# श्री ज्ञा ने श्व री

( सुबोधिनी )

## अध्याय तेरावा

## "क्षेत्रक्षेत्रज्ञ योग"



फलटण

१९५४

डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर

# प्रस्तावना

## क्षेत्रक्षेत्रज्ञविभाग योग.

आणि तेणेंचि ईश प्रसादें। श्रीगुरु संप्रदायलब्धें।
सांच ज्ञान उद्‌बोधे। कोंवळें जें॥

जें अद्वेष्टादिकी प्रभृतिकी। अथवा अमानित्वादिकी।
वाढविजे म्हणौनि लेखीं। बारावा गणू॥

तरी त्रयोदशीं। अध्यायीं गोष्टी ऐसी।
श्रीकृष्णें अर्जुनेसी। चावळिली॥

जें क्षेत्रक्षेत्रज्ञ योगें। होईजे येणें जगें।
आत्मा गुणसंगें। संसारिया॥ १८। १४५६–४८॥

ज्ञानकाड बारापासून ते पंधरा अध्याया अखेर आहे ईश्वराला उपासनेनें प्रसन्न करावें त्याच्या कृपाप्रसादानें व श्रीगुरु संप्रदाय अनुसरल्यानें जें कोवळें सत्यज्ञान उत्पन्न होतें–अनुभवास येतें तें बाराव्या अध्यायांत 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' या श्लोकापासून सागितलें आहे, किंवा तेराव्या अध्यायाच्या 'अमानित्वं' इत्यादि श्लोकाच्या भागात वर्णिलें आहे. म्हणून बाराव्या अध्यायाची गणना ज्ञानकाडातच आम्ही करतो–माउलीनें केली आहे बाराव्या अध्यायापासून पंधराव्या अध्याया अखेर चार अध्यायांत 'ज्ञानाच्या फलाची परिपक्वता' हा विषय सागितला आहे

क्षेत्र व क्षेत्रज्ञ याचें स्पष्ट विवेचन, समग्र विवेचन केलें, त्याच्यात भेद तो कोठें व कसा तें उत्तम प्रकारें दाखविलें आहे, म्हणून त्या तेराव्या अध्यायास 'क्षेत्रक्षेत्रज्ञविभाग योग' असें यथार्थ नांव आहे.

अध्याय पहिला ही गीतेची प्रस्तावना. अध्याय दुसरा हा साख्य शास्त्राचा सिद्धात. हें गीताशास्त्र ज्ञानप्रधान असून, ज्ञाननिष्ठ व कर्मनिष्ठ ह्या दोन निष्ठाच्या रूपानें स्वतंत्र आहे अध्याय तिसरा हें कर्मकांड अज्ञानानें जखडलेल्या जीवास मोक्षप्राप्ती करून देणाऱ्या कर्ममार्गाच्या म्हणजे साधनाच्या विचारानें तसेंच काम्य व निषिद्ध कर्माचा त्याग करून विहित आचरण बिनचूक करावें—शुद्ध भावानें कर्म आचरावें असा निर्णय देवांनीं तिसऱ्या अध्यायांत दिला आहे. देवता काड (ऊर्फ उपासना काड) हें अध्याय चौथ्यापासून तो अकराव्या अखेर आहे ईश्वराची उपासना कर्मयोगाच्या द्वारें कशी करावी, ह्या विषयाचा आरंभ चौथ्या अध्यायाच्या शेवटीं केला आहे. तेथपासून तों अकराव्या अध्यायाच्या म्हणजे 'सर्व वस्तु दर्शनाच्या' अखेर पर्यंत आठ अध्यायात ईश्वराची उपासना कर्माच्या साधनद्वारें करावी हेच तत्त्व सागितले आहे.

"नरदेह प्राप्त झाल्यावर परमार्थ सिद्धीकरिता अवश्य असलेल्या गोष्टी करण्यास हा तर देहच विघ्नें करीत असतो. देहाच्या सगोपनाविषयीं व इंद्रियादिकांच्या तृप्तीविषयीं जीव तत्पर होऊं लागतो व मग तो श्रेयस्कर मार्गास विसरतो. देहाचें आयुष्य तोडण्यास दिवस व रात्र हीं प्रवृत्त झालीं आहेत असें मानून विवेकी पुरुषानें (युक्ततेनें असण्याचा कंटाळा करूं नये–देह बुद्धि त्यागास) देह सोडून जाण्यास–असण्यास एका पायावर उभें असावें. नरदेह श्रेष्ठ अशा या जन्मामध्यें जीवाला परमात्म्याची प्राप्ती करून घेता येते, तशी ती कोणत्याहि अन्य जन्मात करून घेता येत नाहीं. त्यास्तव ज्ञान, भक्ति वगैरे साधनाचा आश्रय करून जर जीव हा संसारांतून पार पडणार नाहीं तर तो आत्मघातकीच समजला पाहिजे (भागवत ११–२०)"

यावच्चंद्रदिवाकरौ जीवितानें जगत ऐस असा आशीर्वादच कीं एक ह्या स्थिरचरानें भूगोल खगोलादीनी द्यावा जसा का असा, अशी ही गुरुसेवा–जीवो गुरुः–हा जन्म म्हणजे जीवसेवाच एक करण्यासाठीं आलेला तेथें ह्या जीव जीवित जीवनानें जें काही एक असणें जसें का एक उमललेलें फूलच हा देह म्हटला जाणारा असा म्हणून ही सेवा आतां आली. येथें सर्व जगत् तर अति प्रसन्न होऊन जें तें आनंदास येणें, म्हणून अहो! येथें सर्व आनंदाचा एक उत्कर्षच, तेथें ह्या जीवितास वागविणें तें कसें हें कांही पदरात पाडून घेणेंच तें बरें नच व्हावें ते?

येथे आत्मानात्मवर्ग एक व प्रकृति पुरुष विवेक दुसरा ह्या दोनच बाजू विचारास नेहमी उचल देणाऱ्या असल्यानें येथे देव देवांनीही पण असेंच म्हटलेली ही जी क्षेत्रक्षेत्रज्ञाची सेवा जाणीव भान गोठी हीच मुळीं परम कल्याणाची अशी असल्यानें तीच कीं सेवा असें आम्हीही मानतो

येथे जो जन्म तोच मुळीं कसा ह्या पंचमहाभूताच्या सूक्ष्मांशाचा तन्मात्राचा केलेला त्याजबाबत सातव्या अध्यायात बोलिलें तें कसें तर अष्टांगानी असलेली जी जडा, गौणी, प्रकृति व अन्या परा जीवभूता प्रकृतीनें जगत् धारण केलेलें–सृष्टीनें सृष्ट असा देह दर्शविलेला, व्यापिलेला, आकळिलेला, उजविलेला असून तेथें कसलीं तत्वें कां काय आहे तें छत्तिसानीं सागून सदतिसावें जें तत्त्व तेंच परमात्मरूप म्हटलें – ह्या छत्तीसाचे केलेले हे देह त्यांस शरीर क्षेत्र स्थूल देह आकार प्रकृति म्हटली–लिंग शरीर ते चोविसावें अथवा सतराचें [(म्हणजे इच्छा द्वेषादि शिवाय जें शरीर तें) होय, संस्कार संसर्गादिनीच मुळीं २४+५+७ छत्तीसाचें होणें तेही इच्छादि सात मिळविली असतां होते म्हणून]. एकंदरीत क्षेत्र हें विकारासहिततेंच ते छत्तिसाचें आहे असें होय. (म्हणूनच जेव्हा का सर्व छत्तीस गुणानीं आपआपली ती प्रीतीची ती सोय का जोपासना पाहिली का सापडविली होते, तेव्हा कुंडलीमध्यें छत्तीस गुण उतरले म्हणतात. तेथे प्रीती-योगच एक महत्त्व पाहून आहे. तेथें विकाराचें नाव ऐकूं नच येणारें व्हावें कीं! असें मानिलें होते. ह्या जीवांशानें नेहमीं हरएक प्रसंगीं प्रफुल्लितपणा घेऊन असावें ते क्षेत्रच हें मुळीं कीं आपआपल्या परीनी ज्यानी त्यानीं तेथीलच्या गरजा पुरविणे का उणीवा भरून काढणें, ते बोलविणें का डोलविणेंच एक झाल्यानें तेथें ह्या क्षेत्रसंबंधीचा उहापोहच एक नेहमी, ह्या जगास नव्या नव्या गरजा त्या भागवाव्यात कशा अशा तऱ्हेचा प्रसंग सळ देणारा होय—एकंदरींत पुरुषच एक काय तो स्पष्टपणें दाखवून दिला आता हें ओझें—ह्या देहास वागविण्याचें तें सर्वथैव प्रकृतीवरच मुळी सोपविले–अजमाविले, मानमान्यतेचें व्हावे ना म्हणून तिजवरच तें ठेविलें–ठेवावें म्हणून ह्या गुणांची–भूषणाची जोपासना ज्या ज्ञानानें अथवा ज्ञानाची उपाय-योजना ज्या गुणानी का अलंकारानी होत असते तेंच अगोदर तिजपुढें केलें ( वर जे काहीं ह्या गुणप्रवृद्ध-तेच्या उलट तें अज्ञान म्हटले ) ह्या लिंगदेहासच मुळी ती धग का आग अथवा आच बसणारी ह्या तापाची ( अधिभूत, अधिदैव, अध्यात्म ) म्हणून अगोदर ह्या ज्ञानासंबंधींच सांगितले. आता जो तो आपआपल्या योग्यतेवरच कीं हें ज्ञान आपल्या घरी पाळणारा–पोसणारा असा मानिला गेला—सर्व जगत् हेंहीपण त्याच ज्ञानासबंधीचे–संबंधीच एक असें ज्ञेयावर–जाणण्यास योग्य, स्तुत्य मानते—येथें सगुण निर्गुण दोन्हींही तोलिले ते ह्या जगतामध्यें कसे वागविता येतात, निर्गुण महत्त्व तें केवढें तरी महदंतराचें ते बोलिले–आत्म अनात्म पुरुष प्रकृति क्षेत्रज्ञ क्षेत्र देहराज देह सत्कर्म, मध्यम निषिद्ध पुरुष विश्वतोमुख देखण्यास दिला. गुण हेही प्रकृतीचे केलेले—ह्या प्रकृतीचा जो एवढा मोठा खटाटोप तो फक्त प्रकृतीचे सृष्टीनें सृष्टी ज्या पंचमहा-भूताच्या सूक्ष्म अंशाच्या रूढविलेल्या, सूक्ष्म म्हटलेल्या का सृष्ट म्हटलेले जें तेंच मुळी मोक्षरूप व्हावें–करावें–असावें तेंच मुळीं ह्या एवढ्या व्याख्यानाचा उद्देश होय

गुरुसेवा, बुद्धि प्रियतमा, अवधूताचे चोविस गुरु = मनुष्य देहाचा तागा घेऊन आलेला त्यानें जगास रुसूं नये. संसारिक नगारा आटतो तेथें प्रियाची परमसीमा तो आत्मा भेटतो.

ज्यास आपली कृपा आहे, त्यानें-पतिव्रता पतीच्या मनास अनुसरून चालली तर तिला अनायासेंच आत्महित भेटतें तसेंच-श्रीगुरुवचनांस जतन करावें-व्हावें म्हणून जो आपली दृष्टि योजतो, असा (पुरुष मनुष्य) शिष्य आत्मभुवनामध्यें पैस करतो

अशी योग्यता पाहिजे त्याने गुरुवचनादिक दिवा पुढें करावा. जगास श्रुतिवाचून दुसरी माउली नाहीं तेंचि या ब्रह्मीं मेळवितें. वेदांच्या निरोपावेगळें काहीं करूं नये

देहामुळें आपणा सर्वस्वास देवराया, दुजा असा केला, तुम्हास पुढे करून उपायास लागले तेथें तुम्ही त्याच्या मागेच असता, ध्यानानें पाहातो, त्याचे देशी सापडत नाहीं. तेथे ध्यान हे विसरते व प्रेम तेवढें तुम्हास पोहोचते. सुताची दशा दीपसगाने दीप होते, तसेंच तुम्हास प्रणिपात केल्यानें पूर्णपणच एक अंगी येऊं पाहतें-येऊं होते.

पृथ्वी क्षमा धारण करते. पर्वत व वृक्ष अहेतुक परोपकार करतात. वायू-प्राणवायू-आहारादि पदार्थानी मनाची व वाणीची सुस्थितीच्या योगे ब्रह्मचिंतन घडावें इत्यादि गुरु चोवीस म्हणून पदार्थमात्र प्रेमाचे करून आपण त्याच्या प्रेमाचे झालेले जे मनुष्यरूपानें जन्मलेलें अवतरलेलें परब्रह्मच ! आता उदयास आलेले कीं ज्ञानसूर्यच जमा त्यासच कीं आपले म्हटले पूर्वजक कीं तो एक तेथेच प्रेम वस्ती केलें जगही धुंडलें तरी तें नच भेटणारें तें आतां भेटल्यानें आपला सर्व जीवच तेथें लाविला असें तें गुरुगौरवाच्या आदराचे जीवन ! जीवित हेंच प्रेमरूपच आनंदास आलेलें नादण्यास आलेला आनंद असे. प्रेम नाहीं असा मनुष्य नाहीं. ती प्रेमाची दिशा ! मन आनंदलें, प्रशस्त झाले, तेंच स्वहिताकडे वळविलें तर, स्वत.सहित अनेकाचे ठायीचें तें प्रेम होते. बुद्धि हीच जागी अशी कल्याण पाहाणारी, तर ते प्रेम जीवितास येतें. जिवंत असें ते सततचें होते ! जिवंत पाण्याचा झरा ! " आयुष्मान् हो " असा आशीर्वाद देणारें ते प्रेम, गोड, मोहक रम्य प्रिय !

प्रेम ह्या देहगावी एकले पाहून प्रेम दावे लाविले ते आता बोलूं लागले जन्माचे बिरडे केव्हा फिटेल ! स्वामी आत्मा प्राणनाथ केव्हा भेटेल ! जीवदशेनें असलेली प्रकृती प्रेमाची विरहिणी होऊन आहे ! प्रेम-भेटीसाठी निमिष हें युगच असलेले भासते ! तेथे प्रेम भेटले तर गतायुषास आयुष्य भेटलें, सुकत चाललेल्या झाडावर अमृताचा वर्षाव झाला ! रंकास द्रव्याचा ठेवा भेटला ! आधळ्याचे डोळे उघडले ! भिकाऱ्यास इंद्रपद भेटलें असें होते !

श्री ज्ञानेश्वर माउलींनी अत्यंत महत्त्वाचा असा हा तेरावा अध्याय अतिशय थोड्या अवधीत पुरा करून घेतला हें त्यांच्या कृपावलोकनाचे प्रतीक होय-आपल्या कृपादृष्टीचा असाच नेहमी प्रसाद असावा अशी माउलीचे चरणीं नम्र विनंति करून ही लेखणी आटोपती घेतो

**" ही कृती श्री ज्ञानेश्वर माउलीचे चरणीं अर्पण असो. "**

**फलटण,**
१४-२-१९५४

संताचा दासानुदास,
**डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर.**

# क्षेत्रक्षेत्रज्ञ योग

## स्पष्ट मांडणी

( भाग १ )

**ओव्या १–१५९** **श्लोक १–६**

### क्षेत्रक्षेत्रज्ञ योग

क्षेत्र म्हणजे एतद् क्षेत्र–छत्तीस तत्वें शरीर देह हे क्षेत्र म्हणिजे. ह्या शरीरास क्षेत्र (शेत) म्हणतात. क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा (तत् क्षेत्रविद् क्षेत्रज्ञ इति आहुः) शरीर हें माझे आहे असे जो जाणतो त्यास तत्वज्ञानी क्षेत्रज्ञ म्हणतात. क्षेत्रक्षेत्रज्ञाचे ज्ञानास आम्ही मानतो असे भगवतानी म्हटलें आहे. ह्या क्षेत्रामध्यें क्षेत्रज्ञ तो मी जाण. विकाररहित प्रकृति व निर्विकार पुरुष (क्षेत्र व क्षेत्रज्ञ) याचें जे तत्वतः ज्ञान तेंच ज्ञान. ह्याहून इतर ते पाडित्य होय असें माझें मत आहे.

**छत्तीस तत्वें**

पञ्चमहाभूते, अहकार, बुद्धि, अव्यक्त, प्रकृति, दहा इंद्रियें, मन, दहा विषय, इच्छा, द्वेष, सुखदुःख, संघात (स्थूल देहाचा पिड), चेतना व धृति = ३६.

जें क्षेत्र ते कसले आहे, कसें ते विकारी होतें, ते ज्यापासून होतें ते काय आहे, तो क्षेत्रज्ञ कोण? जो प्रभाव तो काय, कसला, ते सगृहत्वें करून सागतो ऐक. ब्रह्मसूत्र पदानी निश्चित केलेल्या हेतूच्या व वेद छंदाच्या द्वारें हें क्षेत्र व क्षेत्रज्ञाचें ज्ञान ऋषींनीं बहुत प्रकारे गाइलें आहे.

### क्षेत्र घटना

**पंचमहाभूतें–अहंकार–बुद्धि–अव्यक्ताची ओळख**—परा व अपरा मधील दुसरी जी अपरा म्हणजे जीवदशा तिला येथे अव्यक्त असा पर्याय आहे. **मन** हें नाव व्यर्थच पण सत्तत्व तेंच उजू व्हावे असा तेथीलचा हेतू जाण. इद्रिय व विषय याची भेट झाली म्हणजे त्रठच एक उभे होते. त्वरिततेनें कामाचा हात धरून जी वृत्ति वेगाम येते ती **इच्छा.** इच्छेसारखे ह्या इंद्रियाना विषयभोग न जोडले गेले तर जो पेच पडतो तो **द्वेष.** चैतन्याची सत्ता **चेतना** म्हटली, प्रेमस्वरूप ईश्वराचें तेंच मुळीं येथें चेतना वर्गानें असलेले होय. स्वाभाविक सोबतीच ते म्हटले. तत्वाचा जातिस्वभाव परस्पर का एकमेक वैर करणारा जरी तरी एकमेकाना सहन करणारी ती तत्वे होऊन देहरूपी ऐक्यानें जन्मली, स्पर्धा कलह सोडून एकत्र वसली, ती स्वाभाविक गुणानी एकमेकाना पोसतात–पोषण देतात. द्वंद्व व द्वेष सोडून भेटीनें असतात. सहज मिळाले त्यास भलेपण देऊन सिद्ध करणें ज्या धैर्यामुळे होतें त्यास धृति हे नाव आहे. ३६ तत्त्वे एकत्वास येतात जेथे त्यास क्षेत्र म्हटले. परतत्त्वाच्या अलिकडे ब्रह्मदेवापासून मुगीपर्यंत जडाच्या आत जें निर्माण होतें ते क्षेत्र होय.

**ओव्या १६०–१८४** **श्लोक ६**

### गुणविवेचन पुढें (चौदाव्या अध्यायांत) करूं. प्रस्तुत ज्ञानाचें रूप दाखवूं

सविस्तर क्षेत्र सागितले, आता उदार असें ज्ञान ऐक. या ज्ञानासाठीच तर योगी स्वर्गाचा आडमार्ग ओलाडून गगन कीं गिळून असतात, सिद्धीची का पूर्णतेची चाड धरीत नाहीत, उद्यम

संपन्नतेची भीड धरीत नाहीत–नुसतेंच एक योग्य होणें अशी संवय ते तुच्छ मानतात. कोट्यवधी तपे (यश) ज्ञानावरून ओवाळून टाकतात. देह प्रारब्धरूपी वेल उल्घून नाहिसा करितात–अगदीं उघड्या अंगानें भजनमार्गामध्यें धाव घेऊन असतात–दुसरे सुषुम्नेच्या मार्गामध्यें आपली रीघ करून असतात. श्रेष्ठ तपस्थ्याची आवड, उत्कटा ज्ञानप्राप्ती करिता वेदवृक्षाच्या पानापानावरून हिंडते–वेदातील अर्थाचें शोधन करिते. शेंकडोंनें जन्म गुरुसेवा येईलच या बुद्धीनें ओवाळून टाकितात. ज्ञानात प्रवेश अविद्येस खाली पाहावयास लावितो. जीव व आत्मा याचे ऐक्य अतिरम्यतेनें माडून देते–असें ते ऐक्य इंद्रियाची द्वारें बद करितें, प्रपचाचे, प्रघाताचे, मनाच्या सळाचे पायच मोडून टाकितें, मनाचें हलकेपण नाहिसे करितें. ही ज्ञानप्राप्ति जीवदशेस वल्लभत्व–प्रेमाचें वालम जोडले अशी मोय करते, अज्ञानाची धुदी पुसून टाकिते. गर्वाचा टावठिकाणा नाहिसा करिते–अज्ञात भ्रातिदुःख शमवितें, दुजेपण उरूं देत नाही, सकल्प-विकल्प करण्याची संवय शुद्धि घेते, अनावर वस्तूमुळें त्यास ज्ञेय तर कवटाळून असते–उजाळपणावर बुद्धीचे डोळे उघडले होतात. जीव हा अनताच्या तृप्तीवर विश्राति घेतो. आत्म्यास लागलेली ही जीवपणाची बुद्धि जी क्षयव्यथाच एक ती ज्ञानाच्या सान्निध्यानें निरोगी होते.

**ओव्या १८५–८६४** **श्लोक ७–११**

## ज्ञान

अमानित्वादि अठरावीस अंग (ती येणेंप्रमाणे–मानदंभ नसणें, अहिंसा, क्षमाशीलता, मनात व वाचेंत सरळपणा, गुरुसेवा (स्वस्वस्तिक–ज्योतिर्माला जीवो गुरुः) अन्तर्बाह्य शुचिर्भूतपणा, बुद्धिस्थैर्य, मन व इंद्रियासह शरीरनिग्रह, मनोनिग्रह, इहपरभोगवैराग्य, अहकाराचा–गर्वाचा अभाव, जन्म-मृत्युजराव्याधि दुःख याचे ठिकाणी दोषदृष्टीनें पाहाणें, अनासक्ती, स्त्री, पुत्र, गृह याचे ठिकाणीं लपट नसणें, इष्ट अनिष्ट उपपत्तीचे टाई चित्ताची समता, अनन्यपणाची अढळ भक्ती, एकातवास, ग्राम्य लोकसमुदायात जाण्याचा कटाळा, अध्यात्मस्वभाव ज्ञानाचे नित्य अनुशीलन, तत्वज्ञानाच्या अर्थाचे–पचतत्व शिवात्मक–मोक्ष ज्ञानाच्या अर्थाचे स्वरूप आलोचन अशा या साधनीभूत उपागाहून विपरीत का विरुद्ध ते अज्ञान.

**ओव्या ८६५–९३९** **श्लोक १२–१७**

## ज्ञेय जाणल्यानें मोक्ष मिळतो-मोक्ष मिळण्याच्या योग्यतेचा होतो-मोक्षाच्या योग्य होतो

(अनादिमत् पर ब्रह्म) अनादि असे सर्व श्रेष्ठ ब्रह्म, ते सत् असेंही म्हटलेले नाहीं व असत् असेंही म्हणत नाहीत. **त्याला सर्वत्र हात पाय आहेत** (विश्वबाहु), त्याला सर्व बाजूनी डोळे, डोकी, मुखे आहेत. त्याला सर्वत्र कान आहेत. (विश्वतः चक्षु, विश्वमूर्धा, विश्वतोमुख, शब्दजाती–सर्वत्र कान) ते सर्वांना व्यापून राहिले आहे.

**तें अनासक्त आहे,** आसक्तीरहित आहे, सर्वभृत्–योगमायेनें सर्वाचें धारण पोषण करणारें आहे, निर्गुण आहे, गुणभोक्ते आहे.

**भूतांच्या अंतर्बाह्य आहे,** अचर आहे, चर आहे, अति सूक्ष्म असल्यामुळें ते अविज्ञेय–जाणण्यास अशक्य आहे. ते दूर असून जवळही आहे. ते सगुण तसेंच निर्गुण आहे.

**क्षेत्र रूपानें व्यापक आहे, अखंड आहे.** आकाशाप्रमाणें अविभक्त अखड असें सर्व भूतांमध्यें क्षेत्रज्ञरूपानें विभक्ताप्रमाणें भरलेले. प्रभविष्णु–सृष्टीवेळे जया ब्रह्मा म्हणति (ब्रह्मारूपानें सर्वांना उत्पन्न करणारें) भूतभृत् व्याप्तीने विष्णुनामा (विष्णुरूपानें सर्वांचे धारणपोषण करणारे) आकारु हारपे तै रुद्र (ग्रहिष्णु–रुद्ररूपानें संहार–आटणी करणारें. ते (ब्रह्म), तेजाचेंही तेज, अंधाराच्या–मायेच्या अत्यत पलीकडचें, ज्ञानरूप = बोधरूप, ज्ञेयरूप = ब्रह्मरूप, ज्ञानगम्य = ज्ञानानेंच फक्त जाणलें जाणारें असें. (सर्वस्य हृदि धिष्ठितम्) सर्वांच्या हृदयात विशेषरूपानें अधिष्ठित आहे; मनात ठसल्यानें उत्कठा, सेवा व तद्रुपता पावतात.

**ओव्या ९४०–९५९** **श्लोक १८**

**क्षेत्र, ज्ञान, ज्ञेय** तत्वता जाणल्यानें भक्त माझ्या स्वरूपाला पोहोंचतों; असें क्षेत्र, ज्ञान व ज्ञेय समासतः – संग्रहत्वें करून सागितलें–आतापर्यंत विवेचनानें स्पष्ट केलें. **एतद् विज्ञाय मद्भक्तः मद्भावाय उपपद्यते** हें जाणल्यानें माझा भक्त स्वरूपाचा होतो. त्यास आत्म्यपरमपरमात्म प्राप्ति होते. ज्ञेय ब्रह्म आकारलें–ब्रह्माकार म्हटले, उगवलें तोच पुरुष.

आता पाचा ठायींचे न करता हे ठायींचे दोन असे करू: **आत्मा** म्हणजे **पुरुष. अनात्मा** म्हणजे **प्रकृति** (आत्मानात्म विचार क्षेत्र क्षेत्रज्ञ ज्ञान) प्रकृति पुरुष संप्रदाय त्यास साख्ययोग म्हणतात. आत्मा (पौरुषेय–आत्मीय) अनात्मा (प्रकृति परतत्र) प्रकृति पुरुष हीं दोन्ही एकमेकास सोडून असत नाहींत. क्षेत्र म्हणजे प्रकृति, क्षेत्रज्ञ म्हणजे पुरुष, पुरुष हा सत्ता, प्रकृति ही क्रिया होय.

**ओव्या ९६०–१०२९** **श्लोक १९–२२**

## चित् रूप आत्म्य परम प्राप्ति

**प्रकृति पुरुष हीं दोन्ही अनादि आहेत.** प्रकृतीपासून विकार व गूण उत्पन्न होणारे होत (प्रकृति संभवान्). प्रकृति ही कार्य = शरीर, कारण = इद्रियें, मन, बुद्धि, अहकार इत्यादींनीं कर्तृत्व हें मूळप्रकृती कारण आहे. (जीवात्मा = पुरुष सुखदुःखाच्या भोगाला कारण आहे*.)

प्रकृतिस्थ पुरुष प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या गुणाचा उपभोग घेतो (भुक्ते) असा हा गुणसंघ प्रकृतिगुणाविषयींची आसक्ती ही, पुरुषानी बऱ्या वाईट योनीत जन्म घेण्यास कारण होते. प्रकृती पुरुष याचा संग घडत नाही तरी प्रकृती जगास प्रसवते म्हतून पुरुष निर्गुण व प्रकृती माया, पुरुष स्वतः काहींच नाही पण प्रकृतीच विकार होऊन निर्गुणास गुणरग लावते, प्रकृतीच्या स्वाधीन झाल्यानें पुरुष हा गुणाचा भोंवराच बनतो व गुणसगामुळें त्यास जन्ममृत्यूचे भोगणे भोगावें लागते–पुरुष निःसंग म्हणून त्यास भोग ते केवळ भास होत.

**आत्म्यसम श्रेष्ठभाव–परमात्मस्वरूप**—गुणसहीत प्रकृति आणि पुरुष याना जाणण्याचें फल (अस्मिन् देहे पुरुषः परः) देहात असूनही देहातीत **साक्षी,** अनुमोदन देणारा **अनुमन्ता,** धारण पोषण करणारा **भर्ता,** जीवरूपानें **भोक्ता,** ब्रह्मादिकाचा स्वामी म्हणून **महेश्वर,** शुद्ध सत्चिदानंद स्वरूप म्हणून **परमात्मा** म्हटला आहे–म्हटला होतो. प्रकृतीच्या पलीकडील असें हें पुरुषाचें परमात्म्याचें स्वरूप जो जाणतो किवा असें ज्ञान ज्यास झालें आहे ते म्हणजे प्रकृती सर्व काहीं करणारी आहे असें जो जाणतो त्यानें देहाच्या संगतीनें काहीही कर्मे केली तरी तो अलिप्त रहातो.

---

*पुरुषयत्न = दीर्घप्रयत्न, कर्मयोग, त्यागोहि पुरुषव्याघ्रः, विना पुरुष कारेण दैवं न सिध्यति–पुरुष साडेतीन हात उच किंवा खोलीचा.

**ओव्या १०३०–१०५०** **श्लोक २३–२४–२५**

**आत्मस्वरूप रूपपरम–प्रत्यक्षपण परमात्मस्वरूप दर्शन साक्षात्** देहधारी कीं म्हणून देह मोहाने घेतला, आवरला, आडवला जात नाही व देह गेल्यावरहि पण पुन्हा तो 'देहधारीच कीं एक' असा होत नाहीं–हें रूप, ही छाया, हें जल, ही माया असा निवाडा झाल्यानें तो जरी एक देहधारी, तरी देह मोहानें घेतला जात नाही, आणि म्हणूनच कीं लोकोत्तर असा उपकार महत् व्यापकतेनें तें कसें पुरुष प्रकृतीचें असणें असा विवेकच एक त्यास त्या व्यापकतेनें व उत्कंठिततेनें तें प्राबल्य, ते दर्शन की एक विवेकाचे–सूर्य उदय–भानूच (बृहत्, बृहत्) असून–ज्ञानदृष्टीरूपी डोळाच एक उगवल्या प्रमाणें पुरुषाला व गुणासह प्रकृतीला जो जाणतो तो वर्तमान देहानें गुणांमध्यें वर्तत असला तरी तो पुन्हा जन्म पावत नाहीं.

**आत्मरूप दर्शन 'पश्यंति'चे उपाय निरनिराळे**—(परम, तत्पर, उपरम, आत्म, उत्कंठा, रूप.) कोणी आत्मानात्मविचार ज्ञान तत्व ध्यानानें कोणी सांख्ययोगानें, कोणी कर्मयोगानें, कोणी एक (अजानन्तः श्रुत्वान्येभ्यः) लोक सत्पुरुषाच्या उपदेशानें अनुभवियापासून उपासना पद्धति ऐकून घेऊन तीस अनुसरतात व मृत्यूस उल्लंघितात.

**ओव्या १०५१–१०५६** **श्लोक २६**

**(यावत् किंचित् सत्वं स्थावरजंगमं तत् प्रकृतिपुरुष संयोगात् संजायते, विद्धि)** भूतमात्राची, सर्व प्राण्याची उत्पत्ति प्रकृति, पुरुष–क्षेत्र क्षेत्रज्ञ–संयोगापासून झाली आहे. म्हणून भूत सृष्टि क्षेत्रज्ञाहून निराळी नाहीं. सर्व भूतें एकाचीच रूपें आहेत. ती एकच आहेत. निरनिराळीं नावें व निरनिराळी गति म्हणून भूते ती निरनिराळीं आहेत असे समजशील तर ह्या संसारातून तुझी सुटका कधीही व्हावयाची नाही. भूतांचा हा नामरूप खेळ नाशिवत आहे पण आत्मा शाश्वत आहे.

**ओव्या १०५७–१०७९** **श्लोक २७–२८**

**परमेश्वर सम असा पाहणें 'पश्यति' पाहणारे जे ते** म्हणजे सर्व नाशिवत भूतमात्रांमध्यें भरलेला तो सर्वांठाई सारखा असा परमेश्वराला ईश, आत्म, परम, ईश्वर, आत्मअनात्मवर्ग, ईशत्व, वशित्व, ईश्वरायते (ईश=स्वाधीन करणे), परम-श्रेष्ठ, परम, तत्परतेने जो वाणी, ख्वाणी, अक्षर, इज्जत, अब्रु, लाज, लज्जतेनें पाहातो तोच जागतेपणानें असतो. (सर्वेषु विनश्यत्सु भूतेषु सम तिष्ठति।) (अधिभूत क्षरोभावः) **भूतें नाशिवंत तरीपण अविनाशी असा परमेश्वर** सर्वत्र सारखा भरलेला आहे. असें जो समबुद्धीनें–सम पश्यन् आत्मसम तत् साम्य–वाणी, अक्षर शब्दानी पाहातो, तो आत्मघातकी होत नाहीं. **देह म्हणजे शरीर हें त्रिगुणांची व इंद्रियांची केलेली धाकौटी (पिशवी)** आहे तों पर्यंत आत्म्याचा घात करीत नाहीं व देह पडल्यावर त्याच आत्म तत्वात मिळून जातो. (न हिनस्त्यात्मनात्मानं) म्हणून तो उत्तम गतीला पावतो. **परब्रह्माचे ठायीं विश्रांतीस येतो.**

**ओव्या १०८०–१०८३** **श्लोक २९**

**प्रकृतीची माया कर्मं करविते–कर्मं प्रकृतीकडून केलीं जातात–आत्मा उदासीन असतो असें हें आत्म्याचें स्वरूप आहे असें जाणावें आत्मा अकर्ता** (आत्म्य–तत् तादात्म्यतेचा) आहे, असें जो पाहातो तोच खरा ज्ञानी होय. (तत् मय=तन्मय, आत्मीय–स्व, सर्वस्व.)

**ओव्या १०८४–१०९३** **श्लोक ३०**

**भूतांचा भिन्नभिन्नपणा म्हणजे भाव, भूतांची पृथक्‌रूपता एकस्थ आहे एका आत्म्यामध्येंच स्थित आहे,** पण भूतांची पृथक्‌रूपता पृथकतेने न पाहाता, एकत्वाचे भावाने पाहाणें नच केले तर संसारांतून मुक्तता होणेंच नाहीं. म्हणून आत्मा देहात आहे असें म्हणणें व्यर्थ होय. देह विनाशी पण आत्मा शाश्वत असल्यामुळें तो ह्या देहात आहे असें म्हणतां येत नाहीं. जग हें ब्रह्माचा विवर्त तेथें विपरिवर्तते असेंच म्हटलेले स्व सर्वस्व आपले आपणच (तत् मय तन्मय आत्म तत्= तादात्म्य) हा सर्व विस्तार एका आत्म्यापासून आहे असे जेव्हा पाहू लागतो तेव्हाच की ब्रह्म तत् जें का ब्रह्म जें त्याची प्राप्ती होते.

**ओव्या १०९४–११७१** **श्लोक ३१–३४**

**आकाशाप्रमाणें आत्मा व्यापकतेनें शरिरास सर्वत्र व्यापून आहे.** देहाच्या गुणापासून प्रकृति कार्यापासून तो अलिप्त आहे एकच सूर्य–कृत्स्न लोक–सर्व ब्रह्मांडास प्रकाशित करितो, तसा एकच क्षेत्रज्ञ, आत्मा सर्व क्षेत्रास–शरीरास–प्रकाशित करितो. आत्म्याच्या सत्तेने शरीरें उत्पन्न होतात व नाश पावतात पण आत्मा तो जसाच्या तसाच कायम असतो.

**असें हे क्षेत्र, क्षेत्रज्ञाचें ज्ञान,** प्रकृति व प्रकृतिकार्य यापासून सुटण्याचा उपाय जाणणारे, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यामधील अंतर, फरक, भेद जाणणारे लोक–भूत प्रकृति मोक्ष–झालेले–जन्मलेले हे प्रकृतिसृष्टीचे ज्ञानतेनें–परम गतीला पावतात.

ह्या ज्ञानाचा आश्रय करून माझ्या साधर्म्यतेप्रत आलेले सिद्ध पुरुष सृष्टीच्या उत्पत्ति काळीं जन्मत नाहींत व प्रळय काळी व्यथा पावत नाहीत. देहाच्या सर्व द्वारात–इंद्रियात व अन्तःकरणात जेव्हा प्रकाश–चेतना व ज्ञान–विवेक–उपजतो तेव्हा सत्व गुण वाढला असे समजावे–सात्विक पुण्य कर्माचें फळ सात्विक, व निर्मळ असें. ते फळ सुख, ज्ञान व वैराग्यरूपानें असतें असें सांगितलें आहे. जो पुरुष अव्यभिचारी म्हणजे एकनिष्ठ भक्तियोगानें मला भजतो तो तिन्ही गुणाना पूर्णपणें उल्लघून सच्चिदानद ब्रह्माला प्राप्त होण्यास योग्य होतो. प्रकृतीच्या गुणाखेरीज दुसरा कोणी कर्ता नाहीं असे जेव्हा द्रष्टा म्हणजे ज्ञानी समजतो आणि तिन्ही गुणाच्या अत्यत पलिकडे असलेलें तत्व ओळखितो तेव्हा तो माझ्या भावाला म्हणजे माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो, मत्स्वरूपी होतो. (१४ अध्याय—२, ११, १६, २६, १९.)

---

## शरीर

१. शीर्यते यत् तत् शरीरम् (शृ–कृश होणें, विरून जाणें, फुटणें)

२. शी–पडणें, राहाणें, निजणें, शि–तीक्ष्ण करणें

नि+पद्=निपद–रक्षण करणें, कृपा करणें, उत्पन्न होणे, बनविणें–सज्ज करणें

**आस्ते भग आसिनस्यात् ऊर्ध्वं तिष्ठति तिष्ठतः। शेतेनिपद्यमानस्य चराति चरतो भगः।**

बसलेला आहे त्याचें नशीब बसलेलें आहे, उभा आहे त्याचें भग–नशीब उभें आहे, जो निजून आहे त्याचें नशीब पडून आहे–जो उत्पन्न होत आहे, कृपा करीत आहे, सज्ज करून आहे, रक्षण करून आहे, त्याचे नशीब रक्षण करीत आहे, जो उगवता आहे त्याचें नशीब उगवतें आहे, जो चालता बोलता आहे त्याचें नशीब चालतें बोलतें आहे.

# स्पष्ट मांडणी

## ( भाग २ )

भक्तियोगी व कर्मयोगी याचा मेळ कसा बसतो ते समजविण्यासाठीं क्षेत्र क्षेत्रज्ञ व प्रकृति **पुरुष-योग** श्रीभगवान् सागतात—

श्रीभगवान् म्हणाले हे अर्जुना ह्या **शरीरास क्षेत्र असें म्हणतात.** कारण ह्यात जें पेरावें तें उगवतें आणि हें **क्षेत्र** जो जाणतो त्या अंतर्यामी आत्म्यास **क्षेत्रज्ञ** असें वेदवेत्ते म्हणतात. (१)

सर्व क्षेत्रात क्षेत्रज्ञ एकच असून तो मी आहे असें जाण. क्षेत्राचें व क्षेत्रज्ञाचें जें ज्ञान तें माझेच ज्ञान मानले जाते. (२)

**तें क्षेत्र कोणतें** व कशा प्रकारचे, त्याचे विकार कोणते व कोणते विकार कोठून आले, आणि तो क्षेत्रज्ञ कोण आणि त्याचा प्रभाव काय, तें थोडक्यात माझ्यापासून ऐक. (३)

ह्याचें **वर्णन** ऋषींनी निरनिराळ्या छदोबद्ध मत्रात विस्तारानें आणि ब्रह्मसूचक हेतुयुक्त निश्चित अशा (गद्य) उपनिषद् वाक्यानी थोडक्यात केलें आहे. (४)

पचमहाभूते, बुद्धि, अहकार, आणि अव्यक्त अशी प्रकृती व मनासह ११ इद्रियें, पचेंद्रियाचे पचविषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना व धृति असे विकार मिळून थोडक्यात विकारा-सहित **क्षेत्र** म्हटलें आहे. (५–६)

मानाविषयी निरिच्छता, ढोंगीपणाचा अभाव, अहिंसा, क्षमा, सरळपणा, गुरूची उपासना, शुचिर्भूतपणा, स्थिरता, मनोनिग्रह, इद्रियाच्या विषयाच्या ठिकाणीं विरक्ती, अहकाराचा त्याग, जन्ममृत्यू–जरा व्याधि दुःख इत्यादि दोषानी हे शरीर दूषित आहे अशी जाणीव, पुत्र, भार्या, गृह इत्यादिकात मग्न नसणें व त्यात चिकटून न रहाणें, इष्ट किवा अनिष्ट प्राप्त झालें असता चित्त नेहमीं निर्विकार ठेवणें, ईश्वराची कधीही अन्यत्र न जाणारी भक्ती, एकात जागी रहाण्याची आवड, लोकाच्या समाजात जाण्याविषयी अप्रीति, अध्यात्मज्ञानाकडे नेहमीं लक्ष, आणि तत्वज्ञानाच्या विषयाची समजूत इतक्या गुणास मिळून ज्ञान म्हणतात. ह्या गोष्टी **परम ज्ञान होण्याच्या पायऱ्या** आहेत. अर्थात् मग याच्या उलट गोष्टी अज्ञानात पडण्याची उतरण आहे. (७–११)

आता **ज्ञेय वस्तु** काय आहे तें मी तुला सागतो. त्याचें ज्ञान झाले म्हणजे मोक्ष प्राप्त होतो; हेच आदि ज्यास नाही असें परब्रह्म होय. ते सतही म्हटलें नाही व असत्ही म्हटले जात नाही. (१२)

त्यास सर्व बाजूनी हात, पाय, डोळे, डोकीं, कान, तोंडें असून ते सर्वाला व्यापून राहिलेंआहे. (१३)

त्याच्या ठिकाणी सर्व इद्रियाच्या गुणाचें काम होतें पण ते सर्व इद्रियानी विरहित आहे, ते कोठेही चिकटलेले नसून सर्वाना धारण करणारे आहे, निर्गुण असून गुणाचा उपभोग घेणारे आहे. (१४)

ते सर्व भूताच्या बाहेर असून आतही आहे, न हलणारें असून हलणारेंही आहे, आणि दूर असून जवळही आहे, ते सूक्ष्म असल्यानें, पूर्ण (पणें) जाणणें अशक्य आहे. (१५)

सर्व भूतात ते स्वतः अविभक्त असून विभक्त असल्यासारखे दिसते. सर्व भूताना पोसणारें, लयास नेणारें आणि उत्पन्नही करणारें तेच ज्ञेय आहे. (१६)

ते सर्व ज्योतीनाही तेज देणारे, तमाच्या पलीकडचे म्हटले जाते, तें ज्ञानरूप आहे, ज्ञानाची वस्तू आहे, आणि ज्ञानानेंच गम्य आहे व ते सर्वाच्या हृदयात स्थित आहे. (१७)

ह्याप्रमाणें **क्षेत्र** तसेच **ज्ञानाचें साधन** आणि **ज्ञेय** (क्षेत्रज्ञ) हे वेदाताच्या तत्त्वज्ञानातील तीन विषय मी तुला थोडक्यात समजावून दिले. कारण माझी भक्ति करणाऱ्यास हे ज्ञान झालें म्हणजे तो

माझ्या स्वरूपात मिळण्यास योग्य होतो. आता प्रकृती पुरुष ह्या साख्य तत्वाविषयीं मी तुला माहिती सागतों. (१८)

**प्रकृती पुरुष** हे दोन्ही अनादि आहेत असे जाण. विकार व गुण प्रकृतीपासून उत्पन्न होतात. (१९)

कार्यकारणाच्या भाव चालण्यास हेतु असलेली ती प्रकृती होय, आणि सुखदुःखाचा अनुभव घेण्यास हेतु असलेला तो पुरुष. (२०)

पुरुष प्रकृतीच्या ठिकाणीं राहून प्रकृतीपासून उत्पन्न होणाऱ्या गुणाचा उपभोग घेतो आणि त्या गुणात आसक्त झाल्यानें तो शुभाशुभ योनीत जन्म घेतो. (२१)

ह्या देहात असणारा हा **पुरुष** प्रकृतीला जवळ असून **पाहातो,** तिच्या कृत्यास **अनुमोदन** देतो व तिचें पोषण करून तिचा **उपभोग** घेतो पण तो वस्तुतः **ईश्वर** आहे. यालाच **परमात्मा** असेंही म्हणतात. (२२)

ह्या रीतीनें पुरुष आणि गुणासह प्रकृती यास जो जाणतो त्यानें कोणतीही कर्मे केली तरी तो पुन्हा जन्मास येत नाहीं. (२३)

कित्येक योगी ह्या **आत्म्याचें** आपल्या ठिकाणी आपल्या मनाने किंवा ध्यानानें **दर्शन** घेतात. तर कित्येक साख्ययोगानें आणि कित्येक कर्मयोगानें. (२४)

इतर कित्येक योग न जाणणारे लोक इतरापासून ह्या गोष्टी **ऐकून** परमात्म्याची भक्तियोगानें **उपासना** करतात. तेही भगवत् गुण श्रवणात सतत रत होऊन जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून मुक्त होतात. (२५)

हे भरतश्रेष्ठा! जी जी **यत् किंचित्** स्थावर किंवा जगम **वस्तु** उत्पत्ति पावते, ती ती **क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून उत्पन्न होते,** हा तू निश्चय जाण—असें निश्चयानें जाण. (२६)

त्यापैकीं क्षेत्र भिन्न भिन्न व विनाशी असून क्षेत्रज्ञ परमेश्वर सर्व भूतात सारखा भरलेला, क्षेत्र नाश पावलें तरी हा नाश न पावणारा आहे, असें जो ओळखतो, तो खरा जाणकार होय. (२७)

सर्व ठिकाणीं **ईश्वर** भरलेला असून **सम आहे असें जाणणारा आपल्या आत्म्याचा—आत्म्यानेंच नाश करीत नाहीं** आणि म्हणून तो **परमगतीला जातो.** (२८)

तसेंच **सर्वत्र प्रकृतीच कर्में करते** असे जो जाणतो व **आत्मा कांहीं करीत नाहीं** हे ओळखतो तो खरा जाणकार. (२९)

जेव्हा **भूतांचा निरनिराळा भाव एका परमेश्वराच्या ठिकाणीं** मनुष्य पहातो आणि त्याजपासून हा सर्व जगाचा विस्तार झाला आहे असे ओळखतो, तेव्हा त्याला **ब्रह्मप्राप्ति** होते. (३०)

हा **शरीरस्थ आत्मा** अनादि व निर्गुण असल्यानें अव्यय **परमात्माच आहे,** आणि शरीरात असला तरी तो काही करीत नाहीं आणि कोणत्याहि कर्मानें तो लिप्त होत नाही. (३१)

जसें आकाश सर्व ठिकाणीं भरलेले असून सूक्ष्म असल्यानें कशानेंही लिप्त होत नाहीं त्याप्रमाणें हा **आत्मा** सर्व देहात असून कोणत्याहि देहाच्या संबधानें लिप्त होत नाहीं. (३२)

जसा एकटा सूर्य ह्या सर्व लोकाना प्रकाश देतो त्याचप्रमाणें हे भारता! हा **क्षेत्री आत्मा सर्व क्षेत्राला प्रकाशित करतो.** (३३)

**क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा हा भेद** ज्ञानचक्षूनें पाहून जे **भूतांना प्रकृतीपासून मोक्ष कसा** होतो हे जाणतात ते **परमगतीला** जातात. (३४)

# विषयाची अनुक्रमणिका

## "क्षेत्र क्षेत्रज्ञ योग"

स्पष्ट दर्शन–ज्ञान हे तोंडी वाजणारें नुसते शब्दानें बोलणें, तें कशाला? ज्ञानाच्या प्रकाशानें ज्याची बुद्धि ज्ञेयाच्या ठिकाणीं पोहोचते तो हातोहात परतत्वास स्पर्शतो तेंच ज्ञान होय, यात काहीं आश्चर्य नाहीं

**श्रोत्यांनीं म्हटलें** आम्हास सन्मानाचा पाहुणेर झाला, ज्ञान विषय उत्तमतेनें सांगितला, म्हणून आता सगुण स्मरण, आमंत्रण देऊन प्रतिस्पर्धी (शत्रु का शेजारी) शंका उभी करणें नको. लेशमात्र ज्ञानासाठीं योगयोगादि सायास करितात आता येथे तर आमचें सहज समाधान झालें ज्ञानानें पोटच भरलें आहे. युगामारखें वाट पहात असणें, पण देखणेंपण तेथें असतें काय? पूर्णचंद्र उगवला तरी गृहाचे व्यापार दिव्याशिवाय देखणेपणाचे होत नाहींत. ६३४–४६

**संतवाक्य**—व्याख्यानाजवळ आठवण चौपटीची झाली स्मृति सडोळस झाली ज्ञानद्रष्टा असा तूं ज्ञानी आहेस .. ... ६४७–५२

श्लोक ओव्या

अद्वस्तु, अचरणु, रूपवर्णनाम नाहीं कां जेथे कांहीच नाहीं तोच मुळीं प्रकृतीचा भर्ता व अशासच कीं सुखदुःखाचें भोगणें होतें. एरव्हीं अकर्ता, उदास, अभोक्ता पण या पतिव्रतेने भोगविला होतो

थोडीशीही रूपाची का गुणाची हालचाल ती भलताही पण खेळ जी लेखास आणते तिला **त्रिगुणघटिता गुणमयी** असें नांव आहे, बहुत काय पण ही अवयवांनीं त्रिगुणत्रयी पूर्ण असे गूणच ते जाण. ही प्रतिक्षणीं नित्य नव्या गुणाची सर्व अशी. हिचा माज जडास पण माजवितो, चेष्टवितो, सस्नेह, सस्निग्ध अशीं नांवें हिची प्रसिद्ध–हिच्यामुळेंच ही इंद्रियें प्रबुध्द–जागणारीं म्हटलीं अहो मन हें नपुंसकच पण हिच्या लोकोत्तरेच्या करण्यानें तर हें तिन्ही लोभ भोगणारें होतें ९८६–९०

## गुणमयीचें लाघव, दैवी माया ... ... ९९१–९५

ही प्रकृति —१. कामरूप मायेचा माडव, माडवि, मंडप

२. मोह भूलरूपी वनाची वसत ऋतूंप येगारी शोभा.

३. दैवी.

४. माया.

अशी हीं नावें प्रसिद्ध आहेत. वाङ्मयाची वाढ, साकारपणाची जोड, अभंगरूपी प्रपंचाची धाडच कीं–काम, ज्ञान, चित्, ललितकला हिजपासून झाल्या, विद्या हिच्याच केलेल्या, इच्छा किंवा ज्ञानक्रिया हीच व्यायली आहे, टांकसाळलेला नाद, चमत्काराचें घर, असा सर्व खेळ हिचाच.

उत्पत्ति प्रलय हे तर तिचे सायंकाळ प्रात काळ होत असें हें असो, पण हें अद्भुत असें मोहनच एक अद्वय, अद्वितीय असें जे त्याचें हें, परमात्माचि परि दुसरा–'जीवो ब्रह्मैव नापरः' असें, दुसरें होय नि सगाचे हे सोयरे हे निराळेसि घरे (आकाशाच्या केलेल्या घरानेंच नुसते वारेच एक की) नादत असते, अशी ही दैवी माया हिच्या सौभाग्यव्याप्तीची थोरी थोर अशी आहे आणि म्हणूनच ती थोरपण विणारी असून ही अनावराते ( मनास ) आवरते मनाच्या ठाईंच तर निपटपणें काहींच नाहीं पण मनासहित आपणच ती सर्व काहीं होते. ही स्वयंभाची–ब्रह्मदेवाची सभूति–वैभव, योग्यता, अमूर्ताची आकाररूप इत्यादि इंद्रियाची मूर्ति = आकारयुक्त वस्तु, सौंदर्य, स्वभाव, देह, आपणच की स्थिति व ठाव त्यास (पुरुषास) होते. ९९६–१०००

अनार्ताची आर्ति, तया पूर्णाची तृप्ति, अकुळाची जाती गोत होते, इत्यादि किंबहुना पुरुषाचे सर्व काहीं हीच होते १०००–०६

या प्रकृतीनें आपल्या पसाऱ्यानें–व्याप्तीनें त्या अविकारास–विकाररहित पुरुषास–विकारास ( विकृति ) आणलें होतें. तेथे पुरुषत्व जें तें प्रकृतिवशेंकरून जमा का चंद्रमा आवसेमध्यें पडला, हीन कस वालभर जीवरूपी सुवर्णास जोडलें तर पंचतत्व शिवात्मकच कीं अशा कसाचें होतें. १००६–०९

**पुरुष प्रकृतीस आला** तर तो स्वतेजास मुकतो, जागता तो स्वप्नीच्या सोसास वश केला जसा. प्रकृतीचे होण्यानें पुरुषास प्रकृतीचे गुण भोगावे लागतात. जसें का अंतौरि गुणानें उदासपणास आकळलें होते, आणि असे जेव्हा जन्म मृत्यूचे घाव वाजतात तेव्हां गुणसंग आसक्तीचा होतो. १०१०–१५

श्लोक | ओव्या

**केवळ पुरुषास होणें भोगणें नाहीं.** येथें गुणसंगच एक सर्व काहीं होण्यास मूळ होय. तापलेले लोखंड पिटलें तर वन्हीसच घाता बोलतात. उदक आदोळलें तेथे प्रतिमाचे नानात्व चंद्रींच कीं आहे असें लोक म्हणतात–आरसाच जवळ तर मुखास दुजेपण जसें येतें–कुंकुमानें स्फटिकास लोहितत्व म्हणजे तांबडेपणा जसा–तसा गुणसंघाने हा अजन्मा जन्म पावतो असा भासतो एरव्हीं नाहीं. अधमोत्तम योनि यास अशा मानाचे किंवा परिमानाचे होण्यानें–जसा का सन्यासी स्वप्नामध्यें अत्यजाची जाति.) — १०१६–२१

२२ **देखरेख करणारा, साक्षी, संमती देणारा, अनुमंता, पोषण करणारा, भर्ता, भोक्ता म्हणून ईश्वर, परमेश्वर म्हणून परमात्मा अशीं ह्या पुरुषास नांवें येतात.**

परमात्मा पुरुष प्रपंचात महत् ब्रह्म गोसावी असा प्रवाद अपारपणे मोजतो, विचारात घेतो, सृष्टीमधील अनंत काळ ह्यालाच मिळतात (प्रकृतीला). कल्पाताचे वेळी अनंत काळ ह्याच्याच पोटात शिरतात — १०२२–३६

प्रकृतीमधे उभा टेक देण्यापुरता जुईच्या वेलाकरिता खाब जसा–यांत व प्रकृतींत जमीन अस्मानाचें अतर आहे. प्रकृतीला पृथ्वीच नभ म्हटलें. फरक का योग्यता प्रकृतिरूप नदीचे किनाऱ्यावर मेरूच जसा सरितेमधे बिंबतो, पण तिच्या प्रवाहातही हा वाहून जात नाही आगलोट तो लोटावा का लुटावा का लुटवावा कसा ते काहीं जाणत नाहीं

प्रकृति उत्पन्न होते, लय पावते, हा तर जशाच्या तसाच असलेला केव्हांही म्हणून आब्रह्मस्तंब पर्यंतम् हा पुरुष शासनच एक मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत (प्रकृतीच्या पलिकडे एक सत् आहे असें सात्विकरीतीने म्हणतात तो पुरुष हाच) हा शिस्त लावणारा असा, शासन का नियंता होय, प्रकृति याच्याचमुळे जगते, याच्याच सत्तेनें जगविते आणि म्हणून हिनें वरावा, आवरावा, आधारास घ्यावा, भर्ता म्हणावा, पतीच एक करावा जसा

या प्रमाणें गुणासहित प्रकृति व पुरुषाला जो जाणतो तो कर्म करीत असला तरी पुन्हा जन्म पावत नाहीं

२३ **प्रकृति पुरुष विवेक अलौकिक असा उपकारी आहे. हाच विवेक** — १०४१–५०

२४ **भानूप्रमाणें उगवला म्हणजे पुष्कळसे उपाय सुचतात.** कोणी ध्यानानें, कोणी विचाराच्या आगिठीवर आत्मअनात्म किटास पुटे देऊन कसाचे सोळाहि भेद निर्विवादपणें तोलून, जे शुद्ध आपलें सर्वस्व तेंच निवडतात. तेथें सर्वस्वाच्या पोटीच आत्मध्यानाच्या दृष्टीनें आपणा स्वतःसच पहातात, कोणी दैवबळानें स्वत स पहातात, कोणी सांख्ययोगामध्यें चित्त देतात, तर कोणी कर्माच्या आश्रयानें ह्यास जाणतात **हें न जाणणारे लोक दुसऱ्यापासून ऐकून उपासना करतात. श्रुतिपरायण असे तेही मृत्यु संसार सागरास तरून जातात.**

२५ अशा प्रकारें खरेपणानें सर्वांच्या सर्व भवाचें रान निस्तरतात, अभिमान सांडून एकाच्याच बोलास टेकतात. ते हित अहित पाहातात, हानि कीव झेपतात, विचारपुसीनें शीण हरतात, येणें प्रकारें सुख देतात. त्याच्या मुखानें जें निघते तें उत्तम आदरानें ऐकून घेऊन अंगानें तेच होतात. मनानेही तेच होतात. ते ऐकण्यासच कीं आपलीं नांवें देतात. अक्षरास जिवें लिंबलोण — १०५१–५६

करितात. तेहि अंतीं ह्या मरणार्णव समाजापासून चांगल्या ओजानें निघतात. असे असे हे उपाय येथें बहुत आहेत. ते जाणावयास एक वस्तूच व्हावें, आतां असें हें असो. पण सर्वार्थाचें मंथन करून काढलेलें लोणी सिद्धांत नवनीत म्हटलेलें तें तुला देण्याचें करितों. येणेंकरून ह्या आयताच अनुभवाचा असा आयता लाभ होईल व मग ब्रह्मरूप होण्यास तुला सायास पडणार नाहींत म्हणून हेंच बुद्धीमध्यें रचूं, मतवाद हे नाहींसे करूं, दूर सारूं, सोलीव आत्मतत्वच ठरावाचें करूं, सिद्धांताचें करूं.

२६ **हे भरतर्षभ यत्किंचित् सत्व जें उत्पन्न होतें तें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगानें होतें असें जाण. क्षेत्रज्ञा प्रधानापासून भूतव्यक्ति भिन्न नव्हत.** क्षेत्रज्ञ अशा बोलानें तुला सर्वस्व दाखविलें, क्षेत्रहि सर्व सागितलें. ह्या एकमेकांच्या मेळाव्यानेंच मूर्ति होण्याच्या होतात. जसें वाऱ्यामुळें पाण्यावर तरंग होतात. तेजास उखराचि (रोषणाचि) भेट झाली, तेथें मृगजळाच्या पुरासहि रूप येतें–पावसाच्या, मेघाच्या धारानीं वसुंधरा झळंबली असतां नानाविध अकूर उठूं दिसूं लागतात. तसेंच अवघें चराचर–जें कांहीं जीव नांवानें तें दोघामुळेंच (प्रकृतिपुरुषाच्या उभय योगानें) संभवतें, जन्मतें, उत्पन्न होतें. १०५१–५७

२७ **सर्वभूतीं सारखा परमेश्वर आहे. भूतें विनाश पावणारीं तरी परमेश्वर अविनाशि आहे असें जो पाहतो तोच खरा पाहाणारा का जाणणारा होय.**

वस्तु एकच, उजू वस्तु ते सम, आत्मा अविनाश, जीव धर्महीन पण जिवाशीं अभिन्न अशा उत्तम दृष्टीनें पाहाणारा तो ज्ञानियामध्यें सुनयन म्हणावा. ध्यानाच्या देखणाऱ्या डोळयामध्येंहि ज्ञान डोळस तो म्हणावा अशी ही नुसती स्तुति नव्हे पण तोच मोठ्या भाग्याचा जाण. तंतूसच पटत्व अशा खोलीच्या डोळस दृष्टीनें पाहाणें तेंच ऐक्य. भूतें एकाचीं तीं एकच एक आहेत–पण याची प्रतीती तूं घे–नांवें निरनिराळीं–एक सारखी एक नव्हत अशी वागणी–वर्तनें, वागणूकी–अवघ्या सर्वांचे वेषहि पण भिन्नभिन्न असे पाहून किरीटी तूं पोटीं भेद का पाहाशील जरी तरी मग कोट्यावधि जन्म घेतल्यानेंही या भेदबुद्धीच्या बाहेर निघणार नाहींस. तुंभिणीचीं फळें प्रयोजनशील, दीर्घ, लांबोळीं, वाटोळीं, वर्तुळ अशीं तीं सर्व एकाच तुंभिणीचीं ना ? उजू अथवा वाकडेपण बोरीचें तें मोडत नाहीं. तशीं अवघड भूतें पण वस्तु एकच उजू. विस्तवाच्या ठिणग्यांची उष्णता जशी समान तसा अनेक जीवराशीमध्यें परेश तो जाणावा. १०५८–६८

२८ **सर्वत्र भरलेला सर्वत्र सारखा असा ईश्वर आहे असें जो पाहातो तो आत्मघात करणारा होत नाहीं.**

**मोक्षासकट गति परब्रह्म** पायाळ जो त्याचे दृष्टीनें सांपडते–भूत वैशम्यामुळें विषम बुद्धीचा होत नाहीं कोट्यावधि दीप तेथें तेज एकच, एकाहून एक वरचढ असें, पण तेज तें एकच. तसा ईश सर्वत्र असताच आहे अशा सर्वस्वानें (देखत असतांना) जगतो, तो मरण का जीवित अशा दोहींना सांपडत नाहीं, म्हणून असा तो आगळ्या दैवाचा होय, असें मीं वरचेवर वाखाणणें करीत १०७७–८३

आहें जें का ब्रह्म सम साम्य शेजेवरच त्याचा डोळा लागून आहे. विश्रांतीस पाहून आहे गुणइंद्रियांची धोकटी, देह धातूची त्रिकुटि, पाच मेळाव्याची दारुण अशी, उघडी पांच नाग्यांची इंगळी पांचांची झाल्यानें आगी लागली (मत्सरामुळें) जीवरूपी पंचाननास सांपडलेली हरिणाची राहाटी ह्या शरीरीं असून भोगी असा तेथे नित्य बुद्धीची धार, (पाणी) अनित्यतेचा भाव द्विधा करीत नाहीं, दाटपणें असत नाहीं पण या देहीं भोगी आत्म्यामधें असतां जो स्वत.स घाताचे करीत नाहीं तो शेवटीं त्या सर्वस्वामधेंच मिळतो. योगज्ञान प्रौढपण हें जन्मकोटि ओलांडूनही मायेमधून निघत नाहीं म्हणून योगी ह्या अशा प्रतिज्ञेमध्येंच बुद्धी देऊन असतात. असें तें परब्रह्म आकाराचें पैलतीर नादाची पैलमेर, मदन सौदर्य तूर्येचें माजघर असें जें (परब्रह्म).

२९ **आत्म्याचें स्वरूपः–प्रकृतीकडून सर्व प्रकारें कर्मे केलीं जातात. आत्मा अकर्ता आहे असें जो पाहतो–देखतो तोच ज्ञानी समजावा.**

**आत्मप्रभेवरच प्रकृति** विविध आरंभानें–आरंभभारानीं–गुणांनी गुणामध्येंच खेळते. येथें आत्मा–ओथंबा–खाब तो कोण हें जाणत नाहीं. अशा निवाड्यानें ज्याच्या जिवीं प्रकाश होतो तेथें अकर्तयासच, भेदनिवृत्तीसच त्यानें खरें पाहिलें.

मन, बुद्धि प्रमुख अशी करून सर्व कर्मेंद्रियाहि करून प्रकृतीच अवघें कांहीं करिते हें जो खरेपणानें पाहातो, जसें घरची तीं घरीच राहाटतात, घर तें काहींच करीत नाहीं, अभ्र आकाशीं धावते, आकाश ते उगे असते.

३० **जो प्रकृतीनें घडलेल्या भूतांचें पृथक् पण हें एका आत्म्यांत स्थित आहे व त्या आत्म्यापासून हा सर्व विस्तार झाला आहे असें पाहातो तेव्हां ब्रह्म संपादनतेस तो योग्य होतो.**

सर्वभूत आकार जेव्हा सृष्टीमधें रिघतात तेव्हांच ब्रह्मसंपत्तीचें तारूं लाभतें, सापडते. मग ज्या त्याकडे ब्रह्मानेंच दृष्टि उघडली होते, बहुत काय पण तेथें अपार सुख लाभते होते. एवढ्यानेंच तुला हे पार्था पुरुषप्रकृति व्यवस्थेसबंधीं जेथल्या तेथें तुझ्या अनुभवास आली. ठाईचा ठावच एक सापडला अशा या मार्गामधें अमृत चुळेस येते. निधान डोळ्यानीं पाहाणें होते, तसा हा जिव्हाळा मानावा, प्रतीती तीच व्हावी. घरच चित्तामध्यें बांधणें या प्रतीतीचें तें आता या प्रतीतीवरच ना? या अनुभवावरच ना? करिता आणखी काहीं एकदोन सखोल असे बोल मनास आवडतील, मानतील असे बोलतों. मनास जामीन घेऊन हे बोल घ्यावेत असें देवानें म्हटलें ते देव आनंदाने डोलूं लागले, अर्जुनानें सर्वांग लक्षाचें केले. १०८४–९४

अर्जुना एरव्हीं तेव्हाच ब्रह्मसंपन्न होणें होते जेव्हा का भिन्नभिन्न भूताकृति एकत्वानें एकत्वात (ब्रह्मात) दिसतात. देहरूप पाण्यामध्यें मनस्तरंग तरंग तसे देही अनेक अवयव, पण आत्मा तो एकच–स्थळामध्यें परमाणु असे अनेक रजःकण तरी पृथ्वी ती एकच–मनाचे ठाईं अवघे सर्वभाव, रूप उत्कंठा तरी आत्मा तो एकच–अग्नीच्या ठिणग्या अनेक तरी वन्हित्व एकच, सूर्य प्रकाशाचीं किरणें तीं सहस्रश जरी तरी एकच तें सूर्यमंडळ ना?

श्लोक | ओव्या

३१ **परमात्मा स्वरूपानें कसा आहे म्हणशील तर अनादि म्हणून अकर्ता व निर्गुण म्हणून अलिप्त असा. सूर्यच जसा जळामध्यें असून जळानें लिंपला जात नाहीं.** पाणी देहाजळ होतें का नव्हतें तरी आत्मसूर्य तो केव्हाही आहेच आहे. पण आणिक एक सूर्य पहाणें दृष्टीनें तेंच तें जळांत असलेलें बिंब होय. १०९४–१११९

तसा आत्मा जेथच्या तेथेच आहे तो अनादि नित्यसिद्ध सहज, निर्गुण–अरूप–शून्य–आत्मा–अलक्ष–पंचत्व–(लयस्थान) अव्यय.

आत्मा शरीरीं आहे म्हणावें तर तो तसा नाहीं. तो जेथच्या तेथेंच आहे. आरशात मुख दिसतें तर तेथें मुख आरशांत पडलें म्हणावें पण तें खरें काय? तसें आत्मतत्त्वानें ह्या शरीरीं असणें होय. आतां त्या मुखाची–तोंडाची आत्म्याची व देहाची भेट होते असें म्हणणें हें सर्वस्वी खोटें नव्हे का? वाऱ्याची व वाळूची गांठ पडणें शक्य आहे का?

अग्नीमध्यें कापसाचा केलेला दोरा तो कसा ओवावा? कुठचा तो पाषाणाला व आकाशाला सांधा असणें तें–एक पूर्वेकडे निघाले व एक पश्चिमेकडे निघाले त्यांची भेट जशी कां–तसा हा आत्म्याचा व देहाचा संबंध जाण. प्रकाश व अंधार यांत जो भेद, जिवंत व मृत शरीरामध्यें जसा भेद, तसा देहांत व आत्म्यांत फरक–भेद जाणावा देह पंच तत्वाचे झालेले कर्माच्या गुणानी गुंफले. ते कुंभाराच्या चाकावरील मडक्याप्रमाणें पुन्हा पुन्हा जन्म मृत्यू पाहाणारे काळरूपी अनलाच्या तोंडीं घातलेली लोण्याची उंडी ही देहच तर ते माशी पाख पाखडी माशी पंख फडफडील तरच अगदीं निमिषामध्येंच संपणारे.

कदाचित् अग्नीमध्यें पडले गेले तर भस्मच होऊन वाऱ्यानें उडते. जर का श्वान त्यावर पडले तर मग ते विष्टाच एक होणारे वरील दोन्ही उपयोगाचे नच झाले तर कर्माचा पुंजच होते असा हा परिणाम कश्मल–विषादच एक कीं, अशी ह्या देहाची ही दशा, व आत्मा तो कसा म्हणशील तर तो अनादि असा सहज नित्यसिद्ध असा, तो निर्गुण म्हणून तो कळेचा का नच कळेचा–तो सकळ काहीं अथवा कांहींच नाहीं. अक्रिय–काहीही नच करणारा अथवा क्रियाशील (सर्व काहीं करणारा) असा. कृशही नव्हे स्थूळही नव्हे. **अरूप** असा ना आभासाचा ना निराभासाचा, ना प्रकाश ना अप्रकाश, ना अल्प ना बहु, शून्य म्हणून रिता ना भरलेला–रहित ना सहित, मूर्त ना अमूर्त.

**आत्मा,** आनंद ना निरानंद, एक ना विविध, बद्ध ना मुक्त.

**अलक्ष** म्हणून इतका ना तितका, आयता ना रचला, बोलका ना उगा.

**लय स्थान. (पंचत्व)** म्हणून सृष्टि उत्पन्न होण्यानें तो रचिला जात नाहीं सर्व संहार तरी खर्च न होणारा. आहे आहे नाहीं नाहीं ह्या दोहींचें पंचत्व म्हणजे लयस्थान तो.

**अव्यय** म्हणून ना मापला ना पूजिला, ना वाढला ना खचला, ना विटला ना वेंचला, असा आत्मा हे प्रियोत्तमा! शरीरामध्यें आहे, असें जे म्हणतात, तेथें तर मठाच्या आकारानें आकाशासच (व्योमास) जसें का नांव आलें. त्या-

श्लोक ओव्या

प्रमाणें त्याच्या अनुस्थितीनें देह होत असतात, देह होतात जातात तेथे आत्मा तर कांहीं घेत नाहीं व टाकीत नाहीं. तो जसाच्या तसाच असतो. आकाशाच्या ठायीं दिवसरात्र येतात, जातात. त्याप्रमाणें देह हे आत्मसत्तेवर जाणावे, म्हणून ह्या शरीरीं तो काहीं करीत नाहीं व करवीत नाहीं. तो तर आयताच व्यापारी रूढ असतो. त्यास कांहीं सज्ज होणें का न होणें नसतें, एवढ्याच करतां, स्वरूपानें आत्मा उणा अथवा पुरता आहे, असें म्हणणें होत नाहीं. असें हें असो. पण तो आत्मा देहबुद्धीनें लिंपला होत नाहीं.

३२ **सर्व व्यापक आकाश अत्यंत सूक्ष्म व विरळ असल्यामुळें कशानेंही लिप्त होत नाहीं. तसा देहामध्यें ओतप्रोत भरलेला आत्मा देहभावानीं लिप्त होत नाहीं.**

सर्वत्र सर्व देहीं आत्मा असतुचि असें संगदोषें एकेही लिप्त नोव्हे **क्षेत्र-विहीन क्षेत्रज्ञाचें लक्षण !** ११२०–२२

आकाश हें काय कुठें नाहीं असें नाहीं तें तर सर्वाही ठायीं आहेच आहे. तें कुठें असतें व कुठें असत नाहीं असें नाहीं तरी पण कशानेंही तें मळत नाहीं. तसा सर्वा ठायी, सर्व देहामध्यें–देहीं आत्मा आहेच आहे, पण तो संगदोषानें लिप्त होत नाहीं. आतां पुन्हा पुन्हा हेंच एक खरें असें लक्षण **क्षेत्रविहीन अशा क्षेत्रज्ञाचें** जाणावे.

३३ **सूर्य नभाला प्रकाशित करतो, तसा एकच क्षेत्रज्ञ आत्मा सर्व क्षेत्रांना प्रकाशित करतो.**

क्षेत्रज्ञ क्षेत्र आभामास प्रकाशतो. यावर आणखी काहीं विचारूं नका व शंकाही पण घेऊं नका ११२३–२८

सपर्शानें लोह चेष्टतें–हलतें पण लोह कांहीं लोहचुंबक नव्हे, असें हें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांमधील अंतर जाण.

दिव्याच्या ज्योतीच्या दीप्तीवर घरची रहाटी होत असते, पण वेगळीकतेची ती तऱ्हा ( वैचित्र्य ) दीपाची व घराची.

लाकडाच्या पोटात अग्नि असतो पण हा काहीं काष्ठ नव्हे, अशा दृष्टीनें पहावा.

नभ व आभाळ सारखी नव्हत. सूर्य व मृगजळ एका तोलाचीं नव्हत. तसा हाहि डोळा जाणावा, जर सडोळसपणानें पहाणें केलें तर.

हें सर्व काहीं असो पण जसा का गगनामधूनच किंवा गगनानेंच सूर्य जसा विविधतेनें लोकांना प्रकाशित करतो, तसा आत्मा.

३४ **क्षेत्र व क्षेत्रज्ञ यामधील भेद व भूतांमध्यें स्थिर असणाऱ्या सृष्टीचें मूळ जी प्रकृति तिच्यापासून मुक्त होणें हें ज्ञानदृष्टीनें जे जाणतात ते ज्ञानवान लोक मोक्षाला जातात.**

शब्द तत्त्वसार जाणणारास तेचि देखणी अशी बुद्धि–प्रज्ञा ती, क्षेत्र-क्षेत्रज्ञामध्यें भेद पहात नाहीं. ह्या क्षेत्र-क्षेत्रज्ञाचें अंतर पहाण्यास चतुर ते ज्ञानियाचें द्वार आराधतात. याच क्षेत्र व क्षेत्रज्ञामधील भेद जाणण्याकरितां ११२९–७१

शांतिरूपी संपत्ति जोडतात व शास्त्रार्थी दुभती घरीं पोसतात. योगाचें आकाश गांठावें असा धींवसा म्हणजे धैर्य घेऊन पुरुषास पुरुषाचीच आशा लागलेली. शरीरादिना तृणवत् मानतात. जीवेंभावेंकरून संताचे-वहाणधर होतात-जोडे -वाहाणं-वागवितात.

अशा तऱ्हेच्या ज्ञानाच्या बिनमोलतेचा प्रेमभार आतमध्यें घेऊन खरेपणास येतात-खरे होतात. व मग क्षेत्र व क्षेत्रज्ञामधील खरें असें अंतर खऱ्या अशा ज्ञानानें जे पहातात अशा ब्रह्म संपन्नाचे-ज्ञानावर कुरवंडी करूं-गौरव करूं. महाभूतादिक जीं पंचमहाभूतें तीं प्रभेदल्यामुळें, अनेकपणाचीं झाल्यानें अहो! लटकी अशी ही सर्वत्र पसरलेली जी प्रकृती शुकनलिका न्यायानें न लागतांहि लागली आहे. असें हें जसें आहे अगदीं तसेंच ज्यास ठाऊक होतें-समजतें तेथें माळा ती माळाच एक खरी, अशी डोळयास दिसावी व खोटी अशी जी सर्प-बुद्धि ती नाहिंशी व्हावी. शिंपीची प्रतीती खरी शिंपच अशी, रुपेपणाची भ्रांति जाऊन होते. तसें वेगळेपणानें वेगळी अशी जे अंत करणानें ही प्रकृती पहातात ते मी म्हणतों ब्रह्म होतात. जें ब्रह्म आकाशाहूनही मोठें, अव्यक्ताचें पैलतीर, जें भेटलें असतां भेदभावानें उघडें पडूं देत नाहीं, भेद व साम्य असें पाहात नाहीं, जेथें आकार संपतो, जीवित्व विरतें, द्वैत (नुरतें) उरत नाहीं, असें जें अद्वय तें परमतत्व, हे पार्था! ते सर्वथैव होतात. तेच मुळीं ह्या आत्मा व अनात्म्यासंबंधी व्यवस्था करणारे राजहंस समजावेत. असा हा आघवा श्रीकृष्णांनी आपल्या जीवाच्याही जीवास-अर्जुनास ह्या आत्मानात्म का क्षेत्र क्षेत्रज्ञासंबंधीं स्पष्ट उलगडा केला. एका कलशामधील दुसऱ्या कलशात भरावें त्याप्रमाणें आपलें सर्वस्व श्रीहरीनें अर्जुनास दिले.

वर असें म्हणणें होत आहे कीं अहो कोण कुणास तें देणें देत आहे? तो नर जसा का तसाच नारायणही पण वर अर्जुनास म्हणूं केलें कीं हा मी श्रीकृष्ण अहो! पण असें हें इथें अप्रयोजक असें तें मी न विचारतां कां बरें बोलत आहे? एवढेंच काय पण देवानें सर्वस्व दिधलें-(११४७) पण तो पार्थ कांहीं आपल्या मनामध्यें समाधान पावेना, तो तर अधिकाधिक हांव घेऊन आहे. **तेलवात दिव्यासहित** दिवा ते वातीसहित आहे तेथें जी कांहीं दिव्याच्या ज्वाला दीप्तीस येणारी थोरवी तसें हें ऐकत असतां अर्जुनाच्या अंतरामध्यें आवड येऊन आहे. येथें आता सुगरीण खरी वर उदार जर भेटली-मिळाली-वर रसज्ञ व जेवणारे असले तर-हात ज्ञानच होतो-हात अवतरतो. पण तेथें रसज्ञ जेवणारे पाहिजेत ना?

तसें अहो देवा! ह्या लक्ष्याच्या-लक्षाच्या लवलवीनें तसें होत आहे व वर पहावें तर येथें व्याख्यान तों चौपट वाढलें आहे. अनुकूल वाऱ्यानें मेघ सावरला होतो. चंद्रोदयानें सिंधू भरतो. श्रोतयांचे आदरामुळें रस मातला होतो. आतां देवांनीं अवघें सर्व विश्व आनंदमय केलें होईल! तें रायानीं ऐकावें असें संजय म्हणत आहे. **मराठी भाषेची थोरीव** याप्रमाणें महाभारतामध्यें भीष्मपर्वाच्या जोडीनें जी कथा सांगितली-(म्हटली) तीच हा श्रीकृष्णार्जुनाचा

प्रश्नोत्तररूपी संवाद स्पष्ट—उत्तम अशा शिष्ट मराठी भाषेत भाग्य करून ओवीचा तो प्रबंध दाखविण्याचें करून नुसती **शांतिकथा बोलण्यास आणिली तेथें ती शृंगाराच्या माथ्यावरच मुळीं पाय देऊन, ती शांति शक्तीप्रत येणारी अशी देशी नवी वेल्हाळ आवडती प्रिय मराठी भाषा जी साहित्यासच मुळीं जिवंत करते,** व वर तिच्यापुढें अमृतहि पण फिकें पडेल—पडते बोल हे ओलावा करणाऱ्या गुणास शीतलपणानें चंद्राची बरोबरी करतील व नादाच्या लोपाने रसरंगानें भुलविणेंच ते आनंदाप्रत जसें येणे तें येथें खेंचर म्हणजे अज्ञानाच्या मनास म्हणजे अनधिकारी विषयी पामराच्या मनासही सात्विकतेचा पान्हा आणते अतरंग अधिकारी पुरुषाना तर समाधि जोडते—लाभते तसा ह्या वाग्विलास विस्तारानें—गीतार्थाने जग भरून जावो गीतार्थ सर्वत्र प्रसर घेवो जग आनंदाच्या आवारामध्येंच भरूं, या सर्व जगास आनंदाचें कोडाळें ( करून ठेवूं ) करूं

**भरतवाक्य**

विवेकाचें दैन्य संपो । कानामना ( श्रवण व मिश्रब्रह्मास ) सफलता जोडो ॥

भलताही ( वाटेल तो ) ब्रह्मविद्येची खाणी पाहो. परतत्व डोळा दिसो. सुखाचा सोहळा पाहो महाबोधाचा सुकाळच अशा सुकाळामध्यें विश्व रिघो असें हे सर्व आता निरूपले व्हावें, असें उत्तम बोलणें करूं, कारण अहो परमदेव श्री निवृत्तीनीं मी अनुग्रह केलेला—प्रेरणा केलेला आहें, म्हणून मार्मिक अक्षरामध्ये यथार्थ शब्दानीं श्लोक व उपमा गर्दीनें ग्रंथार्थाचा परोपरीनें झाडा देईन अशा विद्येनें परिपूर्ण मजला सरस्वती कृपेच्या वाङ्मय साहाय्यानें श्रीगुरुरायानें पुरतेपणाचे केलें आहे **कृपेच्या साहाय्यानें मी जें जें बोलतों तें तें सर्व उचित ठरतें व तुम्हां संतांच्या सभेंत गीता मला लाभली असें म्हणतों.** याहीवर तुम्हा संताचे पाय मी लाभलो आहें म्हणून येथे काहींही अटक किंवा प्रतिबंध नाहीं अहो हे प्रभु काश्मीरी मुकें म्हणजे सरस्वतीच्या पोटी मुकें मूल चुकूनही कधी होणारें नाहीं अहो लक्ष्मी जी समुद्राच्या पोटी जन्मली तिला सामुद्रिक शुभ लक्षणाची तर केव्हाही ती उणीव भासणारी नव्हे, तसें तुम्हा संताच्या जवळ अहो अज्ञानाची गोष्ट तर कसलीही मुळी नसणारच, आणि म्हणूनच कीं नवाही रसानी वर्षण्याचे—मागण्याचें का बोलण्याचे करीन. किंबहुना आता अहो देवा! मजला वेळ, सधी कां थोडाबहुत अवसर तो देण्याचा करावा कीं जी, व मग श्रीज्ञानदेव म्हणतात ग्रंथ बरवा असा सागण्याचें करीन ( ११७१ ).

**इति श्री गीता भावार्थ दीपिकायां त्रयोदशोध्यायः ॥**

**पुंडलीक वरदे हारि विट्ठल !**

---



॥ श्री गणेशाय नमः ॥ ॥ श्री आदिमूर्तये नमः ॥

॥ श्री आदिगुरवे नमः ॥

# श्रीज्ञानेश्वरी

## (सुबोधिनी)

## अध्याय तेरावा

— क्षेत्र-क्षेत्रज्ञ विभाग योग —

केलेया स्मरण। सकल विद्यांचें अधिकरण।
तेचि वंदू चरण। श्रीगुरूंचे ॥ १ ॥

जयाचेनि आठवे। शब्दसृष्टि आंगवे।
सारस्वत आघवें। जिव्हेसि ये ॥ २ ॥

वक्तृत्व गोडपणें। अमृतातें पारुष म्हणे।
रस होती ओळंगणे। अक्षरासी ॥ ३ ॥

भावार्चे अवतरण। अवतरविती खूण।
ह्याता चढे संपूर्ण। तत्वभेदु ॥ ४ ॥

श्रीगुरूंचे पाय। जैं हृदय गिंवसूनि ठाय।
तैं एवढे भाग्य होय। उन्मेषासी ॥ ५ ॥

ते नमस्कारूनि आतां। जो पितामहाचा पिता।
लक्ष्मियेचा भर्ता। तो ऐसे म्हणे ॥ ६ ॥

केलेया = जयाने केलिया. सकल = होय सकळ. अधिकरण = आधार, आश्रयस्थान. तेचि = ते. (१) शब्दसृष्टि = शब्दब्रह्म. आंगवे = प्राप्त होतें. सारस्वत = विद्यापीठ, वाङ्मय, वक्तृत्व. (२) ओळंगणे = अनुकूल सेवा करणारे (३) अवतरविती = अवतरवी खूण = निजखूण. (४)

॥ नमः परमात्मने ॥

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

श्रीगणेशास नमस्कार करून हा तेरावा अध्याय लिहिण्यास घेतों. लिहिण्याचें काम निर्विघ्नपणें तडीस जावें अशी आपली कृपादृष्टि असावी अशी आपणास मी विनंति करितों. श्रीआदिमूर्तीस मी साष्टांग नमस्कार करितों. आपला कृपाप्रसाद असावा अशी आपले चरणीं माझी नम्र प्रार्थना आहे. (१)

'स्मरण' केल्यानें सर्व विद्या प्रकाशमय होऊं लागल्या – लागतात, प्रतिष्ठेस आल्या – येतात. तेथें त्या मनोरथावर मन प्रसादाच्या प्रसन्नतेनें नृत्य करूं लागलें – लागतें, श्रीशारदादेवी अधिकारारूढ झाली – होते, असें सर्व विद्यांना आधार असलेलें – अनेक न्यायाचें मंदीरच किंवा सर्व सिद्धांताचाहि सिद्धांत असे ते चरण श्रीगुरूचे, त्यांना आतां वंदन करू. ज्यांच्या स्मरणानें सर्व शब्दवेध – वेदसृष्टि ही ध्वनीस येऊन ध्वनित होऊन अर्थबोधास प्राप्त होते व विद्यापीठच जसें जिव्हेस येऊन बोलूं लागलें.

स्मृति ही अलंकार होऊन स्मरस्मरण प्रीति ही ती विवेकास येते तेथें शब्दब्रह्म जें पदवीचें का नांवाचें का कीर्तीचें तें मूळधर्म स्वभावच मूर्तिमंत होऊन, स्वीकृत होऊन, अर्थाप्रत येतें व आता सर्व विद्यांचें पीठच जें सारस्वन, प्रतिभावाङ्मय तेंच पुढें झालें – जिव्हेस येतें आहे. (२)

वाङ्मय, वक्तृत्व गोड होऊन अमृतासही मागे टाकतें – टाकीत आहे – व रस हे तर अक्षराची सेवा करणारे झाल्यानें आश्चर्यच एक असे होऊन येत आहेत.

रसांनीं आवड, प्रीति, आनंद व सौंदर्य पत्करिलें व अक्षरांचें स्वागत करणारे असेच – अनुकूल – ते त्याचे सेवाविधान हें आश्चर्याचें स्थान होऊन आहे (३)

देवतेचें का देवाचें आगमनार्थ एक स्तुतीच जशी गुह्यार्थानें मनात उतरणारी तेथें आत्मस्वरूपाची ओळख होत आहे – प्रियपणाच्या अर्थाचें गर्भित असें तेथे स्थान का प्रवेशद्वारच असें तें ( वाङ्मय ) ( रस ). भाव विलक्षण अशा बुद्धिमत्तेच्या लक्षणांनीं – धोरणानीं प्रख्यातीचीं तीं लक्षणें प्रकट होऊं लागल्यानें व संपूर्ण असा तो तत्त्वभार हा आपल्या सत्यपणास येऊन उमलूं लागला – खऱ्या स्वरूपास आला तेथें भाग, फरक का अतर तें व्याख्येस येत आहे, मूळ तत्त्वप्रकाशन हेंच प्रकारानें बोधाचें होऊन हातास येऊन आहे – तेथील किरण का मदन का आश्रय हाच हातास – वर चढला – येऊन आहे – तेथें निजलक्षणें हींच प्रगट झालीं व आता सपूर्ण तत्त्वभेद बोध हाच हातीं आला आहे – महत्त्वाचा झाला आहे – प्रख्यातीचा असाच तो होऊन आहे. (४)

अहो, श्रीगुरूचे पाय जर हृदयाशीं पोटाळून असले तर असें तें भाग्य हें दैवच एक ऐश्वर्यास आलें असें होतें. विचाराला, ज्ञानस्फूर्तीला विलक्षण अशी जागृति येऊन दैव हेंच उमलतें – दैवी तेज झळकतें. सर्व ज्ञानविस्तार विस्मयतेचा असा सदैवी होतो – आहे श्रीगुरूचे पाय हृदयाशीं धरून असलें म्हणजे ज्ञानस्फूर्तीला एवढें भाग्य येते. (५)

असे ते श्रीगुरूचे चरण आतां नमस्कारून, ब्रह्मदेवाचा पिता जे श्रीकृष्ण व लक्ष्मीचा स्वामी असे ते श्रीकृष्ण पुढें काय बोलूं लागले तें सांगतों – तें आता सागण्याचें करूं (६)

**श्रीभगवानुवाच—**

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**
**एतद् यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥**

अभिधीयते = नामास येते. प्राहु. = म्हणतात. क्षेत्रज्ञ = संसारी जीव, क्षेत्रज्ञ. तद्विदः = तत्त्वज्ञानी, ब्रह्मज्ञानी ('तत्त्वमसि' वाक्यांतील ब्रह्म जें 'तत्' तें दर्शित केलेले)

अन्वय — कौन्तेय, इदं शरीरं क्षेत्रम् इति अभिधीयते यः एतद् वेति तं क्षेत्रज्ञ इति तद्विदः प्राहुः ॥

अर्थ — हे कौन्तेया या शरीरास क्षेत्र म्हणतात व असें हें क्षेत्र जो जाणतो त्यास तत्विद म्हणजे ब्रह्मज्ञानी †'क्षेत्रज्ञ' (संसार जाणणारा) जीव असें म्हणतात. (१)

---

† शरीरद्वारा केलेल्या बऱ्यावाईट कर्माचें फळ भोगण्याची ही शरीररूपी कर्मभूमि आहे म्हणून याला जड देह म्हणतात आणि क्षेत्रज्ञ म्हणजे जीवात्मा (सर्वव्यापी परमात्मा) असें समजावें—

अपरा प्रकृति हे क्षेत्र
ईश्वराची जी परा, जीवभूता प्रकृति तो क्षेत्रज्ञ } क्षेत्रक्षेत्रज्ञ म्हणजे प्रकृति-पुरुष

जमिनींत बीज पेरावें तसें फळ मिळतें अगदीं तशीच ह्या शरीराला शेताची म्हणजे क्षेत्राची उपमा आहे

**पंचीकृतमहाभूतसंभवं कर्मसंचितम् ।**
**शरीरं सुखदुःखानां भोगयतनमुच्यते ॥** (११, आत्मबोध)

अर्थ—पंचमहाभूतांचें पंचीकरण होऊन जन्मलेलें तें कर्म किंवा संचितसुखदुःखांना भोगण्याकरितां असलेलें हें शरीर त्यास सुखदु ख भोगण्याचें स्थान म्हटलें आहे.

**पंचप्राणमनोबुद्धिर्दशेन्द्रिय समन्वितम् ।**
**अपंचीकृतभूतोत्थं सूक्ष्मागं भोगसाधनम् ॥** (१२ आ)

अर्थ—पंचमहाभूतापैकीं प्रत्येक – पंचप्राण, मन व बुद्धि, दशेंद्रियासहित उपस्थित असें उत्थानतेनें असलेलें सूक्ष्मभूत तन्मात्रारूप जें तें भोगसाधनाचें सूक्ष्म अग – सूक्ष्म शरीर (साधनें जाणारें)

**अनाद्यविद्याऽनिर्वाच्या कारणोपाधिरुच्यते ।**
**उपाधित्रितयादन्यमात्मानमवधारयेत् ॥** (१३ आ.)

अर्थ—सागता येण्यासारखी नाहीं ती अनादि अविद्या कारण उपाधि होय स्थूल, सूक्ष्म व कारण उपाधीहून वेगळें तें आत्मस्वरूप जाणावें

**पंचकोशादियोगेन तत्तन्मय इव स्थितः ।**
**शुद्धात्मा नीलवस्मादियोगेन स्फटिको यथा ॥** (१४ आ.)

अर्थ—कारणामुळें शुद्धात्मा त्याच्या कोशाच्या ठिकाणीं तन्मय दिसणारा होतो. निळ्या आदि रंगामुळें स्फटिक त्या त्या रंगाप्रमाणें दिसणारा होतो.

**देहेन्द्रियमनोबुद्धिप्रकृतिभ्यो विलक्षणम् ।**
**तद्वृत्तिसाक्षिणं विद्यादात्मानं राजवत् सदा ॥** (१५ आ)

अर्थ—प्रकृतिमंत झालेले देह, इंद्रिय, मन व बुद्धि हीं सर्व अद्भुतपण घेऊन असल्यानें तेथें चकित होऊन जाऊं नये वृत्तिसाक्षी आत्मा त्या वृत्तीसच प्रकाशित करणारा त्यास जाणून घेऊन तोच होऊन असावें. वृत्तीच्या प्रकाशाचें नेहमीं होऊन असावें.

**पार्थी परिसिजे। देह हे क्षेत्र म्हणिजे। (एतदिति)**
**जो हे जाणे तो बोलिजे। क्षेत्रज्ञु येथ॥७॥**

पार्थी—तरि पार्था. क्षेत्र = शेत. क्षेत्रज्ञ = जीव, क्षेत्राला जाणणारा जो.

तरी हे पार्था, आतां ऐक कीं ह्या देहास क्षेत्र किंवा शेत म्हणतात व असें हें क्षेत्र जो जाणतो तोच येथें क्षेत्रज्ञ म्हटला आहे (७)

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्व क्षेत्रेषु भारत।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम॥२॥**

विद्धि = जाण सर्व क्षेत्रेषु = सर्व क्षेत्रांमध्यें. क्षेत्रक्षेत्रज्ञयो. = क्षेत्राक्षेत्राचें जें ज्ञान. तत् ज्ञानं मतं मम = तेंच एक ज्ञान होय असें माझें मत आहे.

अन्वय—भारत, सर्वक्षेत्रेषु क्षेत्रज्ञं च अपि मां विद्धि, क्षेत्रक्षेत्रयोः यत् ज्ञानं, तत् एवज्ञानम्, मम मतम्।

अर्थ—हे भारता, सर्व शरीररूप शेतामधील, क्षेत्रामधील–क्षेत्रज्ञाता–जो तो मीच (जीवात्मा–परमात्मा) आहे असें जाण. क्षेत्र व क्षेत्रज्ञ याचें जें (तत्त्वदृष्ट्या) ज्ञान तेंच (यथार्थपूर्ण) ज्ञान या संज्ञेस पात्र होतें, तेंच एक ज्ञान होय–असें माझें निश्चित मत आहे. (इतर ज्ञानें व्यर्थ पांडित्य होत. येथें सहजच असें आहे कीं तें निर्विकार अशा ब्रह्माचें ज्ञान होय किंवा विकाररहित अशा प्रकृतीचें तें होय). क्षेत्र म्हणजे शरीर (तत्त्वसमुदाय) आणि क्षेत्रज्ञ म्हणजे सर्व क्षेत्रांमध्यें असणारा आणि क्षेत्रांना जाणणारा–जीवात्मा–असें हें क्षेत्रक्षेत्रज्ञाचें ज्ञान आपणांस मान्य आहे असें भगवन्तांनीं सांगितलें आहे. (२)

**तरी क्षेत्रज्ञ जो येथें। तो मीचि (जाण) निरुते।**
**जो सर्व क्षेत्रांतें। संगोपूनि असे॥८॥**

**क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें। जाणणें जें निरुते।**
**ज्ञान ऐसे तेयातें। मानूं आम्ही॥९॥**

येथें—एथे. निरुते = खरेपणानें. मीचि = मीचि जाण. संगोपूनि = पोषण भरणानें पोसून (८) निरुते = निरुत्तर असें तें निश्चयाचें जाणणें. तेयातें = तयाते = तयासी (९)

तरी येथें (क्षेत्रज्ञ) संसारी जीव जो तोच ह्या क्षेत्रास जाणणारा तो मीच होय असें खरेपणानें आणून ऐस. असा तो (जीव) क्षेत्रज्ञ हा ह्या सर्व क्षेत्रास–शेतास–शरीरांना–पाळून पोसून असतो. (८)

आतां ज्ञान म्हणून जें आहे तें हेंच जें ह्या क्षेत्रज्ञास जाणणें तें होय–व असें तें ज्ञानच तूं होऊन असलास तर तें आम्हीही पण खऱ्या भावानें मानतोंच–तेथें ज्ञान वसतें असें आम्ही केव्हांही मानूंच–आम्ही, तेंच ज्ञान होय, असें मानणें करितों–माननीय असें म्हणतों. तेथें दुसऱ्या कोणीही जरी या बाबत प्रश्नोत्तरांचा रगाडा केला तरी पण ह्या ज्ञानापुढें निरुत्तरच व्हावें लागतें आणि म्हणून हेंच ज्ञान होय असें मानणेंच एक आम्हाकडून होतें–ह्या देहात किंवा शास्त्रांत जो क्षेत्रज्ञ तो मी माझे अंशानें निश्चित–परमात्माच होय. जो सर्व देहाचें पालन करून आहे आणि देह व जीव (जीवात्मा–परमात्मा) यास समजणें, कळणें निश्चितपणें अशा ह्या जाणण्यासच ज्ञान म्हणावें. (९)

**तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्चयत् ।**
**स च यो यत् प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥**

यत् = कोणतें. यः = जो. सः = क्षेत्रज्ञ यादृक् = कशासारखें. विकारी = त्याचे विकार कोणते. यतः च यत् = ज्यापासून हें झालें आहे – जीवदशेचें झालें आहे. प्रभावः = त्याचा प्रभाव काय – सामर्थ्याचें ज्याच्यामुळें होणारें. समासेन = थोडक्यांत, संग्रहत्वानें, साररूपानें, समुच्चयेंकरून सांगितलेलें.

अन्वय— यत् यादृक च, यत् यतः विकारी च, यत् यतः च, यत् यः सः प्रभावः च, तत् क्षेत्रम्, तत् मे समासेन शृणु ।

अर्थ—तें क्षेत्र कोणतें, आणि कशा प्रकारचे आणि त्याचे विकार कोणते ? म्हणजे कोणकोणत्या विकारांनीं तें युक्त असतें आणि त्या क्षेत्रापासून कोणतें कार्य उत्पन्न होतें, तसेंच किंवा तो क्षेत्रज्ञ कोण आणि त्याचा प्रभाव म्हणजे सामर्थ्य काय तें ( वगैरे सर्व ) मजपासून सक्षेपतः ( समुच्चयेंकरून ) श्रवण कर. ( ३ )

**तरी क्षेत्र येणें नांवें । हें शरीर जेणें भावें ।**
**म्हणितलें तें आघवें । सांगो आतां ॥ १० ॥**

**हें क्षेत्र का म्हणिजे । कैसे कें हें उपजे ।**
**कवण कवणीं वाढविजे । विकारी येथ ॥ ११ ॥**

**हें औट हात मोटकें । कीं केवढें पां केतुकें ।**
**बरड कीं पिकें । कवणाचें हें ॥ १२ ॥**

**इत्यादि हें सर्व । जें जें याचे भाव ।**
**ते बोलिजति सावेव । अवधान देईं ॥ १३ ॥**

**पैं याचि स्थळाकारणें । श्रुति सदा बोभाणें ।**
**तर्क येणेंचि ठिकाणें । तोंडाळु केला ॥ १४ ॥**

**चाळितां हेचि बोली । दर्शनें शेवटा आली ।**
**तेंवीच्चि नाहीं बुझाविली । अजुनि द्वंद्वें ॥ १५ ॥**

**शास्त्रांचिये सोयरिके । विचलिजे येणेंचि एकें ।**
**याचेनि एकवंकें । जगा वादू ॥ १६ ॥**

**तोंडेसि तोंडा न पडे । बोलेसि बोला न घडे ।**
**इया युक्ति बडबडे । त्राये जाली ॥ १७ ॥**

**नेणो कोणाचे हे स्थळ । परि कैसे अभिलाषाचे बळ ।**
**जे घरोघरी कपाळ । पिटवित असे ॥ १८ ॥**

**नास्तिका देयातेया तोंड । वेदांचे गाढे बंड ।**
**ते देखोनि पाषांड । आनचि वाजे ॥ १९ ॥**

**म्हणे तुम्हि निर्मूळ । लटिके वाग्जाळ ।**
**ना म्हणसि तरी पोफळ । घातले आहे ॥ २० ॥**

भावें = अभिप्रायानें, मतानें, कारणास्तव ( १० ) कें = कोठे. वाढविजे – वाहिजे = पाठीवर वाहून घेऊन विकाराचे केले जाणारे, विकारामुळें नुसतें फुगणें जें विकारी = षड्विकाराचे – षड्ऊर्मींचे (११).

औट हात = याचें प्रमाण साडेतीन हाताचें आहे. मोटकें = लहानसें. बरड = नच पिकणारें, नापीक. कवणाचें = कोणाचें (१२) सावेव = सविस्तरतेनें, साद्यंततेनें (१३) बोभाणें = बोभाटा करणारी, पुकारा करणारी ठिकाणें = ह्या ठिकाणाची व्यवस्था लावण्याच्या प्रयत्नानें. इंद्रियें गगनासारखीं व्यापक तीं कशीं आवरलीं जाणारीं – तेथें काहीं तरी सोय पाहिजेच व ती सोय ती कशी असावी असा उहापोह जो (१४). बुझाविली = बुझविली, नाहींशी केली, समजविली (१५). एकवंकें = सोयरीक व चालना यांची एकमेकांशीं गाठ पडल्यानें वादाला जगांत हें क्षेत्रच एक कारण आहे (१६). तोंडेसि तोंडा – तोंड – न पडे = तोंडास तोंडें मिळालीं नाहींत व अद्याप वाद बंद झाले नाहींत – मिटले नाहींत – तोंडानें तोंडाला पुरतेपण येईना तोंडाला लागणें हें अद्याप संपेना बोलेसि बोला – बोला बोलेसि = बोलानीं तेथीलचें तें बोलणें हें कांहीं घडविलें जाईना – व्यवस्थितपणास येईना – ध्वनिसूत्राच्या योग्यतेचें होईना. त्राये – त्राय – जाली = सीमा, शिकस्त, हद्द झाली, शर्थ झाली (१७) अभिलाष = इच्छा, आकांक्षा, हाव. कपाळ पिटवीत आहे = एकसारखा तोच ध्याम घेतल्यामुळें डोकेच मुळीं आता दुखूं लागलें – एकसारखी पिरपिरच होत आहे (१८) देयातेया = यावया आभंड – बंड = सर्व गगनच आभंडास म्हणजे तोलणें करावें म्हणून आलेलें केलें आनन्वि वाजे = भलतेंच बोलू लागले, बडबड करीत आहे (१९). बाराबंद – बाराबंदी = बंडी. निर्मूळ – निर्मळ = मूळ रहित पोफळ = प्रतिज्ञेची सुपारी दिली आहे (प्रतिज्ञेचा विडा-तांबूल घातला आहे) (२०).

ज्या अभिप्रायावर – अस्तित्वामुळें हें शरीर क्षेत्र असें म्हटलें जात आहे तें सर्व काहीं आता सांगण्याचे करितों (१०)

ह्यास क्षेत्र का म्हणावें कसें तें, का कोठें हें निपजतें, उपजतें, उत्पन्न होतें व कोणाकोणानीं हें आपल्या पाठीवर वाहून विकाराचे — का नसत्या उर्मीचें केलें जाते तें. (११)

हें लहानसें असें तें साडेतीन हातच आहे, कीं केवढें आहे, कशासारखें तें आहे, पिकणारें आहे कीं नुसतें नापीक आहे – नापीक कीं माळरानाचे म्हटलेलें तें पिकविलें जाणारें आहे किंवा नाहीं – तसेंच तें कोणाचें आहे. (१२)

इत्यादि इत्यादि सर्व काहीं जे जे म्हणून याचे भाव, का अभिप्राय – दैव, स्वभाव, चेष्टा, विलास इत्यादींबद्दल जें काहीं आता सविस्तरपणें, साद्यंततेनें सांगण्याचें करितो – येथे भावच – जीवस्वभावच मुळीं ते आपल्या सर्व अवयवासहित बोलत आहेत तिकडे लक्ष असूं देत – अवधान द्यावें (१३)

अहो! याच क्षेत्रास्तव श्रुतींनीं नेहमीं पुकारा करीत असावा – त्याची तीं अपरिमित बोलणीं होऊन असलेलीं तर्कशास्त्र जें तेंही पण ह्या क्षेत्राची व्यवस्था लावण्याचें ठिकाणच झाल्यामुळें अतिशय तोंडाळपणेंच बोलूं लागलें व ह्या इन्द्रियाचें गगनासारखे अवाढव्यपण तेंच मुळीं प्रकाराप्रकारानीं आवरिलें व्हावें असें समजून त्याचें बोलणें हें नुसतें तोंडाळपण असें तें होऊन आहे – पाहा. (१४)

हीच गोष्ट ह्या क्षेत्रासंबंधीं करितां करितां दर्शनेंही पण दमून जाऊन स्वस्थ बसलीं – त्यांनीं तेथीलची गोष्ट तशीच ठेविल्यामुळें अद्याप तीं द्वंद्वें म्हणजे वैषम्य, रहस्य, कलह, स्पर्श, दुजेपण किंवा ह्या अद्वितीयतेचें द्वैतपणाचें भांडण मिटवितां आलें नाहीं. ती ती विविद्विषा अद्याप तेथें आहेच. वर तेथें समजविणें जें तेंच मुळीं त्याना न करिता आल्यामुळें तेथें ह्या दुजयाचा छंद हा अद्याप रहस्यच घेऊन आहे. (१५)

अहो! ह्या क्षेत्रामुळें तर ही शास्त्रानें शस्त्राचें भर्तारपणाचें व्हावें असाच तेथें तगादा (घेतल्यामुळें). तेथें चंचलताच मुळीं उत्पन्न होऊं लागली. ह्या शेताचें जें नाते जोडणें का आत्मपण पत्करणें का सोयरीकच एक लग्नसंबंधानें तेथें तर नेहमी ढळणें का प्रवास हाच महत्त्व घेऊन आहे. तेथे बदलणे का सगर्वता हीच पुढें होऊन तिनें ह्या क्षेत्रास डावच ह्या बदलण्याचा दिलेला होऊन आहे. अहो! असें पाहा कीं

श्री भगवंतानीं ह्या सोयरिकेसंबंधीं अर्जुनास म्हणूं केलें कीं बाबा जो मातेच्या उदरास येतो – जो ह्या मातेच्या उदरामधून निघालेला तो ह्या मातेचा सोयराधायरा, का सोयरिकतेच्या नात्याचा का गोताच्या संबंधाचा, असें हें केव्हाही होणारें नव्हे – तेथें चाचलयच एक किंवा प्रवासीपण हेंच मोबदलाच एक जमा ( १२ – ८३ ). ह्या क्षेत्राच्या एकसारखेपणामुळें किंवा एकरूपतेमुळेंच मुळीं ह्या जगामध्यें वाद प्रस्थापित होऊन असलेला आहे. अहो ह्या क्षेत्राच्या प्रीतीमुळेंच अमूर्त असा जो परमात्मा तो मूर्त होऊन एकरूप किंवा सारखेपण आलें व त्यामुळें ह्याची जी स्थिति किंवा अवस्था आहे ती आवडत आहे ( ४ – १२ ). म्हणून जो परमपुरुष ज्यास 'रुखुमाईचा पति' म्हणूं केलेलें तोच एक सोयरा होय असेंच मानिलेलें होय. (१६)

तोंडास तोंड मिळावें, नुसत्या तोंडानेंच तोंडावर पडूं नये. तोंडच तें मिटावें – तोंडाची मिळणी व्हावी का हे वाद मिटावेत ह्या बोलांनीं बोलणें तें घडलें जाऊन तेथें भांडण हें बंद व्हावें अशा अनेक युक्तीमुळें तर ह्या बडबडण्याची चिकस्त झाली – हद्द झाली, शर्थच होऊन आहे. (१७)

असें हें जें स्थळ किंवा क्षेत्र हें कुणाचें आहे तें काहीं समजेचना, पण तेथें ह्या वांछेचें का अभिलाषाचें बळच वाढल्यामुळें तेथें घरोघरीं ती इच्छा हीच पुरती व्हावी अशी एक तेथे मनीषाच – त्यामुळें दैव हेंच मुळीं रुसून असल्यासारखें जसें का तेथें दैवच पुढें होईना तेथे गृहस्थ कोण, शरीर हें कसचें – गुणाच्या पलीकडचा भाव तो देव कसा तें पाहाणें कोणी करीना. पण इच्छेचें हपापणेंच एक (१८)

आस्तिक्यबुद्धि का अस्तित्वभावच क्षेत्र मुळीं नच आस्तिक्याचें काय काय नसते नसते छंद घेऊन ही ईश्वरत्वाची भावना हीच मुळीं (अन् ईश्वरत्वावर) उभी होणारी आहे असें त्यानीं आपलें ठाम मत देऊं केल्यानें ह्या वेदांनीं तर आपला भर त्या परमात्म्याचें प्रस्थापितपण करण्याकडे केल्यानें नेति नेति म्हणजे इथेच हें थांबत नाहीं असें म्हटलें – एवढ्यावरच हें काहीं भागत नाहीं – 'हें नव्हे हें नव्हे' – जें समजतें तें नव्हे – असें त्याचें तें गाढेपणाचें दाटपणाचें बोलणें त्यानें तर सर्व आकाशच व्यापिल्यामुळें अतिशयतेचा असाच तो अव्ययत्वाचा भार उचलावा लागला गेला. तेथें त्याचें तें बोलणे हें सविशेषतेच्या एका निराळे-पणाचें असेंच होऊन त्यानें तर सर्वांची दृष्टीच मुळी आपणाकडे वळविली – व ह्यामुळें तें जें तिसरें पाखंड नावाचें तें तर भलतेंच बोलूं लागलें – त्याची बडबड तिसरीच एक गोष्ट पुढें घेऊं लागली व निदर्णेच एक तेथें वर येऊं केलें गेलें ते म्हणूं लागलें कीं हे वेद म्हणून जे आहेत ते तर काहीं निर्मूळ असेच होत. त्याना कसलाही आधार म्हणून नाहीं. ते आधारशून्य होत व त्यांनीं केलेलें ते वाग्जल्पन किंवा वाग्जाळ हें लटिकेपणाचें समग्र असें आहे. (१९)

देहाच्या इंच इंच जागेवर जसे अवयवाचे – अवयवादेहाचे – देहादेहाचे झुपकेच जसे असणारे तेथें अस्ताव्यस्ततेचें तें परिमापन हें कसें श्वसनभारानें ह्या जीवदशेनें जीवपणाच्या त्या देहधारणेस उचलणारें असें – देहाची घडण ही बुंद बुंद पाण्यावरच मुळीं मोत्याची घडण तेथें सात्विक भावना एक उगवणारा त्या त्या उपमाकोटींनीं : : जहल्लक्षणा – का जहद जहल्लक्षणा ही त्यागाचा धडा देणारी, तेथे ती ती भूमिका ही आपापलीच मुळीं ती धारणा प्रखर पणाची करणारी झाल्यानें तेथे मशागत, मजुरी, सेवा, विधि, विधान तेथें शब्दसंभार हाच परम एक दिव्यभार म्हटला जाणारा होय – व आतां ह्या प्रकृति जमीन, भूमिका, भूमि, मेदिनी इत्यादि त्या जशा का निरनिराळ्या प्रकृतिमंततेच्या वाञ्छनाकार कुशलत्वच होय – तेथें आता असा हा "सत् शब्दः" शब्दभार – शब्दधारणा – शब्दसभार हाच जसा का एक नव्हाळीचा सुरेख तो ह्या नावाजलेल्या का नावानावावर उभ्या होणाऱ्या त्या दयिता, वनिता, अस्तुरी, स्त्री, बायको इत्यादींच्या नटण्यानेंच मुळी तो तो भार त्याच्या दिलपसतीचा असा आवडून घेतलेला असल्याने आता येथे त्या त्या स्त्रीलिंगांनीं – स्त्रियानीं बुद्धिमतिभारानीं आपापलें सुभगत्व का सौभाग्य, नवरे हुडकून घ्यावेत जसे का एक

ह्या देहरूपी भूमि जमिनीची मशागत केली – असें येथें हें होतच असतें पण तें कसें ह्या बोलीनें बोलाप्रत आणावें घ्यावें – बोलीनें बोलीच्या बांधेसूदपणाचें करावें हेंच मुळीं काळाची वाट पाहात असलेलें जसें कां ! ती ती रचना आतां आपल्या दिव्यतेस आली तर मग तेथें जशी कां ती बुद्धि कुशल हीच मुळीं आपल्या हुरुपास सौभाग्यास आल्यानें देवताच एक अशी महत् भाराची सर्व जगासही पुरून उरणारी अशी दिव्य आदेशाची होय म्हणून येथें ती सहज गृहाची ती गृहिणी का अस्तुरी म्हटली गेल्यानें अनेकच्या अनेक बुद्धिभार ह्या आस्तिक्य बुद्धिभावनेचे तेच मुळी ह्या – राजमुद्रेशिवाय भलत्यास नच भजण्याचें करून आपल्या स्वतःच्या अशाच त्या आस्तिक्य भावनेवरच उभ्या झाल्या व प्रजागर जो जागतेपणच एक तेथेंच उघड्या डोळ्यांनीं नांदू लागल्या. [ आस्तिक्य = पै राजमुद्रा आथिलिया। प्रजा भजेभलतेया। तेवि शास्त्रें स्वीकरलिया। मार्गमात्राते ॥ ८४९ (१८) ] व हें जर मानीत नसाल तर आम्ही तर ही गोष्ट करण्यानें का अर्थ बोलण्यानें प्रतिज्ञेची सुपारी घेऊन आहोत कीं आमचेंच म्हणणें खरें आहे निर्मळपणाचें जें विरक्ताचें लक्षण किंवा देहसाधन हेंच तपश्चर्येचें करणें येथे तत्परपण पाहात असल्यानें तेथें निर्मळपणाचें अगच आपलेंसें केलेलें होय पण ही ‘देहसाधन तत्परपणाची परीक्षा’ हेंच मुळीं अवघड वाटल्याने मग काय लटिकेपणच आंत डोकावूं लागलें, असें केव्हाही होणारच (२०)

पाखांडाचिये कडे। नागवी लुंचिती मुंडे।
नियोजिली वितंडे। तळासी येती ॥ २१ ॥
मृत्युबळाचेनि माजे। हे जाईल-वीण काजे।
ते देखौनि व्याजे। निघाले योगी ॥ २२ ॥
मृत्यूसि आधाधिले। तिही निरंजन सेविले।
यमनियमाचे केले। मेळावे पुरे ॥ २३ ॥
येणेचि क्षेत्राभिमाने। राज्य त्यजिले ईशाने।
गुंति जिणौनि स्मशाने। वासु केला ॥ २४ ॥
ऐसिया पैजा महेशा। पांघुरणे दाही दिशा।
लांचकरू म्हणौनि कोळसा। कामु केला ॥ २५ ॥
पै सत्य लोकनाथा। वदनें आली बळार्था।
तऱ्ही तो सर्वथा। जाणेचि ना ॥ २६ ॥

पाखाडाचे = पाखाडाचिये नागवी = कच्छहीन. लुंचिती मुंडे = डोकीचे केस उपटणारी. तळासी येती = गप्प बसतात (२१) जाईल = जाई. वीण काजे = व्यर्थ. व्याजे निघाले योगी = ह्या निमित्तानें योगी योगास निघाले (२२). आधाधिले = भ्यायलेले. निरंजन = निर्जन = एकांतवास (२३). ईशाने = शंकरानें गुंति जिणौनि = उपाधि जिंकून का जाणून (२४). पांघुरणे दाही दिशा = अवधूतपण पत्करावें लागलें. लाचकरू म्हणौनि कोळसा कामु केला = भ्रष्ट करणाऱ्या कामाची – कामरूपाची – मदनाची राखच करुन टाकिली (२५). सत्य लोकनाथ = ब्रह्मदेव

आस्तिक्य भावना हीच ज्याना सापडली नाहीं तेथें त्यांनीं तीं प्रत्याहाराची जीं अवघड ठिकाणें किंवा कडा ह्या नच सांपडल्यामुळें त्यांनीं ह्या शून्यवादामध्येंच फसणें केलें. तें नागविलें गेल्याने त्यांना तत्त्व हें सापडलें नाहीं – वर – ते अव्यक्तच त्याना सापडलें नाहीं तेथें साजवेळा जी ह्या त्रिगुणाचें लग्नच एक ती त्यानीं नुसती विचारावरच टाकिली – तेथें संलग्नता ही त्यानीं पाहिलीच नसल्यामुळें तो विचारच नुसता विचारानें राहिला त्यामुळें तेथे एक नागवणेंच झालें. दिगंबरपणाचें तत्त्व हें त्यांनीं केसाचें कुंचणें करून

जसें स्थापित केलें. तेथें मिथ्यावादाची आज्ञा का तगादा का नेमणूकच एक असा ताळच टाकिल्यामुळें त्यांना गप्प बसणेंच होऊन आहे. तोंडाला टाळाच बसतो असें होऊन आहे. (२१)

मृत्यूनें जर बळ केलें तर तेथें सर्व देह हाच मुळीं त्या त्रितापादि प्रारब्धादिकडे खर्च होणारा होईल व मग हा जन्मच मुळीं व्यर्थ आला किंवा जाला असें एक निमित्त पुढें झाल्यानें योगीच मुळीं जो योग होऊन आला योगच मुळीं ह्यावरच जन्मला. योग हाच योगी होऊन आला – तेथें हा मनुष्य जन्म शोभूं लागला. (२२)

मानसिक दुःखामुळें ह्या मृत्यूसच भ्यालेले ते त्यांनीं तर निर्मळपणाची विरक्तता पत्करिली व एकांतवासांत राहाणें केलें व यम व नियम म्हणजे इंद्रियांचें दमन व मनाचें आकलन हें जेवढा भार घेऊन असणारें तेवढ्या भारास त्यानीं तोंड देऊन तें आपलेंसें केलें. (२३)

ह्या शेताचा किंवा क्षेत्राचा अभिमान घेऊन जो महादेव श्रीशंकर त्यांनींही पण (हें देहराज आत्म्याचें जें ह्या क्षेत्रावर स्वामित्व चालविणें तें) शिवलोक सोडून देऊन ती देहाची उपाधि लक्षांत घेऊन – जाणून का (योगघोष का योगयुक्ति) युक्तीनें जिकून का जिंकावा म्हणून स्मशानामध्यें म्हणजे मसणवटींतच वास केला (२४)

ह्या उपाधीसच मुळीं जिंकिलें पाहिजे अशी एक तेथें पैजच लागल्यामुळें त्यानींही पण आकाश हेंच वस्त्र करून दिशा ह्या पांघरण्याचें केलें व भ्रम करणारा जो काम तोच मुळीं आपलासा केला – आवरला – जिंकला – म्हणून तेथें आतां ती देहबुद्धि तो काम व तें कामरूप हेंच मुळीं आवरिलें गेलें व योगच मुळीं तो महत्त्वास आणला गेला – तेथें चित्ताचें सर्व प्रकारें आकलन होऊं लागलें – केलें गेलें – भिंधेपणाच होण्यानें सर्व कळ्याच मुळी ह्या देहधारणेस पाहूं लागल्यानें तेथें लज्जा जी तिनें सर्व लोकाना मुळीं वरचढपण दिलें. तेथें जसे का सुललित म्हणजे देखणा किंवा पात्रतेचा भारच मुळी ह्या सर्व देहास दिवसाचा करून त्या पुरुषबीजास प्रकृतीशीं समेट पाहिल्यामुळें तेथें इच्छा, मदन का भोग्यवस्तू ह्याच मुळीं आपल्याशा तें बीज ह्या प्रकृतीशीं रमूं लागलें पण भिंधेपण हेंच जर महत्त्व ह्या कामास आकळून केल्या काम कोळसा केला – कामच मुळीं अग्नीचा केला – म्हणून अक्षराचें परमदिव्य हेंच बुद्धियोगाचें रहस्य सांख्याच्या पदरात पडेना व अव्यक्ताच्याही पलिकडे जें दुसरें सनातन अव्यक्त तें तर मुळीच त्यांनीं पाहण्याचे केलें नाही हा काम लाच देणारा असा म्हणून त्यास लज्जेमुळें काळेंठिक्करपणाचें केले अहो कोणीही ते तसें त्याचे केलें नाही पण तोच आपण स्वतःस लाजला व काळा ठिक्कर पडला (२५)

सत्यलोकामध्यें वास्तव्य करणारा जो ब्रह्मदेव त्यासही पण एकाची चार तोंडें होऊन तीं वदनें बळाच्या – आरक्ततेच्या सामर्थ्यास आलीं तरी पण तेथें ह्या क्षेत्राचें जाणणें हेंही त्याचेकडून होईना. (२६)

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥४॥**

बहुधा = बहुतप्रकारें, अनेक वेगळ्या प्रकारानीं. गीतम् = गायिलेलें पृथक् विविधै· छंदैः = वेगवेगळयापणानें अनेक छंदानीं. ब्रह्मसूत्रपदै = ब्रह्मप्रतिपादिक सूत्र पदानीं वचनानींही. सूत्र=धागा, दोरा, प्रत्यय, लागाबाधा सापडावा म्हणून – त्या ब्रह्मसूत्रपदानीं हेतुमत् हेतुमद्भिः = हेतु धरून असणारे हेतुमन्त जे त्यानीं (हेतु = आवड, इच्छा, युक्तिसिद्ध) विनिश्चितैः = निश्चितपणाची तीं पदें करून

अन्वय—(इदं क्षेत्रम्) हेतुमद्भि ऋषिभिः बहुधा पृथक् विविधैः छंदैः गीतम्, विनिश्चितैः ब्रह्मसूत्रपदैः च एव।

अर्थ—(हें क्षेत्रक्षेत्रज्ञाचें वर्णन) हेतुमंत असे जे ऋषी त्यांनीं ब्रह्मप्रतिपादक सूत्रपदांनीं–वचनांनीं, प्रत्ययाचें–निश्चितपणाचें करून–निर्धाराचें, प्रयोजन कारण–परिणामाचें करून–अनेक तऱ्हांनीं, वेगवेगळ्या अनेकविध छंदांनीं गायिलेलें असें हें क्षेत्र आहे हें क्षेत्रक्षेत्रज्ञाचें वर्णन पूर्वीं वसिष्ठादि ऋषींनीं ऋग्यजु इत्यादि निरनिराळ्या वेदोक्त मंत्रांनीं युक्तिसिद्ध व निश्चित प्रत्यय उत्पन्न करून देणाऱ्या ब्रह्मप्रतिपादक सूत्रमय वचनांनीं आणि त्याचप्रमाणें दुसऱ्या अनेक वेगळ्या प्रकारांनीं विवेचनपूर्वक गाइलें आहे म्हणजे वर्णन केलें आहे तात्पर्य क्षेत्रक्षेत्रज्ञाचें यथार्थ विवेचन पूर्वीं ऋषींनीं वेदमंत्रांचे सयुक्तिक आधार देऊन येथें सांगितल्याप्रमाणें केलें आहे

(कर्मवादी)

**एक म्हणती हे स्थळ। जीवाचेचि समूळ।**
**मग प्राण हे कुळ। तयाचें पथ॥ २७॥**
**जो या प्राणाचे घरीं। अंगें राबते भाव चारी।**
**आणि मना ऐस आवडी। कुळवाडी करु॥ २८॥**
**तया इंद्रिय बैलाची पेटी। न म्हणे अंवसी पाहाटी।**
**विषय क्षेत्रीं आटी। काढी भली॥ २९॥**
**मग विधीची वाफ चुकवी। आणि अन्यायाचें बी वाफवी।**
**कुकर्माचा करवी। राबु जरी॥ ३०॥**
**तरी तयाचि सारिखें। असंभाव्य पाप पिके।**
**मग जन्मकोटी दुःखें। भोगी जीव॥ ३१॥**
**ना तरी विधीचिये वाफे। सत्क्रिया बीज आरोपे।**
**तरी जन्मशत मापे। सुखचि मविजे॥ ३२॥** (साख्य)
**तंव आणीक म्हणती हे नव्हे। हे जीवाचेचि न म्हणावें।**
**आमुतें पुसा आघवें। क्षेत्राचें या॥ ३३॥**
**अहो जीव पथ उखिता। वस्तीकरू वाटे जातां।**
**आणि प्राणु हा बलौता। म्हणौनि जाणे॥ ३४॥**

एक=कर्मवादी (२७) या=जया राबते भाव–राबती भाऊ=अपान, व्यान, उदान व समान असे चौघेजण आपल्या अंगानें असती. कुळवाडी करु–कुळवाडीकर=शेतकी करणारा शेतकरी (२८). इंद्रिय बैलाची पेटी=विषय क्षेत्रच मुळीं आटविण्यासाठीं दहा बैलरूपी इंद्रियांची जोड जेथें विषयाचे आक्रोश हेच आवरिलेले. आटी=अगमेहनतीनें आवरणें. फांवले (२९). विधीची वाफ चुकवी=दैव जें त्या दैवाचें होणें किंवा स्वहित साधण्याची सवड चुकवून. अन्याय=न्यायाचें जें नाहीं तें अन्यायाचें. बी–बीज. वाफवी=पेरतो. राब=सराव, राबणें, अंगाचें करणें (३०). आरोपे=राबणें जरी तरी ते राब किंवा सरावाच्या पाठीमागें लपून एका उत्तम क्रियेचे केलें. मविजे=मोजतो, भोगतो शत–कोटि (३२). आणीक=दुसरे कोणी, साख्य. क्षेत्राचे या–सेताचे यया (३३). उखिता=पाहुणाच जसा येणें जाणें करणारा किंवा वाटसर बलौता=बलुतेदार–बाराबलुत्यापैकीं एक (३४).

कर्मवाडी म्हणूं लागले कीं हें शेत, क्षेत्र का स्थळ हें समूळपणें जीवाचें होय व तो जीव ह्या प्राणासच मुळीं राबविणारा असतो. हा प्राण जो तोच त्याचें कुळ कीं दुसऱ्या शब्दात मेहनत करणारा एक गडीच ठेविला जसा (२७)

ह्या प्राणाच्या घरी म्हणजे ह्या प्राणामध्येंच चार भाव किंवा चार भाऊ अंगमेहनत करून असतात आणि मना (इच्छा, स्वभाव) सारखाच मुळी एक शेतकी करणारा, कुळवाडी करणारा किंवा हें सर्व कांहीं आवरून धरणारा असतो. (आतां येथें असेंच म्हटलें गेलें कीं शेती ही हरिनामाची जशी का व तेथे भावरूपी चार ह्या प्राणाचे भाऊ आपल्या सर्व अगानीं राबत असतात) (२८)

त्यास इंद्रियेंरूप बैलाची जोडी होय सर्व विषयक्षेत्र – ज्ञानेंद्रियांचे पंच विषय शब्द, रूप, स्पर्श, रस, गंध – आटविण्यासाठीं किंवा विषयाचें आक्रोशणें हेंच अगमेहनतीनें आवरिलेलें होतें तेथें एऱ्हवी का आवशी का संध्याकाळची का पहाटची वेळ असें न म्हणता एकसारखा तेथेंच तो राबून असतो. (येरव्हाळी म्हणजे रात्र होण्याचे अगोदर, आवशी म्हणजे ठरलेल्या किंवा नेमलेल्या वेळेचे अगोदर. अमक्याच वेळीं झालें किंवा केलें पाहिजे असें नच होता सर्वकाळी )

ह्या प्राणास (चार भावासहित अंगमेहनत करणारा त्यास) इंद्रियेंरूप बैलाची जोडी होय. ती सर्व विषयक्षेत्रास = म्हणजे ज्ञानेंद्रियाचे पंचविषय (ध्येय – लक्ष्य), शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध व कर्मेंद्रियांचे (ज्ञानेंद्रियें = त्वचा, जीभ, डोळा, कान व नाक कर्मेंद्रियें = हात, पाय, गुद, उपस्थ, वाणी) पंचविषय (क्रिया) करणें, चालणें, बोलणें, मळ व मूत्र विसर्जन = आटविण्याकरिता किंवा आवरण्याकरिता – किंवा विषयाचें आक्रोशणें हेंच मुळी आवरिलेलें करण्याकरितां होय. तेथे येरव्हाळी का आवसी का संध्याकाळीं का पहाटेचे वेळीं असें न म्हणतां एकसारखा – मनाच्या इच्छेचा लळा का स्वभावच तेथें जसा पुरविला गेला – तेथेंच तो राबून असतो – एकसारखा काम करून असतो (अमक्याच वेळी, नेमलेल्या का ठरलेल्या वेळींच असें न म्हणता तो तेथे – जसे का नेमलेल्या वेळेच्या अगोदरच मुळी किंवा सर्वकाळीं). (२९)

आणि मग जर स्वहित कर्माची सधी दवडून अन्यायाचें बीज पेरतो जर कुकर्माचा राब का सरावाचा केला – विहितकर्म करण्यास मिळालेली ही सवड, संधी दवडून तेथें खपणें ते अन्यायाचे बी बीज असेंच गोळा बेरजेनें जर पेरलें – तेथेंच राबणें केलें तर कर्तव्यकर्माची ऊब चुकवून जर अन्यावो – अन्याय बीज पेरलें – वाफेंत घातलें व कुकर्माचा जर राब – सराव तेथे – तसें ते पेरणे हेंच सरावाचें केले जर तर तयाच्या सारखेंच पाप असें भाग्य तेथे पिकतें. व मग कोटीच्या कोटी जन्म दुःखाचे असेच तो जीव भोगीत राहतो. (पाप = उत्पत्ति किंवा सख्य होण्याची योग्यताच मुळीं जेथें नाहीं असें.) (३० – ३१)

अथवा सृष्टिरचनेचें अग ज्यास कर्म म्हटलें आहे तसें तें आंग जर पुढें घेऊन चाललें तर तेथें ब्रह्मदेवच मुळीं तो सृष्टि रचणारा तोच जसा अध्यक्ष होऊन आला व आता सर्व काहीं यथाशास्त्र यथापद्धत होऊं लागल्यानें ह्या जीवदशेची ऊब, इच्छा, जीवितगोडी हीच मुळी वाफेंत घातली, तीस उबारा दिला, पोटच्या प्रेमाचें केलें, पोटींच वाहून आहे असें जर तेथें ते सत् बीजच एक क्रियेवर टेकविलें क्रियेचें केलें तर वर जें कुकर्माच्या करण्याचें आरोपणें जें मिथ्यात्वच एक ते नाहींसें होऊन तेथे उत्तमत्व हेंच त्या क्रियेला पाहूं लागून पुरुषाचें जसें तें अंग आपल्या मदतीस येऊन आहे असें होतें सत्वस्तूची जी क्रियाशक्तीची प्रेरणा किंवा प्रभाव ह्राच तेथे आतां आरोपिला गेला – कामच कमवूं लागला असें होतें – सर्व रूपणें, उगवणें किंवा रूपास येणें होऊन आहे असें झालें तर मग काय शेंकडोशे वर्षे नव्हे तर कोटीच्या कोटी वर्षेच जशी आपलें माप घेऊन आहेत असे ते होऊन मग सुखच एक सर्व मावून आहे – आत पैस घेऊन आहे असें होतें – मग सुखच तेथें शतकोटी वर्षे हा जीव भोगत राहातो – कामच कमविला गेल्यानें धर्मास आला तेथें सर्व सुखच सहजपणेंच आपलेंसें होऊन येतें (३२)

अशा ह्या विधानावर आणीक दुसरे कोणी ज्यांना सांख्य म्हटलें आहे ते म्हणूं लागले कीं अहो! असें तें नाहीं – अहो, तेथें हें जीवाचें असें म्हणणेंच होत नाहीं – तेथें काय असतें तें आम्हाला पुसा म्हणजे आम्ही ह्या क्षेत्रासंबंधीं सर्व कांहीं सांगतों. (३३)

अहो, येथें या क्षेत्रामध्यें हा जीव नुसता एक पांथस्थ – का वाटसरु किंवा पाहुणा आलेला असतो – तो प्रवासामध्यें असलेला असा एक वाटसरु क्षणभर वस्ती करण्यास आलेला असून तेथें प्राण हा जसा एक बलुतेदार असल्यामुळें तो जागा राहातो. त्यास आपल्या निर्वाहाची ती योग्य हिस्सेदारी का वाटणी पोहोंचावीच म्हणून तो एकसारखा जागा असतो येथें बलौता जो तो जसा ह्या जमिनीची नांगरट पाहाणारा असून त्यास तेथीलच्या तळाचीं जीं वर आणिलीं गेलेलीं ढेपें – तेथें बारावी बुद्धि हीच आपला सर्व भार घेऊन असते. वृद्ध कपीच एक जसा आपलें वृद्धाप्य त्या तेथीलच्या क्रियेनें बसविणारें असें मन लावून काम करणारें तें त्याचें त्या जागेपणानें असण्याचें होय. बळ हेंच तेथें इंद्रियेंरूपी करणानीं का औत इत्यादि उपकरणांनीं उजविलेलें (३४)

अनादि जे प्रकृति। सांख्य जियेतें गाती।
क्षेत्र हे वृत्ती। तियेची जाणा ॥ ३५ ॥

आणि तियेतेचि आघवा। आथी घर मेळावा।
म्हणौनि वाहिवा। घरीं वाहे ॥ ३६ ॥

वाह्याचियें—वाहिव्याचियें—राहाटी। जें मुदल निघे इये सृष्टीं।
ते तियेच्याचि पोटीं। जाले गुण ॥ ३७ ॥

रजोगुण पेरी। तेतुलें सत्व सोकरी।
मग येकलें तम करी। सांवगणी ॥ ३८ ॥

रचुनि महत्तत्वाचें खळे। मळी येकेचि काळें।
तेथ अव्यक्ताची मिळे। सांज भली ॥ ३९ ॥

तंव येकीं मतिवंती। या बोलाचिया खंती।
म्हणितले ययां स्थिती। अर्वाचीना ॥ ४० ॥

हां हो परतत्वा आंतु। के प्रकृतीची मातु।
हा क्षेत्रवृत्तांतु। उगेचि आयिका ॥ ४१ ॥

शून्य शेज साळिये। सुलीनतेचिये तुळिये।
निद्रा केली होती बळिये। संकल्पें येणें ॥ ४२ ॥

आथी = आहेपणाचा, अस्तित्वाचा का आस्तिक्याचा. घर मेळावा = घराचा कीं घरचा जमाव, समुदाय. वाहिवा = वहिवाटदारी ( ३६ ) वाह्याचिये – वाहिव्याचिये = बाह्यांगाची राहाटी का वहिवाटदारीची राहाटणी. तियेच्याचि – तियेचिया ( ३७ ) सोकरी = राखतो, सोकलेलें तेथेंच राखण करितो जसा. येकले – वेळे = वेळेस आल्यावर, उगवण्यानें पक्व झाल्यावर. सावगणी = संवगणी = मळणी, यथासांग मिळवणी, मळणी, लावणी, लाणी, साठवणी ( ३८ ). महत्तत्वाचें – महत्त्वाचें = जेथें त्रिगुण हें साम्यावस्थेंत असतात त्याचें. काळे – पोळे – काळुगेनि पोळे = काम नामक जो बैल किंवा पोळ अथवा खोड त्याजकडून. साजे – साज = संध्यासमय, लग्न, संधिप्रकाश ( ३९ ). येकीं = सकलपवादी. मतिवंती – गमती = बुद्धिवंतानी. खंती = तिरस्कार करून स्थिति – ज्ञप्ति = गति, अवस्था अर्वाचीना = अगदींच अलीकडची

अशी ही कल्पना आहे (४०). परतत्वा आंतु = जेथें सर्व परतत्व एक, तें ब्रह्मच एक तेथें. के प्रकृतीचा मातु = ह्या प्रकृतीबद्दलची गोष्ट ती कसची – कशास करितां – काय तेथें प्रकृतीची मातब्बरी ती. वृत्तांतु = रीत, गोष्ट, इतिहास, फुरसत, सत्ता, बातमी (४१). शून्य शेज साळिये – साउलिये = शून्य म्हणजे अव्यक्त हें शेजघरच जसें तें एक तेथीलच्या मंदिरांत का घरांत का घराच्या साउलीमध्यें. सुलीनतेचिये = लयरूप, मिळून गेलेला, नम्र, विनययुक्त. तुळिये = गादीवर, बिछान्यावर, लयतुल्य स्थाणूच जसा, फळीवर (४२).

नित्यसिद्ध अशी जी मूळमाया, किंवा मूळस्वभाव हाच परमेश्वर – जेथें सातरंगांपैकीं प्रत्येक – जेथें स्वभावसिद्ध निरोगी का चतुर्थशून्य अशी जी प्रकृति तिला साख्यशास्त्र गाते – सर्व महत्त्व जेथेंच देऊन आहे – तेथें क्षेत्र ही एक वृत्ति आहे – अशी ती क्षेत्रवृत्ति ही त्या प्रकृतीची आहे जेथें 'वृत्ति' म्हणजे उपजीविका, अंत करणाचा व्यापार, स्वभाव किंवा वर्णरचना असें म्हटलें 'क्षेत्र' म्हणजे राहाण्याचें ठिकाण, गृह, अंथरूण किंवा हौस का जीवितरंगरंजन, शरीर, देह. (३५)

अशा त्या नित्यसिद्ध अशा मूळमायेच्या क्षेत्रास किंवा वृत्तीसच सर्व आहेपणाचा, अस्तित्वाचा किंवा आस्तिक्याचा जसा का आपल्याच घरचा जमाव किंवा समुदाय पोहोंचविलेला असतो, आणि म्हणूनच ती वृत्ति वहिवाट बाह्यांगाची का अंतरंगाची आपल्याच घरीं, घरामध्येंच वाहून असते, वहिवाटून असते. (३६)

अशा त्या वाहिवा म्हणजे गृह पाठीवरच वाहून असणें जें, घरींच तें वहिवाटीचें करून असणें जें तेथीलच्या राहाटीमध्येंच – ह्या सृष्टीला मूळ मुद्दल म्हणून जे आहेत ते तिच्याच – मूळमायेच्या पोटींच गुण उत्पन्न झाले. (आतां सहजच असें कीं ते गुण हे समतोल असेच होते. तेथें गुण न म्हणतां गुणमयी किंवा सगुण म्हटलें ) (३७)

रजोगुण हा जितकें जेवढें कांहीं पेरण्याचें काम करितो – तितके किंवा तेवढें सर्व सत्वगुण हा राखतो, पेरलेल्याची राखण करणें हेंच सत्वगुणाचें काम जसें व नंतर तमोगुण जो आहे तो एकला वेळेस आणून – पक्व झालें असें तें वेळेस येणें किंवा महत्त्वास आलें असें तें पेरलेलें व राखलेलें, त्याची मळणी करितो, यथासांग मिळवणी, मळणी, लाणी व साठवणी करितो. (३८)

अशी ती केलेली मळणी खळयावर होणारी तेथें जसें एक महत्त्वाचें किंवा महत्‌तत्त्वाचें खळेंच केलें व तें सर्व एका काळ नामक बैलाकडून किंवा पोळाकडून का खोंडाकडून एकदमच मळले जाणारें होतें तेथे आतां अव्यक्तपणाची गांठच बांधली का अव्यक्त जें त्याचें लग्नच लागलें संध्यामयच जसा सर्व तेथें संधि-प्रकाशासारखें तें साजेस आलें असें होतें तेथें मित्रत्वाचें जसें भावणें किंवा करणें झालें (३९)

अशा ह्या म्हणण्यावर संकल्पवादी जे त्यांनीं आपणांस विशेष मतिवंत समजून अशा म्हणण्याचा तिरस्कार केला – खंतच एक त्यांनीं घेऊन असें म्हणूं केलें कीं अहो, अशा या गोष्टी – बुद्धीच्या, स्तुतीच्या किंवा ज्ञानाच्या महतीच्या त्या तर अगदीं अलीकडच्या काळाच्या आहेत. (४०)

अहो ! पर जें किंवा परतत्त्व चें ब्रह्म त्यापुढें प्रकृतीची ती मातब्बरी ती काय ? म्हणून या क्षेत्रा-बद्दलचा इतिहास किंवा रीत ती आम्हीं सांगतों ती आपण निमूटपणें ऐकून घ्या. (४१)

अहो ! बलवान् असा जो संकल्प त्यानें अव्यक्तरूप शेजबाज घरामध्यें किंवा मंदिरांत सर्व लयरूप गादीवर निद्रा केली होती. (कलाकुशलतेचें जें गहनत्व तेथें अनुमान रचना, कल्पना हीच जशी योगिनी होऊन आली तेथें संकल्पास, निश्चयास, उद्देशासच सर्व महत्त्व आलेलें मानलें किंवा युक्ततेशिवाय जो एक संयोग तोच पुढें होऊन त्यानेंच आपला उद्देश पुढें चालविला असे) (४२)

**तो अवसांत येइला। उद्यमि सदैव आला।**
**म्हणोनि ठेवा जाला। इच्छेस्तव ॥ ४३ ॥**
**निरालंबीची वाढी। त्रिभुवना येवढी।**
**हे तयाचिया जोडी। रूपा आली ॥ ४४ ॥**
**मग महाभूतांचे येकवाट। सैंध वेटाळुनि भाट।**
**भूतग्रामाचे आधार। चिरिले चाऱ्ही ॥ ४५ ॥**
**यावरी आदि। पांच विषयांची बांधी।**
**ते बांधिली प्रभेदी। पंचभूतिकी ॥ ४६ ॥**
**कर्माकर्माचे गुंडे। बांध घातले दोही दोहीकडे।**
**नपुंसके बरडे। राने केली ॥ ४७ ॥**
**तेथे येरझारेलागी। जन्ममृत्यूची सुरंगी।**
**सुहाविली निलागी। संकल्पे येणे ॥ ४८ ॥**
**मग अहंकारेसि येकलोधि। करूनि जीविता अवधि।**
**वाहविले बुद्धि। चराचर ॥ ४९ ॥**

अवसांत येइला=अकस्मात् जागा झाला. जाला=जोडला, सांपडला. इच्छेस्तव–इच्छावशें (४३) निरालंबीची=निराकार ब्रह्मतत्त्वाची, परब्रह्माची, परतत्त्वाची. वाढी=सुसंबद्धता, सुलग्नता, संलग्नता. जोडी=सारखी, खटपटीनें, सुखदु.खाचें जें कांहीं सन्चित क्रियमाण प्रारब्धावर टेकलेलें तें भोगण्याकरितां देहधारण होतें जें तें तसें एका जोडीचें जसें ह्या प्रकृतीस झेंपण्याकरितां. रूपा=रंगारूपा (४४). येकवाट=एकाच वाटेनें किंवा एकवटून. सैंध–सैरा=यथेच्छ. वेटाळुनि भाट भूतग्रामाचे आधार=भाट म्हणजे पडीक जमिनीचें एकीकरण करून भूतग्रामाचे भाग म्हणजे जारज, स्वेदज, अंडज व उद्भिज ह्याचे चारी आधार, भाग चिरले, द्विभाग–द्विधा केलें (४५). आदि=अगोदर. पाहिलें किंवा मुख्यकाम जें तें. पांच विषयांची–पांच वटेयाचि–पाचवटे=पांच विषयाची बांधी किंवा बंधारे, बाध. पाच वट यांची बांधणी–पाच वाटेकऱ्याची बांधणी. प्रभेदी=फेरफारानें, प्रकारानें. पंचभूतिकी–पांचभौतिकी=पंचभूतांचे बाध–बांधणी भिन्नभिन्न तयार केले (४६). गुंडे=धोंडे. दोही दोहीकडे–दोहीकडे. नपुंसके बरडे=पौरुषहीन जमिनी, नापीक जमिनीची (४७). येरझारा=हेलपाटे. सुरंगी=वाटा, भुयारें, भूमींतलीं विवरें. सुहाविली=सुशोभित केली निलागी=निसरडी अशी. संकल्पे येणे=ह्या संकल्पानें (कल्पनेनें) निरालंब ब्रह्मापासून तो तहत मृत्युलोकापर्यंतच्या–वाडीपावेतों रचून भिन्न केली (४८). येकलोधि–येकलाधी=ऐक्य. अवधि=सीमा वाहविले=राबविले (४९)

तो बलवान् असा संकल्प किंवा उद्देश अकस्मात् जागा झाला. व भलेपणानें नेहमीं उद्योगांत राहिल्यानें सदैव असा झाला आणि म्हणूनच तर हा इच्छेवशेकरून किंवा त्या इच्छाशक्तीमुळेंच हा ठेवा जाहला–असा हा सदैवतेचा ठावच एक जोडला गेला. (४३)

व त्रिभुवनाएवढी निरालंबीची–निराकार ब्रह्माची का परब्रह्माची वाढीच एक सुसंबद्धता–संलग्नता–हिची जोडीच एक जोडली गेली–त्याच्या खटपटीनें त्यास मिळाली, रंगारूपास आली. (४४)

मग महाभूताचे एकाच वाटेचे ते पडीक जमिनी यथेच्छ एकीकरण करून भूतग्रामाचे म्हणजे भूतसमूहाचे ते चारी भाग–समुदाय–कळप–चिरले. जसे का प्रत्येक भूताचा अर्धा भाग व बाकी प्रत्येकाचा एक अष्टमांश भाग घेऊन तें एकत्वास आणिलें तेथें जैसे का आपंचीकृततेचें होणें झालें. (किंवा भूतग्रामच

वस्तूच एक असा तापत्रयाचा नाश करण्यासाठीं करून गोपवेशाचे आड राहून तेथें ही वात्सल्यभक्तीच अशी भक्तवात्सल्यवेस आली). अथवा अंडज, जारज, स्वेदज, उद्भिज अशा त्याच मुळीं महाभूतांच्या नापीक जमिनी त्या चारी चिरल्या – फाळल्या. (४५)

नंतर अगोदरचें काम किंवा मुख्य असें जें करणें तें म्हणजे ह्या पांच विषयांची बांधी बांधणी ती पंच-भूतांच्या प्रकाराप्रकारांनीं बांधिली – पांचभौतिक प्रकारांनीं विशेष असें करून अगोदर ती पांच विषयांची बांधी बांधली. प्रभेदानें म्हणजे फेरानें का प्रकारानें अथवा विशेषसें असें तें (पांच विषयांचें असणें तें) पंचभूतांनीं त्या पांच विषयांची बांधी – बांधणी बांधून टाकिली. पांच वटयाची – वृक्ष हा डिम्यांनीही पण वृक्षपणास आणिला गेला तेथें त्या वृक्षाचें अपरंपारपण जसें तसें ह्या विषयांचें तें तसें असणें हे बांधि बांधेसूदपण का आडकाठीच ती ह्या पंचभूतांच्या प्रकारांनीं – फेरांनी किंवा विशेषांनीं बांधून टाकिली, जखडली गेली – भिन्नभिन्न केली. बांधि, बंधन, रचलेलें तें बाधून टाकिलें, तयार केलें. (४६)

कर्माचे का अकर्माचे धोंडे दोहीदोहीकडे (बाधच जसे) घातले व पौरुषहीन जमिनी का नापीक अशीं माळरानें, चोपणाचीं तीं रानें करून सोडलीं. (४७)

तेथें आता हेलपाट्याकरितां का येरझारा, जाणेंयेणें करण्याकरितां ह्या संकल्पानें निसरडी अशी जमिनीं-तील भुयारें सुरेख केलीं – सुशोभितपणास आणिलीं. ह्या संकल्पानें ह्या कल्पनेनें निरालंब ब्रह्मापासून तों तहत मृत्युलोकापर्यंतच्या वाडीपावेतों रचून तीं भुयारें भिन्न केलीं. (४८)

जीविताची सीमाच झाली – जीवित्व हें अगदीं परम अवधीचें असें शर्थतेचें झालें अशी एक लोधीच ह्या भूतादीम् सहित – म्हणजे एकला हाच सर्व धी आहे अशा अहंकारासहित – जीवअभिमानासहित ऐक्यता केली व चराचर आतां ह्या बुद्धीनें (रूपी देवतेनें) राबविलेंच जसें. (४९)

**ययापरी निराळी। वाढे संकल्पाची डाळी।**
**म्हणौनि तो मुळी। प्रपंचा यया ॥ ५० ॥**

**इयापरी मतमौक्तिकि। येथ पटिघाइले आणिकि।**
**म्हणति हां हो विवेकि। कैसे तुम्ही ॥ ५१ ॥**

**परतत्वाच्या गांवीं। संकल्प सेज देखावी।**
**तरी कां पां न मानावी। प्रकृति तयाचि ॥ ५२ ॥**

**परि असो हे नव्हे। तुम्ही यया न लगावे।**
**आतांचि हें आघवे। सांगिजेल ॥ ५३ ॥**

**तरी आकाशि कवणें। केलि मेघाचि भरणें।**
**अंतरिक्ष तारांगणें। धरि कवण ॥ ५४ ॥**

**गगनाचा तडवा। कोणें वाढविला केव्हां।**
**वारा हिंडत असावा। हें कोणाचें मत ॥ ५५ ॥**

**रोमा कवण पेरी। कोण समुद्र भरी।**
**पर्जन्याच्या करी। धारा कवण ॥ ५६ ॥**

निराळी = निराळ म्हणजे चिदाकाशांत. डाळी = वर्तणुक, डाहाळी. मुळी = मूळच तो ह्या प्रपंचास (५०) मतमौक्तिकि – मतमुक्तकी = संकल्पवाद्याची मतें. पटिघाइले – पडिघाइले आणिकी = ह्या संकल्प-वाद्याना स्वभाववादी जे त्यानीं पराभविलें. कैसे तुम्ही – तरि तुम्ही भले (५१). मानावी – मनावी.

तयाचि = सांख्याची (५२). यया - या. सांगिजेल - सांगिजैल (५३). तडवा - तडावा - थडवा = चांदवा. वाढविला = ओढिला, वेढिला. केव्हा - केधवा. वारा - पवन. मत = आज्ञा (५५). कोण - कवण - कोण समुद्र भरी - सिंधू कवण भरी (५६).

याप्रमाणें निराळामध्यें म्हणजे चिदाकाशांत संकल्पाची वर्तणूक होऊं लागल्यानें तोच मुळीं किंवा हा संकल्प हाच मुळीं ह्या प्रपंचाचें एक मूळ होय. (५०)

अशा तऱ्हेचीं हीं सकल्पवाद्यांचीं मतें - मनसोक्त अशीं तीं, तीं पण आतां स्वभाववाद्यांनीं 'अहो, असला कसला हा तुमचा विवेक म्हणून 'किंवा अहो जर तुम्ही खरे विवेकी असाल तर भलेपण तुमच्या पदरीं येईल' असें म्हणून (त्यांनीं तीं मतें) ती पराभविलीं. ते म्हणूं लागले कीं— (५१)

अहो! परतत्त्व जें, श्रेष्ठतत्त्व जें, ब्रह्मतत्त्व जें, परब्रह्मतत्त्व जें - तेथें परतत्त्वाच्या - म्हणजे श्रेष्ठतत्त्वाचें आत्मतत्त्वाचें सर्वैथैव जें कांहीं आपण त्या गांवचें होणें तेथें जर संकल्पाची सुरेखता पाहावी तर मग कां बरें अहो तेथीलची ती - किंवा तयाची ती प्रकृति नच मानावी - अहो तेथें त्या सांख्यांच्या प्रकृतीचें मानवणे - कां करूं नये - अगोदर तीच मुळीं गोडीस आणावी तें कां न किंवा ती मानावी 'वाह क्या खूब!' अशी एक मान्यतेची ती का बरें न करावी खाऊ दिल्यानें मुलें समजविलीं - गोडीगुलाबीचीं केलीं जातात, त्याप्रमाणें ती अगोदर करावी. कां करूं नये. (५२)

पण हें असो. असें काहीं तें नाहीं. तुम्ही ह्या बोलण्यास तोंड देऊं नये. हेंच एक निश्चिततेचें असें तें मानूं नये — म्हणून तेथीलची सर्व गोष्ट आता सांगतों, आईका — (५३)

तरी अहो! आकाशाच्या ठायीं जीं काहीं मेघाचीं भरणें होतात तीं कोणी बरें केलीं - तीं कोण करतो बरें! व हीं जीं अधांतरीं दिसत असलेलीं तीं तारागणें कोण बरें झेपून आहे ते. (५४)

गगनाचा चांदवा अथवा तडवा हा कोणी बरें ओढिलेला आहे व तें केव्हां? व वायू किंवा पवन हा हिंडत असावा असें हें वायू हा का वारा हा कुणाच्या आज्ञेवर हिंडतो फिरतो आहे बरें! (५५)

अहो! ह्या अंगावरच्या लवेची का रोमाची किंवा केसांची वाढ पाहावी तो जसें काहीं एक तेथें पेरणेंच झालेलें दिसतें. जर, मग तेथें ती पेरणी म्हणावी तर कोण बरें ती करीत असेल? अहो समुद्र हा कोण भरतो? कोण त्यास भरवतो? किंवा पर्जन्याच्या धारा ह्या वळतो तो कोण बरें! (५६)

तरी क्षेत्र हें स्वभावें। हे वृत्ति कवणाचि नव्हे।
हे वाहे तया फांवे। येरां तुटे ॥ ५७ ॥

तंव आणिके येकें। क्षोभें म्हणितलें निकें।
तरि भोगिजे येकें-। काळें केवीं ॥ ५८ ॥

हे जाणो मृत्यु रागिटा। सिंहाडयाचा दरकुटा।
परि काय कीजे वाजटा। पूरिजत असे ॥ ५९ ॥

महाकल्पापरौति। कव घालुनि अवचिति।
सत्यलोक भद्रजाति। आंगी वाजे ॥ ६० ॥

तरि ययाचा मार। देखताति अनिवार।
परि स्वमतिभार। अभिमानिया ॥ ६१ ॥

लोकपाळ नित्य नवे। दिग्गज मेळावे।
स्वर्गीचिये आडवे। रिघोनि मोडी ॥ ६२ ॥

वाहे=वाहून असतो, त्यांतच राबतो जो (५७). आणिके येके=काळवाद्यांनीं. क्षोभे–रोषे= रोषास येऊन (५८). जाणो=जाणे. मृत्युरागिटा=रागावलेला मृत्यूच. सिहाडयाचा दरकुटा=सिहाची गुहा. वाजटा पूरिजत असे=अहो वाजणारे असे का वाजट असें तुमचे बोलणें का बडबड ती काय पुरी पडणार? (५९) अगी वाजे=आगविजे, झेप घालतो. सत्यलोक=ब्रह्मलोक. भद्रजाति=हत्ती (६०) परि=तरी. भार–भर (६१). दिग्गज=दिग्गजाचे मेळावे=समुदाय. आडवे=अरण्यात (६२)

तसेंच त्याप्रमाणेंच हें देहक्षेत्र जें स्वभावेंकरून आहे हें कुणाचीही विशिष्ट वृत्ति किंवा वतन नव्हे ह्या वृत्तीस वतन उपजीविका म्हणावें तर ती अमक्याचीच आहे असें नसून तें जो अगीं वाहून असेल, मशागतीचें करील, त्यात जो राबेल त्याचेंच तें होय. जो ह्या क्षेत्रास अगावर वाहातो त्याचेच ते जाणावें, त्यासच तें फावतें, लाभतें, सापडतें, एरव्हीं तें तुटतें.

हें जसें आपल्या स्वभावानेंच घडून येतें तसें देहक्षेत्र हें स्वभावसिद्ध आहे, हें कांहीं कोणा एकाचें विशिष्ट वतन नाहीं. याची जो मशागत करील त्याचें तें होतें. इतरांना तें लाभत नाहीं (५७)

अशा ह्या स्वभाववाद्याच्या बोलण्यावर काळवादी जे त्यांनीं असा आक्षेप घेतला कीं—त्यांनीं रोषास येऊन म्हणूं केलें कीं असें जर म्हणावें तर ह्या देहक्षेत्रावर एकव्या काळाचीच निरंतर ती सत्ता काय म्हणून आहे. वाहाणें व भोगणें हें एकाच काळीं कसें बरें होईल तें. (५८)

असे हे ते रागीटपणाचे ते बोल—वृत्तीनीं आपल्या महत्त्वास आल्यानें तरच तें भोगणें होणारें असे ते मृत्युसारिखे रागीटपणाचे जसे ते सिहाच्या आकृतीचे–सिहाडयानें दरीमधून का गुहेमधून जाणें जसे का ते वृत्तीचे आपल्या काळास, बळास का समर्थतेस येणें ते—तें काय ह्या काळवाद्याच्या बडबडीनें पुरतेपणास येईल? त्या काळाची सत्ता अनिवार्य आहे हे पक्कें तुम्हास माहीत असूनही तुम्ही आपल्या मताचा खोटा अभिमान वाहात आहां!! हें जणूं काय रागावलेला मृत्यूच किंवा सिहाची गुहा आहे पण काय करावें तुमच्या सारख्या भकभक्याना हें कोठचें पटणार? (५९)

अवचितपणें महाकल्पाच्याही पलीकडे–'परती कव' म्हणजे कवळून घेऊन त्या सत्यलोकामध्यें वागणारे जे हत्तीच्या आंगासारखे अवाढव्य–विषयाचे थवे–ते तर तेथच्या गांवचे होऊन त्यांना आंगवून असावें–आकळून असावें. नाहींतर ते थवे आगीं वाजणारे होतात. कर्मबंधच तेथे वाजणारा होतो. हा काळसिंह महाकल्पाच्या पलीकडेही आपल्या वेधाची पकड घालून ब्रह्मलोकरूपी हत्तीवरही झाप घालतो. (६०)

तरी ह्या विषयाचा मार अनिवारपणाचा असाच जेथें तेथें पाहिला जातो–तें पण जसें का आपल्याच मतिबुद्धीचें अभिमानास्पदतेचे ते भरास येणें होय. (६१)

नित्य नवे नवे लोकपाळ–तसेंच दिग्गजाचे जे मेळावे का समूह–अष्टदिक्पाळाचें जें अव्यक्ती असणें तेथें स्वर्गामध्यें जाताना लागणारें जें अरण्य त्यात रिघून ती मोडून टाकते. नवे नवे लोकपाळ आणि दिग्गजाचे कळप याचा हा काळसिंह स्वर्गाच्या रानात घुसून संहार करितो. (६२)

**येरे ययाचेनि अंगवाते। जन्ममृत्यूचिये गर्ते।**
**निर्जिवें होऊनि भ्रमतें। जीव मृगें ॥ ६३ ॥**

**न्याहाळीं पा केव्हढा। पसरो लागतसे चवडा।**
**जो करुनिया माजिवडा। आकारु जगा ॥ ६४ ॥**

**म्हणौनि काळाची सत्ता। हाचि बोलु निरुता।**
**ऐसे वादु पाण्डुसुता। क्षेत्रालागीं ॥ ६५ ॥**

हें बहु उखुविखि। मागां ऋषीं केली नैमिषी।
पुराणें इये विषीं। मतपत्रिका ॥ ६६ ॥

अनुष्टुभादि छंदे। प्रबंधीं जिये विविधे।
ते पत्रावलंबन मदें। करिताति अझुनि ॥ ६७ ॥

वेदीचें बृहत्समसूत्र। जें देखणेपणें पवित्र।
परि तयाहि हें क्षेत्र। नेणवेचि ॥ ६८ ॥

आणीक आणिकीही बहुती। महाकवी हेतुमंती।
जयालागी मती। वेंचिलिया ॥ ६९ ॥

परि ऐसें हें येवढें। का अमुकियाचेचि फुडें।
हें कवणाहि परवडें। होयेचिना ॥ ७० ॥

आतां ययावरी जैसें। क्षेत्र आहे ऐसें।
तुजसांगो तैसें। साद्यंत गा ॥ ७१ ॥

येरे–येर. गर्ता=घळ. भ्रमिते=कोसळतात (६३). न्याहाळा–न्याहाळी. केवढा–केव्हढा. पसरो लागतसे–पसरलासे. चवडा=जबडा, पंजा. माजवाड–माजिवडा आकारुजगा–आकारगज (६४). वाडु–वादु (६५). उखि–विखि–वादविवाद, तर्कवितर्क (६६). प्रबंधी जिये विविधे=ज्या ग्रंथांत या-विषयीं विविधचर्चा केलेली आहे पत्रावलंबन=ग्रंथाचा आधार. मदे=गर्वानें. करिताति=करिती (६७). देखणेपणे–जे देखणेपणे (६८). जयालागी=यालागी (६९). फुडें=खरेपणानें. कवणाहि–कोणाहि. परवडे–वरपडे=आंगचें असे, सांपडलेले (७०). क्षेत्र आहे ऐसें=क्षेत्र हें असे (७१).

दुसरीं जीं जीवरूपी निर्बळ हरणें असतात तीं तर ह्या काळसिंहाच्या नुसत्या अंगाच्या वाऱ्यानेंच जन्म-मृत्यूच्या गर्तेमध्यें जाऊन निर्जीव अशीं होऊन पडतात. (६३)

पहा पहा अहो, ह्या काळसिंहाचा केवढा तरी चवडा जबडा पसरूं लागत आहे, पसरला आहे. तेथें माज केल्यानें ह्या जगास आकारास आणिलें आहे—हा आकारगज दिसूं लागत आहे. ह्या जबड्यांत हा विश्वाकाराचा हत्ती गडप होऊन जात आहे (६४)

म्हणून काळाची सत्ता ह्या क्षेत्रावर चालत असलेली असते असें म्हणणेंच एक काय तें खरेंपणाचें होय. इत्यादि इत्यादि असें जें काहीं बोलणें–अशा प्रकारचे वाद ह्या क्षेत्राविषयीं होत असलेलें. (६५)

अशा तऱ्हेची बरीच भवति न भवति पूर्वी ऋषींनीं नैमिषारण्यी केलेली. व पुराणें तर ह्यासंबंधीं आज्ञापत्रकेंच होत–अभिप्राय होत–म्हणजे चर्चा केल्याबद्दलचे आभार होत. (६६)

अनुष्टुभ छंदानीं गायिलेले ह्या विविधतेच्या चर्चेबद्दलचे प्रबंध असून अजूनपर्यंतही त्याबद्दलचा पुरावा मतभेद करून 'कागदोपत्रीं' घेत असलेले आहेत. (६७)

वेदामधील जें बृहत्समसूत्र जें देखणेपणामुळें–सडोळसपणामुळें पवित्र असें मानलें आहे त्यासही पण हें क्षेत्र नेणणेंच होऊन आहे. (६८)

दुसरे आणिकही अनेक महाकवि जे उद्देश पुढें करून चालत असलेलें, ज्यांनीं आपल्या अनेक मति ह्यामध्यें लाविल्या–इच्छित जसें प्राप्त झालें म्हणजे वासना हीच मुळीं शमते व आत्मा तृप्त झाला असें होतें तितक्या महत्त्वानें ह्या महाकवींनीं आपला मतिभार अभिप्राय इकडे वेंचिलेला आहे. (६९)

पण असें हें क्षेत्र अमक्याचेंच खरेपणानें तें आहे हें कुणालाहि पण सापडलें नाहीं – हें कुणालाहि पण अमक्याच्या आधीनतेचें तें आहे असें खरेपणानें म्हणवेचना. (७०)

आतां ह्यावरही हे अर्जुना गा, हें क्षेत्र जसें आहे तसें किंवा असें असें तें आहे हें साद्यंततेनें सांगण्याचें करितो (७१)

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इन्द्रियाणि दशैकं च पञ्चचेन्द्रियगोचराः ॥५॥**

अन्वय—पञ्चमहाभूतानि, अहंकार. बुद्धि अव्यक्तम् (गुणमयी) च एकं मन., (दहा इंद्रियें) इन्द्रियाणि दश (विषया) इन्द्रियगोचरा पञ्च ( = २४ )

अर्थ—(चोवीस तत्त्वाचें स्वरूप) पाच महाभूतें, एक अहंकार, एक बुद्धि, एक अव्यक्त (गुणमयी), दहा इंद्रियें, एक मन, पाच इन्द्रियगोचर म्हणजे विषय (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध) मिळून चोवीस तत्त्वें (५)

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत् क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥**

अन्वय—इच्छा, द्वेष , सुखं, दु·खं, सघातश्चेतना धृति·, एतत्समासेन क्षेत्रं उदाहृतम् ।

अर्थ—(वरील तत्त्वाचे विकार) इच्छा, द्वेष, सुख, दु ख, संघात, चेतना व धृति अशीं सात मिळून एकंदर चोवीस अधिक सात मिळून एकतीस तत्त्वाचें हें सविकार क्षेत्र आहे असें सक्षिप्ततेनें सागितलें ( ३१ + ५ ज्ञानेंद्रियविषय मिळून ३६ तत्त्वें होत ).

**तरी महाभूतपंचक । आणि अहंकार येक ।**
**मनबुद्धि अव्यक्त । दशकु इंद्रियांचा ॥ ७२ ॥**

**आणीकही एकु । विषयांचा दशकु ।**
**सुख दुःख द्वेषु । संघातु इच्छा ॥ ७३ ॥**

**आणि चेतना धृति । एवं क्षेत्रव्यक्ति ।**
**सांगितली तुज-प्रति । आघवीचि ॥ ७४ ॥**

**आतां महाभूतें कवणें । कवण विषय कैसी करणें ।**
**हे वेगळालेपणें । एकैक सांगो ॥ ७५ ॥**

**तरि पृथ्वि आप तेज । वायु व्योम इये तुज ।**
**सांगितली बुझ । महाभूतें पाचें ॥ ७६ ॥**

**आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असें ।**
**ना तरी आंवसे । चंद्र गूढ ॥ ७७ ॥**

**नाना अप्रौढे बाळकीं । तारुण्य राहे थोकी ।**
**कां न फुलता कळकीं । आमोदु जैसा ॥ ७८ ॥**

**किंबहुना काष्ठीं । वन्हि जेंवि कीरीटी ।**
**तेंवि प्रकृतीच्या पोटीं । गौण्य जो असे ॥ ७९ ॥**

**जैसा ज्वर धातुगत। अपथ्याचें मिस पाहात।**
**मग जालिया आंत-। बाहेरी व्यापी ॥ ८० ॥**

**तैसी पांचाहि गांठीं पडे। जैं देहाकारू उघडे।**
**तैं नाचवी चहूंकडे। तो अहंकारु गा ॥ ८१ ॥**

**नवल अहंकाराची गोठी। विशेषें न लगे अज्ञानापाठीं।**
**सज्ञानाचे झोंबे कंठी। नाना संकटीं नाचवी ॥ ८२ ॥**

अव्यक्त = प्रकृति. दशइंद्रियें = पाच ज्ञानेंद्रियें व पाच कर्मेंद्रियें ( ७२ ). दशविषय = ज्ञानेंद्रियाचे पांच विषय व कर्मेंद्रियांचे पाच. संघात = प्राणाचा व्यक्त व्यवहार, स्थूलदेहाचा पिंड ( ७३ ). चेतना – चेतनावर्ग – सजातीय वस्तुसमूह. धृति = धैर्य. क्षेत्रव्यक्ति = क्षेत्राचीं छत्तीस तत्त्वें, १० इंद्रियें, १० विषय, ५ महाभूतें, १ अहंकार, १ मन, १ बुद्धि, १ अव्यक्त, १ सुख, १ दुःख, १ द्वेष, १ संघात, १ इच्छा, १ चेतना, १ धृति = ३६ ( ७४ ). करणे = इंद्रियें. एकैक – येकैक ( ७५ ). महाभूतें – महाभूते पाचै ( ७६ ). थोकी = गुप्त. कळकि – कळिकी ( ७८ ). गोप्यु – गौप्यु

पांच महाभूतें, एक अहंकार, एक मन, एक बुद्धि, एक अव्यक्त व दहा इंद्रियें. (७२)

आणि एक तो विषयाचा दशक होय तसेंच सुख, दुःख, द्वेष, संघात व इच्छा. (७३)

तसेंच चेतना व धैर्य अशी ही छत्तीस तत्त्वाची सर्वक्षेत्र-व्यक्ति जाण. (७४)

आतां महाभूतें तीं कोणतीं, विषय ते कोणते व करणें म्हणजे इंद्रियें तीं कोणतीं तें सर्व वेगळालेपणानें एक एक सांगतो. (७५)

पृथ्वी, आप, तेज, वायु व व्योम अशी हीं पांच महाभूतें तुला सागितली. (७६)

आता जागृति अवस्थेमध्यें स्वप्न लपलेलें असतें, जसा का चंद्र हा अवसेस गूढ असा असतो. (७७)

अथवा अप्रौढ मुलाच्या ठायीं तारुण्य हें लपून असतें – लपलेलें असतें किंवा कळकाच्या झाडास फुले न येतांच सुवास जसा आंत ( दम धरून ) असतो. (७८)

अथवा लांकडांमध्यें वन्हि जसा त्याप्रमाणें प्रकृतीच्या पोटीं जो गौप्य असतो. (७९)

ज्याप्रमाणें हाडीताप नुसतें अपथ्याचें मिस पाहून असतो व अपथ्य झालें कीं सर्व देहाच्या आत बाहेर व्यापतो. (८०)

त्याप्रमाणे ह्या पांचांच्या गांठी भेटी झाल्या व हा देहाचा आकार उघडूं लागतो तेव्हां जो चहूंकडे ह्या देहास नाचवून असतो तो अहंकार होय. (८१)

ह्या अहंकाराच्या नवलाची गोष्ट ती ही कीं तो अज्ञानाच्या पाठीमागे विशेष करून लागत नाहीं पण सज्ञानाचे कंठी झोंबून त्यास अनेक संकटामध्यें पाडतो. (८२)

**आतां बुद्धि जे म्हणिजे। ते ऐसिया चिन्हीं जाणिजे।**
**बोलिले श्रीयदुराजें। आईका सांगो ॥ ८३ ॥**

**तरी कंदर्पाचेनि बळे। इंद्रियप्रवृत्तिचेनि मेळे।**
**विभांडुनि येती पाळे। विषयांचे ॥ ८४ ॥**

**तो सुखदुःखांचा नागोवा। जेथ उगाणो लागे जीवा।**
**तेथे दोहिंसिही बरवा। पाडु जे धरी ॥ ८५ ॥**

हें सुख हें दुःख। हें पुण्य हे दोख।
का हे मैळ हे चोख। ऐसे निवडि ॥ ८६ ॥

जिये अधमोत्तम सुझे। आणि साने थोर बुझे।
जे या दिठी पारखिजे। विषयजीवें ॥ ८७ ॥

जे तेजतत्वाची आदी। जे सत्वगुणाची वृद्धि।
जे का आत्मसुखाची सिद्धि। आत्मया जीवाची संधी वसवित जे ॥८८॥

अर्जुना ते गा जाण। बुद्धि तूं संपूर्ण।
आतां आईक ओळखण। अव्यक्ताचि ॥ ८९ ॥

पै सांख्याच्या सिद्धांती। प्रकृति जे महामती।
तेचि येथ प्रस्तुती। अव्यक्त गा ॥ ९० ॥

आणि सांख्ययोगमतें। प्रकृति परिसविली तूंतें।
ऐसी दोही परी जेथे। विवंचिली ॥ ९१ ॥

तेथ दुजी जे जीवदशा। तिये नांव वीरेशा।
अव्यक्त पथ ऐसा। पर्यावो हा ॥ ९२ ॥

तरी पाहालेया रजनी। तारा लोपती गगनी।
कां हारपे अस्तमानी। भूतक्रिया ॥ ९३ ॥

आईका = आईके ( ८३ ). प्रवृत्तीचेनि = वृत्तीचेनि. विभांडुनि = कामाचा जोर झाल्यावर इंद्रियांचे साहाय्यानें जी विषयांचे समुदाय जिंकून आणते – कामाचे जोरावर इंद्रियें जिंकिलीं होऊन येतात. पाळे = समुदाय ( ८४ ) नागोवा = लयलूट, लूट. उगाणें = हिशोब देणें, किंवा अर्पण करणें. पाडु जे धरीं = दोहीसी बरोबर तोलते – दोहीची बरोबर तुलना करितो ( ८५ ). अधम = न्यून किंवा कुत्सित. सुझे = जाणलें होतें, समजतें ( ८७ ) तेजतत्त्व = ज्ञानेंद्रिय. आदि = मूळ. आत्मगुणाची सिद्धि – आत्मया जीवाची संधि = जे जीव व आत्मा या दोहोंचा संयोग दाखविते. वसवितसे = वसवित असे ( ८८ ). दोही परी – दोही परींची = परा व अपरा प्रकृति ( ९१ ). तेथ = जेथ. पर्यावो – पर्याय = रीत, प्रकार, अनुक्रम, एक साहित्य अलंकार, चिंतन, जाणणें, परिपाठ, सराव ( ९२ ). पाहालेया – पाहालया = उजाडल्यावर, दिवस उगवल्यावर, उदयाची झाली ( ९३ ).

आतां बुद्धि जी म्हटली आहे ती कसल्या चिन्हांनीं – लक्षणांनीं जाणावी तें श्रीयदुराजांनीं जें बोलिलें तें सांगतों ऐक. (८३)

जी, कामाचा जोर झाल्यावर इंद्रियांचे साहाय्यानें विषयांचे समुदाय जिंकून आणिते – इंद्रियप्रवृत्तीच्या जोरावर विषयाचे समूह जिच्यामुळें जिंकिले होऊन येतात. विषयाचें उठणें हें जिनें जिंकिलें होतें ती बुद्धि (८४)

तेथें सुखदुःखाची लयलूटच एक जेथें ह्या जीवदशेस हिशेब देण्याचें असतें का अर्पण करण्याचें ते तेथें ह्या सुखास किंवा दु:खास जें योग्य तुलनेचें करितें – तोलतें सुखाची का दु:खाची जें योग्य तुलना करतें. (८५)

हें सुख, हें दुःख, हें पुण्य, हे दोष, हें हिणकस किंवा हें चोख असें जी निवडते. अमुक एक सुख किंवा अमुक हें दुःख, फलाणें तें पुण्य का दुसरे ते दोष अथवा हें असें तें बिनकसाचें व अमुक एक चोख म्हणजे निखळ, शुद्ध असें, असें जें काहीं निवडणें, असें जें काही चिंतन का जाणणें. (८६)

जिच्यामुळें न्यून, कुत्सित का उत्तम, श्रेष्ठ, सर्वात चांगलें हें सुचूं लागतें, जिच्यामुळें कमी प्रतीचें का लहानगें, का थोर महत्त्वाचे असें समजतें असें तें ज्या दृष्टीनें पारखिले होतें, जेथें विषय हाच जीवदशा घेऊन आहे तेथें मग ती विषयाची दृष्टि असो का जीवदशेची दिठी असो— (८७)

जी ( बुद्धि ) तेजतत्वाची आदि म्हणजे ज्ञानेंद्रियाचें मूळ, जी सत्वगुणाची वृद्धि, जी आत्मगुणाची सिद्धि बसविणारी किंवा आत्मा व जीव या दोहोंचा संयोग किंवा सांधा एक. ती आत्मा व जीव यांचा संबंध दाखविते – वसविते. (८८)

हे अर्जुना, अशी ही संपूर्ण अशीच एक ती बुद्धि, ती जाण. आतां अव्यक्ताची ओळखी सांगतो ऐक. (८९)

हे महामति अर्जुना, साख्याच्या सिद्धांतावर उभी झालेली – सिद्धांतींनीं सिद्ध केलेली जी प्रकृति तीच येथीलच्या प्रस्तुत ठायीं उपस्थित होऊन असलेली ती अव्यक्त होय. (९०)

आणि सांख्ययोगाच्या मताप्रमाणें प्रकृति ही तुजला ऐकविली. अशी दोही परींची जी – दोन्ही तऱ्हांनीं – विचित्रतेची का वेगवेगळी ती – परा व अपरा – ती जेथें विवंचलेली आहे – विचारास घेतली आहे – वितर्कावर माडली गेली आहे. जेथें वादविवाद, शंका व अनुमान हीं विवेचनास घेतलीं गेलेलीं. (९१)

त्यामधील दुसरी जी जीवदशा, तिला हे वीरेशा अर्जुना, येथें अव्यक्त असा हा पर्याय आहे. पर्यालोचन म्हणजे चिंतन किंवा जाणणें तें असें आहे. येथें अनुक्रम का रीत का प्रकार का साहित्यअलंकारच एक असा हा पर्याय म्हणजे अगदीं सहज असेंच तें क्रमवार उभें झालें – आपोआपच पुढें आलें असें आहे. (९२)

रात्र ही उदयाची झाल्यावर, सर्व रात्र बसून राहाणेंच झालें व आतां रात्र हीच उजाडली, रात्र ही उदयाची का उद्यांची झाली व दिवस वर आला तेथें तारा ह्या गगनामध्यें लोपल्या किंवा असेंही म्हणणें बरें कीं दिवस अंतर्धान पावल्यावर म्हणजे अस्तमान झाला कीं भूतक्रिया ही हारपते भूतांचें करणें किंवा भूतांचा अभ्यास हा समाप्तीस येतो. प्राणिमात्रांचे व्यापार बंद होतात. 'आपंचीकृत पंचभूतानि' असा जो ह्या जीवितास येणारा ह्या भूतांचा अभ्यास – ( देहधारण तेंच मुळीं ) – बंद पडतो.

( मग कर्मेंद्रियाचे पांच । विषय गा साच । जे बांधोनिया माच । क्रिया धांवे ॥ १२० ॥ ) (९३)

नातरी देह गेलियापाठीं । देहादिक कीरीटी ।
उपाधी लोपे पोटीं । कृतकर्माच्या ॥ ९४ ॥

का बीजमुद्रें आंतु । थोके तरु समस्तु ।
का वस्त्रपणे तंतु- । दशे राहे ॥ ९५ ॥

तैसे सांडुनिया स्थूळधर्म । महाभूतें भूतग्राम ।
लया जाती सूक्ष्म । होऊनि जेथें ॥ ९६ ॥

अर्जुना तया नांवें । अव्यक्त हें जाणावें ।
आतां आईक आघवें । इंद्रिय भेद ॥ ९७ ॥

तरी श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन ।
इये जाण ज्ञान- । करणे पाचै ॥ ९८ ॥

इये तत्वमेळपंकीं । सुखदुःखाची उखिविखि ।
बुद्धि करितु मुखीं । पांचै इहीं ॥ ९९ ॥

**मग वाचा आणि कर। चरण आणि अधोद्वार।**
**पायु हे प्रकार। पांच आणीक ॥ १०० ॥**

**कर्मेंद्रिय म्हणिपति। ती इये जाणिजती।**
**आइके कैवल्यपती। सांगत असे ॥ १०१ ॥**

**पै प्राणाची आंतौरी। क्रियाशक्ति जे शरीरी।**
**तियेची रिगिनिगि द्वारी। पांचै इहीं ॥ १०२ ॥**

**एवं दहादि करणे। सांगितली देव म्हणे।**
**परिस आता फुडेपणे। मन ते ऐसे ॥ १०३ ॥**

**जे इंद्रिया आणि बुद्धि। माझारिले संधी।**
**रजोगुणाच्या खांदीं। तरळतसे ॥ १०४ ॥**

देह = देहो. लोपे = लपे. कृतकर्मन् = चतुर, दक्ष (९४). बीजमुद्रे आंतु = बीजाच्या आकारात, आशय स्तब्धतेमध्यें, अव्यक्त सत्वलक्षण किंवा चिन्ह. थोके = गुप्ततेनें आंत असतो. का वस्त्रपणे = का वस्त्रपण (९५). इंद्रियभेद = इंद्रियांचे प्रकार, इंद्रियाइंद्रियाचा निराळेपणा किंवा इंद्रियाचें जे चुगलेपण का फोडणे का फुटणें त्याबद्दल (९७). जाण – जाणें (९८). मेळपंकी – मेळापैकीं = तत्वाच्या मेळाव्या – जुटीमधील, मेळ जाती ऐक्य (९९). ती – तिये सागतसे – सागत असे (१०१). आतौरी = स्त्री. तिया शक्तीची – तिये शक्तीची (१०२). देव – देवो. फुडेपणे – पुढेपणे = खरेपणानें (विश्वांतर्गत जे मन तें कसें तें) (१०३). तरळतसे = खेळ करीत असतें. संधी = साध्यावर (१०४)

किंवा हे किरीटी, देह नाहींसा झाल्यानंतर देह आदिकरून ज्या उपाधी म्हणजे विकार ते सर्व कृत-कर्माच्या पोटींच लोपतात किंवा लपतात. येथें कृतकर्माच्या म्हणजे दक्षतेच्या किंवा चतुरतेच्या पोटीच ते विकार लपतात, गुप्त होतात. (९४)

किंवा बीजाच्या आकारात (बीजरूपी आशयरूप स्तब्धतेमध्यें किंवा अव्यक्त सत्वलक्षण किंवा चिन्हा-मध्येंच) सर्व वृक्ष हा गुप्ततेनें आत असतो किंवा वस्त्रपण हें तंतुरूपानें असतें. वस्त्रपणें तंतु, वस्त्रदशेनें असतो – मध्यें राहातो (९५)

त्याप्रमाणें महाभूतें व भूतग्राम हे स्थूळधर्म सोडून सूक्ष्मरूपानें जेथें लयास जातात. (महाभूताचा स्थूळधर्म व भूतग्रामधर्म तो एक जडप्रकृतिरूपानें असलेला व दुसरा समूहेंकरून किंवा समुदायेंकरून असणारा तो त्या भूतगावचा धर्म). (९६)

हे अर्जुना, त्यास अव्यक्त ह्या नावानें जाणावें त्यास अव्यक्त असें म्हणावें. आता इंद्रियाचे ते प्रकार ऐक. (भेद = भिन्न – भाव, प्रकार, निराळेपणा का फरक जेथे चुगलखोरपणा हें का फोडणें का फुटणें हें जसें त्या इंद्रियाचें भेदलेपण जाण ) (९७)

तरी तीं पाच आहेत — श्रवण, नयन, त्वचा, घ्राण व रसना हीं पाच ज्ञानकरणे – ज्ञानइंद्रियें जाणावीत. (९८)

ह्या तत्त्वाच्या मेळ (जूट) जातीमध्यें सुखदु खाबद्दल (किंवा तत्त्वाच्या मेळाव्यामधील जीं काही सुखदु·खें त्याविषयीं) जो वादविवाद होतो, वाटाघाट चालते ती ही बुद्धि ह्याच पाच मुखानीं करते–ह्या पाचाच्या आधारानें बुद्धि ही वाद व तर्कवितर्क करिते. (९९)

पांच आणीक प्रकार यानंतर आहेत — ते म्हणजे एक वाचा, दुसरा कर, तिसरा चरण, चवथा अधोद्वार (उपस्थ) व पाचवा पायु (गुदस्थान) असे ते होत. (१००)

ज्यांना कर्मेंद्रियें म्हणतात तीं हींच जाणावींत असें कैवल्यपति सांगत आहेत, ऐक. (१०१)

आतां प्राणाची स्त्री म्हणजे अंतुरी जी क्रियाशक्ति या नांवानें ह्या शरीरामध्यें असते तिची जा ये ह्याच पांच द्वारांनीं होत असते (प्राण प्राणी प्राणिया ह्या पंच प्राणांनीं आत्म्याप्रत आला तेथें उपप्राणांनीं तो सिद्ध केलेला – तेथील क्रियाशक्ति ) (१०२)

याप्रमाणें अशीं हीं दहा करणें म्हणजे इंद्रियें सांगितलीं. आतां पुढेपणानें का खरेपणानें मन तें असें असें आहे तें, देव म्हणतात, ऐक. (१०३)

जें इंद्रियांच्या आणि बुद्धीच्या मधल्या संधींत, सांध्यावर का मध्यप्रकाशावर रजोगुणाच्या खांद्यावर बसून खेळत असतें (१०४)

**निळिमा अंबरी । कां मृगतृष्णालहरी ।**
**तैसे वायाचि फरारी । वावो जाले ॥ १०५ ॥**

**आणि शुक्रशोणिताचा सांदा । मिळता पाचांचा बांधा ।**
**वायुतत्व दशधा । येकचि जाले ॥ १०६ ॥**

**मग तिही दाही भागी । देहधर्माच्या खेवांगीं ।**
**अभिष्ठिले आंगीं । आपुलाल्या ॥ १०७ ॥**

**तेथ चांचल्य निखळ । येकले ठेले निढाळ ।**
**म्हणौनि रजाचें बळ । धरिलें तेणें ॥ १०८ ॥**

**ते बुद्धीसी बाहिरी । अहंकाराच्या उरावरी ।**
**ऐसे ठायी माझारी । बळियावले ॥ १०९ ॥**

**वाया मन हें नांव । येऱ्हवी कल्पनाचि सावेव ।**
**जयाचेनि संगें जीव- । दशा वस्तू ॥ ११० ॥**

**जे प्रकृतीसी मूळ । कामा जयाचे बळ ।**
**जे अखंड सूये छळ । अहंकारासी ॥ १११ ॥**

**जे इच्छेतें वाढवी । आशेतें चढवी ।**
**जें पाठि पुरवी । भयासि गा ॥ ११२ ॥**

**द्वैत जेथ उठी । अविद्या जेणें लाटी ।**
**जे इंद्रियांतें लोटी । विषयामाजीं ॥ ११३ ॥**

**संकल्पें सृष्टि घडी । सवेंचि विकल्पोनि मोडी ।**
**मनोरथांचिया उतरंडी । उतरि रचि ॥ ११४ ॥**

**जे भुलीचें कुहर । वायुतत्वाचे अंतर ।**
**बुद्धिचे द्वार । झांकविले जेणे ॥ ११५ ॥**

तैसे – तैसा. जाले – जाहला. तैसे फरारी वावो झाले = वायूचें मिथ्या फुरफुरणें तें मन. वाया फुरफुरु लागून वायू वाया झाला. वायू वाया फुरफुरु लागून वावो झाला (१०५). शुक्र – शुक्ल. शुक्रशोणिताचा = स्त्रीपुरुष बीजाचा. दशधा = दहाभागाचे होऊन (१०६). तिही दाही – तेही दाहे. खेवांगीं – खैवंगी = बळानें अभिष्ठिले – अधिष्ठिले (१०७) चाचल्य – चांचल्या. निढाळ = केवळ (१०८). बाहिरी – बाहेरी (१०९). जीवदशा वस्तू = मायामनाच्या संगतीनें ब्रह्मास जीवदशा आलेली आहे (११०). प्रकृतीस –

प्रवृत्तीसि. सूये – सुवेळ ( छळ ) = टोचणी लावते – आग्रह करिते – बळ देते (जें अहंकाराला नम्रपणाची, सद्‌गुणाची टोंचणी लाविते) ( १११ ) तेणे = जेणे. लाटी = दाडगी ( ११३ ). विकल्पोनि – विकल्पूनि ( ११४ ). कुहर = गुहा, कंठ, बिळ, छिद्र झाकविले – झाकले ( ११५ ).

आकाशावर आलेला निळेपणा ( अंगावरचा नीळ ) — सूर्यकिरणाच्या ठायी जलाची भ्रांति – तें जळ पिण्याची तृष्णा, मृगतृष्णा, मरीचिका – तिच्या लाटा किंवा तरंग जसे हरिणाच्या ठायी त्याप्रमाणें वायापणेच्च जें फुरफुरतें व व्यर्थ झालें व्यर्थच जें फरारा घेतें तें केव्हाही व्यर्थ किंवा वाया झालें जसें (तसा रजोगुण ह्या मनानें वायाच मनास, चित्तास किंवा हातांना फुरफुरवितो ).

आकाशावरील निळिमा किंवा मृगतृष्णेचा लाट किंवा तरंग हा जसा आला तसा गेला. तो वायाच फराळून असतो. तो व्यर्थच फरारा हाताचा जसा एक आकाशावर एक लेप उमटणारा किंवा येणारा – तो कामाचा का मदनाचा फर्रा किंवा फरारा लपेट हाताची तो वायाच आला व वायाच गेला – वायापणें आला – जसें पायाचें फरपटणें झालें – व तो आता व्यर्थच आला व तसाच नाहींसा झाला – तसें मन हें वायाच ह्या रजोगुणी चिदाकाशावर व्यर्थतेच्या लहरी उत्पन्न करणारें तेथे निष्पन्न काहींच न होणारें – तें वायाच आलें व व्यर्थच झालें. ( कर्तव्याचे हात तेथें जसे येतात तसे जातात तेथें निष्पन्न काहीं होत नाहीं. ) ( १०५ )

त्याचप्रमाणें स्त्रीपुरुष बीजाचा सादा, ह्या प्राणाचा बाधा, मार्ग – मिळताच वायुतत्त्व हें दहा ठिकाणचें किंवा दहा भागी असलेलें तें एक असें होऊन आलें. ( १०६ )

मग त्या दहाही भागामध्यें देहधर्माच्या बळाच्या अंगानें अधिष्ठिलें (आपापल्या अंगानीं अधिष्ठिलें) होतें, प्रस्थापित होतें – अभीष्टतेस येतें – फार आवडूं लागतें – अनुकूल असें होतें. ( १०७ )

तेथें चाचल्यच एक सर्वथैव – एकलेपणच एक केवळ आणि म्हणून त्यानें रजोगुणाचें बळच सर्व धरून ठेविलें – रजोगुणाच्या बळाचें ( जीवित हें ) चाचल्याचें झालें. ( १०८ )

तें बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर असें ठाईठावा मध्येंच – आपलाच ठाव आपणास सांपडला असें मध्येंच – आधीमधीच बळिया झालें – बळिवंत होऊन आलें – बळवान झालें ( १०९ )

त्यास मन हें नाव व्यर्थच – वायाविणच – एक – येऱ्हवीं पाहिलें असता कल्पनाच एक ती अवयवासहित असलेली – अशा ह्या कल्पनेमुळें, मनाच्या सगाने वस्तु जी किंवा परब्रह्म जें ते जीवदशेस आलें आहे – माया मनाच्या संगतीनें ब्रह्म जें त्याला जीवदशा आली आहे ( ११० )

जे समूळपणें प्रकृतीच एक किंवा जे ह्या प्रकृतीस मूळ – येथें प्रवृत्ति हीच महत्त्व मुळी ! ती सर्व महत्त्व घेऊन असल्यानें येथें प्रकृति हीच मुळी अगदी मुळातच समूळपणाने – सर्वपणानें असणारी असें हें मन केवढें तरी महत्त्व घेऊन आहे पहा ! म्हणून ह्या मनासच मुळीं अभ्यासाचे – आवरण्याचे केलें – तेंच जिकलें तर सर्व प्रकृति का सर्व प्रवृत्तीच मुळीं आदरिली गेली असें होय. ह्या कामाचें कमविणें करणारें असें तें बळाचें होय – तसेंच तें ह्या अहंकारास नेहमीच एक नम्रता शीक म्हणणारें का ' सद् सत् ' गुणाचें व्हावें म्हणून छळणारें असतें ' सत् ' गुणाकरितां ह्या अहंकारतत्त्वास तें नेहमीं टोंचणी लाविते – आग्रह करितें – बळ देते ( १११ )

असें तें मन (इंद्रियें हीं बलवान् तेथें निग्रह तो होणेंच नाहीं) तें अनेक इच्छा करतें – तें इच्छेस वाढवितें – तें इच्छाशक्ति वाढवितें – अहो ! इच्छाच जर कशाचीहि केली नाहीं तर तेथें क्रिया का कर्तव्य कसचें, तसेंच तेथें तें ज्ञानेंद्रियानें तेजास येणें हेंही मग कोठून आणावें बरें ! असें तें इच्छेस वाढी करणारें आहे. तसेंच तें आशेस चढवून असतें – आज नाहीं उद्या ती इच्छा पूर्ण होईल अशी आशा तेथे चढ घेऊन

असल्यानें हें जीवित नेहमींच जसें एका गोडीमध्येंच जगणारें असें होय. तसेंच तें मन हें 'सत्वसंशुद्धि' नसल्यानें नेहमीं भयास पाहातें–भयच घेऊन असतें–नेहमीं भीतच असतें–तेथें भिणें हेंच एक पाठ पुरविली असें एकसारखें रात्रंदिवस हात धुऊन पाठीस लागलेलें असें होय. तेथें त्याचा हेतु हा तेज, सत्त्व, प्रवृत्ति का तत्त्व ह्यांना सर्वथैव तेजतत्त्वास म्हणजे ज्ञानेंद्रियासच मुळीं भावावर उभें करणें व्हावें असा होय. म्हणून तें भय पाहात असतें–भयाची पाठ पुरवून असतें–धाक देऊन असतें, घेऊन असतें–व मनुष्यानें योग्यतेस यावें असाच मग त्याचा हेतु नव्हे काय ? (११२)

ह्या मनामुळेंच द्वैत हें उठूं लागतें–तें महत्त्व घेऊन असतें–व 'द्वितीयाद्भयं भवति' असेंच तेथें मग झालें–म्हणून 'सत्' तत्त्व हेंच उजू व्हावें असा तो तेथीलचा हेतु जाण. अविद्या ही दांडगेपणास येणारी असें ह्या मनामुळें होतें व मन तें ह्या इंद्रियाना विषयामध्येंच लोटतें, फसवितें. (११३)

नुसत्या संकल्पानें का कल्पनेनेंच सृष्टि घडणारें–व लगेच विकल्पास येऊन ती तें मोडून टाकतें व मनोरथांच्या, इच्छेच्या उतरंडी उतरते व पुन्हा रचतें (११४)

विसरणें, भुलणें, ह्याचें तर ते एक बीळच होय. भुलण्याच्या गुहेंत का छिद्रामध्यें तें वास करून राहातें. तेथें कंठ जो तो सर्व ह्या विसरण्यास दिला असें तें करितें ह्या वायुतत्त्वाचें तें अंतर जाण. अंतर म्हणजे वायापणाची सीमा–तें मध्यें का शेवटीं–का केव्हाही भलतीकडेच वारा वाजणारा–असें तें मन करतें–तेथें वाया असेंच एक ह्या वायापणाचें लपणें झालें–व्यर्थपणाचा अंतरंग हाच तिथें लपविलेला का मित्रेपणास आलेला. ह्या बुद्धीचें दार ते झाकते झकवितें, झाकवितें ह्या बुद्धीची वेळ का उपाय का साधन का दारच एक त्यानें बंद करून ठेविलें–असें तें मन आहे–असतें–होय. (११५)

तें गा कीरीटी मन। या बोला नाहीं आन।
आतां विषयाभिधान। भेदु आईक ॥ ११६ ॥

तरी स्पर्श आणि शब्द। रूप रस गंध।
हे विषय पंचविध। ज्ञानेंद्रियाचे ॥ ११७ ॥

इहींच पांच द्वारीं। ज्ञानासी धांव बाहेरी।
जैसे का हिरवे चारीं। भांबावे पशु ॥ ११८ ॥

मग स्वर वर्ण विसर्ग। अथवा स्वीकार त्याग।
संक्रमण आनंद उत्सर्ग। विण्मूत्रांचा ॥ ११९ ॥

हे कर्मेंद्रियांचे पांच। विषय गा सांच।
जे बांधोनिया माच। क्रिया धावे ॥ १२० ॥

ऐसे हे दहाहि। विषय गा इये देहीं।
आतां इच्छा तेही सांगिजैल ॥ १२१ ॥

तरी भूतले आठवे। कां बोले कान झांकवे।
ऐसियावरी चेतवे। जे गा वृत्ति ॥ १२२ ॥

इंद्रिया विषयासि भेटी। सरिसीचि वेगें उठी।
कामाची बाहुटी। धरुनिया ॥ १२३ ॥

जियेनि उठिलेपणें। मना सैंघ धांवणें।
न रिगावे तेथ करणें। तोंडे स्तुती ॥ १२४ ॥

**जिये वृत्तीचिया आवडी। बुद्धि होय वेडी।**
**विषया जिया गोडी। ते गा इच्छा ॥ १२५॥**

**आणि इच्छिल्या सांगडे। इंद्रिया आमिष न जोडे।**
**तेथ जोडे ऐसा जो दावा पडे। तोचि द्वेषु ॥ १२६॥**

विषयाभिधान=इंद्रियग्राह्य पदार्थ, त्याचा शब्दकोश किंवा नांव (विषय म्हणजे विषय देश का विषय आश्रय का विषय तें करावयाचें कर्म का विषय अर्थ का विषय व्यवहार किंवा विषय लक्ष्य इत्यादींबद्दलचा शब्दकोश, शब्दज्ञान किंवा नांव)=ज्यांना विषय म्हणतात त्यांच्या नांवामधील भेद किंवा फरक–भिन्न-भिन्नता किंवा भेग (भेद) (११६). हे विषय–हा विषयो–ज्ञानेंद्रियाचे–ज्ञानेंद्रियाचा–पचविध= एकच विषय पण तो पंचविध, विविध होऊन येणारा तो विषय प्रकार, पद्धति किंवा उत्कर्ष अथवा कर्मामुळें पंचविध म्हणजे पांच प्रकारचा झाला का वेळाचा झाला (११७). इहीं–इहींच. पांच–पांचै. हिरवे चारीं–हिरविया चारी (भांबावे पशु)=तृणाचें हिरवेंगार, हिरवळ का हिरवें चार असें जें पशूंचें खाय तें प्रकाराप्रकाराचें, चित्रविचित्रतेचें असें निराळेपणाचे असल्यानें तेथें (दूध विसरल्यानें) भांबावणेंच एक चतुष्पाद प्राण्याचें (११८). स्वर=कंठध्वनि, नाद वर्ण=सुर, वस्तुधर्म, अक्षर, आकृति, मनुष्यजाति. विसर्ग=गति, द्विबिंदुयुक्त करणें, पार्थक्य, कर्मसंज्ञ, सृष्टिनियमव्यापार. स्वीकार=स्वीकृत, अंगीकृत, अंगिकार, उचलणें, संमति, आपलेंसें करणें त्याग=दान, वर्ज करणें, सोडणें. संक्रमण=बरोबर, मिळणी, जाणें. उत्सर्ग=त्याग विण्मूत्राचा (११९). बांधोनिया माच क्रिया बाहेर धावे=शिडी बांधून ज्याच्या आधाराने क्रिया बाहेर धाव घेते (१२०) भूतले आठवे=उपभोगाचे स्मरण. का बोले कान झाकवे–का बोले कान न झाकवे=कानावर शब्द पडता क्षणींच प्रदीप्त होणारी जी वृत्ति का चेतना (१२२). इंद्रिया विषयासि–इंद्रिय विषयाम्विया. वेगी–जे गा बाहुटी=हात, खांदा (१२३). जियेनि–जियेचेनि. न रिगावे–न रिगावे तेथ करणें तोंडे स्तुती=तेथे जेथें नच जावें तेथेंच इंद्रियें तोंड घालतात–इंद्रियें भलत्याच ठिकाणीं तोंडें घालतात (१२४). जया–जिया=ज्या इच्छेच्या गोडीमुळें विषय हाच गोड होतो अथवा ज्या विषयाचें गोड होणें होतें जिच्यामुळें (१२५) इच्छिल्या सागडे=इच्छेसारखें जोडणें. तेथ–जेथ जो दावा–जो दाव–जोडावा–जो दावो पडे=अंगावर येणारा डाव, पेंच–जो डावा पडे म्हणजे त्या उत्तम अर्धामधेंच जाऊन पडतो तेथें द्विषताच एक उगवते (१२६).

हे किरीटी पार्था, तेंच मन होय यात मुळींच शंका नाहीं–तेथें तें काहीं काहीं कदाचित् दुसरें तिसरें एकादें असेल असें नाहीं. आता विषयांचें (नाम) अभिधान जें त्याचे भेद ऐक आभिधान म्हणजे शब्द-कोश–ह्या विषयाचा पोहोचलेला शब्दकोश व त्याचे प्रकार सागतो ऐक–अभिधान म्हणजे सांगणें (किंवा संभाषण किंवा नांव देणें तें. कर्त्याबद्दल विधान–नांव, शब्द, शब्दकोश, बंधन, गीत, गाणें) भेद म्हणजे प्रकार (भिन्नभिन्नता किंवा विषयव्यूह तो फोडणें जें–त्याबद्दल जें म्हणणें) ऐक. (११६)

शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पंचविध, पांच प्रकारानीं विषय आहेत. किंवा हा विषयो पंचविध–ज्ञानेंद्रियांचा आहे–एकच विषय पण तो पांच प्रकारांनीं असतो. (११७)

याच पाच द्वारानीं ज्ञान हें किंवा ज्ञानेंद्रिय हें बाहेर धाव घेतें. धांव ही बाहेरची होते–जसें चारा हा हिरवाचार असला म्हणजे पशूंना तेथें ती चाऱ्याची निवडानिवड ही त्यास भाबावणेंच एक करणारी होते. तसे ते विषयाचे प्रकार हे तेथीलची चित्रविचित्रता ही हें बरें कीं तें बरें असें वृत्तीस संभ्रमाचें करिते–तेथें गौरव का भ्राति का धादल अथवा त्वरा ही भ्रांतपणाची होऊन येते. (११८)

आतां स्वरवर्णाचा – स्वर व व्यंजन मिळून – उच्चार, कर्मसंज्ञा, वस्तूचा स्वीकार व त्याग, चालणें (बरोबरीनें असणें – गुणसंक्रमण). (हें आनंदाचें स्थान म्हटलेलें) व विण्मूत्राचा त्याग करणें हें कर्मेंद्रियांचे विषय होत. (११९)

असे हे कर्मेंद्रियाचे पांच विषय – साचेपणानें आहेत हे विषय, अतराळीं केलेली एक पराची शिडीच जशी मार्गावर आरूढ होणारी – हिच्या साहाय्यानें, आधारानें क्रिया ही बाहेर धांव घेते. (१२०)

ती क्रिया कसली म्हणशील तर तें म्हणजे – करावयाचें कर्म, अर्थ, व्यवहार, लक्ष्य, देश का आश्रय व इंद्रियग्राह्य पदार्थ – ह्यानीं ती क्रिया धावेची होते – वेगास येते – जीवनास येणारी होते. असे हे दहा विषय ह्या देहामध्यें परिणाम करून असतात. आतां इच्छा म्हणजे काय तें सांगतों. (१२१)

भूतलात असलेले किंवा भूतलेले म्हणजे उपभोगलेले जे काहीं विषय त्यांच्या स्मरणानें जें काहीं सजातीय चेतन का वृत्ति तीस इच्छा म्हणतात. किंवा कानावर शब्द पडता क्षणींच प्रदीप्त होणारी जी बुद्धि का आठवण – येथें ह्या स्मरणास का आठवणीस बुद्धि असें म्हटलेलें – प्राणास आलेली, जिवित्वाची झालेली, चेतन घेणारी होते अशी जी वृत्ति (ती इच्छा होय) (१२२)

इन्द्रिय व विषय याची भेट झाली म्हणजे – तेथे बळच एक उभें होतें – सहज त्वरिततेनें खाद्यास खांदा मिळवून किंवा कामाचा हात धरून जी (वृत्ति) वेगास येऊन उठते. (१२३)

जिच्या उठल्यानें किंवा जी उभी झाल्यानें मन हें अतिशयतेनें धांवूं लागतें तें जिकडे तिकडे म्हणजे पाहिजे तिकडेच मुळीं धांवूं लागल्यानें (मन हें जसें घड्या घातलेलें, तें आतां तेथीलच्या घड्या का निऱ्याच मुळीं विस्कटलेल्या झाल्यानें) इंद्रियें हीं भलल्याच ठिकाणीं तोंडें घालतात – करणें म्हणजे इंद्रियें हीं तोंडें सुती – तोंडांचें निद्रेस येणेंच जसें एक – झोपेच्या प्रदेशातच मुळीं हीं इंद्रियें आपलीं तोंडें घालूं लागतात. (१२४)

अशी जी ही वृत्ति ती आवडत असलेली, हिच्या आवडतेपणामुळें बुद्धि ही वेडी होते. जिच्यामुळेंच मुळीं ह्या विषयांना गोड म्हटलेलें – ज्या वृत्तीच्या गोडपणावरच मुळीं ह्या विषयाना गोडी आलेली अशी जी वृत्ति ती इच्छा जाण (१२५)

आता इच्छा ही झाल्याबरोबर—किंवा ह्या इच्छेपारखे ह्या इंद्रियांना विषयभोग न जोडले गेले – नच मिळाले – तेथें मिळावे किंवा जोडणें जोडावें असा जो एक पेच पडतो – किवा पीळ पडतो तो द्वेष होय. (१२६)

> आतां यावरी सुख। ते एवंविध देख।
> जेणे येकचि अशेष। विसरे जीऊ ॥ १२७ ॥
>
> मना वाचे काये। जे आपलि आण वाहे।
> देहस्मृतीची त्राये। मोडित ये जे ॥ १२८ ॥
>
> जयाचेनि जालेपणे। पांगुळ होइजे प्राणें।
> सात्विकासि दुणे-। वरिहि लाभु ॥ १२९ ॥
>
> कां आघवियाचि इंद्रियवृत्ति। हृदयाच्या एकांती।
> थापटुनि सुषुप्ति। आणी जे गा ॥ १३० ॥
>
> किंबहुना सोये। जीव आत्मयाची लाहे।
> तेथ जे होये। तया नांव सुख ॥ १३१ ॥

आणि ऐसी हे अवस्था । न जोडतां पार्था ।
जिजे तेचि सर्वथा । दुःख जाण ॥ १३२ ॥

हे मनोरथ संगे नव्हे । येऱ्हवी सिद्धि गेलेचि आहे ।
हे दोन्हीचि उपाये । सुखदुःखासि गा ॥ १३३ ॥

आतां असंगा साक्षिभूतां । देहीं चैतन्याची जे सत्ता ।
तियें नांव पांडुसुता । चेतना येथ ॥ १३४ ॥

जे नखौनि केशवरि । उभी जागे शरीरी ।
जे तिन्हीं अवस्थान्तरीं । पालटेना ॥ १३५ ॥

मनबुद्ध्यादि आघवी । जियेचेनि टवटवी ।
प्रकृतिवनमाधवी । सदाचि जे ॥ १३६ ॥

जडाजड अशि । राहाटे जे सरसि ।
ते चेतना गा तुजसी । लटिके नाहीं ॥ १३७ ॥

ययावरि – यावरि. येकांचि – एकोंचि. अशेष = नि शेष, समग्र. जिउ – जीव (१२७). आण वाहे = शपथ घालते. त्राये = बळ, आधार, आश्रय. तिन्ही अवस्थाचे बळ (१२८). पांगुळ = लंगडा, पंगु दुणे वरिहि = दुपटीहून अधिक (१२९) सुषुप्ति = निद्रावस्था, गाढ झोंप (१३०) सोये = आश्रय जीव आत्मयाची लाहे = जीव आत्मरूप मिळवतो. नाव – नाम (१३१). जिजे – जे जिजे – जे कीजे = जिणें, वाचणे (१३२) हे – ते. नव्हे – न होये. मनोरथसगे नव्हे (न होय) – मनोरथभंगे होय. येऱ्हवी सिद्धि गेलेचि आहे = जीवित जगणे हें होतच आहे पण वासनायुक्त स्थितींत सुख नाहीं व वासनारहित स्थितींत सुख आहे असें जीवित हें जगून आहे दोन्ही = इच्छारहित असणें हा जो उपाय तो सुखाचा होय व इच्छायुक्त असणें हा उपाय, इलाज, साधन (म्हणावा का?) दु.खाचा ( ३३). नखौनि केशवरि = पायाच्या नखापासून तों तहत डोकीच्या केसापर्यंत तिन्ही अवस्थान्तरी = जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तिन्ही अवस्थामध्यें (१३५). प्रकृतिवनमाधवी = ह्या चेतनेनें मन बुद्धि आदि टवटवीत झाल्यानें ती प्रकृतिवनाला वसताप्रमाणें नेहमी टवटवी आणणारी असते (१३६) राहाटे = वागते, सचार करते. सरसि – सरिसी = सरसपणाने, विशेष उत्तमत्वानें (१३७)

आता यानंतर जे काही बोलणे करणे आहे ते ह्या सुखाबद्दल होय तें अशाप्रकारचे आहे की त्या सुखाच्या एकव्यापणामुळेंच जीव बाकी दुसरें सर्व काही विसरतो तें सुख, सुख असें एकच अशा त्या एका सुखामुळेंच हा जीव नि·शेषपणें, आठवावयाचे असें काहींही न ठेवता, समग्रपणाने सर्व काहीं विसरतो (१२७)

मनानें, कायेनें का वाचेनें आपल्या जीवदशेची शपथच एक घालून ह्या देहबुद्धीचें (आश्रय, आधार) किंवा बळच पार मोडून काढतो (१२८)

या सुखाच्या जालेपणानें प्राण हाच मुळीं पागुळला होतो व सात्विकतेस व सत्वगुणयुक्ततेस दुपटीहूनहि अधिक संपन्नता येते. तेथे सात्विक अष्टभावाची प्राप्ति होते, लाभ होतो. (१२९)

अथवा असेंही म्हणूं कीं इंद्रियाच्या सर्व वृत्ति हृदयाच्या एकातामध्येंच प्रेमाच्या थापटल्यानें आणिल्या जाऊन तेथे एक गाढ अशी झोप, निद्रावस्था जे सुख आणतें तेथे ते सुख सर्व इंद्रियाच्या अवघ्या वृत्ती हृदयाच्या एकान्तामध्यें थापटल्या गेल्यामुळें – प्रेमास आणिल्या गेल्यामुळें – सर्व वृत्ती हृदयाच्या एकान्ताच्या झाल्या व आता विश्रान्तीच एक जशी का गाढ झोप (का निद्रावस्थाच) एक तेथे येऊन आहे (१३०)

एवढेंच नव्हे तर, तेथें ह्या जीवानें आत्मरूपच मिळविलें – ह्या आत्मसुखाची सोयच झाली – आत्म-रूपच तो जीव झाला असें जें काहीं सुखाचे होणें त्या सुखास सुख म्हणतात सर्व इंद्रियाच्या सर्व वृत्ति ह्या हृदयाच्या एकान्तामध्येंच थापटून निजविल्या, विश्रातीस आल्या व एक जें निखळ आत्मस्वरूप तेथें उरलें – जीव हा प्रसन्न झाला – देहाकाराची थापच थाप ब्रह्माकारानें घडलेली ती तेथें आत्मसुखाची सोय झाली व आतां चित्त हें सुप्रसन्न होऊन त्यानें हा प्रभूच पाहिला – तो परमात्माच सर्व सुखावर आरूढ झालेला – असें तें आत्मसुख होय चित्त प्रसन्न झालें त्यासच सुख म्हणतात – जीव हा स्वरूपी मिळून गेला एवढेंच नव्हे तर त्यानें एकत्वानें ती स्वरूपदर्शनाची प्राप्ति पाहिली (१३१)

अशी ही अवस्था नच कमविता किंवा जोडता जें काहीं जगण्यानें असणें किंवा जगणें तेच सर्वथैव दुःख होय असें जाण (१३२)

हें काय नुसतें इच्छा करण्यानें होणारें नव्हे – वासनावशतेचे होऊन हें साधणारें नव्हेच – येथें ह्या वासनाना किंवा अनेक अशा मनोरथावर उभें होणें जें त्यानें तें आपलेंसें होणारें असें नाहीं पण मनोरथभंगानेंच मात्र – वासना नाशानें – मात्र तें होईलच. एरव्हीं पाहिलें असता हें जगणें हें होतच आहे – येथें सर्व भूताची उत्पत्ति ज्यापासून झाली आहे व ज्यानें हें सर्व जग व्यापिलें आहे त्या परमात्म्याची पूजा आपल्या स्वाभाविक कर्मांच्या योगानें केली असता मनुष्याला परमसिद्धि मिळते असें हें होतच आहे – तरी पण ह्या सुखप्राप्तीचें का दु.खरूप जगणें तें दु·खाचें तेथे ह्या दोहीकडे उपाय हे लागू आहेतच – का साधन हें इलाजाचें करणें हें आहेच – तें दोहीकडे सारखेंच लागू आहे. (१३३)

आता ह्या देहामध्यें जी चैतन्याची सत्ता वागत असते तेथे असंग व साक्षीभूत असा जो देही म्हणजे आत्मा हे पाण्डुसुता, तेथें ही चैतन्याची सत्ताच मुळी चेतना म्हटली आहे. तेथे सजातीय चेतनावर्ग जो तोच मुळी चेतनतेचा होय – तेथे सजातीय जें प्रेमस्वरूप ईश्वराचे तेंच मुळी येथें चेतनावर्गानें असलेलें होय (१३४)

अशी ही चेतना आनखाग्र म्हणजे पायापासून तो थेट केसापर्यंत उभी होणारी असून ती सर्व शरीर-भर जागी राहाणारी – असणारी – अशी ती काय जागृति का स्वप्न का सुषुप्ति अशा ह्या तिन्ही अवस्थामध्यें ही पण पालटणारी नाही (१३५)

मन, बुद्धि आदिकरून जी सर्व तत्त्वे तीं ह्या चेतनेमुळेच टवटवीत दिसणारीं अशी तीं नेहमीच्या नेहमींच ह्या प्रकृतिरूपी वनाला वसतऋतु प्राप्त झाला आहे असें जाण (१३६)

तेथें जड प्रकृति किंवा अजड प्रकृति – तेथे अमत् जड दु·ख अशा जडाजडामध्ये एकसारखेपणानें किंवा उत्तमत्वानें संचार करणारी – वागणारी ती तीच मुळी तुजला नेहमी टवटवित करणारी, सुप्रसन्नता ह्या मनास देणारी अशी आहे हें काही लटिकें असें, तुजला चेतना ती नाहीं असें नाही – येथें त्या चेतनेवरच तूं मुळीं वागत आहेस हें लटिकें नाहीं. (१३७)

**पै रावो परिवार नेणें। आज्ञापि परचक्र जिणें।**
**कां चंद्राचेनि पूर्णपणें। सिंधु भरती ॥ १३८ ॥**

**ना ना भ्रामकाचें सन्निधान। लोह करी सचेतन।**
**कां सूर्य संगे जन। चेष्टे गा ॥ १३९ ॥**

**अगा मुख मेळे विण। पिलियांचें पोषण।**
**करी निरीक्षण। कूर्मी जेंवी ॥ १४० ॥**

पार्था तियापरी । आत्मसंगती इया शरीरीं ।
सजीवित्वाचा करी । उपयोग जडा ॥ १४१ ॥

मग तियेने चेतना । म्हणिजे पैं अर्जुना ।
आतां धृति विवंचना । भेद आईक ॥ १४२ ॥

तरी तत्वां परस्परें । उघडिया जातिस्वभावें–वैरें ।
पृथ्वीतें नीरें । न नासिजे ? ॥ १४३ ॥

नीरातें आटी तेज । तेजा वायूसि जुंझ ।
आणि गगन तंव सहज । वायू भक्षी ॥ १४४ ॥

तेवींचि कोण्हीहि वेळे । आपण काईसयाहि न मिळे ।
आंत रिगोनि वेगळें । आकाश हें ॥ १४५ ॥

ऐसी पांचही भूतें । न साहती एकमेकांतें ।
कां तियेंही ऐक्यातें । देहां येती ॥ १४६ ॥

द्वंद्वाची उखिविखि । सांडुनि वसती एकी ।
एकमेकांतें पोखि । निजगुणें ॥ १४७ ॥

ऐसेनि मिळे तिया साजणे । चाले धैर्यें जेणें ।
तया नाव म्हणे । धृति पैं गा ॥ १४८ ॥

रावो = राजा (शब्द, किकाळी) परिवार = लवाजमा आज्ञापि – आज्ञप्ति – आज्ञा = नुसत्या आज्ञेवर, आज्ञाच एक झाली कीं बस्स – हुकुम (आज्ञावह = आज्ञा पाळणारा) परचक्र = शत्रूचा हल्ला, शत्रूचें सैन्य जिणें = जिकणें (१३८) ना ना = अथवा भ्रामक = लोहचुंबक. सन्निधान = शेजारीपण, समीपता, जवळचे होणें. सचेतन = चेतनायुक्त, चेतन, चंचल सगे चेष्टे = सग चेष्टवी (१३९). मुख मेळे विण = स्तनास पिलियाचे तोंड लावल्यावाचून निरीक्षण = कूर्मीचे निरखून पाहणें, कृपा अवलोकन (१४०) आत्मसगती = मूळ स्वभाव जो आत्मा त्याची सोबत इया – इये सजीवित्वाचा – सजीवत्वाचा उपयोग = कामास येणें (१४१) धृति विवंचना = धैर्याच्या विचाराचे (१४२) उघडि – उघड = स्पष्ट नीरें = उदक, रस न नासिजे – विनाशिजे (१४३) झुंज = जुंझ = युद्ध (१४४) न साहती एकमेकातें = एकमेकाच्या डोळ्यात सहन होत नाहींत एकमेकाला अनुकूल नसतात देहा – देहासी (१४६) द्वंद्व = स्पर्धा, कलह, दोन तत्त्वे जोडताना होणारें युद्ध उखिविखि = वादविवाद साडुनि – सोडुनि वसती एकी = ऐक्यानें असतात निजगुण स्वभावगुण – स्वाभाविक गुणाने – एकी एकमेकाते पोखि (१४७) मिळे – न मिळे. तिया – तया साजणे = सजातीय करणे, एकाच जातीचे करणे (पुनरुज्जीवन, सिद्ध, शृंगार, तयार, भला, कुलीन) चाले – चले होऊन असतें किवा होते म्हणे – मी म्हणे धृति = (धारण, उद्धरण, उत्साह, तृप्ति) धैर्य, सुख (१४८).

(शब्द) राव किंवा राजा परिवार, लवाजमा जाणीत नाहीं पण आज्ञा करणें जाणतो, त्याची आज्ञा शत्रुसैन्य जिंकतें – त्या त्याच्या नुसत्या आज्ञेवरच मुळीं शत्रूचें सैन्य किवा शत्रूचा हल्ला जिंकिला होतो – जातो – किंवा असें पाहा कीं अहो, चंद्राच्या पूर्णपणामुळेंच ना सिधूस (करेणूच्या गंडस्थळामधून निघणारा जो स्राव त्या रसास) भरती येते ना ! पौर्णिमेचा चद्र हाच मुळी सिधूस भरती देणारा का आणणारा होतो (हत्तीच्या गंडस्थळातून वाहाणारा जो मदस्राव त्यास सिधू म्हणतात त्या गंडस्थळाना सुशोभित करण्यासाठीं जें वस्त्र असतें त्यास 'श्री' म्हणतात) (१३८)

अथवा लोहचुंबकाचें संनिधान, शेजारीपण किंवा समीपता हीच मुळीं लोखंडास सचेतन चेतना देणारी होते – करणारी होते किंवा सूर्याचा संग म्हणजे दिवस हाच मुळीं जनास का जगास व्यापार करण्यास लावतो – प्रवृत्त करतो – जगाच्या हालचाली दिवसावरच मुळीं होत असतात (१३९)

अहो पिलियाचें मुख स्तनास लाविल्याशिवाय नुसत्या कृपावलोकनानें – निरीक्षणानें – निरीक्षण्यानेंच कूर्मी – कांसवी ही त्याचें रक्षण करिते जशी का. (१४०)

पार्था, त्याप्रमाणें ह्या शरीरामध्यें स्वाभाविक जी जोड, सोबत किंवा संगी जो आत्मा त्याची सोबतच मुळीं अचेतन जें – चेतनाशून्य जें जड त्यास कामास येणें करतें कामाचें करतें, उपयोगाचें करतें – त्यास कामकाजास आणते (१४१)

हे अर्जुना, असें तें जडास कामास येऊं करणें, चेतन देणें, चेष्टविणें जें त्यामुळेंच मुळी तिजला म्हणजे त्या स्वाभाविक सोबतीसच चेतना म्हटलें जाते – आहे – आता धैर्याचा विचार जो त्याचे भेद ऐक. (१४२)

या पृथ्वीला उदक हें किंवा रस हा पार आटवून घेतो किंवा कालवून घेऊन आवरून घेऊन विलयाचे – गढूळपणानें पाणीरूप – सर्वैथैव शुद्ध पाणीरूप करून असत नाहीं काय? अहो! ह्या तत्वाचा, परस्परांचा, एकमेकांचा, उघड म्हणजे स्पष्ट असा जातिस्वभावच मुळीं वैर करणारा असल्यानें काय हें पृथ्वी-तत्व रसानें किंवा उदकानें का नीरानें पारचें पार ध्वंस केलेलें – सर्व प्राणीरूपच एक झालेलें – होतें का नाहीं बरें? (१४३)

ह्या नीरास म्हणजे पाण्यास का उदकास किंवा रसास तेज आटवून टाकतें, खाऊन घेतें, तसेंच ह्या तेजाची व वायूची परस्पर झुंज (पाहावी तो ती) होतच असते. तसेंच गगन हें तर त्या वायूला अगदीं सहजपणेंच जिरवितें – खाऊन टाकते गगन हें वायु भक्षितें अगदीं सहजच (१४४)

तसेंच हें आकाश पाहावें तो तें तर कधीही कोणाबरोबरही नच मिळता आंतमध्यें अगदीं वेगळे-पणानेंच जसें व्यापून असते (१४५)

अशीं हीं पाचही भूते एकमेकाना सहन करणारी नाहींत जरी तरीही पण – अशी तीं एकमेकास न खपून घेणारीं किंवा परस्पराना अनुकूल नसणारी जरी तरीही – तीं ह्या देहरूपाने – ह्या देहामुळें देहास म्हणजे ऐक्यास येणेच होऊन आहेत ना? तीं ह्या देहरूपी ऐक्यानेंच जन्मलीं, जशीं का ऐक्यास आलीं असें होत आहे (१४६)

अशीं तीं स्पर्धा किंवा कलहाची ओरडाओरड सोडून देऊन एकत्र वसतातच ना? व एकमेकाना स्वाभाविक गुणानेंच मुळी कीं अहो तीं पोसतात, पोषण देऊन असतात द्वंद्व का द्वेष का दोघाच्या युद्धाची ओरड नच करिता तीं भेटीनें असतात – सग्रहाचीं होतात (१४७)

याप्रमाणें जें (मिळणारें नाहीं – मिळून मिसळून असणारें नाहीं) मिळे का जें सहजपणेंच मिळालें का भेटलें त्यासच एक शृंगारणें का भलेपण देऊन सिद्ध केलें असें ज्या धैर्यामुळें होते, त्यास धृति हें नाव आहे साजणें चालें = सजातीय, सजातिचें केलें, एकाच जातीचें केलें, सजीवन, पुनरुज्जीवन, सिद्ध करणें, शृंगारणें, तयार करणें, भलेपण देणे, भला म्हणणें करणें, कुलीन करणें इत्यादि इत्यादि तें तसें करणें चालतें – होतें (किंवा जें नच मिळालें तेथे ते तसें करणें चालतेही पण). असें हें एकंदरींत ज्या धैर्यामुळें होतें – किंवा होणारें त्यांस धृति असें नाव, नाम मी म्हणतो. (१४८)

आतां जीवेसि पांडवा। या छत्तिसांचा मेळावा।
तोचि येथ जाणावा। संघात पैं गा ॥ १४९ ॥

एवं छत्तिसही भेद। तुज सांगितले विशद।
यया ये तुलयातें प्रसिद्ध। क्षेत्र म्हणिजे ॥ १५० ॥

रथांगाचा मेळावा। जेंवि रथु म्हणिजे पाण्डवा।
कां अधोर्ध्व अवयेवा। नांव देह ॥ १५१ ॥

करी तुरंग समाजें। सेना नाम निपजे।
कां वाक्यें म्हणिपति पुंजे। अक्षरांचे ॥ १५२ ॥

कां जळधारांचा मेळा। वाच्य होय आभाळा।
नाना लोक सकळा। नांव जग ॥ १५३ ॥

कां स्नेह सूत्र वह्नि। मेळु एके स्थानि।
धरिजे तो जनि। दीपु होये ॥ १५४ ॥

तैसी छत्तिसही इयें तत्त्वें। मिळती जेणें एकत्वें।
तेणें समूहपरत्वें। क्षेत्र म्हणिजे ॥ १५५ ॥

आणि वाह्यातेनि भौतिकें। पाप पुण्य येथ पिके।
म्हणौनि आम्ही कवतिकें। क्षेत्र म्हणो ॥ १५६ ॥

येकाचेनि मतें। देह म्हणती ययातें।
परि असो हें अनंतें। नामें यया ॥ १५७ ॥

पैं परतत्वाच्या आरौते। आणि स्थावरा आतौतें।
जें कांहीं होतें जातें। तें क्षेत्रचि हें ॥ १५८ ॥

पैं सुरनरउरगी। घडता हे योनि विभागी।
ते कर्म गुण संगी। पडिले सांतें ॥ १५९ ॥

संघात = पिंड, समुदाय ( १४९ ) तुज सागितले – सागितले तुज विशद = स्पष्ट, निर्मळ. प्रसिद्ध = भूषित, विख्यात, शोभा पावणारे, अलंकारच जसा एक ( १५० ) अधोर्ध्व = खालच्या वरच्या. अवयेवा – अवेवा नाव – नाम. देह – देहो ( १५१ ) करी = हत्ती. समाज = जमाव ( १५२ ) वाच्य = बोलण्यास योग्य, शब्दाचा मूळ अर्थ ( १५३ ) स्नेह सूत्र वह्नि = तेल, वात व अग्निज्योत. एके = एकीये ( १५४ ). म्हणिजे = म्हणिये ( १५५ ). वाहातेनि भौतिकें – भौक्तिके = व्यापार करणाऱ्या शरीरानें प्राणी या देहांत व्यापार करून पापपुण्याई कमावितो किंवा करतो. हीं पाच भौतिकें शरीर रूपानें राबविलीं, पाठीवर वाहिलीं तेथें राबणाऱ्या शरीरानें पापपुण्याची कमाई केली ( १५६ ). अनंते नामें = अनेक नांवें ( १५७ ). परतत्वाच्या आरौते आणि स्थावरा आतौतें = परब्रह्माच्या अलीकडे व स्थावराच्या म्हणजे जडाच्या आंत ( १५८ ) कर्म गुण संगी = सत्व, रज व तम या गुणाच्या संगतीनें पडिलें सांतें = मध्यें पडले असतां ( १५९ ).

जीवासहित किंवा जीवाबरोबर जो काहीं ह्या छत्तीस तत्वाचा मेळावा – बांधा तोच येथें पिंडसमुदाय जाणावा. ( १४९ )

याप्रमाणें सर्वच्या सर्व छत्तीस भेद का प्रकार हे तुजला स्पष्टपणें निर्मळ करून सांगितले व ह्याच इतुक्यांनीं हें क्षेत्र विख्यानतेचें झालेलें, शोभा पावणारें होतें. हीं तत्वें ह्या देहाचा अलंकारच होत – म्हणून यांस क्षेत्र म्हणावें. ( १५० )

रथाच्या अनेक अगाचे जे विभाग ते सर्व जोडले असतां जसा रथ म्हटला जातो, हे पाण्डवा, त्याप्रमाणें येथील क्षेत्राच्या खालच्या वरच्या अवयवांना जेव्हा जोडलें जाणें होतें तेव्हांच मुळीं हें क्षेत्र 'देह' असें नांव घेते – पावतें. (१५१)

हत्तींच्या व घोड्यांच्या जमावानें जसें सेना असें नाम निपजतें तेव्हा तेथें सेनाच एक अथवा वाक्यें हीं अक्षरांचे पुंजच जसें वाक्याप्रत आलेलें तेथें वाक्येंच तीं होत. चाल, चलन, चलणूक का वृत्ति हीच येथें एका महत्त्वानें उभी झाली – जशी ह्या देहानें देहरचना – सृष्टीची झाली जशी का. (१५२)

पावसाच्या धारांच्या वर्षावानें जसा पाऊस हा आभाळातून पडतो किंवा आभाळ वर्षतें असें म्हटलें जातें अथवा ह्या लोकाना जग हें नाव येतें (१५३)

तेल, वात व वन्हि याची एकी दिव्याच्या योग्यतेने असते तेव्हां अथवा या तिहींचा एके ठिकाणीं मेळ झाला म्हणजे जनामध्यें तो दीप म्हटला जातो – होतो. (१५४)

त्याप्रमाणें हीं सर्व छत्तीस तत्त्वें ज्या एकत्वानें एकत्वाच्या मिळणींची होतात, एकत्वास येतात – अशा त्या समूहपरतत्वावरच – त्यास क्षेत्र म्हटलें जातें. समूहपरत्वें म्हणजे वैर, भेद, परिणाम, मागून येणे, इत्यादि जें, तेणेंकरूनच त्यांस क्षेत्र म्हणणें होतें. (१५५)

आणि ह्या राबणाऱ्या पंच भौतिक शरीरानें – व्यापार करणाऱ्या ह्या जड देहानें प्राणि ह्या देहांतच व्यापार करून, पापपुण्याची कमाई करितो, आणि म्हणूनही पण आम्ही ह्यांस कौतुकानेंच क्षेत्र म्हणूं. (१५६)

दुसरे कोणी एक ह्यास देह म्हणतात – पण हें असो – ह्यास काय अनेक – अनंत नामें आहेत (१५७)

कारण जें काहीं परतत्त्वाच्या, ब्रह्म व त्याच्या वस्तुस्थितीच्या अलीकडे – म्हणजे विष्णुतत्त्व परब्रह्माच्या अलीकडे – व ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंतच्या त्या जडाच्या आत जें काहीं निर्माण होतें व लय पावतें तें सर्व क्षेत्र होय. (१५८)

सत्व, रज व तम या गुणाच्या संगतीनें त्या त्या गुणाच्या कर्मामध्यें पडलें असता तेथें सुर म्हणजे देवलोक का नर म्हणजे मनुष्यलोक का उरग म्हणजे सर्पयोनि (दिव्य कर्मयज्ञसूत्र) अशा योनींनीं ते योनी विभागांनीं, वाट्यानीं, किंवा रचनेनें ते तें घडणें होतें – ते तें घडत आहे – घडत असतें (१५९)

**हेचि गुणविवंचना। पुढां म्हणिपेल अर्जुना।**
**प्रस्तुत आता तुज ज्ञाना। रूप दाऊं ॥ १६० ॥**

**क्षेत्र तंव सविस्तर। सांगितले सविकार।**
**म्हणौनि आतां उदार। ज्ञान आईक ॥ १६१ ॥**

**जया ज्ञानालागी। गगन गिळिताति योगी।**
**स्वर्गाची आडवंगी। उमरडौनि ॥ १६२ ॥**

**न करिती सिद्धीची चाड। न धरिती ऋद्धीची भीड।**
**यौगा ऐसे दुवाड। हेळसिती ॥ १६३ ॥**

**तपोदुर्गें ओलांडित। ऋतुकोडी वोवांडित।**
**उलथोडि सांडित। कर्मवल्ली ॥ १६४ ॥**

**नाना भजन मार्गी। धावत उघडिया आंगीं**
**येक रिगताति सुरंगी। सुषुम्नेचिया ॥ १६५ ॥**

**ऐसी जिये ज्ञानी। मुनीश्वरांची उतान्ही।**
**वेदतरूच्या पानोवानी। हिंडताती ॥ १६६ ॥**

**येईल गुरुसेवा। इया बुद्धि पांडवा।**
**जन्माचा सांडोवा। टाकित जे ॥ १६७ ॥**

**जया ज्ञानाचिये रिघवणी। अविद्ये उणे आणी।**
**जीवात्मया बुझावणी। मांडुनि दे ॥ १६८ ॥**

**जे इंद्रियांचीं द्वारें आडी। प्रवृत्तीचे पाय मोडी।**
**जे दैन्यचि फेडी। मानसाचे ॥ १६९ ॥**

**द्वैताचा दुकाळु पाहे। साम्याचे सुयाण होये।**
**जया ज्ञानाचिये सोये। ऐसे करी ॥ १७० ॥**

गुणविवंचना = गुणाचा विचार, वितर्क. पुढा = 'गुणत्रयविभागयोग' अध्यायांत (१६०). सविस्तर = फैलाव्यासहित. प्रचुरतेनें = प्रसारासहित, विछाना छाननीसहित. उदार = उत्तम. आईक - आइके (१६१). आडवंगी = (स्वर्गाचा) आडमार्ग. उमरडौनी = वोलांडुनी (१६२). सिद्धीची चाड = फलोत्पत्ति, इच्छा, कार्याची पूर्णता ऋद्धि = श्रीमंती, समृद्धी, वाढ भीड = मुरवत, भीडभाड, महत्त्व पाहून संकोचणें जें दुवाड = व्यवहाराची जोड टाकून नुसतें यौग म्हणजे योग्यतेचें होणें जें एक योग्य होणें ही संवय आपलीशी केलेली. हेळसिती = तुच्छ मानतात (१६३) तपोदुर्गे ओलांडित = कोट्यवधि तपरूपी किल्ले वोवाळून सडित ऋतुकोडी वोवाडित = कोट्यवधि यज्ञयाग, होम, निश्चय नभावरून वोवाळून टाकतात. कर्मवल्ली = कर्मरूप वेली जड देहास येणें तो कर्मरूप वेल उलथून साडून नाहींसा करतात (१६४). उघडया - उघडिया रिगताति सुरंगी = गुप्तमार्गानें किंवा भुयारानें जातात मुषुम्नेचिया = सुषुम्ना नाडीच्या (१६५) मुनीश्वराची उतान्ही = श्रेष्ठ अशा तपस्व्याची आवड, उत्कंठा, इच्छा ह्या ज्ञानासाठीं वेदतरूच्या पानोवानी हिंडताती = वेदवृक्षाच्या पानापानावरून हिंडतात - वेदातील मार्गाचे शोधन करितात (१६६). येईल - देईल. जन्माचा साडोवा - जन्मशताचा साडोवा = शेंकडो जन्माची वोवाळणी करितात, जन्म ओवाळून टाकितात (१६७) ज्ञानाचिये - ज्ञानाची रिघवणी - रिगवणी = प्रवेश बुझावणी = ऐक्य जीवात्मया - जीव आत्मया = जीव व आत्म्याचें ऐक्य माडुनि दे = शोभेस आणते, अति रम्यतेचें करते (१६८). आडी = अडविते, बंद करते प्रवृत्ति = प्रपंच, मार्ग, मनाचा कल, प्रघात. मानसाचें दैन्य फेडी = मनाचें दरिद्रपण - हलकेपण - का विपत्ति नाहींसे करिते (१६९) दुकालु = अभाव. साम्याचे सुयाण = अद्वैतबोधाचा सुकाळ, साम्य (तुल्यतेची) सिद्धि. जीवदशेस वलभत्व - वालभ - जोडलें असें करतें ज्ञानाचिये - ज्ञानाची. सोये = प्राप्ति (१७०). उदारज्ञान - ज्ञानाचीं चिन्हें देहव्यापारी दिसतात तीं (१६०-१८४).

अशी ही गुणाबद्दलची शंका, विवंचना, वादविवाद किंवा अनुमान हें पुढें ('गुणत्रयविभागयोगामध्यें' सांगितलें) सागूं आतां येथें प्रस्तुत प्रसंगी तुजला ज्ञानाचें रूप दाखवूं तूं जो आपण ज्ञानरूप व्हावें अशी इच्छा धरून आहेस त्या तुला तें ज्ञानाचें (का तुझे) रूप तें दाखविण्याचें करूं जें ज्ञान म्हणून आहे त्यास रूपास आणूं. (१६०)

क्षेत्र हें तर सविस्तरतेने म्हणजे फैलाव्यासहित प्रचुरतेने व त्याच्या प्रसारासहित असें तें 'सविकार' सागितलें. म्हणून आता (जे निर्विकार असें) उदार असें जें उत्तम ज्ञान तें ऐक. (१६१)

अशा ह्या उत्तम ज्ञानासाठीं योगीजन हे तर स्वर्गाचा आडमार्ग ओलांडून गगनच सर्व गिळून टाकतात. (१६२)

फलोत्पत्तीची किंवा कार्याच्या पूर्णतेची चाड ते धरीत नाहींत. तेथीलच्या इच्छेचे का खुषीचे होत नाहींत. ऋद्धि म्हणजे श्रीमंतीची, समृद्धीची संपन्नता – उद्यम – तेथें वाढ व्हावी अशी मुळींच भीड न ठेवितां – तेथीलचें महत्त्व पाहून आपल्या योगाचें होणें हें आटपून घेत नाहींत. व योग्य होणेंच एक तें– तेथीलची संवयच नुसती ते आपलीशी करीत नाहींत. तशी ती संवय ते तुच्छ मानतात. (१६३)

कोट्यवधि तपरूपी किल्ले किंवा यज्ञ त्या ज्ञानावरून ओवाळून टाकतात. कोट्यवधि यज्ञयाग होम तेथीलच्या नभावरून ओवाळून टाकतात व जड देहास येणें – जन्मणें – मरणें – ह्या कर्मरूप वेल उलथून सांडून नाहींसा करतात (१६४)

अथवा भजनमार्गामध्यें उघड्या अगानेंच मुळीं आपली सर्व धांव घेऊन असतात. दुसरे कांहीं सुषुम्ना नाडीच्या गुप्त मार्गामध्येंच आपली रीघ करून असतात. (१६५)

श्रेष्ठ अशा तपस्व्याची आवड, उत्कंठा, इच्छा ही ज्या ज्ञानाच्या प्राप्तीकरितां वेदवृक्षाच्या पाना-पानावरून हिंडतात – वेदातील मार्गाचें शोधन करितात. (१६६)

अनेक शतजन्मच मुळीं ते, गुरुसेवा येईल या बुद्धीनें, ओवाळून टाकितात. (१६७)

ज्या ज्ञानांत प्रवेश झाला असता अविद्येसच खालीं पाहाण्यास लावतो – अविद्येसच मुळीं कमीपणानें पाहातो व जीव आणि आत्मा याचें ऐक्य शोभेस आणतो – अतिरम्यतेनें मांडून देतो. (१६८)

जें ऐक्य इंद्रियाचीं द्वारें बंद करितें – प्रपंचाचे मनाच्या सलाचे का प्रघाताचे पायच मोडून टाकतें – व जें मनाचें दरिद्रिपण का हलकेपण नाहींसें करतें (१६९)

ज्या ज्ञानाची प्राप्ति द्वैताचा अभाव पाहाते – अद्वैत बोधाचा सुकाळ करते व जीवदशेस वल्लभत्व का प्रेमाचें वालभ जोडलें अशी सोयच एक करून असतें (१७०)

मदाचा ठावोचि पुसी । जे महामोहाते ग्रासी ।
नेदी आपपर ऐसी । भाष उरो ॥ १७१ ॥

जे संसाराते उन्मळी । जे संकल्पपंक प्रक्षाळी ।
अनावराते वेटाळी । ज्ञेयाते जे ॥ १७२ ॥

जयाचेनि जालेपणे । पांगुळला होइजे प्राणे ।
जयाचेनि विंदाणे । जग हे चेष्टे ॥ १७३ ॥

जयाचेनि उजाळे । उघडति बुद्धिचे डोळे ।
जीव दोंदावरी लोळे । आनंदाचि या ॥ १७४ ॥

ऐसे जे ज्ञान । पवित्रैक निधान ।
जेथ विटाळलें मन । चोखकीजे ॥ १७५ ॥

आत्मया जीव बुद्धि । जे लागली होती क्षयव्याधि ।
ते जयाच्या सन्निधि । निरूजा करी ॥ १७६ ॥

ते अनिरुप्य की निरुपिजे । ऐकता बुद्धि आणिजे ।
वांचुनि डोळा देखिजे । ऐसे नाहीं ॥ १७७ ॥

**मग तेचि इये शरीरीं। आपुली प्रभा जैं करी।**
**तै इंद्रियांच्या व्यापारीं। डोळाही दिसे ॥ १७८ ॥**

**पैं वसंताचें रिगवणें। झाडाचेनि साजेपणें।**
**जाणिजे तेंचि करणें। सांगती ज्ञान ॥ १७९ ॥**

**अगा वृक्षासी पाताळी। जळ सांपडे मुळीं।**
**तें शाखांचिये डाहाळीं। बाहेरी दिसे ॥ १८० ॥**

**कां भूमीचें मार्दव। सांगे कोंभांची लवलव।**
**नाना आचार गौरव। सकुलीनाचे ॥ १८१ ॥**

**अथवा संग्रामाचिया आयती। स्नेहो जैसा ये व्यक्ति।**
**कां दर्शनाचिये प्रशस्ति। पुण्य पुरुष ॥ १८२ ॥**

**ना तरी केळी कर्पूर झाला। जेंवी परिमळें जाणो आला।**
**कां भिंगागारी दीपु ठेविला। बाहेरी फांके ॥ १८३ ॥**

**तैसें हृदयीचेनि ज्ञानें। जियें देहीं उमटती चिन्हें।**
**तियें सांगो आतां अवधानें। चांगे आईक ॥ १८४ ॥**

मद = धुंदी, गर्व महामोह = अज्ञानामुळें झालेली भ्राति – दुःख ( १७१ ) उन्मळी = उपटून टाकते. प्रक्षाळी – पाखाळी = शुद्ध करते ज्ञेय – परब्रह्म अनावर = अमर्यादतेचें. वेटाळते = आवरते ( १७२ ). पागुळला – पागुळ विदाणे = कौशल्य चेष्टे = वागते, व्यापार करते ( १७३ ) दोद = तृप्ति ( १७४ ). पवित्रैकनिधान = पवित्रतेचा साठा निरुजा = निरोगी ( १७६ ) अनिरूप्य = आकृतीचा का शरीर स्वभावाचा अभाव बुद्धि आणिजे = बुद्धीला समजण्यासारखें करणे तें ( १७७ ) आपुली प्रभा जै करी – जें आपुला प्रभावो करी = प्रवृत्तीने आपल्या सामर्थ्याचा परिणाम केला जर डोळाही दिसे – दृष्टींही दिसे ( १७८ ) साजेपणे = टवटवीतपणाने करणें = इन्द्रियें व त्याचे व्यापार ( १७९ ) डाहाळी = विस्तारातून. बाहेरी – वरीही ( १८० ). लवलव = कोवळेपणाची, कोमलपणाची चमक सकुलीनाचे – सुकुलीनाचे = कुलीन जे त्यांचा थोरपणा त्यांच्या राहाणीवरून, आदरातिथ्यावरून समजतो ( १८१ ) स्नेह = मित्रत्वाची संपत्ति. प्रशस्ति = पूज्यता ( १८२ ) कर्पूर – कापूर. भिंगागारी = काचेच्या गृहांत ( १८३ )

डोळ्यावर आलेली अज्ञानाची धुंदी तिचा पार मोडच पुसून टाकते. गर्वाचा ठावठिकाणाच मुळीं नाहींसा करतें – जें अज्ञान भ्रांतीमुळें होणाऱ्या दुःखास पार नाहीसें करतें व आपलें का पराचें असें दुजेपणच तेथें उरूं देत नाही – माझें माझें व त्याचे म्हणजे दुसऱ्याचे असें दुसरेपणानें दुजेपण पुढें होणारें ते त्याचें नावही पण उरूं देत नाही (१७१)

जें संसारवृक्षास पार उपटून टाकितें – उन्मळून टाकतें – ज्याच्यामुळें संकल्प विकल्प करण्याची संवय ही शुद्धीची होऊन येते व जें अनावर अमर्यादतेचें असें जें वस्तु, परब्रह्म, ज्ञेय त्यास अगदीं कवटाळून असतें (१७२)

ज्याचें होण्यानें – जें ज्ञेय आपण स्वतः झालें असता हा प्राणच पागुळला – पंगु होतो – त्याच्या त्या कौशल्यानें जगाचे व्यापार हे होऊं लागणारे असतात. (१७३)

ज्याच्या उजाळपणावरच ह्या बुद्धीचे डोळे उघडले जातात व जीव हा आनंदाच्या तृप्तीवरच मुळी विश्रांतीस असतो – चा होतो. (१७४)

असें जें एका पवित्रपणाचें सर्वथैव निधान, गुप्तधन तेथें तर विटाळलेलें मन हेंच मुळी शुद्ध करून घ्यावें – तें ह्या मनास पावित्र्याचा स्पर्श करून आपुल्या शुद्धीस आणिते – ते ज्ञान आपण होऊन आपलें जें विटाळलेले मन हें चोख म्हणजे उदार भावाचें करावेंच करावें (१७५)

ह्या आत्म्याला जी काही सर्वसाधारण एक सामान्य जीवपणाची बुद्धि हीच कोणी एक क्षयरोगाची व्यथा जडलेली ती ज्याच्या सान्निध्यानें निरोगीपणाची होते – तसें ते आत्मबुद्धीचे होऊन ती क्षयव्यथा निरोगीपणाची करावीच करावी. (१७६)

जें आकृतिप्रकार, शरीरस्वभाव इत्यादीचें नसलेलें तेंच आतां आपल्या निरूपणास किंवा निरोपास आल्यानें रूपाचें होऊन बोलूं लागलें व तें त्याचें बोलणें ह्या बुद्धीस समजेल असें केलें असतां – तें बुद्धीनें नीट समजून घेऊन असावें पण बुद्धीला जर ती दृष्टि नाही तर तें दिसणारें असें होणार तरी कसें ? (१७७)

पण तेंच ह्या शरीरामध्यें जेव्हा आपल्या प्रकाशाचा प्रभाव सामर्थ्य परिणाम करूं लागतें तेव्हा ह्या इंद्रियाच्या व्यापारानीं, हालचालीनीं जी काहीं कर्माची, प्रवृत्तीची ती प्रभा, प्रभाव तेथें दृष्टि येते – ती प्रभा व तो व्यापाराचा प्रभाव डोळ्याना दिसूं लागतो – तेथे डोळाच मुळी एक दिसणारा होतो. (१७८)

तेथें ज्ञानडोळाच एक उगवल्यानें – इंद्रियें ही मुळीं किंवा तींच मुळीं करणे किंवा उपकरणें ही ज्ञानाची गोष्ट करूं लागतात जसें का झाडाच्या टवटवीतपणानें वसंताचें येणें होऊन आहे असें. (१७९)

अहो, असें पाहा कीं वृक्षास अधोलोकांत – त्याच्या त्या त्वचेस पोहोंचणारें जल तें मुळीं मुळांतच सांपडतें व तेंच मुळीं शाखाच्या विस्तारामधून बाहेर दिसूं लागतें – वरही पण तें दिसूं लागतें (१८०)

ह्या भूमीचें जें मृदुपण, मार्दव, सौम्यतेचें तेज तेच मुळीं ह्या कोंबांच्या कोमलपणानें चमकूं लागतें जसें का आदरातिथ्यावरून कुलीन जो त्याचा थोरपणा त्याच्या राहाटीवरून समजतो (१८१)

आईती जी संग्रामाची जेथें हत्ती, घोडे, पायदळ, रथ इत्यादि अंगे सुव्यवस्थितेने मांडली होतात तेथें मित्रभाव हा व्यक्तित्वास येऊन असतो – व्यक्तित्व मित्रभावानें असते जसें किंवा दर्शनाच्या पूज्यतेनें पुण्यपुरुष जो तेथें मनाचें प्रशस्तपण हें एका प्रशस्तपणानें पुण्यच उभें झालें जसें (१८२)

केळ ही कर्पूर झाली – कापुराच्या परिमलानें ती केळ आता कापूर सर्वथैव अशी होऊन आहे किंवा भिंगाच्या गृहामध्यें ठेविलेला दिवा त्याचा प्रकाश जसा बाहेर फाकतो तसें तें होय (१८३)

त्याप्रमाणें अंतःकरणातील ज्ञानामुळें किंवा हृदयामधील ज्ञानाच्या प्रकाशामुळें किंवा ज्ञानानें ह्या देहावर म्हणजे देहाच्या क्रियेंत जी काही लक्षणें उमटून असतात, उमटतात तीं आता सांगतों – लक्ष्य देऊन ऐस, चांगलेपणाने ऐक – सर्व अवधान येथे देऊन ते ऐकण्याचे कर. (१८४)

**अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥७॥**

अमानित्वम् = मान नसणें, महत्त्व घेऊन नच बसणें अदंभित्वम् = लौकिकाचा दंभ नसणें, गर्व का कपट का ढोंग नसणें अहिंसा = प्राणिमात्रास नच दुखविणें. क्षांतिः = क्षमाशीलता आर्जवम् = मन व वाणी यांचा सरळपणा. आचार्योपासनम् = गुरुसेवाविधान. शौचम् = शुचिर्भूतपणा. स्थैर्यम् = मनाची स्थिरता, स्थैर्य आत्मविनिग्रहः = मनोनिग्रह, आत्मसंयम, मन, इंद्रिये व शरीर यांचा निग्रह.

**अन्वय**—अमानित्वं, अदंभित्वं, अहिंसा, क्षान्ति, आर्जवम्, आचार्योपासनम्, शौचं, स्थैर्यं, आत्मविनिग्रहः । (एतद् ज्ञानम् इति प्रोक्तम् ।)

गा आता आवधानें ॥ चांगें आइक ॥ ८४ ॥ श्लोक ॥ आमानित्वमदंभित्व
महिंसा क्षांतिरार्जवं ॥ आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥
टीका ॥ ॥ तरि कवणिही विषिंचे ॥ साम्य होणें न रुचे ॥ संभावितपणाचें ॥
वोझें जया ॥ ८५ ॥ आथिलेचि गुण वानितां ॥ मान्यपणें मानितां ॥ योग्यते
चें येतां ॥ रुप आंगा ॥ ८६ ॥ तें गजबजों लागे कैसा ॥ व्याधें रुधिला मृग जै
सा ॥ कां बाहीं तरतां वळसा ॥ दाटला जेवि ॥ ८७ ॥ पार्था तेणें पाडें ॥ संन्मानें
सांकडे ॥ गरिमे तें आंगा कडे ॥ येवोंचि नेदी ॥ ८८ ॥ पुज्यता डोळां न देख
वि ॥ स्वकीर्ति कानीं नाइकावी ॥ हा आमुका ऐसि नव्हावि ॥ सचि लोकां ॥ ८९ ॥
तेथ सत्काराचि के गोठी ॥ कें आदरा येईल भेटी ॥ मरणें सिं साटी ॥ नमस्का
रितां ॥ ९० ॥ वाचस्पतीचेनि पाडें ॥ सर्वज्ञता तरि जोडे ॥ परि वेडिवमाजि
दडे ॥ महिमे भेणें ॥ ९१ ॥ चातुर्य लपवी ॥ महत्व हारवी ॥ पिसेपण मिरवी ॥
आवडोनि ॥ ९२ ॥ लौकिकाचा उद्वेग ॥ शास्त्रांवरि उबग ॥ उगेपणी चांग ॥
अति भरु ॥ ९३ ॥ जग आवज्ञाचि करावी ॥ संबंधी सोय न धरावी ॥ ऐसे
ऐसी जीवीं ॥ चाड बहु ॥ ९४ ॥ तळवटपण बाणे ॥ आंगीं हीणावो स्वेंवणें ॥

लेखकाजवळ असलेल्या हस्तलिखित पोथीच्या १३ व्या अध्यायातील अक्षराचा नमुना.

अर्थ—महत्त्व घेऊन नच असणें, लौकिक मान नसणें=लौकिकाचा ताठा का ढोंग नसणें, प्राणिमात्रांना नच दुखविणें, क्षमाशीलता, स्वभावाचा सरळपणा, मन हें व वाचा ही सरळपणाच्या वर्तनाची, गुरुसेवातत्परता, शुचिर्भूतपणा, मनाची स्थिरता व मन, इंद्रियें व शरीर यांचा निग्रह (यांना ज्ञान असें म्हणतात ) ( ७ )

तरी कव्हणीहि विषीचें। साम्य होणे न रूचे।
संभावितपणाचें। ओझें जया ॥ १८५ ॥

आथिलेचि गुणवानिता। मान्यपणें मानिता।
योग्यतेचे येता। रूप अंगा ॥ १८६ ॥

तैं गजबजो लागे कैसा। व्याधें रूंधिला मृग जैसा।
कां बाहीं तरतां वळसा। दाटला जेंवी ॥ १८७ ॥

पार्था तेणें पाडें। सन्मानें जो सांकडे।
गरिमेतें अंगाकडे। येवो नेदी ॥ १८८ ॥

पूज्यता डोळा न देखावी। स्वकीर्ती कानीं नाईकावी।
हा अमुका ऐसी न व्हावी। सेचि लोकां ॥ १८९ ॥

तेथ सत्काराची के गोठी। के आदरा येईल भेटी।
मरणेसी सांठी। नमस्कारिता ॥ १९० ॥

वाचस्पतिचेनि पाडे। सर्वज्ञता तरी जोडे।
परि वेडिवेमाजीं दडे। महिमे भेणें ॥ १९१ ॥

चातुर्य लपवी। महत्व हारवी।
पिसेपण मिरवी। आवडोनी ॥ १९२ ॥

लौकिकाचा उद्वेग। शास्त्रांवरी उबग।
उगेपणा चांग। अति भरूं ॥ १९३ ॥

जगें अवज्ञाचि करावी। संबंधीं सोयचि न धरावी।
ऐस ऐसी जीवीं। चाड बहु ॥ १९४ ॥

तळवटपण बाणे। अंग हिणावो खेंवणें।
तें तेंचि करणे। बहुतकरुनी ॥ १९५ ॥

हा जिवंत ना नोहे। लोक कल्पी येणे भावे।
तैसे जीवे होआवे। ऐसी आशा ॥ १९६ ॥

पैल चालतु की नोहे। का वारेनि जात आहे।
जना ऐसा भ्रम जाये। तैसे या होईजे ॥ १९७ ॥

माझे असतेपण लोपो। नांवरूप हारपो।
मज झणें वासिपो। भूतजात ॥ १९८ ॥

ऐसी जयाची नवसिये। जो नित्य एकांता जातुजाये।
नामेंचि जो जिये। विजनांचेनि ॥ १९९ ॥

वायुसी आणि जयापाडे । गगनेसी बोलो आवडे ।
जीवप्राणेसी झाडें । पढियंती जया ॥ २०० ॥

किंबहुना ऐसी । चिन्हें जया देखसी ।
जाण तया ज्ञानेसी । सेज जाली ॥ २०१ ॥

पै 'अमानित्व' पुरुषीं । तें जाणावें यिहीं मिसीं ।
आतां अदंभाची वोळखी । सौरसु देवो ॥ २०२ ॥

तरी अदंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें ।
जीऊं जावो परी नुमसे । ठेविला ठावो ॥ २०३ ॥

तयापरी कीरीटी । पडिलाहि प्राणसंकटी ।
परि सुकृत न प्रकटी । आंगे बोले ॥ २०४ ॥

खडाणे आला पान्हा । पळवी जेंवी अर्जुना ।
कां लपवी पण्यांगना । वडिलपण ॥ २०५ ॥

आढ्य आतुडे आडवी । मग आढ्यता जेवी हारवी ।
ना तरी कुळवधू लपवी । अवयवांतें ॥ २०६ ॥

नाना कृषीवळ आपले । पांघुरवी पेरिले ।
तैसे झांकी निपजले । दानपुण्य ॥ २०७ ॥

वरि वरि देह न पूजी । लोकाते न रंजी ।
स्वधर्म वाग्ध्वजीं । बाधो नेणे ॥ २०८ ॥

परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिले ।
न शके विकूं जोडिले । स्फीतीसाठीं ॥ २०९ ॥

शरीरभोगाकडे । पाहाता कृपण आवडे ।
येऱ्हवीं धर्मविषी थोडे- । बहु न म्हणे ॥ २१० ॥

कव्हणीहि – कवणेही विषीचे – विषयाचें साम्यहोणे – जीवासाम्य ( १८५ ) आथिलेचि = अंगीं आलेलेच ( १८६ ) रूंधिला – रुधला = आडविला. वळमा = भोवऱ्यांत दाटला, सांपडला ( १८७ ). साकडे = कष्टी होतो गरिमेतें = मोठेपणाला ( १८८ ) न व्हावी – नोहावी ( १८९ ) येईल – देईल. साठी = बरोबरी ( १९० ). पाडे = तोलाची महिमे मेणें वेडिवेमाजी दडे = मोठेपणाच्या भीतीनें वेड्यात दडतो ( १९१ ) उद्वेग = चित्तास येणारी अस्वस्थता उबग = कंटाळा उणेपणी = न्यूनत्व, उणे – उगे. अतिभरूं – आथीभरु ( १९३ ) तळवटपण – तळौटेपण = लघुत्व, लहाणपण. हिणावो = हीनपण. खेंवणें = (हीनपणाचें) भूषण ( १९५ ). जिवंत – जीतु. जीवे – जीणे ( १९६ ). की नोहे – ना नोहे. वारेचि – वारेनि तैसे या – तैसे ( १९७ ) वासिपो = न भीवो ( १९८ ). जाये – आहे विजनांचेनि = एकांताचें नांव ऐकतांच खूष होतो ( १९९ ). तया – जया – जेया. जीवप्राणेसी – जीवे प्राणे – जीव—प्राण ( २०० ). ऐसी – ऐसऐसी. ज्ञानेसी – ज्ञानासी (२०१). मिसीं = लक्षणावरून. अदंभाची वोळखी – अदंभाचिया ओळखीसी ( २०२ ) नुमसे = सांगायचा नाहीं ( २०३ ). खडाणे = पान्हा चोरणाऱ्या गाईला. पण्यांगना = वेश्या. वडिलपणे – वडिलपण ( २०५ ) आडवी = रानांत. देह – देहो. न पूजी = डामडौल करीत नाहीं. न रंजी = खुशामत करीत नाही. स्वधर्म वाग्ध्वजीं बांधो नेणे = आपल्या सत्कर्माची टिमकी वाजवीत नाहीं ( २०८ ) स्फीतीसाठीं = प्रतिष्ठा मिळविण्यासाठीं ( २०९ ). विषी – विषयीं ( २१० )

उदारज्ञान = हृदयातील ज्ञानाचीं चिन्हें देहव्यापारांत दिसतात तीं उदाहरणासहित—

कोणत्याहि विषयाशीं ह्या जीवदशेचें साम्य व्हावें असें त्यास मुळींच रुचत नाहीं, आवडत नाहीं–संभावितपणाचा डामडौल करणें म्हणजे तर एक मोठेंच ओझें असें त्यास वाटतें. (१८५)

अंगीं असलेल्या गुणांची वाखाणणी केली तर त्यास ते आवडत नाहीं. त्याचे ते गुण मानिलेले व्हावेत असे तो केव्हाही ओझेंच मानतो, व त्या गुणांमुळें जशी का योग्यताच एक अंगीं येऊन आहे व आतां पाहावें तों त्याच्या अंगानें एकरूपच घेतलें ते योग्यतेचें असें तो मानीत नाहीं (१८६)

तसे ते गुण वाखाणणें का गुणाची मानमान्यता ही रूपास आलेली योग्यता तेथें तें रूपच जणूं डाव दिलें गेल्यानें त्यास तर चहूंबाजूंनीं आडविणेंच होतें. तेथें तो गजबजूं लागतो–चळवळूं लागतो जसा का मृगच एक पारध्यानें अडविला किंवा जसें कांहीं एकादा आपल्या हातानीं पोहून नदींतून जात असता भोवऱ्यात सापडावा तसा. (१८७)

अगदीं असेंच तो सन्मानानें कष्टी होतो म्हणून मोठेपणाला आपल्या अंगाकडे येऊं देतच नाहीं. (१८८)

दर्शनाची प्रशस्ति का पूज्यता ही त्यास आपल्या डोळ्यानी पाहावीशी वाटत नाहीं–स्वतःची गुण-वाखाणणी का कीर्ति ही तो आपल्या कानानीं ऐकण्याची इच्छा करीत नाही एवढेंच नव्हे तर हा अमुक आहे अशीही पण लोकाना त्याची आठवणच मुळीं येऊं नये असेंच तो भावून असतो (१८९)

तेथें सत्काराची गोष्ट ती बोलताच येत नाही–तो केव्हाही सत्कार करून घेणारा होतच नाहीं–का तेथें आदर केला असता त्यास मोठेपण भेटलें असें तो केव्हाही तें मोठेपण आपल्या अंगावर घेत नाहीं तर त्यास नुसतें नमस्कारणें केलें तरी (लौकिक लाजच जशी) मरण जसें आलें अशी त्यास उदासीनता येणारी होते (१९०)

तो तर वाचस्पतीपेक्षाही सर्वज्ञ असलेला–तेथें सर्वज्ञता ही जोडून असलेली पण मोठेपणाच्या भीतीनें तो वेड्यांत दडतो (१९१)

चातुर्य लपवितो, महत्त्व हरवून असतो (दुसऱ्यांना–लोकाना दिलेलें करून असतो) पिसेपण मिरवितो केव्हाही पाहील त्यास असेंच एक त्याचेबद्दल मानणें होते असें तें त्याचें वागणें हें लोकाना अतिप्रिय होऊन असलेलें–आता तें आवडलेलेंच मुळी लपविलें दडविलें, पिसेपण मिरविलें असें तें जास्तच गोड होऊन आलें असें होते (१९२)

लौकिकाच्या गोष्टीविषयीं त्यास चित्ताची उद्विग्नता येणारी होते शास्त्राचा कंटाळा असतो (उणेपणच का न्यूनत्वच त्याने पाहावे असाच एक तेथें त्याच्या मनात भर येऊन असतो) उगीच आपलें असावें असाच त्यास एक चागुलपणाचा भार येऊन असतो. (१९३)

जगानें नेहमीं अवज्ञा करावी–सोयरेसबंधीनीं आपली सोयच झाली असें मानूं नये–अशा अशा तऱ्हेची त्याच्या जीवीं चाडच एक असते (१९४)

लहानपणच एक अगी बाणावें. हीनपण हेंच एक भूषण बहुतकरून पुन्हा पुन्हा तेच तेंच करणें होत असलेले. (१९५)

हा जिवंत आहे कीं नाहीं असा लोकांमध्यें एक समज दृढ होऊन असतो व असेंच मुळीं जिणें व्हावें अशी त्याचे अंगीं एक दशाच येऊन असते. (१९६)

पलीकडे दिसणारा तो चालत आहे कीं नाहीं–तो चालता बोलता आहे असें नाहीं–किंवा नुसत्या वाऱ्यावरच जात आहे (कीं वेडा आहे) असा जनामध्यें भ्रमच एक असतो, जेणेंकरून ते तेच तो तसतसा होऊन असतो (१९७)

माझें असतेपण – आहेपण हेंच लपून असो – जगाच्या दृष्टींतून लोपो – नांवरूप तसेंच हारविलेलें होवो व सर्व भूतजात हें मज न भिवो. (१९८)

अशी ज्याची बेंबीच्या देंठापासून इच्छा असते – जो नित्य एकान्तामध्यें आहे – एकांतानें प्रेमाचें होणें होत आहे व जो एकान्ताच्या नामेंकरूनच मुळीं जीवित धारण करून असतो. (१९९)

वायूबरोबर त्याचप्रमाणें आकाशाबरोबरही बोलणे आवडावें व झाडें हीं तर जीवप्राणासकट – जीवप्राण – जीवप्राणासारखींच त्यास पढियंती होऊन आहेत (२००)

बहुत काय पण अशीं अशीं लक्षणें ज्याचे ठायीं दिसतात त्याचे ठिकाणीं ज्ञानानें आपलें शेजघरच केलें आहे असें जाण. ज्ञानच तो होऊन आहे असेंच जाण. (२०१)

असें तें अमानित्व ह्या पुरुषामध्यें असलेलें तें अशा ह्या लक्षणावरून जाणावें. अदंभाची – लौकिकाचा ताठा नसण्याची – ओळखीची महत्वाची ती गोष्ट बोलूं – व्यवस्थिततेनें सागूं. (२०२)

ह्या ओळखीबद्दलचें जें काहीं बोलणें ते व्यवस्थितपणाचें असें गोड होऊन असावें असें करूं. अदंभित्व कसें म्हणशील तर लोभी जसा जीव गेला तरी आपले मनानें ठेविलेला ठेवा केव्हाहि सागावयाचा नाहीं तसें (२०३)

त्याचप्रमाणें प्राकसंकट जरी आले तरीही सुकृत हें अगानें का वाचेनें केव्हाही प्रकट करणारा नव्हे. (२०४)

पान्हा चोरणाऱ्या गाईस पान्हा आला असतां ती तो चोरते – पळविते किंवा हे अर्जुना, वेश्या आपलें वयोमान हें केव्हाही लपवूनच असते. (२०५)

धनवंत – धनसमृद्ध रानात भेटला असता आपण तो गरीबाहूनही गरीबपण मिरवितो – गरीब होतो किंवा जशी कुळवधू ही आपले अवयव झाकून असते त्याप्रमाणें (२०६)

किंवा शेतकऱ्यानें आपलें पेरलेलें ते तो केव्हाही पांघरुणानें झांकून टाकतो, त्याप्रमाणें दान किंवा पुण्य जें कांही निपजलें का उपजले असेल तें तो झाकून असतो (२०७)

नुसता वरवरचा डामडौल तो केव्हाही मिरवीत नाहीं – लोकांची खुशामत करीत नाहीं व आपल्या सत्कर्माची टिमकी तर तो केव्हाही मुळी वाजविणारा होतच नाहीं – स्वधर्मास नुसत्या बडबडीनें बाधून टाकीत नाही. (२०८)

परोपकार बोलत नाही – अभ्यासिलेले मिरवीत न'ही व प्रतिष्ठा मिळविण्यासाठी जें काही ज्ञान जोड-लेलें असेल ते तो विकीत नाही (२०९)

कृपण जसा एक एक पैसा अति काळजीपूर्वक खर्च करितो – साभाळून असतो त्याप्रमाणें जो ह्या शरीर भोगाकडे कसलाही उधळेपणाचा डाव येऊं देत नाहीं. एऱ्हवीं पाहिलें असतां ह्या धर्माविषयीं – धर्मकृत्या-कडे तो एवढें पुरे का तेवढें बहुत असें पाहाणारा केव्हाहि होत नाहीं. (२१०)

**घरीं दिसे सांकड। देहीचीहि आयती रोड।**
**परि दानी जया होड। सुरतरुसी ॥ २११ ॥**

**किंबहुना स्वधर्मीं थोर। अवसरी उदार।**
**आत्मचर्चे चतुर। येऱ्हवी वेडा ॥ २१२ ॥**

**केळिचे दळवाडे। हळू पोकळ आवडे।**
**परि फळोनिया गाढे। रसाळ जैसे ॥ २१३ ॥**

का मेघाचे आंग झिलु । दिसे वारेनि जैसे जाईल ।
परी वरुषती नवल । घनवटे ते ॥ २१४ ॥

तैसा जो पूर्णपणी । पाहाता घाती आयटी ।
येऱ्हवी तरी वाणी । तोचि ठाये ॥ २१५ ॥

हे असो या चिन्हाचा । नटनाट्य ठायी जयाच्या ।
जाण ज्ञान तयाच्या । हाता चढले ॥ २१६ ॥

पै गा अदंभपण । म्हणितले ते हे जाण ।
आता आईक खुण । अहिंसेची ॥ २१७ ॥

तरी अहिंसा बहुती– । परी बोलिली असे अवधारी ।
आपुलाल्या मतांतरी । निरुपिता ॥ २१८ ॥

परी ते ऐसी देखा । जैसा छेदूनि शाखा ।
मग तयाचिया बुडखा । कूप कीजे ॥ २१९ ॥

कां बाहु तोडुनि विकिजे । मग भुकेची पिंडा राखिजे ।
नाना देऊळे मोडुनि कीजे । पौवळी देखा ॥ २२० ॥

तैसी हिंसाची करुनि अहिंसा । निपविजे यज्ञ हा ऐसा ।
पै पूर्व मिमांसा । निर्णय केला ॥ २२१ ॥

जे अवृष्टीचेनि उपद्रवे । गादले विश्व आघवे ।
म्हणोनि पर्जन्येष्टि करावे । नाना याग ॥ २२२ ॥

तव तिये इष्टीच्या बुडी । पशुहिंसा रोकडी ।
मग अहिंसेची थडी । कैंची दिसे ॥ २२३ ॥

पेरिजे नुसधी हिंसा । तेथ उगवेल काई अहिंसा ।
परि नवल बापा धिंवसा । या याज्ञिकांचा ॥ २२४ ॥

आणि आयुर्वेदही आघवा । तो याचि मोहरा पांडवा ।
जो जीवा कारणें करावा । जीवघात ॥ २२५ ॥

नाना रोगें आहाळली । लोळते भूते देखिली ।
ते हिंसा निवारावया केली । चिकित्सा पै ॥ २२६ ॥

तंव ते चिकित्से पहिले । येका कंदा खाणविले ।
आणि येक उपडविले । समूळ सपत्री ॥ २२७ ॥

येके आड मोडावली । अजंगमाची खाली काढली ।
येके गर्भी उकडविली । पुष्पामाजी ॥ २२८ ॥

अजातशत्रु तरुवरां । सर्वांगीं देवविल्या शिरा ।
ऐसे जीव घेऊनि धनुर्धरा । कोरडे केले ॥ २२९ ॥

आणि जंगमाहि हात । लावुनि काढिले पित्त ।
मन राखिले सिणहत । आणीक जीव ॥ २३० ॥

**अहो वसती धवळारे । मोडोनि केले देव्हारे ।**
**नागवूनिया वेव्हारे । गवांदी घातली ॥ २३१ ॥**

**मस्तक पांघुरविले । तंव तळवटीं उघडे पडिले ।**
**घर मोडोनि केले । मांडव पुढे ॥ २३२ ॥**

**नाना पांघुरणें । जाळुनि जैसें तापणें ।**
**का जाले आंगधुणें । कुंजराचे ॥ २३३ ॥**

**ना तरी बैल विकुनी गोठा । पुसा लावुनि बांधिजे गाठा ।**
**इया करणी की चेष्टा । काई हांसो ॥ २३४ ॥**

**येकी धर्माचिया वाहाणी । गाळु आदरिले पाणी ।**
**तंव गाळितिया आहाळणी । जीव मेले ॥ २३५ ॥**

**येक न पचितीचि कणे । यिये हिंसेचे मेणे ।**
**तेथ कदर्थले प्राणे । तेचि हिंसा ॥ २३६ ॥**

साकड = गरीबी दैन्य आइती – आयती = देहाची ठेवण, देहयष्टि होड = पैज (२११) अवसरी = ऐनवेळेस, प्रसंगीं. चतुर = दक्ष, शहाणा, सारथि (२१२) दळवाडे = खुंट (२१३) झिल्ल = हलके. वरुषती – वर्षती. घनवटै = घनवट (२१४). पूर्णपणी – पूर्णपणी. आयटी धाती = इच्छा पूर्ण होते. वाणी = दैन्य लक्षणाचा स्वभाव ठाये – ठावो – ठाय (२१५) नटनाव्य – नटनाच = उत्कर्ष हाता – हातु. हाता चढले = अंगीं बाणलें (२१६) निरुपिली – निरुपिती – निरुपिता (२१८). छेदूनि – खोदूनिया. कूप – कुंप = कुंपण, आळे, कुवा (२१९) विकिजे – पचविजे. पिंडा – पीडा. पौवळी – पौळी. आवार देखा – देवा (२२०). निपविजे – निपजविजे. निर्णय – निर्णो (२२१). गादले – गादेल = उष्म्याचें झालें, पीडा पावलें (२२२). रोकडी – तंव रोकडी (२२३) घिवंसा = धारिष्ट (२२४). रोगे – रोगी. आहाळली – पोळली. लोळते भूते – लोळती भूते चिकित्सा = निदान, प्रतिकार (२२६) येका कंदा खाणविले – येकाचे कंद खणविले. समूळ – समूळी (२२७). मोडावली – मोडली. अजंगम = वृक्ष. खाली – खाल. काढिली – काढविली. गर्भी – गर्भिण. पुष्पामाजी – पुटामाजी (२२८). कोरडे = निःसत्व (२२९). केले – केली. नागवूनिया = ठकवून. वेव्हारे = व्यवहारांत, व्यापारांत. गवांदी – गवादी = अन्नछत्रें (२३१). कुंजराचे = हत्तीचे (२३३) पुसा – पुंस = पोपट. गाठा = पिंजरा. इये करणे = या करणीं (२३४). वाहाणी = वाहाती वाट, संप्रदायावर. आहाळणी = हळहळीनें, भ्रमांतच (२३५). पचितीचि – पचवितीचि कदर्थले प्राणे = कासाविस झाले (२३६)

घरीं पाहावें तो गरिबी. वर पाहावें तो मोडकें तोडकें लहानसें दैन्यच एक जसें. देहाची यष्टि, ठेवण पाहावी तों ती तर रोड जशी. पण दानप्रसंगीं पाहावें तर सुरतरूबरोबरही पैजच जशी एक करणारा. (२११)

तसेंच स्वधर्मामध्यें अति थोर असा प्रशस्तपणाचा – प्रसंगी किंवा ऐन वेळेस उदार – आत्मज्ञानाचे चर्चेसबंधीं अति शहाणा, दक्ष, चतुर सारथीच जसा एक. एरव्ही पाहिलें असता जसा का वेडाच एक (२१२)

केळीचे दळवाडे म्हणजे खुंट जसे हलके पोकळ असलेले पण फळास आल्यानें तर अति उत्तम अशी रसाळ फळें देणारे (२१३)

मेघाचें येणे पाहावें तो अगदी हलके जसें का वाऱ्याने सहजच विस्कळणारें पण त्याचा वर्षाव जेव्हा पाहावा तेव्हा तर त्याच्या घनतेबद्दल नवलच एक वाटणारें. (२१४)

त्याप्रमाणें जो पूर्णपणीं पाहाता – पुण्यपूर्णी पाहाला तर इच्छाच पूर्ण होते येरव्हीं तरी पण हा वाणीचा दरिद्रपणाचा का दैन्याचा ठावही पण तोच होय. (२१५)

हें असें असो पण असेंच हें जाण कीं अशा लक्षणाचा उदय का उत्कर्ष ज्याच्या अगीं असेल त्याच्या अंगीं ज्ञान बाणलें आहे – त्याच्या हातास ज्ञान आलें आहे (२१६)

तरी अदंभपण म्हटलेलें जें तें असें जाण आता अहिंसा म्हणजे काय तें सागतों – तेथीलची खूण ऐक (२१७)

अहिंसा ती बहुत प्रकारांनीं – परीपरींनीं बोलिली आहे व आपल्या मताप्रमाणें ती निरूपिली आहे. निरूपिता ती अनेक तऱ्हांनीं बोलिली गेली आहे. (२१८)

पण तें बोलणें कसें म्हणशील तर जसें का वृक्षाच्या खांद्या का शाखा छेदून किंवा खोडून मग त्याच्या बुडख्याला (त्याच्या वाढीस जोम यावा म्हणून) कुंपण घालावें तसें होय. (कुंपण = कूप, कुवा, विहीर). (२१९)

रूपांत फेरफार करून – कर्मयोगीच तो जसा सहन होईना म्हणून – किंवा बाहू एक तोडून विकावा, पिकवावा, रंधनक्रियेस घ्यावा व ह्या पिडास तर भुके किंवा भुकेले ठेवावें – तेथें उपाशीपणाची पीडा राखावी जसें का किंवा देउळें मोडून पौंवळी (देवाचें आवार, पौळी) करावी जशी (२२०)

त्याप्रमाणें हिंसा करून अहिंसा उपजविली, निपजली असा हा निर्णयच जसा षड्दर्शनापैकीं तत्त्वनिर्णय प्रकरणांत – पूर्वमीमांसेंत केला आहे कर्मकाडामध्यें यज्ञादि कर्मात हिंसा करून त्यापासून अहिंसेची अपेक्षा करावी – त्यापासून अहिंसेच्या फलाची अपेक्षा करितात (२२१)

पर्जन्यवृष्टि झाली नसता जी काहीं पीडा होते त्या पीडेमुळें सर्व विश्व गाजलें गेलें – गादलें आता अनेक यागादिक कर्में नच केलीं – पर्जन्येष्टि नच केली तर विश्व अधिकच गादेल म्हणून नाना याग पर्जन्येष्टि करावेत जसे [ महिना पूर्ण झाला म्हणजे प्रतिपदेस (पुरवणी नियम का) दर्शादि कर्म करावें लागतें जें त्यास इष्टि म्हणतात अग्निहोत्र, तप, सत्य, वेदरक्षण, आतिथ्य व वैश्वदेव हीं कर्में याना 'इष्ट' म्हणतात. इष्ट गोष्ट सिद्धीस जावी म्हणून केलेले प्रयत्न तसे पर्जन्येष्टि म्हणजे पर्जन्य पडावा म्हणून केलेला याग ] (२२२)

अशा ह्या इष्टेच्या तळी पाहावें तो पशुहिंसाच एक नगदतेची अशी तेथे अहिंसेची गोष्टच नाहीं – म्हणून अहिंसेचा तीर किंवा कड तेथे कोठून दिसणार बरें ? (२२३)

नुसती हिंसाच पेरली तर तेथे अहिंसा उगवेल काय ? पण ह्या याज्ञिकांचे धारिष्ट किंवा हिय्या नवल करण्यासारखा आहे, नव्हे काय ? (२२४)

आयुर्वेद म्हणजे वैद्यशास्त्र जें ते तर सर्वच्या सर्व याच गोष्टीस महत्त्व देऊन आहे कीं जीवरक्षणार्थ जीवच एक योजावा – जीवाकारणे जीवघात करावा का जमा का असाच उद्देश पुढें होऊन आहे. (२२५)

अनेक रोगानीं पोळलेलीं – रोगानें आहाळलेलीं अशी तडफडणारीं – लोळतीं भूतें पाहिलीं – जमिनीवर लोळत आहेत प्राणी अनेक रोगांनीं अशी ती हिंसाच एक पण हिंसा निवारणार्थ केलेली ती जशी का 'रोगाचा प्रतिकार' होय (२२६)

तेथे त्या प्रतिकाराचे अगोदरच मुळीं एकाचे कंद खणविले गेले, एकास समूळतेनें सपत्रींच उपडविलें गेलें (२२७)

एक तर मध्येंच मोडली – वृक्षाची साल काढविली. एक गर्भीच उकडविली गेली पुटावर पुटें दिल्यानें – वनस्पति गर्भभार दुसऱ्या वनस्पतीची किंवा रसांची पुटावर पुटे देण्यानें तेथें आतां गर्भीच म्हणजे अंतरा-तच मुळीं ती वनस्पति उकडू केली – आपला सर्व गुण बरोबर घेऊन आली असें आतां त्या पुटें देण्यानें केलें (२२८)

अजातशत्रु जे तरुवर त्याच्या सर्वांगीं शिरा दिल्या गेल्या. अगदीं याप्रमाणेंच जीव प्राणी घेऊन ते हे अर्जुना, नि:सत्व केले गेले. (२२९)

चर, अस्थिर, सजीव जे त्यांनाही हात लावून त्याचें पित्त काढलें व मग त्यामुळें आणीक जीव जे तेहीपण शिणतच ठेविले. (२३०)

अहो, वस्तीचीं धवळारें मोडून देव्हारे केले व व्यवहारांत ठकवून अन्नसत्रच घातलें. (२३१)

मस्त का मस्तक पाघुरविलें तो तळौतेपणामुळें, लहानपणामुळें उघडें पडलें. घरें मोडून पुढें मांडव घातले. (२३२)

अथवा पांघुरणें जाळून त्याच्या प्रकाशानें तापणें केलें, शेकणें केलें तें जसें का गजस्नानच एक तसें झालें. (२३३)

किंवा असेंच तें नव्हे काय कीं बैल विकून गोठा केला, पोपट घालवून देऊन पिंजरा केला अशा ह्या करणी म्हणाव्यात का काय म्हणावें तरी – असल्या ह्या चेष्टा तरी काय कसल्या, अशा ह्या चेष्टांना काय हंसावें !!! (२३४)

एकानीं धर्मसंप्रदायामुळें पाणी गाळणें मोठ्या आदरानें केलें तो काय त्या गाळितया भ्रमातच राहून हळहळीनें जीव मेले झाले (२३५)

दुसरे कोणी किवा कोणी एक ह्या हिंसेच्या भीतीमुळें शब्द करणे तो करीतच ना त्यामुळें प्राण हा कंजुष का अहितकारक झाला व आता ही जी दशा ती काय हिंसा नव्हे ? कोणी तर सूक्ष्म अंश जे ह्या धान्याचे ते पचविण्याचे – शिजविण्याचे, जवळ करण्याचे का – डोळे झाकण्याचे न करीतच ना नच राहिल्या कारणानें प्राण हा नीच नित्य नवेपणास पावण्याचे ऐवजी तो नित्य हलकेपण, उणीव, कुत्सितपण घेऊं लागला व ती हिंसाच होय (२३६)

हिंसाची अहिंसा। कर्मकांडी हा ऐसा।
सिद्धांतु सुमनसा। वोळखे तूं ॥ २३७ ॥

पहिलें अहिंसेचें नांव। आम्ही केले जंव।
तंव स्फुर्ति बांधली हांव। इये मती ॥ २३८ ॥

तरी कैसेनि इयेते गाळावे। म्हणोनि पडिले बोलावे।
तेवीचि तुवा हे जाणावे। ऐसा भाव ॥ २३९ ॥

बहुत करुनि कीरीटी। ह्याचि विषय इये गोष्टी।
येऱ्हवी का अव्हांटी। धाविजेल गा ? ॥ २४० ॥

आणि स्वमताचिया निर्धारा –। लागोनिया धनुर्धरा।
प्राप्ता मतांतरा। निवेचु कीजे ॥ २४१ ॥

ऐसी हे अवधारी। निरुपिती परी।
आता ययावरी मुख्य जे गा ॥ २४२ ॥

ते स्वमत बोलिजेल। अहिंसे रूप कीजेल।
जेणे उठलिया आंतुल। ज्ञान दिसे ॥ २४३ ॥

परि ते अधिष्ठिलेनि आंगे। जाणिजे आचरितेनि बगे।
जैसी कसवटी सांगे। वानियाते ॥ २४४ ॥

तैसे ज्ञानामनाचिये भेटी। सरिसेचि अहिंसेचें बिम्ब उठी।
तेचि ऐसे कीरीटी। परिस आता ॥ २४५ ॥

तरी तरंग नोलांडित। लहरी पाये न फोडित।
सांचलु न मोडित। पाणियाचा ॥ २४६ ॥

वेगे आणि लेसा। दिठी घालूनि अमीषा।
जळी बक जैसा। पाऊल सूये ॥ २४७ ॥

का कमळावरी भ्रमर। पाउल ठेवी अरुवार।
कुचंबेल केसर। यिया बुद्धि ॥ २४८ ॥

तैसे परिमाणु पांगुंतले। जाणोनि जीव सानुले।
कारुण्यामाजी पाऊले। लपोनि चाले ॥ २४९ ॥

ते वाट कृपेची करित। ते दिशाचि स्नेह भरित।
जिवातळीं आंथुरित। आपुला जीव ॥ २५० ॥

ऐसिया जतना। चालणे जया अर्जुना।
हे अनिर्वाच्य परिमाणा। पुरिजेना ॥ २५१ ॥

पै मोहाचेनि सांगडे। लासी पिले धरी तोंडे।
तेथ दाताचे आगरडे। लागती जैसे ॥ २५२ ॥

का स्नेहाळु माये। तान्हयाची वास पाहे।
तिये दिठी आहे। हळुवार जे ॥ २५३ ॥

नाना कमळदळे डोळे। विजिजती ढाळो ढाळे।
तो जेणे पाडे बुबुळे। वारा घेपे ॥ २५४ ॥

तैसेनि मार्दवे पाये। भूमीवरी न्यसितु जाये।
लागती तेथ होये। जना सुख ॥ २५५ ॥

ऐसिया लघिमा चालता। कृमी कीटक पंडुसुता।
देखे तरी माघौता। हळुचि निगे ॥ २५६ ॥

म्हणे पाये धडफडिल। तरी स्वामीची निद्रा मोडेल।
रचलेपणा पडेल। झोति हन ॥ २५७ ॥

इया काकुळती। वाहाणी घे माघौती।
कोण्हीहि व्यक्ति। न वचे वरी ॥ २५८ ॥

जियाचेनि नांवे। तृणातेहि नोलांडावे।
मग न लेखिता जावे। हे के गोष्टी ॥ २५९ ॥

मुंगिये मेरु नोलांडवे। मशका सिंधु न तरवे।
तैसें भेटलिया न करवे। अतिक्रम ॥ २६० ॥

ऐसी जयाची चाली। कृपा फळी फळा आली।
वाचियकी देखसी जियाली। दया वाचे ॥ २६१ ॥

**स्वयें श्वसणेचि तें सकुमार। मुख मोहाचें माहेर।**
**माधुर्या जाले अंकुर। दशन तैसें ॥ २६२ ॥**

स्फूर्ति बाधली हाव = बुद्धीनें इच्छा धरिली ( २३८ ). अव्हाटी = आडवाटी ( २४० ). निवेचु = निवाडा, निवाड, विचार निर्वेचु – निर्वच – निर्वचु ( २४१ ) जेणे – जिया ( जीव ) आतुल – आतील ( २४३ ) अघिष्ठिलेंनि = अर्गी बाणल्याने जाणिजे – आणिजे. वगे – वागे – वागे = मार्गानें, कृतीनें. वानियाते = कस, नंबर, वाण ( २४४ ) ज्ञाना – ज्ञान ( २४५ ). सांचलु – सांचले = शांतपण ( २४६ ). लेमा = हळूच अमीषा – आविसा – अमिषा कैसा = खाद्य जो मासा त्यावर ( २४७ ) पाउल ठेवी अरुवार = पाय ठेवी हळुवार ( अरुवार = सुंदर, कोमल, मृदु ) कुचंबेल = चुरडेल बुद्धि – शंका ( २४८ ). परिमाणु – परमाणु पागुतले – पागुंतले लपोनि – लपवुनि ( २४९ ). लासी = भाटी, माजरी. आगरडे – अगरडे = अग्रभाग, टोके ( २५२ ) हळुवार = मार्दव, कोमलत्व ( २५३ ) डोळे विजिजती ढाळो ढाळे – डोळ विजति ढाळे = वारा घेतांना. वारा घेपे = वारा वाहाण्याचें करितो ( २५४ ) न्यसितु – न्यसीत = ठेवीत. जना – जीवा ( २५५ ) लघिमा = हलकेपण, अगदी हलकेपणें – मृदुलत्वाने – कोमलत्वानें – स्नेहार्द्रतेनें मागौनि – मागुती – माघुती निगे – निघे ( २५६ ) पाये धडफडिल – पाय – पावो धडफडिल तरी स्वामीची निद्रा मोडेल रचलेपणा पडैल झोति हन = पाय आपटीत चाललो तर कृमीकीटकांच्या ठिकाणच्या नारायणाची जीवज्योत – झोत – विस्कटेल व शातिसुखास धक्का पोहोचेल ( २५७ ). वाहाणी घे माघौती = परत फिरतो. कोण्हीहि – कोणेही ( २५८ ). जियाचेनि – जिवाचेनि. नोलाडावे – नोलांडवे. मग न लेखिता जावे हे के गोष्टी = आपणच तेथे तो प्राणवायु पुरविण्याचें केलें जसें का ( २५९ ). तैसा – तैसें ( २६० ). फळी = फुली. देखसी – वान्यिकी देखिली ( २६१ ). सकुमार – सुकुमार. दशन – दांत ( २६२ ).

कर्मकाडामध्यें तर हिंसा जी तीच मुळीं अहिंसा म्हटली. असा हा सिद्धातच एक तो तूं ओळखून ऐस (२३७)

जेव्हा का आम्ही ह्या अहिंसेस नावाचें केलें तेव्हा बुद्धीनें इच्छा धरिली कीं ह्या मतमताचा गलबला तो आम्हास जाणण्याचे नको तर – आपल्या मतींनीं जी काहीं स्फूर्ति घेतली ती अहिंसेच्या कीर्तीची किंवा नावाची ती आम्ही ऐकावीच ऐकावी. (२३८)

ही गाळून शुद्ध कशी करावी – अगोदर ती गाळावी ती कशी म्हणूनच तर हें बोलणें घडत आहे तसें तुजलाही पण तें समजेल, जाणवेल असा भाव आम्ही घेऊन आहोंत. असें तें हें रूप हिंसेचें तें तूंही पण जाणावेंच जाणावें. (२३९)

हे अर्जुना, बहुतेक हाच एक विषय ह्या लोकींच्या गोष्टींना देऊं केला म्हणून तेथे बोलणें हें केव्हाही स्फूर्तिमंततेचें आहे. एरव्हीं पाहिलें असतां आडमार्गानेंच जाणें होत आहे – होतें ना? (२४०)

आपलें स्वतःचें मत हें निर्धारावर उभें करण्याचें तें तर ज्यांनीं म्हणून एक विशिष्ट मताप्रत येणें केलेले त्यावरूनही आम्ही निवड करून विचारास घेऊन निवाडा देण्याचें करणें करावें असें आहे. (२४१)

अशी ही निरूपिलेली परीपरीची – तऱ्हातऱ्हाची अथवा प्रकाराप्रकारावर उभी झालेली. तेव्हा आतां ह्यावर जी काहीं मुख्य – प्रामुख्येंकरून प्रख्यातीची अशी ती निवड. (२४२)

तें स्वमतच एक तें बोलूं ह्या अहिंसेस रूप करूं – तिला नांवारूपास आणूं – जेणेंकरून हा जीव जो ललचावलेला त्या नांवारूपास तेथें तो उभा झाला, उठला, जागा झाला, जागला व आतां ज्ञानामध्यें व त्यामध्यें उपमेचें कौशल्यच मुळीं आंत डोकवेना. तो जीव, तो जिया, ती उपमा, तें ज्ञान हें एकच होऊन आलें असे. तें ज्ञानच तो जीव, जिया, अहिंसा, आंबुल दिसूं लागलें, रूपास आलें (२४३)

तें आतां कसें जाणावें, तें आपणच स्वतः कसें व्हावें तें – अंगच्या अधिष्ठानानें – अंगी बाणण्यास (जाणतां येतें) आणावें व आचरावें व आचरतां आचरतां त्या मार्गानें – कृतीनें तें कसास येऊं लागून आपला कस हा उत्तमत्वाचा असेंच करितें. अगच्या अधिष्ठानास आणून आचरण्याच्या मार्गानें तें कसाचें तें बोलूं लागतें. (२४४)

अहिंसा ही तीन प्रकारची वर्णिली आहे. ती कायिक, वाचिक व मानसिक अशी तीन प्रकारची आहे. ह्यांतील कायिक जी ती पायानीं (पादेंद्रियसाध्या) साधणारी हातांनीं (हस्तेंद्रियसाध्या) साधणारी व डोळ्यांनीं (चक्षुरींद्रियसाध्या) साधणारी. ती कशी तें स्पष्ट करून सांगतों आगच्या अधिष्ठानास आणून मार्गाचे कृतीनें ती आचरावी. तेथें कसास येणें ह्याच तिचा रंग किंवा वाण होय.

तसें तें ज्ञान हें मनास भेटूं लागल्यानें, ज्ञानामनाची भेटी झाली न झाली तोच तें अहिंसेचें रूप रूपास येतें – बिंबास येतें – तेंच कसें होतें तें आतां सांगतो, परिसावें. (२४५)

पाण्याचे तरंग नच ओलांडितां – त्याच्या लहरी पायानें नच फोडितां जो साचलुपणा – शातपणा पाण्याचा तेथें वेगानें व नाजुकपणानें आविसावरच दृष्टि घालून, जसा बगळा पाण्यांत पाय टाकतो. (२४६-२४७)

किंवा भ्रमर हा कमळावर आपलें पाऊल अति हलुवारपणानें ठेवितो – कदाचित् फुलांतील केसर (पुं-केसर, स्त्री-केसर) हे कुचंबेल – चिरडेल ह्या शंकेनें – अशी बुद्धि घेऊन (२४८)

त्याप्रमाणें जसे का अतिसूक्ष्म परमाणूच ते पण आच्छादिलेले असे सानुले जीव जाणून घेऊल आपले पाय कारुण्यामध्येंच लपवून तो चालत असतो. (२४९)

ते पाय कसे म्हणावेत तर, ते जसे का कृपाच एक आथरलेली आहे – चहूं दिशांकडे – चहूं दिशास स्नेहमार्दव – आतबाहेर भरभरून आहे त्या जीवाच्या तळी आपलाच जीव जसा अथरीत आहे. (२५०)

अशा तऱ्हेचे ते पाय जे ते कृपेचें पोसणें का स्नेहाचें वत्सलपण आपलाच जीव जसा – असें तें कृपेचें जतन जीवाप्राणापेक्षाही जास्तपणें करून असणें तें – जीवजतनतेचें तें चालणें – जीव किंवा जिया सर्व जेथें ललचावलेला असा त्या प्रेमाकरितां – तेथें चालणें हें अर्जुना ज्यास – तें हें असें मुळी बोलण्यासच येत नाहीं – तें अनिर्वाच्य असें होय. तेथें कसलें परिमाण का प्रमाण हें पुरते होत नाहीं (२५१)

अहो ! मोहममतेच्या ते संगतीनें (जोडीनें – साग गडे जसें बुद्धीसच एक प्रश्न करणें ते प्रेमानें) भाटीनें का लासीनें आपले पिलें तोंडानें धरिलें तेथें दाताचे अग्रभाग किंवा टोकें हीं कशीं बरें लागत असतील – झाकलीं होऊन असतील – अति मऊपणाची तीं – तसें (२५२)

आईचा कळवळा, प्रेम, स्नेहवात्सल्य तें आपल्या तान्हुल्याची वास पाहाणारें तें कसें बरें असतें. त्याप्रकारची दृष्टि – दिठीमध्यें आहे जी स्नेहार्द्रता, कोमलत्व, हलुवारपणा तसें ते होय. (२५३)

अथवा कमळाची दळें अथवा पत्रे हीं हळूहळू हलणारी—मंदमंद वायूमुळें तीं दळें – पानें कमळाची हलणारीं जशीं तितक्या सौम्यपणानें – तितक्याहीपेक्षा मधुरपणानें, अति सौम्यपणानें हीं बुबुळें वारा घेणारीं होतात.

सर्व आंग – सर्व डोळाच मुळी प्रेमानें जिकला तेथे ह्या बुबुळानीं वारा घेणें होत असलेलें – कमळाच्या पाकळ्या डोलविल्या जाणाऱ्या त्या अति सौम्य अशा मंदमंद वायूनें तसें अंगीं देवाचें वारें आलें असें जें कांहीं म्हणणें तेथे किंवा "देहावरील वारा स्वाधीनतेचा जसा – अगदीं प्राणाबरोबर तोलून धरावा तसा श्रीविठ्ठल हा क्षणभरसुद्धा विसंबू नये"

[ "चातकाचें जीवन घनु । तरि तो स्वयें एकाधिनु । आला वेळ भुलावणु । जैसा नलिनीसि नाहीं भानू ॥ १ ॥ चंद्रासवें चकोरे मिळोनिया पूर्णिमेसी विरोध माडिला । तो योगु दुर्मिळ म्हणोनि तो प्रसंगु विपाईला वेळा रया ॥ २ ॥ तैसे माणुसपण सहज तनुवरि देवाचा वारा स्वाधिनु । तैसा बापरखुमादेवीवरु विठ्ठलु न विसबावा एकु क्षणु ॥ ३ ॥"

एक गोपी आपले मैत्रिणीस सांगते – चातकाचें जीवन मेघ हे आहेत खरे त्या चातकाला मेघप्राप्तीचा प्रसंग एकादेवेळींच यावयाचा. त्याचप्रमाणें नलिनीस म्हणजे सूर्यविकासी कमलिनीस सर्वकाळ सूर्याची प्राप्ति नाहीं – चकोराना चंद्राशीं ऐक्यप्राप्तीस फक्त पौर्णिमाच बाकीच्या वेळीं चंद्रप्राप्तिविरोध म्हणजे वियोगच असतो चातकाला मेघाचा योग, कमलिनीला सूर्यप्राप्तीचा योग, चकोराला चंद्रप्राप्तीचा योग प्राप्त होणें फार चागलें आहे खरें, पण तसा योग क्वचितच येतो

त्याचप्रमाणें मनुष्यशरीराच्या प्राप्तीचा योग फार दुर्लभ – ज्यावेळीं पुण्यपापाची समानता होईल त्यावेळींच हा योग प्राप्त होतो म्हणून दुर्लभ आहे – असा दुर्लभ मनुष्यजन्म अवचित प्राप्त झाला आहे म्हणून अशावेळीं रखुमादेवीचा वर जो श्रीहरि पाडुरंग, त्याचे चिंतन क्षणभर सुद्धा विसरू नको. (ज्ञा गा देवाची आळंदी, पुणें.) ] (२५४)

तितक्या मृदुलपणानें भूमीवर पाय न्यसीत जातो जो – तेथें ह्या जीवाना – ह्या जगाला – ते पाय जर लागले तर ते अति सुख देणारे होत (२५५)

अशा तऱ्हेच्या लघिमेवर चालत असलेला तो – त्यानें जर काहीं कृमिकीटक पाहिले तर तो हळूच मागेंच परततो – हळूच माघारी निघतो (२५६)

असें म्हणूं लागतो कीं पाय आपटीत जर चाललें तर पाय लागून एकादा प्राणी धडपडेल तर स्वामीची निद्रा मोडेल – कृमिकीटकाच्या ठिकाणची नारायणाची जीवज्योत – ज्ञोत हन विस्कटेल व शातिसुखास धक्का पोहोचेल – रचनेला ज्ञोतच एक पडेल म्हणून अगदी हलकेपणानें चालत असलेला, तेथे चालणें तें कोमल-पणाचे, मृदुलत्वाचे तसेंच स्नेहार्द्रतेचें होय (२५७)

अशा तऱ्हेचें काकुलतीपण तेथें असल्यानें तेथें जी कांहीं पाठीवर वाहून चालण्याची वृत्ति परत मुरडून घेऊन परत फिरतो व कोणत्याही व्यक्तीवर तसें ते ओझे न घालता तो मुळी तेथें हातच घालीत नाहीं – सहजपणें त्यातून परततो (२५८)

अशी व्यक्ति जेव्हां का भेटणारी होते तेव्हा अहो ! जीवदशेची गोष्ट पुढें घेतली असतां जो तृणासही पण—आपणानेंच तो तेथे प्राणवायू पुरविण्याचे केलें जसें का तेथें तो तर प्राणच एक पुरवून असणारा. जीव का जिया हा ह्या जीवितदशेस ललचावलेला असा – जीव हा लाचावलेला तो ह्या जीवनप्रेमाची गोष्ट आपण त्याशीं बोलावीच असा स्वाभाविक ध्येय, एक हेतु घेऊन असलेला (२५९)

मुंगीस मेरु ओलांडितां येणार नाहीं – मशक ते काय सिंधु तरेल असें जेथें दीनपण का दुबळेपण तेथें जें काही एक क्रमणें व्हावें अशी गोष्ट जर भेटली तर तो तेथें ती पुरती करून घेतो – कटकटा होतो. तेथील महत्त्व ऐक्यतेस पोहोंचतें होतें जसे देव मोडून देऊळ करणें तसें येथें न करितां ज्याची त्यास ती योग्यता पोहोचती केलेली होते. (२६०)

अशी ज्याची चाल – रीत – कृपेचें चालणें तें म्हणजे कृपाच ती मूर्त होऊन नेहमीं फुललेली अशी आतां फळास आली अशी असून ती वाच्य केली असता मूर्तिमंत दयाच एक ह्या याचे मध्यें अवतरली, जियालेपणास आली असें होय. (२६१)

स्वयंसिद्धतेचे ते, स्वतःनें आपुलपणानें जें तेथे होणारें श्वसणें प्रक्रियत्व तें अति सुकुमारपणाचें असें मुखच ते ममताच आपल्या माहेरास आलेली असें अतिशय नाजुकपणाचें तें जसें मोहममतेचें माहेरघरच होय. तेथें ते दशन पाहावेत तो मधुररसाचें जें माधुर्य तेंच जसें उगवलेले अंकुर घेऊन आलेलें असे. (२६२)

**पुढां स्नेह पाझरे। मागा चालती अक्षरें।**
**शब्द पाठीं अवतरे। कृपा आधीं ॥ २६३ ॥**

**तंव बोलणेंचि नाहीं। आणि बोलो म्हणे जरी कांहीं।**
**तरि बोलुं कोण्हाहि। खुपैल कां ॥ २६४ ॥**

**बोलतां अधिकुहि निघे। तरि कोण्हाहि वर्मी न लागे।**
**आणि कोण्हासिहि न रिघे। शंका मनीं ॥ २६५ ॥**

**मांडली गोठी हन मोडेल। वासिपेल कोण्ही उडेल।**
**आईकोनि वोवांडिल। कोण्हि जरी ॥ २६६ ॥**

**तरी दुआळी कोण्हासी न व्हावी। भवंई कोण्हासी नुचलावी।**
**ऐसा भावो जीवीं। म्हणोनि उगा ॥ २६७ ॥**

**मग प्रार्थिला विपायें। जरि लोभें बोलो जाये।**
**तरि परिसतया होये। मायबाप ॥ २६८ ॥**

**कां नादब्रह्म मुसे आलें। कीं गंगापय असळलें।**
**पतिव्रते आलें। वार्धक्य जैसें ॥ २६९ ॥**

**ऐसें सत्य आणि मवाळ। मितलें आणि रसाळ।**
**बोल जैसे कल्लोळ। अमृताचे ॥ २७० ॥**

**विरोध वादाळ। प्राण ताप ढाळ।**
**उपहास छळ। वर्म स्पर्श ॥ २७१ ॥**

**आटुवेटु विंदाण। आशा शंका प्रतारण।**
**हे सन्यासिले अवगुण। जया वाचा ॥ २७२ ॥**

**आणि तयाचि परी कीरीटी। प्रांजळ जयाची दिठी।**
**तत्पता सांडिलिया भ्रुकुटी। मोकळिया ॥ २७३ ॥**

**का जे भूतवस्तु आहे। तियें रुपो शके विपायें।**
**म्हणौनि वास न पाहे। बहुत करुनी ॥ २७४ ॥**

**ऐसाहि कोण्हे येके वेळे। आंतुलें कृपेचेनि बळें।**
**उघडोनिया डोळे। दिठी घाली ॥ २७५ ॥**

**तरि चंद्रबिंबीहूनि धारा। सुटतां नव्हती गोचरा।**
**परी येकसरी चकोरा। निघती दोंदें ॥ २७६ ॥**

**तैसें प्राणियासि होये। जरी तो वास पाहे।**
**तया अवलोकनाची सोये। कुर्मीही नेणे ॥ २७७ ॥**

**किंबहुना ऐसी। दिठी जयाची भूतासी।**
**करही देखसी। तैसेचि जे ॥ २७८ ॥**

तरी होऊनिया कृतार्थ। राहिले सिद्धांचे मनोरथ।
तैसे जयाचे हात। निर्व्यापार ॥ २७९ ॥

अक्षमे आणि संन्यसिले। का निरंधन आणि विसाळे।
मुकेनें घेरलें। मौन्य जैसे ॥ २८० ॥

तयापरी काही। तया करा करणे नाही।
जे अकर्तव्याच्या ठायी। बैसो येती ॥ २८१ ॥

आसुडेल वारा। नख लागेल अबरा।
इया बुद्धि करा। चेवो नेदी ॥ २८२ ॥

तेथ आंगावरील उडवावी। कां डोळा रिघती झाडावी।
पशुपक्ष्या दावावी। त्रास मुद्रा ॥ २८३ ॥

इया केऊत्या गोष्टी। नावडे दंड का सोटी।
मग शस्त्राचे कीरीटी। बोलणे के ॥ २८४ ॥

लीला कमळे खेळणे। का पुष्पमाळा झेलणे।
न करी म्हणे गोफणे। ऐसे होईल ॥ २८५ ॥

हालवती रोमावळी। यालागी अंग न कुरवाळी।
नखाची गुंडाळी। बोटावरी ॥ २८६ ॥

तव करणयाचाचि अभाव। परि करणे असाहि पडे ठाव।
तरि हाता हाचि सराव। जे जोडिजति ॥ २८७ ॥

का 'नाभिकारा' उचलिजे। हात पडले देईजे।
आर्ताते स्पर्शिजे। अळुमाळ ॥ २८८ ॥

मागा – माघा शब्दा – शब्द – बोल (शब्दाशब्द – शब्दशब्दा – बोल – शब्दा – शब्द) शब्दशब्दा-पाठीं अवतरे ( २६३ ). कोण्हाहि – कोणाही. खुपैल – खुपेल ( २६४ ) अधिकुहि – अधीकही कोण्हाहि – कोणाच्चिया लागे – लगे (२६५). माडली – माडिली = चालू. गोठि – गोठी मोडैल – मोडेल. वासिपैल – वासिपेल कोण्ही उडेल = कोणी भय पाऊन दचकेल. वोवाडिल = परतेल, उलटेल (२६६). दुआळी–दुवाळी = क्लेश. न व्हावी – नोहावी (२६७) परिसतया – परिसत्या – ऐकतया – ऐकत्या. मायबाप – मायबापु (२६८) की – का. नादब्रह्म – नादब्रह्मचि. असळले – उसळलें, आकारास आलें, शुद्ध झालें ( २६९ ) ऐसे – तैसे सत्य – सांच मवाळ = मृदु मितले = परिमित, थोडे बोल = शब्द (२७०) विरोध वादाळ – विरोध वाद बळ = विरोधवादाला बळ देणारे प्राण ताप ढाळ – प्राणि ताप ढाळ = प्राण्याच्या अतरंगाला वेदना देणारें वर्तन ( प्राण – प्राणी प्राणी प्राण ) उपहास = थट्टा किंवा फजिती. छळ = कावा, कपट, सोग. वर्म = छिद्र ( वर्मन् = चिलखत . क्षत्रियाच्या नावापुढे जोडण्याचा शब्द ) स्पर्श = हेरणे. वर्मस्पर्श = छिद्राशी संपर्क करणारे जे, प्राण्याच्या अंतरंगाला वेदना देणारे जे ( २७१ ) आटुवेटु – वेगु – विदाण = अटीतटीचे, हटातटाचें भाषण. आवेशाचे तें का खोचदार कोटिक्रमाचें बोलणें. आशा शंका प्र-करण – प्रतारण = ठकबाजीचे बोलणें. सन्यासिले = टाकिले आहेत ( २७२ ). प्राजळ – थाऊ = ठाव, तळ तत्पता साडिलिया = कपाळाला आठ्या नाहींत अशा ( २७३ ). भूत (वस्तु) – भूती (वस्तु) रूपो शके = रुतणें शक्य असे. वास न पाहे = सहसा कोणाकडे पाहात नाहीं – त्या भूतवस्तूला – ब्रह्माला कदाचित् त्रास होईल म्हणून ( २७४ ).

आंतुले – भींतरले = आंतल्या. उघडोनिया – उघडोनि. दिठी – दृष्टि (२७५). बिंबीहूनि – बिंबौनि. सुटतां– निघतां. गोचरा = स्पष्ट दिसत नाहींत येकसरी – येकसरे (२७६). वास – कही वास – कांहीं वास (२७७). जे – ते ( २७८ ). राहिले – राखिले ( २७९ ). अक्षमे – अक्षम. निरंधन – निरिंधन विसाळे – विशाळे. मुकेनें – मुकेनि. मौन्य – मौन ( २८० ). तियापरी – तयापरी. करा – कारा अकर्तयाच्या – अकर्तव्याच्या ( २८१ ). आसुडै – हालेल, धक्का बसेल. चेवो – चळो ( २८२ ). वरील – वरिली रिघती – रिगते. त्रासमुद्रा – भय ( २८३ ) केऊत्या गोष्टी – केउतिया गोठी दंड का सोटी – दंड काठी ( २८४ ) हालवती – हालवतील गुंडाळी = लाव वाढलेली (नखें) (२८६) करण – करणें परिकरणे ऐसा – परि ऐसा ठाव – प्रस्ताव = प्रसंग (२८७) नाभिकारा = अभय देण्यास पडले – पडिलिया हात पडले देईजे – हात पडिलिया देईजे = पडलेल्यास सांवरण्यास हात देणें करावें. आर्ताते – ना तरी आर्ताते ( २८८ ).

प्रेम हेंच अगोदर पाझरूं लागतें – मागें अक्षरें हीं चालूं लागणारीं व शब्द मागोमाग किंवा नंतर येणारे होऊन असलेले अशी कृपा हीच तेथें एक (२६३)

स्नेह आर्द्रतेस आला अगोदर, नंतर अक्षरें हीं उमटण्याचीं झालीं व नंतर मागोमाग बोलणें होऊं लागले पण कृपा ही अगोदर प्रादुर्भावाची होऊन आहे प्रेमामागून अक्षरें आलीं व त्याचें रूपांतर बोलामध्यें झालें पण कृपादृष्टीचें अवलोकन हेंच अगोदर तेथें. आता बोलणेंच मुळीं कांहीं नाहीं व जर कांहीं बोलूं म्हणावें तो तेथे कदाचित् कोणास तो बोल खुपेल किंवा काय असेंच मनाचें अपूर्व स्नेहाचें असणें. (२६४)

बोलतां बोलतां अधिक कांहीं जर तोंडून निघालें तर तें कुण्याच्याहि वर्मी नच लागणारें असेंच होय. कोणाच्याहि मनांत त्या बोलण्याविषयी – स्नेहाबद्दलची – शंकाच मुळीं मनात नच येणारी. (२६५)

चालू असलेली गोष्ट ही नाहींशी होईल कोणी भय पावेल, किंवा दचकून परतेल, उडेल किंवा ती गोष्ट ऐकून कोणी उलटेल कदाचित् (२६६)

तरी दुआळी, दुवाआळी, म्हणजे क्लेश कोणासही होऊं नयेत – कुणावरही भुंवई ही उचलिली न व्हावी असा भाव जीवाभावानें असल्यामुळें तेथें तो उगाच राहातो. (२६७)

यावर जर कदाचित् तो लोभामुळें बोलूं लागला तर ऐकणाऱ्याना जसा का मायबापच एक असा होऊन आलेला होय (२६८)

नादब्रह्म आकारास आलें – शुद्ध गंगेचे पाणी जसें आशेस आलें का पतिव्रतेस जसें का वार्धक्य आलें आहे. (२६९)

असें सत्य आणि अतिशुद्ध असें मृदु ते बोलणें, परिमित व थोडकेच पण अति रसाळ असे तेथील ते बोल बोलणें हे अमृताच्या लाटाच होत – तरंगच ते होत (२७०)

विरोध वादास बळ देणारे का प्राण्याच्या अंतरंगाला वेदना देणारे किंवा उपहास, छळ, वर्मस्पर्श करणे जें तें (इत्यादि जें कांहीं – तसेंच अटीतटीचें भाषण का आवेशाचें असें तें खोचदार कोटिक्रमाचें बोलणें असें हें ) अवगुण पार टाकिलेले असे ज्या बोलण्यात आहे. (२७१–२७२)

त्याचप्रमाणें हे अर्जुना, ज्याची दृष्टि अगदी प्रांजळ प्रामाणिकतेची अशी जेथें रागाचें नावच नसल्यामुळें ह्या भुंवयांनीं आपली मोकळेपणाची अशी सरळ मनाच्या मोठेपणाची कमालच होय. (२७३)

भूतमात्रीं ( जे ) वस्तु आहे तिला कदाचित् तें बोलणें रुतेल, त्या वस्तूला, ब्रह्माला त्रास होईल म्हणून सहसा कोणाकडे तो पाहातच नाहीं. (२७४)

असा तो कोणा एखादे वेळेस भीतरच्या कृपाबळेंकरून डोळे उघडून पाहूं लागला (२७५)

तर जशा का चंद्रबिंबाहून अमृताच्या धारा सुटत असताना मुळींच गोचर होत नाहींत, दिसत नाहींत, पण चकोर जे त्यांना तर दोंदे निघणारी होतात (२७६)

तसें प्राण्याला होऊन जाते—जर त्यानें काहीं कोणाची वास पाहिली तर—पण तसल्या त्या पाहाण्याची सोय, तेथीलच्या प्रेमाची कल्पना, किंमत कूर्मीस म्हणजे कांसवीसही नच होणारी अशी. (२७७)

अथवा अशी ती भूतमात्रीं ज्याची दृष्टि आहे असा तो होय. त्याचे हात तेही पण तसेच होत. (२७८)

ते कसे म्हणावेत तर सिद्धाचे मनोरथ हे कृतार्थ होऊन राहिले असे—मनोरथ हे पाळले आहेत असेच ते तेथीलचे कर अगदी निर्व्यापार होत. (२७९)

(ते कसे म्हणावेत तर) जसे का वाचेनें जो मुका आहे त्यानेच मुळी मौन घेतलें ते—तेथें इंधन नाहीं व विझालेपणच तेथें कामाचें (तेथें कामाचें बळ हें जसें टाकलेले ते, ते अशक्तपणाचें, उतावळेपणाचें किंवा क्षमाहीनतेचे असेंच जे मुळी तें तेथे नाही) (२८०)

त्याप्रमाणे त्या करांना काहीं करणेंच नाही असें जे अकर्त—याच्या ठिकाणीं वसूं येणारें, वसणारे ते हात होत. (२८१)

वारा कदाचित् हालेल, त्यास धक्का बसेल, अबर जें—आकाश का वस्त्र—त्यास कदाचित् नख लागेल असें समजून—अशा बुद्धीनें ते मुळी चळलेले नच—चेवास आलेले होतच नाहीत असे (२८२)

अगावर असलेलीं तीं उडवावीत का डोळ्यामध्यें शिरणारी तीं झाडावीत किंवा पशुपक्ष्याना एक त्रास-मुद्रा दाखवावी असें त्याच्यानें होत नाही (२८३)

अशा ह्या गोष्टी तरी कसच्या! अहो जेथे दंड किंवा मोटा का काठीचे नावच नाही तेथें शस्त्राची गोष्ट ती कशास तर (२८४)

लीलेचे खेळ ते जसे का कमळच एक हातात घेऊन गरगर फिरविणे किवा फुलाच्या माळा ह्या लीलेने उडवाव्यात व झेलाव्यात असें जें काही सहज लीलेचे ते खेळणें तो तसलेही पण करीत नाही, कारण न जाणो कदाचित् ते खेळणें (जसें का) गोफणगुंडा होऊन एकाद्यास लागेल. (२८५)

पोटावरील रोमावळी हालविली होईल म्हणून तो आपले अगच मुळी कुरवाळण्याचें करीत नाही व नखें न काढताच तीं नखावरच नखाची गुंडाळी अशी ती नखे गुंडाळिलीं झालेलीं बोटावर होतात (२८६)

अशा प्रकारें त्या कार्याचा केवळ अभाव त्या पुरुषाच्या बाबतींत असतो. पण असें असूनही कदाचित् वर्तण्याचा प्रसंग आलाच तर ते पुढील प्रमाणें वागण्याची आपल्या हाताना सवय करून असतात—लावतात

(हस्तदेवता, हातभार, हातातळीं, ही सर्व स्वतःचे महिमान घेऊन सर्व देव पदवीची झाली तेथें जोडणें म्हणजे कुशल क्षेत्र, समाधानाचें, तें बोधाचें लेणे तेथें सर्व कृपाही आपल्या लावण्यास आली सर्व कल्याणच करणारे असे ते हात होत) (२८७)

अहो, पडलेल्यास सावरण्याकरिता हात देणें तसेंच अभय देण्यास तें उचलिलें किंवा थोडेंबहुत या आर्तांना ससारत्रस्ताना स्पर्श करण्यास ते दिले होतात असे. (एकाद्याला अभय देण्याकरिता त्यानी वर व्हावें—जो पडला असेल त्याला आधार देण्यास पुढें व्हावें—जो दुःखी असेल त्याला अति प्रेमळपणानें गोंजारावें) (२८८)

**हेही उपरोधे करणे। तरी अतिभय हारणें।**<br>
**नेणती चंद्रकिरणे। जिव्हाळा तो ॥ २८९ ॥**

**पाहोनिया स्पर्शु। मलयानिळ खरपुसु।**<br>
**तेणे माने पशु। कुरवाळणे ॥ २९० ॥**

जे सदाचि ते मोकळे । जैसी चंदनांगे शीतळे ।
न फळताहि निःफळे । होतीचिना ॥ २९१ ॥

आता असो हे वाग्जाळ । जाणे ते करतळ ।
सज्जनाचे शीळ । स्वभाव जैसे ॥ २९२ ॥

आता मन तयाचे । सांगो म्हणो जरी सांचे ।
तरी सांगितले कोणाचे । विलास हे ॥ २९३ ॥

काई शाखा नव्हे तरु । जळेविण असे सागरू ।
तेज आणि तेजाकारु । आन काई ॥ २९४ ॥

अवेव आणि शरीर । हे वेगळाले काय कीर ।
की रस आणि नीर । सिनी आथी ॥ २९५ ॥

म्हणोनि जे हे सर्व । सांगितले बाह्य भाव ।
ते मनचि गा सावेव । ऐसे जाण ॥ २९६ ॥

जे बी भोई खोविले । तेचि वरी रूख जाले ।
तैसे इंद्रियद्वारीं फांकले । ते अंतरचि ॥ २९७ ॥

पै मानसीच्चि जरी । अहिंसेची अवसरि ।
तरी कैची बाहेरि । वोसंडेल ॥ २९८ ॥

आवडे ते वृत्ति कीरीटी । आदी मनौनि उठी ।
मग ते वाचेचिये दृष्टी । करासि ये ॥ २९९ ॥

वाचूंनि मनीच्चि नाही । ते वाचेसी उमटेल काई ।
बीजेविण भुई । अकुर जसे ॥ ३०० ॥

उगमीचि वाळोनि जाये । ते ओघी कैचे वाहे ।
जीऊ गेलिया आहे । चेष्टा देही ? ॥ ३०१ ॥

म्हणौनि मनपण मोडे । ते इंद्रिया आधीचि उबडे ।
सूत्रधारेविण साईखेडे । वावो जैसे ॥ ३०२ ॥

तैसे मन हे पांडवा । मूळ यया इंद्रियां भावा ।
हेचि राहाटे आघवा । द्वारी यिही ॥ ३०३ ॥

परी जिये वेळी जैसे । जे होऊनि आंतु असे ।
बाहेरी ये तैसे । व्यापार रूपे ॥ ३०४ ॥

यालागी सांचोकारे । मनीं अहिंसा थारे ।
जैसी पिकली हती आदरे । बोभाती निगे ॥ ३०५ ॥

म्हणोनि इंद्रियें तेचि संपदा । वेंचिताहि उदावादा ।
अहिंसेचा धांदा । करिते आहाती ॥ ३०६ ॥

समुद्रीं दाटी भरितें । तैं भरितें भरी तरियांतें ।
तैसे स्वसंपत्ति चित्तें । इंद्रिया केले ॥ ३०७ ॥

**हे बुद्धि असो पंडितु। धरुनिया बाळाचा हातु।**
**वोळी लिही सुयुकु। आपणचि ॥ ३०८ ॥**

**तैसे दयालुत्व आपुलें। मनें हातापाया आणिलें।**
**मग तेथ उपजविले। अहिंसेतें ॥ ३०९ ॥**

**या कारणें कीरीटी। इंद्रियाचियां गोष्टी।**
**मनाचिये राहाटी। रूप केलें ॥ ३१० ॥**

**ऐसें मनें देहें वाचा। सर्व सन्यासु दंडाचा।**
**जाला ठाईं जयाचा। देखसिल ॥ ३११ ॥**

**तो जाण वेल्हाळ। ज्ञानाचें वेलाउळ।**
**हें असो निखळ। ज्ञानचि तो ॥ ३१२ ॥**

**जे अहिंसा कानीं ऐकिजे। ग्रंथाधारीं निरोपिजे।**
**ते पाहावी हे जैं उपजे। तै तोचि पहावा ॥ ३१३ ॥**

**ऐसें म्हणितलें देवें। ते बोल एके सांगावे।**
**परि फांकला हें उपसाहावें। तुम्ही मज ॥ ३१४ ॥**

उपरोधे=नाइलाज म्हणून, मिनतवारीनें (२८९) पाहोनिया–पावोनि तो खरपुसु=तीव्र, कठीण. तेणे–येणे (२९०). जे सदाचि ते–जे सदा रिते शीतळे–निसळे=शीतल. निःफळे=निफळे (२९१). सिल–शीळ–शील (२९२). सांचे–जरी साचे (२९३) तेजाकारू=सूर्य (२९४) अवेव–अवयव. सिनी–सिना–सिनानी–सीने=भिन्नभिन्न (२९५). म्हणुनि–म्हणोनि जे हे–हे जे सावेव=सावयव. जाण–जाणे (२९६) जे बी भोई–जे भुईबीज. रूख–तरु इंद्रियद्वारीं–इंद्रियद्वारा अतरची–तें अतरचि कीं (२९७). अवसरी=तुटवडा, प्रसंगास येणें, उणेंपण, तोटा, अकुंचन वोसंडेल–वोसंडेल (२९८). आवडे=जाण. आदि–आधी. वाचेचिये–तेवाचे (२९९). उबडे=रिकामें, निर्बल, निःशक्त, उपडें. साईखेडे=कळसूत्री बाहुलें (३०२) जिये वेळी–जये वेळे बाहिर–बाहेरी (३०४) थावे थोरे= थोर होऊन–महत्त्वास येऊन स्थिर होतें. द्रुति–दृती=सुगध, मकरंद बोभाति–बोबात–बोभात–निगे =बोभाटा करीत पसरते (३०५). उदावादा=पूर्णपणें धादा=धंदा (३०६) दाटी–दाटे. भरिते–समुद्रचि. तरियाते–तरियंते=खाड्याना (३०७) बुद्धि–बहु वोळी–वोळ सुयुकु–व्यक्तु सुयुक्तु–व्यक्तु–सुव्यक्त (३०८) दंडाचा=हिंसेचा (३११) वेलाउळ=घर निखळ–निखिल (३१२). कानीं–काने ग्रंथाधारीं–ग्रंथाधारें. उपजे–ऐसे जें उपजे (३१३) बोले–बोल. फाकला–फाकल (३१४).

हेंही नाईलाज म्हणून करावयाचें आग्रहास्तवच एक करावयाचें. परंतु दुःखिताचें भय हरण करण्यांत त्याचा जो शीतळपणाचा जिव्हाळा अनुभवास येतो तो चंद्रकिरणांतही आढळत नाहीं (२८९)

ते हात पशूलाही अशा प्रेमाने कुरवाळतात कीं त्याचा स्पर्श म्हणजे जणूं काय तो सुगंध शीतळ मलयवायूचाच स्पर्श ते हात नेहमीच निर्लेप व मोकळे असतात आणि चंदनाच्या शीतळ फांद्यांप्रमाणें फळ न येतांही ते कधीं निष्फळ होत नाहींत कारण त्यांचा शीतळपणा–प्रेमळपणा हा बहुमोलाचा अक्षय्य व सर्वव्यापी असतो. (२९०–२९१)

असा हा शब्दविस्तार पुरे झाला. हे अर्जुना, इतकें समजून ऐक कीं त्याचा तळहात साधुसंतांच्या शुद्धशीतल शीलाप्रमाणें असतो. (२९२)

शाखा तो वृक्ष नव्हे काय ! काय सागर हा पाण्याशिवाय असूं शकेल ! अहो, तेज आणि तेजाकार, तेजस्वी पदार्थ (प्रकाश आणि सूर्य) एकच ना ! (प्रकाश व सूर्य हीं काय दोन आहेत !) (२९४)

अवयव आणि शरीर ही काय वेगळालीं असतात ? अथवा रस आणि पाणी (नीर) हें काय भिन्न असूं शकतें ? हीं कधींही वेगळी, निराळीं का भिन्न राहूं शकत नाहींत – जेथें शरीर तेथें अवयव असावयाचे किंवा शरीर म्हणजे अवयवच तो का अवयवाचें तें रस हा पाण्याशिवाय केव्हांही नसतो – तेथें रस तो पाणीच होय. तेथें निराळेपणानें तें केव्हांही असूं शकत नाहीं (द्रवपणा हा उदकाशिवाय असूं शकत नाहीं – म्हणून रस तें पाणीच होय ) (२९५)

परंतु हे जे सर्व बाह्यभाव सांगितले तें सावयव मनच जाण. (२९६)

बी भुयींत खोंविलें तेंच वर वृक्ष का रुख होऊन आलें – तसें इंद्रियद्वारांनीं फाकलेलें (उत्तेजित झालेलें) तें अंतरच (अंत·करणच) नव्हे काय ? (२९७)

पण मानसामध्येंच जर अहिंसेची उणीव असेल तर बाहेर (कैची) ती कशी दिसेल ? किंवा भरभरून सांडूं लागेल अशी होईल ? (उणीव का तोटा का अकुंचन, तुटवडा, कमतरता, उणेपण का प्रसंगास येणें जें तें जर — ) (२९८)

मनापासून, मनाहून जी वृत्ति अगोदर उठूं लागते, उठते – ती जाण – तिजला वृत्ति म्हणतात मग ती वृत्ति (कमलीहि किंवा एकादी) वाचेच्या दृष्टीमधून करास येते – हातास येते (२९९)

पण मनांतच जर नाहीं – मनीच जर कांहीं नाहीं तर वाचेस कांहींच येऊं शकणार नाहीं – तेथें वाचेमध्यें कांहीं तरी उमटेल काय ? अहो भुयीमध्यें बीज जर नाहीं तर अकुर कोठून उगवणार ? — तेथें बीज नाहीं तर अकुरच मुळी नाहींत असें होय. (३००)

उगमामध्येंच जें वाळून जातें ते ओघामधूनच वाहाणारें कसचें – जीव जेथें जाऊन आहे तेथे देहीं हालचाल कसची ? (३०१)

म्हणून मनपणच जर मोडलें गेलें – तर इंद्रियें हीं तर अगोदरच मुळी निर्बल झालीं मन मोडल्यामुळें उपडी, निर्बल का नि शक्त अशी तीं इन्द्रियें झालेलीं होतात सूत्रधाराशिवाय कळसूत्री वाहुल्याना नाहींपणच जसें त्याप्रमाणें (३०२)

तसें हें पाण्डवा, ह्या इंद्रियाच्या सर्व भावाना मन हेंच 'वृत्ति, मन, वाचा, कर, इंद्रियभाव' ह्या द्वारानीं राहाटवितें. (३०३)

ज्यावेळीं जें काही जसें होऊन असेल तसेंच मुळीं तें व्यापाररूपानें बाहेर येतें (३०४)

आणि म्हणून खरेपणानें पाहिलें असता मनीं जर अहिंसा ही थोर होऊन, महत्त्व घेऊन स्थिर झाली असेल तर सुगंध हा जसा बरोबर आदर घेऊन पसरतो – पूर्णपणच जेथें एक तसें अहिंसा महत्त्वच एक व सुगंधदृष्ट्या तें आदरानें बोभाटा करीत पसरतें. (३०५)

आणि म्हणून इंद्रियें जीं तीच संपदा जाणावी. ती उपयोगास पूर्णपणें घेतली असता एका अहिंसेचा (मंगल) धंदाच ती करीत असलेली होते. (३०६)

समुद्रास भरती आली तर खाड्या ह्या आपोआपच मुळीं समुद्रानें भरल्या जातात – समुद्रच त्या होतात – त्याप्रमाणें इंद्रियांना चित्तानें स्वसंपत्तीचें केलें होतें. (३०७)

ही बुद्धि पंडित अशी बाळाचा हात आपण हातानें, आपल्या हातात धरून सुयुक्ततेच्या (सुव्यक्त, व्यक्त) ओळी लिहिते. (३०८)

त्याप्रमाणें आपलें दयाळूपण हें हातास व पायास आणिलें तरच तेथे (जसें का) अहिंसेचें उपजविलें असें तें होय – अहिंसा उपजली, उपजविली, जन्मली, जन्मविली असें होतें. (३०९)

या कारणास्तव हे किरीटी, ह्या इंद्रियांच्या गोष्टी ज्या, त्या मनाच्या राहाटीनेंच, राहाटीवरच मुळीं रूपास आणिल्या होत – रूपाच्या केलेल्या होत (३१०)

असा कांहीं एक – याप्रकारें मनानें, वाचेने व देहानें दंडाच्या फलाचा त्याग म्हणजे हिंसेचा त्याग केलेला ज्याचे ठिकाणीं पाहाशील — (३११)

तो ज्ञानाचें गृहच एक अति वेल्हाळ असें, अति कुशल असें सर्व सौंदर्याचे. बहुत काय बोलणें पण तो तर शुद्ध म्हणजे निखळ ज्ञानच जाणावा. अखिल ज्ञानभूमिकाच तेथें रंगविली. (३१२)

अहिंसा कानीं ऐकावी का कानानें ऐकण्याचें केलें, करतो जो तसेंच ग्रंथाच्या आधारानें निरूपावी – निरूपिता – निरूपिणें तें व मग ती पाहावीच असें जें काहीं मनात येतें तेव्हां तोच मुळीं पाहावा. (३१३)

असें देवानीं म्हटले तें एका 'बोल' (बोलाने) शब्दाने सागावें पण जर फांकल (विषय फांकला) किंवा विषय सोडून जें बाजूस होणें झालें हें तुम्ही माझें सहन करून असावें – सहन करावेंच. (उद्दीप्तपणानें प्रसरण झाल्यानें तेथे भय किंवा प्रकाशच पसरला असें जे झालें किवा होणारे ते तुम्ही मला क्षमा करालच).
(३१४)

म्हणाल हिरवें चारी गोरु। विसरे मागील मोहा धरु।
कां कडेलग पांखिरुं। गगनीं भरे॥ ३१५॥

तैसिया प्रेमाचिया स्फूर्ति। फावलिया रसवृत्ति।
वाहाविली मति। आकळेना॥ ३१६॥

तरि तैसे नव्हे अवधारा। कारण आहे विस्तारा।
येऱ्हवी पद तरी अक्षरा। तिहीचेच्चि॥ ३१७॥

अहिंसा म्हणता थोडी। परि तैंचि जी होये उघडी।
जैं लोटिजति कोडी। मतांचिया॥ ३१८॥

येऱ्हवी प्राप्त मतांतरे। थातंबुनि आंगभरे।
बोलिजैल ते न सरे। तुम्हापासी॥ ३१९॥

रत्नपारखियाच्या गांवी। जाईल गंडकी तरी सोडावी।
काश्मिरी न करावी। मिडगण के॥ ३२०॥

काईसा वास कापुरा। मंद जेथे अवधारा।
पिठाचा विकरा। तिये सांती॥ ३२१॥

म्हणोनि इये सभे। बोलिकेपणाचेनि क्षोभे।
लागसरु न लभे। बोला प्रभु॥ ३२२॥

सामान्य आणि विशेषा। सकळै कीजेल देखा।
तरी कानाचिया मुखा-। कडे न्याल तुम्ही॥ ३२३॥

शंकेचेनि गदळे। जे शब्दप्रमेय मैळे।
तें मागुत (मागुतिया) पाउली पळे। अवधान येते॥ ३२४॥

करुनि बाबुळियेची बुंथी। जळे जिये ठाती।
तयाची वास पाहाती। हंस काई ॥ ३२५॥

का अभ्रापैलीकडे। येत चांदिणें कोडें।
तैं चकोरां चांचुवडे। उचलती ना ॥ ३२६॥

तैसे तुम्ही वास न पाहाल। परंतु वरी कोपाल।
जरी निर्विवाद नव्हैल। निरुपण ॥ ३२७॥

न बुझविता मतें। न फिटे आक्षेपाचे लागते।
ते व्याख्यान जी तुमते। जोडुनि नेदी ॥ ३२८॥

आणि माझें तंव आघवे। ग्रथन येणेचि भावे।
जे तुम्ही संतीं होआवे। सन्मुख सदा ॥ ३२९॥

येऱ्हवी तरी सांचोकारे। तुम्ही श्रीगीतार्थाचे सोईरे।
जाणोनि गीता-जीवसरे। धरिली मिया ॥ ३३०॥

जे आपुले सर्वस्व दियाल। मग इयेते सोडवुनि नियाल।
म्हणोनि ग्रन्थ नव्हे बोल। कृपेचे सांचचि हे ॥ ३३१॥

कां सर्वस्वाचा लोभु धरा। या बोलाचा (बोलीचा) अव्हेरु करा।
तरी गीते मज अवधारा। येकची गती ॥ ३३२॥

किंबहुना मज। तुमच्चिया कृपा काज।
तियेलागी व्याज। ग्रन्थाचें केलें ॥ ३३३॥

तरि तुम्हां रसिका जोगें। व्याख्यान शोधावें लागे।
म्हणोनि जी मतांगें। बोलो गेलो ॥ ३३४॥

तंव कथे पसरु जाला। श्लोकार्थ दुरी ठेला।
कीजो क्षमा या बोला। अपत्या मज ॥ ३३५॥

आणि घासा आंतील हरळु। फेडितां लागे वेळु।
ते दूषण नव्हे खडळु। सांडावा कीं ॥ ३३६॥

कां संवचोर चुकवितां। दिवस लागलिया माता।
कोपावे की जीविता। जिताणे कीजे ॥ ३३७॥

परी या वरील हे नव्हे। तुम्ही उपसाहिले तेचि बरवे।
आता अवधारीजो देवे। बोलिले ऐसे ॥ ३३८॥

म्हणे उन्मेषसुलोचना। सावध तू होई अर्जुना।
करु तुज ज्ञाना। ओळखी आता ॥ ३३९॥

तरी ज्ञान गा ते येथे। वोळखतु निरुते।
आक्रोशेविण जेथें। क्षमा असे ॥ ३४०॥

हिरवें – हिरवा गोरु – गुरु. मोहर = मार्ग. वारेलग = जिकडे वारा वाहातो तिकडे मिळणारे (३१५). आहे – असे नव्हे – नोहे (३१७). परि तैचि जी होये – परी ते तैचि जी होय. लोटिजति कोडी मतांचिया = हिंसेला अहिंसा म्हणणाऱ्या मतवाद्याचें खंडन (३१८). मतांतरे थातंबुनि अंगभरे = जशींच्या तशींच तीं प्रचलित मतें अहिंसेबद्दलची तीं नच खंडन करितां जशींच्या तशींच ठेविलीं व आपल्याच बळावर बोलूं लागलों तर तें तुमच्या जवळ चालणार नाहीं (३१९). मिडगण – मिणगणे तेथें – मिडगण केवि. गंडकि ह० = पाढऱ्या स्फटिकानें म्हणजे काश्मीरानें स्वतःची स्तुति करूं नये – गुणाबद्दलची. सोन्याचा कस लाविला जाणारा दगड रत्नपारख्याच्या गावीं खपतील (३२०). कापुरा – कापुराचा वास जेथें हीन तेथें पिठाला कोण विचारतो तिये साती – तिये साते (३२१). लागसरु – लागसर = लाग सापडणार नाहीं (३२२) सामान्या – सामान्य सकळें – सकळ – सकल – सकळे = सरसगट कानाचिया – कानामनाचिया (३२३). मागुत – मागुलिया (३२४) बाबुळियेचि बुंथी = शेवाळ्याचा बुरखा, पाघरुण. ठाती – आहाति = असतात. मेळे – मैळे (३२५) तै चकोरा चाचुवडे उचलती ना – तै चकोरे चाचु उचलीत ना (३२६) वास = साधन केव्हा वागावें – चार ग्रंथे नेद्या – (परंतु ?) निर्व्यवाद – निर्विवाद – अविरुद्ध (३२७). जोड्नि नेदी – जोडू नेदी = तुमचें प्रेम मिळणार नाहीं (३२८) जीवसरे – एकसरे = जीवाशी (३३०) आपुले सर्वस्व – सर्वस्व आपुले दियाल – द्याल बोल = जामीन, तारण (३३१) या बोलाचा – बोलीचा (३३२) तुमचिया कृपा काज = तुमच्या कृपेची गरज व्याज – निमित्त (३३३) ठेला – ठेलो – गेलो (३३४) हरलु – खडलु = खडा (३३६). जिताणे कीजे = पोर जिवंत घरीं आलें म्हणून लिंबलोण उतरावें (३३७). उन्मेषसुलोचना = ज्ञानस्फूर्तीचे डोळे असलेल्या अर्जुना (३३९). आक्रोशेविण = आक्रांतरहित (३४०).

हिरवा चारा खाण्यास मिळाल्यामुळें गोरु – गुरें किंवा ढोरें मागच्या मार्गाचा लाग धरीत नाहींत अथवा जिकडून वारा वाहात आलेल्या वाऱ्यावर – वाऱ्यास मिळालेलें पाखरूं आकाशामध्ये स्वैर सचार करूं लागतें पण मागच्या मार्गाची आठवण ठेवीत नाही (३१५)

त्याप्रमाणें ह्या ज्ञानस्फूर्ति त्या त्या बुद्धिप्रेमाच्या अशा एका प्रेमावरच मुळीं उभ्या झाल्यानें त्या रसानीं तर आपला बहारच आलेला पाहिला – तेथे रस हा महत्त्व पावून आहे म्हणून तेथे त्या मति – मत-मतातराची वाहविल्या गेल्यानें त्या मतींच्या रसवृत्तीची फावणेंच एक घेतले तेथे आकळणेच होईना (३१६)

तसें हे नव्हे – ते असें आहे कीं – ऐका – येथे विस्तार जो एकंदर तोच येथें महत्त्व घेऊन आहे – महत्त्व पावून आहे – हा विश्वविस्तार हाच आपल्या मान्यतेवर उभा असल्यानें तेथें विस्तारच हा आपआपल्या अतराच्या त्या त्या मतींनीं नटला एरव्हीं पाहिलें असता हें अक्षराचें पद हेंही पण त्याचेंच होय – त्या मतींचें होय. ब्रह्माक्षराचें ते पद प्रतिष्ठेचें हेंही पण त्यानीं केव्हाही मानिलेलें आहेच आहे. ह्या तीन पदांचें – 'अ' 'हिं' 'सा' तिही अक्षराचें तें पद जरी – तरी. (३१७)

'अहिसा' ही म्हणावी तर ती अडाणी थोडीच अशी आहे – पण तीच जेव्हां ह्या अनेक विश्वाची कशी मानिली आहे तें मतामताच्या कोठीला जेव्हां का इत्थंभूततेची शर्थ घेऊन बोलिली जाते तेव्हा मात्र तिचे खरें स्वरूप हें उघडकीस येतें – उघडें होतें. (३१८)

अहो ! एरव्हीं पाहिलें असता ह्या वर दिलेल्या तऱ्हाच्या मतांची जेव्हां का ती फार प्रचलिततेची अशीच वागविली जाणणें येथें तीं मतें तशींच ठेवून त्याचें निराकरण नच करिता आपल्याच स्फूर्तीच्या बळावर ती बोलली गेली तर तें तुमच्याजवळ केव्हाहि मान्यतेचें होणार नाहीं म्हणून ती अशी केव्हांहि खंडन झाली व वर ही आपल्या मताची जी काही एक जगातील सम्मताना सरळपणानें मान्य होणारी अशी केलेली तरच बरें – नुसतेंच आपलें मताचा आदर्श पुढें केला काय कसचा असाच होईल (३१९)

अहो! उत्तम सुवर्णाचा कस लावणाऱ्या दगडाचा शाळिग्राम शिळाचा पुष्कळसा गुणवर्णनाचा क्रम आंखला तर त्या गंडकींतील शिळा खपतील हें केव्हाहि. पण तेथें काश्मीरांनीं–पांढऱ्या स्फटिकानें जर आपलेंच गुणवर्णनाचें केलें तर तेथें आत्मस्तुतीच एक ती जशी कां असे होईल म्हणून तें तसें स्तुतीचें बोलणें पुढें घेतें तें काय कामाचें. (३२०)

अहो! जेथें कापुराचा वासच मुळीं हीनतेचा असें आहे–त्या सुवासास कोणीच न विचारावें तेथें पिठाची खरेदी ती कशाची होणारी–तेथें पिठास कोण विचारतो तेथें 'मंद' अशीच एक उपमा पुढें झाली. (३२१)

म्हणून या सभेमध्यें नुसतें बोलकेपण जर तर तेथें एक क्षोभच पुढें येणारा होईल. तेथें निष्पन्न कांहींच होणार नाहीं–जसे संस्कृत शब्द हे अशोच्यानें ऐकिले तर–बोलले तर–तेथें सत्त्वगुणाचें येणें हें कसचे! पण तेथें क्षोभच एक तो कशास कांही मेळ नाहीं असेंच म्हणूं शकणार–उलट गुणाचे वाटेच क्षोभास आलें असें होईल. तेथें बोल जो आहे त्याचा लागाबाधा सापडणार नाहीं–तेथे बोलाचा लाग खपणार नाहीं–सभेमध्यें नुसत्या बोलकेपणाच्या क्षोभानें बोला लाग न लागता तेथें क्षोभच एक, अहो हे प्रभु! वाग्जल्पन तें. (३२२)

सर्वसामान्य का विशेष असें तें जें मताचें अंतर हें सरसकट एकच होईल व मग त्या श्रवणास तर मनाचें एक–सर्व मनच एक तेथें बोलत आहे असें होईल–तेथें ऐकण्यावर ऐकणें–बोलण्यावर बोलणें–ऐकण्यानें बोलणें–बोलण्यानें बोलणें ऐकणें–कानच एक सर्व मुख होऊन आहे असेंच तुम्ही मानून असाल. (३२३)

अहो! तेथें मग शंकाच अनेक व त्या तर ह्या शुद्ध अशा सिद्धांतावर उभ्या झाल्या व प्रमेय मळलें जसें व मग काय सर्व सावधपण–का अवधान लक्ष्य तेंच मुळी मागच्या पायानींच मुळीं चालू लागणारें होतें (असें होईल)–तेथे मागच्याच पायानी अवधान पळत येणारें होईल, होतें सर्व सिद्धात शुद्धतेचे जे ते जर मळले–मेळाचे झाले–सर्व अन्यक्रम एक–मलीनपणाचे जर ते झाले–भेसळले–तर लक्ष हें मागल्या पायानीं पळूं लागून येतें (३२४)

(पाण्यामध्यें) शेवाळ्याचे पाघरूण घेऊन ह्या देहरूपी जळामध्यें (पाण्याने) जी उभी होऊन आहेत तिथें जीं जळें, उदकें, शेवाळ्याचें झाकण–ढांकण–बुरखा–घेऊन आहेत तीं उदकें आपल्या उपयोगाचीं होतील–काही साधनतत्पर होतील असें समजून ते हंस काय त्याची वाट पाहाणारे होतील? पाण्यामधील हंस जे शुद्ध दुधाचा अंश घेणारे ते काय (देह) जळांनीं घेतलेलीं शेवाळ्याची पाघुरणें (असे ते साधनतत्पर होऊन तपश्चर्येची होतील असें नाहीच) तेथें तीं जळें, उदकें उपयोगास (योगसाधनास) पाहाणारीं होतील असें ते हंस केव्हाच समजणारे नव्हत (३२५)

अहो! चकोरांना तर आपल्या चंचूच मुळीं उचलवत नाहींत, तें चांदणें वेंचण्यास जें अभ्रामागें लपून आहे. चांदणें हें तर आपले कौतुकास पाहून आहे पण तें अभ्राच्या पलीकडे आहे तेथें त्याचे त्या चादण्याचें कौतुक करणारे जे चकोर ते आपल्या चंचू उचलीतच नाहीत–त्याना आपल्या चंचू उचलवतच नाहींत. जेव्हां का अभ्रानें लपलेलें चांदणें तेव्हा चकोर हे ते वेंचण्याचें मनावर घेत नाहींत. (३२६)

त्याप्रमाणें ह्या देहाची वास न पाहाल–जर ती योग्यता पाहाणार नाही तर ग्रंथास आपलें असें न म्हणाल कारण मग ते निर्दोष असें, निर्विवाद असें तें निरूपण, तुमच्या आपलें असें न म्हणण्यानें होईल. अहो! येथें जर असें म्हणूं केलें कीं ग्रंथच मुळीं आपली योग्यता पाहात नाहीं तर मग जेथें शब्द हाच मुळीं ह्या देहानें, कीर्तीचा केला जावा, योग्यतेस यावा, देह हा साधनपर होऊन तेथें योगाच्या निकटचें होणें तें जर

नच झाले तर मग ह्या देहाची वास – योग्यता – नच योगावर – योग्यतेवर – उभी नसल्यानें हा निर्दोष असा बोल तो विसंवादतेचा असेंच म्हणू कराल म्हणून देहाम देहाची योग्यता यावी, त्याच करितां वर नुसतेंच क्षोभाग येणें केलें – कोपणें केलें – तर मग तुम्हांस हें येथीलचें निर्विवाद बोलणें मानणेंच नाहीं. ते तुम्ही आपलें, माझें, मी म्हटलेलें – सन्मान्यतेचे असें गृहीत धरणार नाहींत. ‘ग्रंथ नेया’ परंतु कोपणेंच एक तेथे – तिथें ग्रंथाची गोष्टच मुळी लपली व एक क्षोभणेंच पुढें झालें असें होईल (३२७)

मत न समजविलें तर तिथे ( दूषण किंवा निंदा ) आक्षेपच एक येणारा व तो तर ह्या मनास केव्हांहि लागतोच – टोचतोच – व असें तें लागणारें व्याख्यान जर तर मग तुमचें प्रेम हें केव्हाहि मिळवत नाहींच – तुम्हांस जोडून घेणें जें ते प्रेमाचें असें आपलेपण ते मग केव्हाहि जवळचे होणारें नव्हे (३२८)

माझें सर्व ग्रथन हें जें ग्रंथरचनेचें तें तर हाच एक भाव पुढे घेऊन आहे, कीं तुम्ही संत हे नेहमीच मला सन्मुख असोत – असावेत दर्शनाचे, सन्मुखतेचें, तेथें तपश्चर्येचे प्रत्यक्षत्वच. एरव्ही ‘खरें पाहिले’ असतां ‘श्रीगीता’ ‘अर्थ’ जो ‘त्याचे’ तुम्हीच एक ‘खरे’ ‘सोयरे’ होत असें जाणून ‘मी’ गीता ही एकसारखी जिवाशीं धरून आहें (३२९ – ३३०)

अहो आपण संत जे ते आपले सर्वस्व होऊनच इजला सोडवून न्याल आणि म्हणूनच अहो एक लांधेपणाचा हा नुसता ग्रंथ नसून ते प्रत्यक्ष खरेखुरे सताचे बोल होत (३३१)

अहो ! सर्वस्वाचा लोभ धरून ह्या बोलाचा – ह्या बोलीचा जर अव्हेर केला – सर्वस्वाचा लोभ धरावा व मग केव्हाहि अव्हेरच करावा असेंच ते सर्वस्वाच्या लोभाचें व अव्हेराचें नातें आहे – आणि म्हणून तर मग असेंच म्हणावें कीं अहो गीतेस जी गति तीच गति मलाहि पण प्राप्त होणारी होय (३३२)

एक तुमच्या कृपेचें व्हावें – तुमची कृपा व्हावी हीच मला एक इच्छा आहे – ह्या कृपेसाठींच मुळीं ह्या ग्रंथाचें एक निमित्त पुढें केलें. (३३३)

आणि म्हणून तर तुम्हा रसिकाना आवडणारें, प्रिय होणारें असेंच तें व्याख्यान असावें असें घेतलें – ते व्याख्यान शोधिलेले असावें, आणि म्हणूनच तर जी कांहीं मतामतांचीं अंगे, अतरें तींच बोलिलो – बोलून राहिलो आहें – बोलून दाखविलीं (३३४)

ह्यामुळें ह्या कथेस विस्तार जाहला व श्लोकार्थ तो तर दूरच राहिला गेला आणि म्हणून मज आपल्याला असा विस्तार झाल्याबद्दल आपण क्षमा करावी (३३५)

जेवणातील घासामध्यें एखादा खडा काढता काढतां वेळ लागला तर ते ग्रंथ संपत्तीचे जे भूषण तें खडा काढावाच असें आहे तेथे तसें करणे दूषण नव्हेच (३३६)

वाटमारा सोकलेला चोर चुकविता चुकविता चुकविण्यास मुलाला दिवसेचे दिवस लागले तर माता ही त्या बाळावर न रागावता त्याची दृष्टच काढते, केव्हाही काढणारी होते ती त्याचेवरून लिबलोण उतरते तेथे अहो रागावणें टाकून द्या व अगोदर त्या बाळाची दृष्टच काढा अहो मोठें गौरवाचें एक बोलणें होतें. (३३७)

पण हें काही ह्या ( श्लोका ) वरील हें नव्हे म्हणून असें समजून तुम्ही संतांनीं तें उपहासावें, सहन करावें, हेंच बरें दिसणारें आहे बरें असो अता देवानीं जे काय बोलिले ते ऐकण्याचें करावें. (३३८)

ते म्हणाले कीं अगा ( उन्मेषसुलोचना ) ज्ञानस्फूर्तीचे डोळे असलेल्या अर्जुना, बाबा सावध हो. आतां तुला ज्ञानाची व तुझी ओळख करून देतो तेथे सावधानतेनें ऐस – सावधानतेने ऐस (३३९)

आता ज्ञान जें निरुते म्हणजे खरेपणानें निरुत्तर करणारें असें जें तिचे अंतरीं खेद नसून आकांतरहित अशी सर्व क्षमाच एक होय. (३४०)

अगाधे सरोवरी। कमळिणी जियापरी।
का सदैवाच्या घरी। संपत्ति जैसी ॥ ३४१ ॥

पार्था तेणे पाडे। क्षमा जयाते वाढे।
तेही लक्षण पुढे। लक्षणी सांगो ॥ ३४२ ॥

तरी पढियंते लेणे। आंगी भावें जेणें।
धरिजे तेवी साहाणें। सर्वेचि जया ॥ ३४३ ॥

त्रिविध मुख्य आघवे। उपद्रवाचे मेळावे।
वरि पडिलिया नव्हे। वांकुडा जो ॥ ३४४ ॥

अपेक्षित पावे। ते जेणे तोषे मानावे।
अनपेक्षिताहि करावे। तोचि मानु ॥ ३४५ ॥

जो मानापमानाते साहे। सुखदुःख जेथ सामाये।
निंदास्तुति नव्हे। दुखंडु जो ॥ ३४६ ॥

उन्हाळेनि जो न तापे। हिमवंतिया न कांपे।
कायिसियाहि न वालिपे। पातलेया ॥ ३४७ ॥

स्वशिखराचा भारु। नेणे जैसा मेरु।
कां धरा यज्ञसुकरु। वोझे न म्हणे ॥ ३४८ ॥

नाना चराचरी भूती। दाटणी नव्हे क्षिति।
तैसा नाना द्वंद्वी प्राप्ती। घामैजेना ॥ ३४९ ॥

घेऊनि जळाचे लोट। आलिया नदीनदाचे संघाट।
करी वाड पोट। समुद्र जेवी ॥ ३५० ॥

तैसे जयाच्या ठायी। न साहाणे कांहींचि नाहीं।
आणि साहातु असे ऐसेहि। स्मरण नुरे ॥ ३५१ ॥

आंगा जे पातले। ते करूनि घाली आपुले।
येथ साहातेनि नवले। घेपेजेना ॥ ३५२ ॥

आहे अनाक्रोश क्षमा। जयापासी प्रियोत्तमा।
जाण तेणे महिमा। ज्ञानासि गा ॥ ३५३ ॥

तो पुरुष गा पाण्डवा। ज्ञानाचा वोलावा।
आता परीस आर्जवा। रूप करुं ॥ ३५४ ॥

तरी आर्जव ते ऐसे। प्राणाचे सौजन्य जैसे।
आवडे तयाहि तोषे। एकचित्ता ॥ ३५५ ॥

का तोंड पाहुनि प्रकाशु। न करी जेवि चंडांशु।
जगा एकचि अवकाशु। आकाश जैसे ॥ ३५६ ॥

तैसे जयाचे मन। मनुष्य प्रति आनान।
नव्हे आणि वर्तन। ऐसे पै ते ॥ ३५७ ॥

जे जगाचि सनोळख। जगेसी जुनाट सोयरीक।
आपपर हे भाष। जाणणे चि नाहीं ॥ ३५८ ॥

भलतेणेसिही मेळु। पाणियाचिया ऐसा ढाळु।
कोणेविषीं आढळु। नेघे चित्त ॥ ३५९ ॥

वारियांची धांव। तैसे सरळ भाव।
शंका आणि हाव। नाहीं जया ॥ ३६० ॥

मातेपुढे बाळका। रिगता नाहीं शंका।
तैसे मन देता लोका। नालोचि जो ॥ ३६१ ॥

फावलेया इंदीवरा। परिवर नाहीं धनुर्धरा।
तैसा कोनुकोपरा। नेणे जिऊ ॥ ३६२ ॥

चोखाळपण रत्नाचें। रत्नावरी किरणांचें।
तैसें पुढां मन जयाचें। करणें पाठीं ॥ ३६३ ॥

आलोचु जो नेणें। अनुभवचि जोगावणें।
घरी मोकळीं अंतःकरणें। नव्हेचि जया ॥ ३६४ ॥

दिठी नव्हे मिणधी। बोलणें नाहीं संदिग्धीं।
कोण्हेसी हीनबुद्धी। राहाटीजेना ॥ ३६५ ॥

दाहाही इन्द्रिये प्रांजळें। निःप्रपंच निर्मळें।
पांचही पालव मोकळे। आठही प्रहर ॥ ३६६ ॥

अगाधे – अगाध = फार खोल, अपरंपार कमळिणी – कमलिनी = कमलाचे समुदाय, कमळाची वेल (३४१). वाढे = ओगरे. लक्षण पुढे लक्षणी – लक्षे ते फुडे लक्षण लक्षे = पाहाणें, वर्णन करणें (उपलक्षण—एका अर्थाच्या भाषणानें अन्य अर्थ सूचित करणें). लक्ष = चिन्ह लक्षण = खूण, गुणवर्णन लक्षणा = वाच्यापासून निराळा सूचित अर्थ (३४२) भावे जेणे = भावेजणे (उदासपणानें) (३४३). मुख = मुख्य. उपद्रव = पीडा, जुलूम. वरिपडिलिया = वर पडलिया (३४४). अपेक्षित = इच्छित, जरुरी असेल तें. मानावे = मानवे, संतोषवावे करावे = करतो मान = गौरव, सत्कार, परिमाण (३४५). मानापमानाते – मानापमानासि साहे = सोसतो, सहनशील होतो सामाये = सामा ये नव्हे – नोहे = न होये दुखंडु = द्विधा, कष्टी, मोहच जात नाहीं, हीन नीच होत नाहीं. निराळे होणे = संबंध तोडणें (३४६). तप = तपस्वी होणें, तपश्चर्या करणें ताप = पीडक होणारा – पीडा करणारा उन्हाळा = ऊन, उष्णता, खडखडित वाळलेले. तपासबंधीं कंप = हालणें (अनुकंप = दया करणें), कृपा करणें. वालिये = भीत नाहीं (३४७) यज्ञसूकरू = यज्ञवराह. सूकरु = शूकरु (३४८) दाटणि = गर्दी, पृथ्वीचे परिमाण लहान हा अर्थ नाहीं. दु:ख होणे जे = वोझे वाटणें. द्वंद्वी = द्वंद्व. घामेजेना = गांगरत नाहीं, घाबरत नाहीं, घामाघूम होत नाहीं, ज्यास उबाराही नाहीं, जो कष्टी होत नाहीं, खडखडित होत नाहीं (३४९) संघाट = समुदाय. वाड = मोठे (३५०). आंगा = शरीरा. साहातेनि नवले घेपेजेना = सहनशीलतेचा अभिमान बाळगत नाहीं (३५२) आहे = हे. जयापाशी = जेथ आथी (३५३) आर्जव = सरळपणा (३५४). सौजन्य = सुजनत्व, भलेपण आवडेतयाहि – आवडतयाहि = वाटेल त्यास. ठिकाणीं = पाहिजे त्याच्या ठिकाणीं. एकचित्ता = एकचि पै गा (३५५) मनुष्यप्रति = माणूस प्रतिमाणसागणिक तोले. नव्हे = नोहे (३५७).

मनोळख = ओळखीचे. भाष – भाक – भाष्य = भाषा जाणणेच्चि, जाणणें (३५८). पापियाच्चिया = पापिया ढाळु = वर्तणूक. आडळु = आड पडणें जें (३५९). नालोच्चि = विचार करीत नाहीं (३६१). फावलेया = उमललेल्या. इंदीवरा = निळें कमळ. परिवर = सेवकजन, आश्रित, आच्छादन. परिवर – परिकर = कानपट्टा, प्रतिबंध. कोनुकोपरा = कमळ उमललें म्हणजे त्याच्या परिमलाला जसा प्रतिबंध नाहीं. जिऊ = जीवन, जिया, जीव, जणें, जगणें – जगत असतां (३६२). किरणांचे = किळेचें. पुढा = पुढें (३६३). आलौंचु = विचार करीत बसणें जोगावणें = संतोष (३६४). मिणधी – मिंधी, ओशाळलेली संदिग्धी = सशयित. कोण्हेसी = कवणेसी. राहाटीजेना = राहाटो नेणे (३६५). प्राजळे = निष्कपट. नि·प्रपंच = निष्प्रपंचे. पाचही पालव = पंच प्राण. प्रहर = पाहर (३६६).

ती क्षमा, तें सोशिकपण, ती सहिष्णुता, तें समर्थतेनें असणें, सर्व काहीं प्रपंचाची जी उणीव किंवा गरज पुरती होणारी अशी व्यापकता ज्याच्या ठायी आहे – असें ज्याचें मन – ती निवृत्ति शाति ती कशी म्हणजे – तर जशी अगाधतेच्या म्हणजे अतिशय खोल पाणी आहे ज्या तळयामध्यें तेथील कमलिनीची वेल जशी किंवा कमलाचा समुदाय जसा का किंवा सदैव जो जेथें काळवेळ ही सर्व दैवी संपत्तीची होत आहे वा सदैवाच्या – दैववानाच्या घरी लक्ष्मी जशी खरेपणाच्या वास्तव्यानें वस्ती करून असते – मुक्कामाने असते. (३४१)

हे अर्जुना, अशा बरोबरीची जेव्हा का क्षमा ही महत्त्व घेऊन असते – महत्त्व पावते तेव्हा लक्षण ते लाक्षणिकतेचें तें सागतों. ती लक्ष्ये म्हणजे योजिली जाते–योग्यतेचे होणे ते लक्षण का ती लक्षणा आता सागतो (३४२)

पढियंते लेणें – त्या स्वभावाचें जें काहीं उदारतेचें वस्त्र पाघरणे – तें ज्या भावानें अगचे असें केलें जातें – किंवा अहो उसने मागून अगावर घातलेले दागिने जसे परत द्यावे लागतात तसे हा भाव एक ज्यानें – उदासपणानें अगचा केला आहे – व ते जें सहन करणें – साहस करणें किंवा सहन करणें त्याप्रमाणेंच सर्व काहीं जो साहाणें करून असतो – साहाणें – सहन करणें – त्याच उदात्त वृत्तीचा होणें जें. (३४३)

त्रिविध मुख – त्रिविध सुख – जें त्रिगुणाचे जेथे अनेक पीडा किंवा जुलुम असें मानलें जाते – बोलिलें जातें – स्वभावाचें तें अति विचित्रतेच्या रम्यतेचें तें दिग्दर्शन – तें जरी सर्वच आपला जोर करूं आलें तरी जो वाकडा होत नाहीं, तरी जो उलटत नाहीं. (३४४)

अपेक्षित – इच्छित वस्तु प्राप्त झाली असता – इच्छित प्राप्त झाले तर जसा मनास मान येतो – मन हें तोषास येऊन मान डोलूं लागते किंवा ती महत्व मानून असते – घेते – त्याचप्रमाणें पण अनपेक्षित ही जरी तरी पण त्याच तोषाच्या बरोबरीनें वागवितो जो (३४५)

जो मान व अपमानानी (केलेला) आपल्या सहनशक्तीस आलेला होतो – सहनशीलतेस शिकून असतो सुख का दु ख हें जेथे सामावून असतें – आंत मावून असतें – सुखदु खाला राहाण्यास ज्या ठायीं माव पैठा असतो – तसेंच निंदा किंवा स्तुतींनीं द्विधा जो होत नाहीं – 'दुखडु' जो होत नाहीं – कष्टी होत नाहीं – मोडला जात नाही – हीन का नीचपण आपलेकडेस घेत नाहीं – निराळा होत नाहीं – संबंध तोडीत नाहीं. (३४६)

खडखडीत उन्हाळा पडला तरी जो तापत नाही, त्रास मानीत नाही – कडाक्याची थंडी पडली तरी जो कापत नाहीं – जें कांहीं प्राप्त झालें असेल त्यास मुळींच भीत नाही – उन्हाळयानें जो तप न करिता नसताच एक तपस्वीपणाचा बाणाच बाळगीत नाहीं. तसेंच हिंवाळयानें जो कंप पावत नाहीं – नुसतेच थरारणें – खुडखुडत बसत नाहीं – तर आपल्या अनुवृत्तीनें का तपश्चर्येनें असतो – जो प्रत्यक्ष ज्ञानतपनसामर्थ्य आहे तो उन्हाळयानें कधींही तापला जात नाहीं उन्हाळा कडक जरी तरी विस्तवाला तो जाळूं शकणार नाहीं

**ना तरी मोह आलिया। काय ज्ञाना मुकिजैल तया।**
**होमा आगीतें उन्हाळेया। जाळवत असे॥ ( ३३७/१४ )**

कसलाही मोहप्रसंग प्राप्त झाला तरी तो ज्ञानास पारखा म्हणजे अनोळखीचें करील काय? काय कडक उन्हाळा विस्तवास जाळूं शकेल? ( ३४७ )

मेरुपर्वत तो आपल्या शिखराचा भार वाहून असतो – तो कांहीं तें ओझें आहे असें मानीत नाही – अहो यज्ञवराह जो तो पृथ्वीवरील सर्व भार सहजच वाहून असतो तो तें कांहीं ओझें असें केव्हाहि मानीत नाहीं. त्यास तें ओझें आहे असें वाटत नाही – ओझें असें न वाटतां तो तें सहन करून असतो – झेंपून असतो. (३४८)

चराचरामधील भूतमात्रानीं क्षिती ही पृथ्वी, हीं भूतें हीं ठासून भरली गेलीं अशी तेथे दाटी झाली असें केव्हाहि ( पृथ्वीमध्यें ) होतच नाहीं – स्थावरजंगमाचें पृथ्वीस ओझें होत नाही – एवढीच पृथ्वी व तींत ही चराचरें अगदीं कोदकोदून भरलीं असें केव्हाहि होत नाहीं – तसा अनेक द्वंद्वांनीं जरी त्याची ती प्रीतीची का प्रेमाची वाढ ही पाहाणे केलें जातें – द्वंद्वानीं त्यास घामाघूम केलें असें होत नाहीं – उबारा – प्राणच जसा आडविला गेला – त्या त्या द्वंद्वाच्या विभागानें तरी तो मुळीच तापत नाहीं – घाबरत नाहीं – आपली हिंमत मोडीत नाहीं – धैर्यवान् असाच होऊन असतो. ( ३४९ )

अहो अनेक नदीचे – नदाचे किंवा नद्याचे – प्रवाह संघाट जरी जळाचे लोटच्यालोट घेऊन आले तरी तो समुद्र ते सर्व आपल्या आत मावून घेतो – तेथे त्याचें पोटच जसें सर्व कांहीं आत मावून घेणारें झालें ( ३५० )

त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं सहन होत नाहीं असें कांहींच नाही – तो सहजपणेंच तें सर्व साहून असतो – याही वर तेथें 'सहन करीत आहे' अशीहि त्यास आठवणच मुळीं होत नाहीं – त्याचें सहन करणें हें एक अगदीं सहजतेचे असेंच होऊन असतें ( ३५१ )

आगास जे आले – शरीर जें प्राप्त झालें आहे – शरीरावर जें कांही येऊन आहे – ते तो आपलेंच आहे असें म्हणून अंगावर धारण करितो, आपल्या अंगीं घालतो व तिथें तर ती सहनशीलतेची कमालच एक ती कांहीं काय नवलाची अशी नच होय – सहनशीलतेचा अभिमान तर तो मुळीच वाहात नाही – अभिमानाचा झाला व त्याने वाहून गेला असें मुळींच होत नाही ( ३५२ )

अतरी खेद नाहीं – आकांत करणें नाहीं – आक्रोशणें नाहीं – अशी जी अनाक्रोश क्षमा ज्याचे ठायीं आहे – हे अर्जुना प्रियोत्तमा, त्याच्या त्या असण्यानें जशी का नामानें ज्ञानास 'महिमा' आली आहे असें जाण. तो 'जाणतो' अशी एक ज्ञानाची कळाच होय. तो जाणता असा त्याच्या योगें करून ह्या ज्ञानास महत्त्व पोहोचलें – ज्ञान हें महिमेचे झाले असें जाण – ज्ञान उत्कर्षाचें झालें – ज्ञान आपल्या माहात्म्यास आलें असेंच तेथें होय ( ३५३ )

तो पुरुष हे अर्जुना, सर्व ज्ञानाचा एक मेळावा – मेळच जाण – तेथे अव्यक्त नावाची जी गुणमयी विख्याता तीच महत्त्व घेऊन आहे – सर्व महत्त्व हें तिजलाच जसें पोहोचलें असें होय. सर्व ज्ञानाचा मेळावा – एकमेळ एकमेळाची ती अव्यक्त सनातन धर्मप्रतिष्ठा तीच तेथे महत्त्वमान्य झालेली होय. आता 'आर्जव' (सरळपण) म्हणजे काय ते सागतो – त्यास रूपाचे करून सागतो – त्यास आता नावारूपास आणूं. ( ३५४ )

तरी आर्जव ते कसे म्हणशील तर अगदीं सरळ हृदयाचें जें सौजन्य तेथें प्राण हा सुहृद – असा सुजनत्व घेऊन आहे व वाटेल त्यास किंवा पाहिजेल त्यास – भलत्यासही – त्या प्राणाच्या ठिकाणीं एक-

चित्ताच्या उद्देशावर तोष पावत असलेला असें तें होय. देश ऐश हा त्या त्या वासनांनीं तो तो शरीरावरील प्रातच जसा प्राणाच्या सौजन्याचा केला – तेथें सुहृदयतेचे ते एकच एक असेंच सरळपण प्राणाचें जेथें आहे तें आर्जव होय (३५५)

अहो ! चंडांशु जो सूर्य तो कांहीं तोंड पाहून प्रकाश पाडणारा होत नाहीं – सर्व जगास अवकाश हाच एक आकाश जसें का — ( प्राण हा काहीं तोड पाहून प्राणाचा केला – प्राणानें प्राण जागविला तसें नसून सौजन्य जें तें भलत्यासहि एकचित्ततेमुळें सुजन – सज्जन – साजन असें झालें – तेथे प्रकाशच एक अवकाशावर सुहृदतेस आला – अंतःकरणाचे प्रियत्वच तेथें सरळ निष्कपट अशा हृदयंगमतेचें एक सुजनत्व शोभूं लागलें असें होय ) (३५६)

त्याप्रमाणें ज्याचें मन ( मनुष्य ) मनुष्याप्रति – ( माणसागणिक निराळें – मनुष्यामनुष्यावर निरनिराळे-पणानें वागणारें ) निराळें – आनी आन – एकाप्रति आन व दुसऱ्याप्रति भलतें का आन आन एकाशीं एक-तऱ्हेचें व दुसऱ्याशीं भलतेंच असें नच होतें व जसें मन तसेंच तें त्याचें वर्तन होत असणारें होय (३५७)

जेथे हें सर्व जग ओळखीचें आहे असें – ह्या जगाशी जुनाट अशी सोयरे ( धायरे ) संबंधाची गोष्टच जो पाहून आहे – तेथें व आपलें व त्याचें किंवा दुसऱ्याचें असें ते त्याचें बोलणें का मानणें नाही – मानणें का बोलणें – ते भाख ( भाष – भाक किंवा भाषेचें ) असें नाहीं (३५८)

भलतासलता जरी तरी तेथे एकमेळीवारच जसा – एकचिततेचा – मेळच जसा बसला आहे – ऐक्य ह्या मनोधर्माचे – जिथे ह्या जीविताची गोडी हीच एका आनंदास आली जशी का – वर्तणूक पाहावी तो पाणी जशी आपली पातळी धुंडणारें तसें – जसें जसें तेथें नमणें तसें तसे तेथें वर्तन जें तें मोठ्याच सभ्यतेचे का विनयाचें का विनीततेचें एक नम्रपणाचेंच असें तेथे चित्त हे कुणासहि आडवीत नाही – कोणाच्याहि आड पडत नाहीं – तेथे आडणें हें होतच मुळी नाहीं – कुठें का त्याचें आडणें झालें – बुजणें झालें असें होत नाही (३५९)

वारा जसा धाव घेतो, जसा का एका चक्रीनें जसा आपली गति का धाव पाहाणारा – त्याप्रमाणें ज्याचे भाव हे सरळतेचे – तेथें कुठें काहीं शंकणें नाही – व कसली काहीं का इच्छेची हाव ही नाहीच अंतराळीं हा जसा वाहाणारा तेथें त्याची ती धाव म्हणजे जशी का चाकाच्या धावेच्या उपमेची. (३६०)

अहो ! आईपुढें जाण्यास बालक जें आहे त्यास काहींहि शंका नाहींच, त्याप्रमाणें लोकाना मन देताना जो विचार करीत बसत नाही – विचार पाहात नाहीं, का जें एक परीक्षा घेऊन मग तेथें तो विचार सांगावा का बोलावा असें. येथें लोक जसे का आईच्या उपमेचे झाले व स्वतः जसे का बालकच एक (सहज) मनाच्या एका सहजतेच्या प्रेमाचे ते. (३६१)

जें निळें कमळ उत्तमतेनें उमललें आहे – इंदीवर जें फाकलेलें – उमललेलें – तेथें त्याच्या सुवासाकरिता काय तें कमल बोलावणी करून आपला परिवार करते ? तेथें तो सुवास घेण्यास काय तें कमल आपल्या भोंवतीं एक परिवार गोळा करतें – अहो तेथे त्या कमलानें आपले आश्रित केले आहेत असे जे कोणी काहीं असें नाहीं – अहो तेथें जीवन हेंच मुळीं आपल्या सुरम्यतेच्या आनंदपरिघास आल्याने जीव हा प्रसभतेच्या लाटेवरच मुळीं हेलकावे खात राहून आनंदाच्या बहारीमुळें जीवित हे उत्कर्षास आलें असें पाहातो – तो जीव त्यास तो परिमळ आपल्या आगोआगीं जसा भरभरून घ्यावा असें पाहूं लागून – जीवन – जीव – जिया हें ललचावलें होतें – जिणें जगत असता – जिणें एक जगतें का आयुष्य पाहात आहे असें तेथें काय मग त्यानें तो परिमळ आगोआगीं भरून घ्यावा असेंच होय. असा हा परिमळ ह्या जीवगोडीस देणारा असल्यानें तेथे आपोआप गर्दीच झाली – स्वसुखास येण्याकरिता तेथें डोळ्याचें निवणेंच एक तेथें सर्व जग हें सेवाचतुरतेचें अग का अगें पाहूं करणारें होतेंच होतें (३६२)

तेजच मुळीं अगोदर दिसूं लागतें – पाहाणें होते – व मग तें तेज काहीं कोठून येणारें – तेथें रत्न ते मग पाहाणें होतें – त्याप्रमाणें ते तेजाचे किरण किंवा कीळ – प्रभा – हीच अगोदर जशी त्याप्रमाणें त्याचें मन हेंच पुढें चालत असलेलें असतें व मगच मुळी काहीं करणें होणारें तें होऊन असतें. (३६३)

अगोदर पाहावें आणि मग काय करणेचें तें करावें किंवा अगोदर हें बरें का दुसरें तिसरें बरें का निराळें का मध्यम काहीं एक त्या मनानें परीक्षणें करावें असें तो करीत नाहीं तर त्याचा अनुभवच मुळीं झाला की तेथें संतोष हाच पुढाकार घेऊन चालत असल्यानें तो त्या अनुभवानेंच मुळीं चालत असल्यानें काहीं एक धरसोडीचें असें त्याचें वर्तन होत नाहीं – आता एक पसंत केलें कीं लगेच तें नापसंत झालें – असें तें तेथें काय तो संतोष म्हणावा ? – तर असें न करिता त्याने जी काही अत करणें पाहिलीं तीं संतोषच एक जोगविला – जोगाविला असें असल्यानें त्याच्या हातून धरसोडीचें वर्तन होत नाहीं. (३६४)

त्याची दृष्टि निर्मल असल्याकारणानें तेथें तेजोहीनतेचें असें त्याचें पाहाणें नाहीं. त्याची दृष्टि ही मिनतवारीची अशी नाही – मिंधी नाहीं – ओशाळतेची अशी नाहीं – तेथें त्याच्या दृष्टीचें पाहाणें हें अति निर्मळ असें स्वच्छ असतें उगीच संदिग्धतेचें असें त्याचें बोलणें असत नाहीं. त्यानें जें काही बोलावें तें निश्चित असेंच होय तें साशंकिततेचें असें केव्हाहि नसणारें असें निश्चिततेचें होय. व तो कोणाहि बरोबर वागूं लागला असता, राहाटत असता हीन बुद्धीचे – नीच असें नवेनवेपणाचें – आता एक तर मग भलतेंच असें धरसोडीचें त्याचें तें राहाटणें असत नाहीं – थोडक्यात बोलणें म्हणजे तो हीन बुद्धीचा होत नाही – त्याचें वागणें ज्ञानदायक जी बुद्धि तिच्याच प्रामाण्यावर चालत आलेले होय (३६५)

त्याची दशही इंद्रियें – प्राजळपणानें ( ज्ञानाचें व कर्माचें साधन – त्वचा, जीभ, डोळा, नाक, कान, हात, पाय, गुद, उपस्थ व वाणी ) – निष्कपटपणानें वागत असलेली – कोणाबरोबरही तो पंक्तिप्रपंचानें वागणारा नसून निर्मळ असा असतो – ती शुद्ध अशी स्वच्छ असल्याने त्याच्या प्राणाचे पाचही पदर पण अष्टौप्रहर मोकळेच असे होऊन असतात. पल्लव जे प्राणाचे – पंचप्राणाचे – ते मोकळे असे पाजळ असे दिवसभर का नेहमींच असतात अष्टौप्रहर प्राणाचे पालव मोकळे असेच होऊन असतात. (३६६)

अमृताची धार । तैसे उजु अंतर ।
किंबहुना जो माहेर । या चिन्हांचें ॥ ३६७ ॥

तो पुरुष सुभटा । आर्जवाचा आंगवठा ।
जाण तेथेंचि घरटा । ज्ञानें केला ॥ ३६८ ॥

आता यावरी । गुरुभक्तिची परी ।
सांगो अवधारी । चतुरनाथा ॥ ३६९ ॥

आघवियाचि दैवा । जन्मभूमि हे सेवा ।
जे ब्रह्म करी जीवा । शोच्यातेही ॥ ३७० ॥

ते आचार्य उपास्ती । सांगिजेल तुजप्रति ।
बैसो दे एकेपांति । अवधानाची ॥ ३७१ ॥

तरी सकळ जळसमृद्धी । घेऊनि गंगा निघाली उदधी ।
का श्रुती हे महापदीं । पैठी जाली । ३७२ ॥

नाना वेटांळुनि जीविते । गुणागुण उखिते ।
प्राणनाथा उचिते । दिधले प्रिया ॥ ३७३ ॥

तैसे सबाह्य आपुलें। जेणे गुरुकुळी ओपिले।
आपणपे केले। भक्तिचें घर ॥ ३७४ ॥

गुरुगृह जिये देशी। तो देशचि वसे मानसी।
विरहिणी का जैसी। वल्लभाते ॥ ३७५ ॥

तियेकडुनि येतसे वारा। देखोनि धावे सामोरा।
आडपण म्हणे घरा। बीजे कीजो ॥ ३७६ ॥

सांचा प्रेमाचिया भुली। तिया देशीची आवडे बोली।
जीऊ थानपती करूनि घाली। गुरुगृही जो ॥ ३७७ ॥

परि गुरु आज्ञा धरिले। देहगावी असे येकले।
वासरु वा लाविले। दावे जैसे ॥ ३७८ ॥

म्हणे कै हे बिरडे फिटैल। कै तो स्वामी भेटेल।
युगाहुनि वडील। निमिष मानी ॥ ३७९ ॥

ऐसया गुरुग्रामीचे आले। कां स्वयें गुरुनेचि धाडले।
तरी गतायुषा जोडले। आयुष्य जैसे ॥ ३८० ॥

कां सुकतया अंकुरा। वरी पडिलिया पियूष धारा।
नाना अल्पोदकीचा सागरा। आला मासा ॥ ३८१ ॥

ना तरी रंके निधान देखिले। का आंधळया डोळे उघडले।
भणंगाचिया आंगा आले। इंद्रपद ॥ ३८२ ॥

तैसे गुरुकुळिचेनि नांवे। महासुखें अति थोरावे।
जे कोडे हे पोटाळावे। आकाश का ॥ ३८३ ॥

पै गुरुकुळी ऐसी। आवडी जया देखसी।
जाण ज्ञान तयापासी। पाईकी करी ॥ ३८४ ॥

आणि अभ्यंतरिलियेकडे। प्रेमाचेनि पाडे।
श्रीगुरूचें रूपडे। उपासी ध्यानीं ॥ ३८५ ॥

हृदयशुद्धिच्या आवारी। आराध्य तो धुरु करी।
मग सर्वभावासी परिवारी। आपण होये ॥ ३८६ ॥

का चैतन्याचिये पौळी। मार्जी आनंदाच्या राउळी।
गुरुलिंगा ढाळी। ध्यानामृत ॥ ३८७ ॥

उदैजता बोधार्का। बुद्धिसी डोल सात्विका।
भरुनि श्रीत्र्यंबका। लाखोली वाये ॥ ३८८ ॥

काळशुद्धि त्रिकाळीं। जीवदशा धूप जाळी।
ज्ञानदीपे वोवाळी। निरंतर ॥ ३८९ ॥

सामरसाची रससोय। अखंड अर्पितु जाये।
आपण भराडा होये। गुरु तो लिंगु ॥ ३९० ॥

ना तरी जीवाचिये सेजे। गुरु कांतु करुनि भुंजे।
ऐसी प्रेमाचेनि भोजे। बुद्धि पाहे ॥ ३९१ ॥

कोण्ही येके अवसरी। अनुराग भरे अंतरी।
कीं तया नांव करी। क्षीराब्धी ॥ ३९२ ॥

तेथ ध्येय ध्यान बहुसुख। तेंचि शेष तुळिका निर्दोष।
वरी जळशयनी देख। भावी गुरु ॥ ३९३ ॥

मग वोळंगती पाये। लक्षुमी आपण होये।
गरुड होऊनि आपण वाहे। आपणचि ॥ ३९४ ॥

नाभी आपण जन्मे। ऐसे गुरुमूर्ति प्रेमे।
अनुभवी मनोधर्मे। ध्यानसुख ॥ ३९५ ॥

येकाधिये वेळे। गुरुमाये करी भावबळें।
मग स्तन्यसुखें लोळे। अंकावरी ॥ ३९६ ॥

ना तरी गा कीरीटी। चैतन्य तरु तळवटी।
गुरु धेनु आपण पाठी। वत्स होये ॥ ३९७ ॥

गुरुकृपास्नेहसलिली। आपण होय मासोळी।
कोण्हि येके वेळी। हेचि भावी ॥ ३९८ ॥

गुरुकृपामृताचे वडप। आपण सेवावृत्तिचे होय रोप।
ऐसऐसे संकल्प। वियें मन ॥ ३९९ ॥

आगवठा=मूर्ती ( ३६८ ) शोच्यातेही–अशुचिते–शोच्याते–पतितालाही ( ३७० ) सागिजेल–प्रकटिजेल एकेपाति–येकपाति ( ३७१ ) महापदी पैठी जाली=ब्रह्मपदावर आरूढ झाली ( ३७२ ). प्राणनाथ–प्राणनाथा–प्राणनाथासी ( ३७३ ) आडपण म्हणे धरा बीजे कीजो–साष्टाग नमस्कार घालून प्रार्थना करितों कीं माझ्या घरीं यावें ( ३७६ ) तिया देशीची–तिये–तया दिशैसीन्चि–दिशासी थानपती –स्थानपति ( ३७७ ) बिरडे–जन्ममरणाचें वाहणें फोडणें तें ( ३७९ ) गतायुष्या–गतायुषा–आयुष (सस्कृत)=आयुष्य हें–हन–हि. पोटाळावे=आवडीनें सहज आकाशही कवटाळून धरील इतका तो मोठा होतो–लीलेनें आकाशही कवटाळतो ( ३८३ ) पाईकी=सेवा ( ३८४ ) अभ्यंतर=अंत.करण. पाडे=पवाडे–बरोबरीने ( ३८५ ) आवारी=आवार, देवळाचे आवार का तटबंदी. धुरु–धुर=ध्रुव, अढळ, निश्चळ ( ३८६ ) चैतन्याचियेपौळी=ज्ञानाच्या चौथऱ्यांत, पोवळीमध्यें. ध्यानामृता=ध्यानामृत. ढाळी=अभिषेक करी ( ३८७ ) उदैजता=उगवता. डाळ–डाल=वर्तणुक, सेवा. सात्विका=अष्टसात्विक भावरूपी कमलानी. श्रीत्र्यंबका=गुरुरूपशिवाला लाखोली=लक्ष कमळें. वाये=वाहे ( ३८८ ). सामरसाची–सामरस्याची भराडा=पुजारी ( ३९० ) प्रेमाचेनि भोजे–प्रेमाची भोजे=प्रेमाचे मनोरथ आनंदानें पाहे–वाहे–बाहे ( ३९१ ). शेष तुळिका=शेषशय्या. जळशयनी=विष्णु ( ३९३ ). थाये=पाये=पादसेवा करणारी लक्षुमी=ते लक्ष्मी वाहे=उभा राहे ( ३९४ ). माये–माय. स्तन्योत्सुक–स्तन्यसुखे ( ३९६ ). पाठी–पोटी होये–होय ( ३९७ ) वडप=वृष्टि वृत्तिचे–वृत्तीचे –व्रताचे=सेवावृत्ती होय ऐसऐसे–ऐसैसे वियें मन–मनचि वियें ( ३९९ ).

आत्माच जसा का तो तेथें पांचही प्राण नेहमीं त्या आत्मरूपाचे होऊन असलेले असे मनाचे मोकळे त्याचें अंतःकरण हें उजु, तेथेंच लाविलेलें असे जसें का अमृताची धारच एक अमर्त्यपण पाहाणारी अशी त्या अंतरामध्यें वाहात असणारी – जसें का एक माहेरघरच ह्या वर दिलेल्या चिन्हाचें – लक्षणाचें तो. (३६७)

हे सुभटा अर्जुना ! असा तो पुरुष आर्जवाची प्रत्यक्ष मूर्तीच होय. व ह्या ज्ञानाने तेथेंच जणूं आपलें (जीवो गुरु। जीव पक्षी। घरचे एक राहाटणारे – राहाणारे) घरटे केलें असें जाण एकसारखे – नेहमी जे जागे असे उभे तेथें देवाचा पहारेकरी जसा किंवा गस्तच जशी एक घालणारें असें तें ज्ञान होय (घरटा).

(३६८)

आता गुरुभक्तीची जी काहीं तऱ्हा किंवा परोपरीची बोलणी तीं सागतो – हे चतुरनाथा, तेथें अवधान असो दे. (३६९)

गुरुसेवा ही सर्व भाग्याची जन्मभूमि होय अवघीं दैवें ही ह्या सेवेमध्येंच जन्मलेलीं होय. जन्मभूमि ही सेवाच जाण ह्या दैवावर उभें राहाणे ज्यायोगें होते ज्यामुळें व ही सेवा जीव जो तो पतित असाहि जरी असला तरी त्यास ब्रह्मरूप करते ही सेवा अशुचि असा जो जीव त्यास ब्रह्मरूप करते. (३७०)

अशी ती आचार्याची योग्यता देणारी जी काही एक उपासना ती तुजला सागतो – तुजपाशी ती प्रकट करितों – तुझें लक्ष हें एकाग्र असेंच असो दे. (३७१)

सकल पाण्याची जी विपुल संपत्ति का उन्नती ही बरोबर घेऊन गंगा ही उदधि जो सागर त्यास भेटण्यास आली असें तें होय किंवा श्रुति ही आपले अनेक सिद्धान्त बरोबर घेऊन महापदावर म्हणजे ब्रह्मपदावर आरूढ होण्यास येती जाहली आहे (३७२)

अथवा आपुलें सर्व जीवित वेटाळून घेऊन आपल्या अगाभोवती लपेटून घेऊन गुण का अगुण अशी ती जीवदशा अवघी एकंदर उखितें – गुमास्ता देणेकरी दारात येऊन तेथें प्रियेचे जें काही उचिततेचें आपल्या प्राणनाथास – आत्म्यास योग्य करून दिली – प्राणनाथ प्राणनाथच खरा असें जें तिचे देणे हें योग्यता भारच तेथें पोहचविला असें होय अशी ती श्रुति ही महान् योग्यता पदरी बाधून असलेली तिनें आत्म्यास – प्राणनाथास आत्मा केलें – प्राणनाथ केलें – त्याची योग्यता उपास्ति त्याचे ठायी स्थिरविली व वर प्राणनाथ म्हणून ही पण ती अति उच्च पदवी स्वतःकडे घेऊन आहे ते ते ‘ महापदे ’ होय. (३७३)

त्याप्रमाणें आंतबाहेर – अंतःशुचि बहिःशुचि असें जें कांहीं आपलेपण ज्यानें गुरुकुळी ओपिलें आहे – ओपिले – वोपले – ओपा – लिगदेहच तो जसा सर्व दर्शनें पाहाणारा – तेथें घराणे का घर का देश किंवा शरीर अथवा शरीरसमुदाय हे गुरुयोग्यतेचे करून आपणहि त्यांत आपुले सर्वस्वानें राहिला व तें शरीर म्हणजे एक भक्तीचें घर जसें असें केलें. (३७४)

गुरुगृह ज्या देशास आहे – ( देश = प्रांत, ठिकाण, भाग ) ( गृह = आश्रय, घर, गुरुनाम ) ज्या देशामध्यें आहे तो देशच आपल्या मनात वसविला जशी का विरहिणीच एक जशी वल्लभास बसवीत बसवती झालेली – वसवून असणारी. (३७५)

तो प्रातच मुळीं मनांत वसता झाल्यानें तिकडून येणारा जो देहावरील वारा–जो देवाचा असा म्हटला जातो – असा तो वारा जेथून येत असेल तेथें सामोरा जाऊन–मनच धाव घेऊन समोर झालें–सामोरें होऊन स्वागत करूं लागलें व ( साष्टाग नमस्कार घालून ) माझ्या घरी चलावें अशीच प्रार्थना करितो तो – “ तो आड पडून घरावीजे कीजे म्हणे ”—— (३७६)

खरें प्रेमच एक तेथें–तेथें त्या प्रेमास भुलणेंच जसें का होणारें – त्या देशींची (दिशाची – दिशेसीची) बोली ही आवडणारी अशी–भलतीही जरी ती, तरी ती आवडून घेतलेली अशी आवडणारीच–तेथें जीव जो तो तर एक वतनदारच त्या देशीच्या बोलीस आवडून घेणारा–जीव हा स्थानपति–थानपति म्हणजे वतनदारच एक, त्या गुरुगृहामध्यें – गुरुनाम – गुरुरमण, आश्रयरूपी अर्थाचा करून घातलेला. (३७७)

ह्या देहगावामध्यें एकचें असें असलेलें जें–मन–तें तर गुरुआज्ञेनें आवरिलेलें–आज्ञाच ती का नामच तें एक तें पक्के धरून आहे असें तें. जसें का वत्सलता ती कां वत्सच एक व तेथील तो प्रेमाचा धागा किंव दावे – (विक्षरो रोहितो मार्गो हेतुर्दामोदरः सहः) – जसें ह्या वृत्तीस लाविलेलें.

(हा जो देह प्राप्त झालेला त्या देहबुद्धीचा जो सर्वथैव आहे त्याजला तर आतां ही देहबुद्धि फारच जड झाली व एकदाचे हें जन्ममरणाचें येणें जाणें – ज्ञानप्राप्तीचें साधन हा देह तो योग्य व्हावा, ज्ञानास यावा अशी जी देहगावीं येणारी इच्छा.) (३७८)

(दामोदर नावे दावे बाधिलें) तो म्हणूं लागला कीं हे जन्ममरणाचें बिरडें केव्हाचें एकदां नाहींसें होईल बरें–ती स्वारी केव्हा बरें भेटेल व निमिष हेही पण युगापेक्षाही जास्त असेंच तो मानून असतो–जें काहीं एक ह्या बुद्धीनें घेतलेलें एक महत्त्व त्या ज्ञानप्राप्तीस येण्याचें का स्वारी भेटण्याचें तेथें तो अतिशयतेच्या उत्सुकतेने असतो (३७९)

असा जो गुरुग्राम तेथून जें काहीं आलें किंवा स्वत गुरूंनीं ते धाडलें तर याजला जसें का आयुष्यच भेटलें असें होते गतायुष जो त्यास त्याच्या देण्यानें आयुष्मान् भव अशा एका आशीर्वादावरच उभें केलें होतें (३८०)

अहो जो अकुर सुकून जात आहे त्याजवर जर अमृताच्या धाराचें सिंचन झालें असें येथे (होऊन असते) होतें—किंवा डबक्यामधील मासा जसा का सागरास जाऊन मिळाला असें तें होय (मन हें जें अल्प तें सागरास आलें – सागराएवढें झालें) (३८१)

अथवा गरीबानेंच एक द्रव्याचा साठा पाहिला – रंकास एक द्रव्यनिधीस मिळाला अथवा आधळा जो त्यास – त्याने डोळे उघडल्यामुळें दृष्टि आली किंवा भणंग भिकारी जो त्यास इंद्रपदानें आपलेसें केलें – इंद्रपद त्यास प्राप्त झालें, असें तें होय (३८२)

हें शरीरच ज्याने तपविलें तेथें श्रेष्ठपणाचा एक देशच का घरानेंच आपलेसें केलें – ज्ञानास आलें – असें तें 'गुरुकुळीचें' नांवही जरी त्याचे कानीं आलें तरी जो महासुखाचा होऊन मोठेपणच एक त्यास प्राप्त झालें असें होते. इतकें काहीं तेथें महत्त्व का मोठेपणावर तो आरूढ होतो कीं सहज लीलेनेंच आकाशालाही कवटाळावेसें असें होतें सुख हें महापदास येऊन तेथें आवडजीवितेवर इतकें मोठेपण घेतलें, आवड ती इतकी थोर झाली कीं, आकाशही पण सहज लीलेनेंच ती कवटाळून असते. (३८३)

अशी ज्याच्या ठिकाणीं ह्या शरीरास तपश्चर्येवर उभे होऊन श्रेष्ठपणास आणणें जें – बापपणाचें होणेंच एक जेथे – अशी आवड गुरुकुळाची ज्याच्या ठायीं पाहाशील तेथें असें जाण कीं ज्ञानच एक तेथें सेवा करीत आहे. (३८४)

तेथे मध्यभागीं का माजघरामध्यें अभिप्रायाचे का प्रियपणाचें किंवा प्रीतीनें प्रेयाचें होणें – परमप्रेमानें श्रीगुरूंचें – व्यापकपणानें व्याप्यव्यापकभावानें पाहिलें असता तेथें बापच एक श्रेष्ठपणा पावून असलेला असें तें रूप – श्रीमुख – रूपडें ध्यानात आणून उपासिन राहातो – तें ध्यानास आणून सेवाच ती का पूजाच ती असें करून असतो (३८५)

हृदयशुद्धीच्या राउळामध्यें – आवारामध्यें तो ध्रुव म्हणजे अविनाशी तत्त्व जें अखंड असें निश्चळ असें तें उपास्य करून असतो व मग सर्व विलास, अभिप्राय का स्वभाव हा सेवकजनच ते जसे का – का आश्रित जे ते तो स्वतःच होऊन असतो. अतींद्रिय जें मन त्या मनाच्या शुद्धीमध्यें का जीव जो त्याच्या शुद्धीकडे – का अंत करणाच्या पवित्रतेकरितां तो ध्रुव म्हणजे अढळ, निश्चळ, अविनाशी, स्थिर, अखंड असें जें पद तेंच उपास्य आराध्य तें श्रीमुख करून मग ह्या जीवदशेचे जे विलास, स्वभाव का चेष्टा त्या सेवकजनच जसे ते, तो स्वतः आपण होऊन असतो. (३८६)

चैतन्याच्या पौळी म्हणजे ज्ञानाच्या चौथऱ्यांत जेथें आनंदच एक, देव, देऊळ, देवालय, देवराव, देवश्रेष्ठ तेथें ध्यान तत्पर होतें. अमृताची धारच एक श्रीगुरुलिंगी शाळुंकेत बसवलेली जी शिवमूर्ति तेथें अभिषेकाची करून असते. (३८७)

बोधरूपी सूर्य उगवला म्हणजे अष्टसात्विक भावाना बुद्धीची (बुद्धि जीवो गुरु· ।) (वर्णानां ब्राह्मणो गुरुः ।) [ वर्ण=वस्तुधर्म, काति, अक्षर, आकृति, उत्कर्ष, मनुष्यजाति स्तुति करणें जें, निरूपण करणें जें.] वर्तणूक देऊन जसे का बोध तो (चोवीस गुरूच जसे त्याचेकडून, प्रत्येकापासून, भिक्षा म्हणून आणि फुलाची डाळची जी) जशीं फुलेंच तीं, तीं लक्ष कमळेंच जशीं कीं, श्रीगुरुरूपी शिवाला वाहातो. (३८८)

काळशुद्धीसाठी तिन्ही त्रिकाळ जीवदशारूप धूप जाळून ज्ञानदीपाने जो निरंतर श्रीगुरुशिवाला– शिवगुरूला – ओवाळतो (जीवअवस्था शिवैक्यानें - जीवशिवैक्यानें – ज्ञानदीपानें )

बुद्धि‘ तत्त्वा ’संबंधीं सांख्यतत्त्वज्ञाचें मत खालीलप्रमाणें आहे (पा. यो. सू १८ व १९/२) =जगत् ,विश्व, शरीर, देह, कलेवर, ज्ञान विचार, अंत.करणशक्ति जाणणें, आठवण देणें. बुद्धीचे, गुणाचे प्रकार ते – १ विशेष, २. अविशेष, ३ अलिंग, ४ लिंगमात्र होत

विशेष=(पा यो सू. १८/२) प्रकाशक सर्व विश्व हें त्रिगुण आणि इंद्रियें याच्या संयोगानें उत्पन्न झालें आहे. प्रकाश, क्रिया आणि स्थिति हा त्याचा त्रिविध स्वभाव आहे अनुभव आणि युक्ति याची प्राप्ति पुरुषास व्हावी हा त्याचा हेतु आहे

गुणाचे प्रकार= (पा. यो. सू १९/२) विशेष, अविशेष, लिंगमात्र, आणि अलिंग असे चार प्रकार गुणांत आहेत प्रकृति ही विश्वाचे सूत्र व मूळ कारण आहे

विशेष=आपल्या इंद्रियानीं त्याचा अनुभव आपणास होतो त्या स्थूल तत्त्वास ‘विशेष’ असें नांव आहे.

अविशेष – अत्यंत सूक्ष्म अशा रूपतत्त्वास ‘अविशेष’ अशी संज्ञा आहे. प्रत्येक मनुष्याभोंवतीं एक प्रकारचें तेजोवलय असते तें तेजोवलय आपणातील तत्त्वाचेंच बनलें आहे. फुलातील तन्मात्राचें अस्तित्व त्याच्या सुवासावरून प्रत्ययास येतें. तसेंच आपणहि सुविचार किंवा दुर्विचाररूपी गंध बाहेर टाकत असतो. मनुष्याचें पावित्र्य त्याच्या सद्‌विचारावर अवलंबून असतें. मनुष्यें कारणरूप असून जागा कार्यरूप असतात आणि नंतर त्या जागा कारणरूप होऊन मनुष्यातील सुविचार जागृत करण्याचें कार्य करतात.

लिंगमात्र=म्हणजे बुद्धि. प्रकृतीचा पहिला दृश्य अथवा स्पष्ट गुण बुद्धि हा होय. नंतर बुद्धीपासून इतर गुण निर्माण होतात शेवटचा गुण—

अलिंग हा आहे. बुद्धितत्त्वात प्रगट होऊन व्यापून स्थूल जग निर्माण होतें आणि त्याच स्थूल तत्त्वात फरक होत होत त्यात बुद्धि दृग्गोचर होऊं लागते. अशा रीतीनें ही क्रिया अखंड मंडलाकार रीतीनें सुरू आहे. ज्याप्रमाणें बियांपासून वृक्ष निर्माण होऊन त्याच वृक्षातून पुन्हां बीज निर्माण होणें – तसेंच हें आहे. (३८९)

गुण = माधुर्य, ओज, प्रसाद हे काव्यगुण मनुष्य, पदार्थ, मूळधर्म—दिव्याची वात—ज्ञानेंद्रियरूपादि पंचविषय – अंत करण – बुद्धि' आधिक्य श्रेष्ठत्व सद्गुण – संधि, विग्रह, यत्न, आसन, संश्रय, द्वैध, रूपादि २४ गुण आचारी, भीमसेन, त्याग. गुणातीत = ईश्वर. गुणाढ्यक = पिता. गुणेश्वर = चित्रकूट पर्वत. गुणउज्वला = जुई. गुणलयनी – लयनिका = तंबू. गुणवृक्ष – वृक्षक = डोलकाठी गुणसाख्यान = साख्यशास्त्र. गुणसागर = ब्रह्मदेव.

समरसपणाचें ऐक्य हीच रससोय म्हणजे पाकनिष्पत्ति तेथें जो अखंड अर्पण करीत असतो – व आपण पुजारी होऊन श्रीगुरु जे ते लिंगच जसे का – सूक्ष्मतरम् जे का ( शाळुंकेत बसलेली ती शिवगुरुमूर्ति – गुरुलिंग – श्रीगुरुरूप जो शिव). (३९०)

तसेच जीवदशेच्या शेजेवर मोठेपणाचे जे शिवगुरु किंवा श्रीगुरु हे 'कातच एक' करून जो भुंजे म्हणजे भोगतो, उपभोगतो असे प्रेमाचे मनोरथ ही बुद्धि पाहूं करते – मनोरथ वाहून असते. ह्या जीवदशेचे जे शेजबाज तेथे कात ते श्रीगुरु केले व आनंदाच्या मनोरथानीं ह्या बुद्धीनें उपभोगणेंच एक केलें (३९१)

अंतरीं अनुराग भरून प्रीतीचा होऊन कोणे एकादे वेळेस तो अनुराग ताबुसपणाचें तें वस्त्रच एक अशी ती प्रीति क्षीराब्धितनया लक्ष्मी – जसा का क्षीराब्धीच एक – ती प्रीति तो अनुरागच एक जो करितो (३९२)

तेथें ध्येय जें तेथे एकाग्रता – ध्येयध्यान हें बहुसुखाचें व तीच एक निर्दोष अशी शेषशय्या व तिजवर पहुडले आहेत ते श्रीगुरु म्हणजे श्रीमहाविष्णूच एक असें जो तो भावितो. (३९३)

मग त्या श्रीविष्णूचे पादसेवन करणारा आपण स्वत.च लक्ष्मी होतो व गरूड होऊन आपण त्याचें वाहन होतो – त्याना पाठीवर वाहातो (३९४)

नाभीच्या ठिकाणीं जन्मणारा तो ब्रह्मदेवही पण आपणच होतो – असें श्रीगुरूच्या प्रेमाचे तें त्याचें करणें हें जसें का तें ध्यानच होय – तेथे मनोधर्मानें असेंच ते ध्यान रचिलें त्यानें (३९५)

एकादे वेळेस श्रीगुरूंना माय म्हणूं कल्पूं लागून तेथे भाव जे ते मनोविकाराचे विलासच उत्कर्ष पाहाणारे असे व त्यावरही स्तन्यसुखाकरिता जसा मायेच्या अंकावर लोळत राहिला (३९६)

ज्ञानतरूच्या तळीं – चैतन्यतरूच्या खाली श्रीगुरु हे धेनु कल्पून आपण तिचें वत्स होतो जसा का – ( ह्या मनोधर्माच्या गोष्टी भाव प्रेमास आल्यानें तेथे बुद्धि ही व्यवहार्य करून एक प्रेमच जसें सर्वभेद तेथीचें झालें असें तें करणें हें लोभ किंवा प्रेमच एक ह्या कुटुंब वत्सलतेचा जसा ) (३९७)

श्रीगुरुकृपारूपी स्नेहसलिल किंवा पाण्यामध्यें आपण मासोळी होऊन आत सचार करीत राहातो व हेंच एकादे वेळेस भावबळास आणून असतो – देहधारण जे हा नरजन्म बहुत पुण्याईनें प्राप्त झालेला जो तेथें कृपा – स्नेह – सलिल – देहरूपी पाण्यामध्यें मन हेंच तरंगत राहाणारें – क्रीडा करणारें तेथें हीच भावना करून असणे जें – देहधारण – स्नेह – कृपा – सलिल – पाणी – देहदिवस – मन हेंच जेथें क्रीडा करणारें असें – केलें जाणारें भावबळानें ( 'मन' ओवी ४६५ पाहा. ) (३९८)

श्रीगुरूची कृपा अमृताच्या वृष्टीमध्यें आपण सेवावृत्तीचें रोप होऊन असतो – तेथे सर्व सेवा करणें हेंच त्यानें घेतलें जसें का. त्याचे मन हें सेवावृत्तीस विते वा दिल्यासारखे तें संकल्प करूं लागते. तो सेवावृत्तीचा वतनदारच एक असा होऊन असतो (३९९)

**चक्षुपक्षेविण । पिलु होय आपण ।**
**केसें पैं अपारपण । आवडीचें ॥ ४०० ॥**

गुरुतें पक्षिणी करी। चारा घे चांचुवरी।
गुरु तारुं धरी। आपण कांसे ॥ ४०१ ॥

ऐसे प्रेमाचेनि धांवे। ध्यानचि ध्यान प्रसवे।
पूर्ण सिंधु हेळावे। फुटती जैसे ॥ ४०२ ॥

किंबहुना ययापरी। श्रीगुरुमूर्ति अंतरी।
भोगी आतां अवधारी। बाह्यसेवा ॥ ४०३ ॥

तरी जीवीं ऐसे आवाके। म्हणे दास्य करीन निके।
जैसेनि गुरु कवतिके। माग म्हणती ॥ ४०४ ॥

तैसिया साचा उपास्ती। गोसावी सुप्रसन्न होती।
तेथें मी विनंती। ऐसी करीन ॥ ४०५ ॥

म्हणेन तुमचा देवा। परिवार जो आघवा।
तेतुलीं रूपें होआवा। मीचि येकु ॥ ४०६ ॥

आणि उपकरती आपुली। उपकरणें आथि जेतुली।
माझी रूपें तेतुलीं। होआवी जी ॥ ४०७ ॥

ऐसा मागेन वरू। तेथ हो म्हणती श्रीगुरु।
मग तो परिवारू। मीचि होईन ॥ ४०८ ॥

उपकरणजात सकळिक। तेही मीचि होईन एकैक।
तेव्हा उपास्तीचें कौतुक। देखिजेल ॥ ४०९ ॥

गुरु बहुताची माये। परी एकुलती होऊनि ठाये।
तैसे करुनि आणवाये। कृपे तिये ॥ ४१० ॥

तया अनुरागा वेधु लावी। एकपत्नी व्रत घेववी।
'क्षेत्रसंन्यास' करवी। लोभाकरवी ॥ ४११ ॥

चतुर्दिक्षु वारा। न लाहे निघो बाहिरा।
तैसा गुरुकृपे पांजरा। मीचि होईन ॥ ४१२ ॥

आपुलिया गुणांची लेणी। करीन गुरुसेवे स्वामि मिळणी।
हे असो होईन गवसणी। मीचि भक्ति ॥ ४१३ ॥

गुरुस्नेहाचिये वृष्टी। मी पृथ्वी होईन तळवटी।
ऐसिया मनोरथांचिया सृष्टी। अनंता रची ॥ ४१४ ॥

म्हणे श्रीगुरूचें भुवन। ते आपण मी होईन।
आणि दास होऊनि करीन। दास्य तेथिचे ॥ ४१५ ॥

निगमागमि दातारे। जे ओलांडिजति उंबरे।
ते मी होईन आणि द्वारें। द्वारपाळ ॥ ४१६ ॥

पाऊवा मी होईन। तिया मीचि लेववीन।
छत्र मी आणि करीन। बारिपण ॥ ४१७ ॥

मी तळु उपरि जाणविता। चवरु धरु हातु देता।
स्वामिपुढे खोलता। होयिन मी ॥ ४१८ ॥

मी होईन सागळा। करु सुईन गुरुला।
सांडिती जो नेपाळा। पडिघा मीचि ॥ ४१९ ॥

हडपी मी वोळगेन। मीचि उगाळु घेईन।
उळिग मी करीन। आंघोळीचे ॥ ४२० ॥

होईन गुरुचें आसन। अलंकार परिधान।
चंदनादि होईन। उपचार ते ॥ ४२१ ॥

मीचि होईन सुवारु। वोगळैन उपहारु।
आपणपे श्रीगुरु। ओवाळीन ॥ ४२२ ॥

जे वेळी देव आरोगिती। तेव्हां पांतिकर मीचि पांती।
मीचि होईन पुढती। देईन विडा ॥ ४२३ ॥

मी ताट काढीन। सेज मीचि झाडीन।
चरणसंवाहन। करिन मीचि ॥ ४२४ ॥

सिंहासन होयिन आपण। वरी श्रीगुरु करिती आरोहण।
होईन मी पुरेपण। वोळगेचे ॥ ४२५ ॥

श्रीगुरुचें मन। जया देईल अवधान।
तो मी पुढा होईन। चमत्कार ॥ ४२६ ॥

तया श्रवणाच्या आंगणी। होईन शब्दाच्या आक्षौणि।
परिसु (स्पर्श) होईन घसणी। आंगाचिये ॥ ४२७ ॥

श्रीगुरुचे डोळे। अवलोकने स्नेहाळे।
पाहाती तिये सकळे। होईन रूपें ॥ ४२८ ॥

तिये रसने जें रुचेल। तो (तो) रसु मिया होयिजैल।
गंधरूपें कीजैल। घ्राणसेवा ॥ ४२९ ॥

एवं बाह्यमनोगत। श्रीगुरुसेवा समस्त।
वेंटाळीन वस्तुजात। होऊनिया ॥ ४३० ॥

जंव देह हे असैल। तंव ऐसी वोळगी कीजैल।
मग देहांती नवल। बुद्धि वाहे ॥ ४३१ ॥

इये शरीरीची माती। मेळवीन तिये क्षिती।
जेथें श्रीचरण उभे ठाती। श्रीगुरुचे ॥ ४३२ ॥

कासे – कास (४०१) थावें – धावे = बळानें. ध्यान – ध्यानातें. हेळावे = लाटावर लाटा, तरंग, लाटा. फुटतु जैसा – फुटती जैसे = आदळत असतात (४०२). आवाके = उमेद, अवसान. जैसे – जंसेनि. कवतिके = कौतुके (४०४). उपास्ती = भक्तीनें, उपासनेनें. सुप्रसन्न = प्रसन्न. तेथें – तेथ (४०५). परिवार = लवाजमा. म्हणेन – म्हणो. तेतुलीं – येतुले (४०६). उपकरणी = उपयोगी पडणारीं उपयोगाचीं

पूजापात्रें. जी=स्वामी (४०७) एकुलती–एकलौती–एकोलती=एकट्याची. आपण–आण=शपथ घालून वाये=शपथ घालून (४१०). एकपत्निचे=एकपत्नी (४११). चातुर्दिक्षु–चतुर्दिक्षु=वारा चार दिशांस वाहातो. निगो–निघे–निघोन–निघो. पांजरा=पिंजरा (४१२). गुरुसेवे स्वामि मिळणी –गुरुवेशा मिळणी–गुरुसेवे स्वामिणीः हे मीच होईन गवसणी। मीचि भक्ति–मी पृथ्वी होईन। गुरुभक्तीसी (४१३). भुवन–भवन (४१५). निगमागमि=जातायेतांना (४१६). पाऊवा–पाउका. छत्र मी आणि करीन बारिपण=छत्रधराच्या पाळीची चाकरी–चवरी वारणें किंवा छत्रचामर वारणें जें (४१७) तळु उपरि जाणविता=खांचखळगा आहे, उंचवटा आहे असें ललकारणारा छडीदार चोपदार चवरु धरु=चवरी धरणारा–चवरधर. खोलता=वाटाड्या–खोलता (४१८). सागळा=झारी धरणारा सागळ=झारी. गुरुला=चूळ भरण्याचें पाणी नेपाळा=चूळ टाकण्याचें पात्र (तस्त). पडिघा=थुंकण्याची पिकदाणी (४१९). हडपी–हडप=पानदान. उगाळु=चावलेला विडा. उळिग=चाकरी (४२०). सुवारु=आचारी. वोगळैन=वाढीन (४२२) आरोगिती=जेविती. पातीकरु=पंक्तीस जेवणारा (४२३). मी ताट–ताट मी. चरणसंवाहन=पाय दाबणें करिन मीचि–मीचि करीन (४२४). वोळगेचे=सेवेचे (४२५) तो मी पुढें–तो मी पुढां (४२६). शब्दाच्या आक्षौणि=शब्दाच्या असंख्य सेना. परिसु–स्पर्श (४२७) जो–जो जो तो–तो तो (४२९). वेंटाळीन–आवरीन (४३०) असैल–असेल. ऐसी वोळगी–वोळगी ऐसी. कीजैल–किजेल. आहे–वाहे (४३१).

ज्यास अद्यापपावेतो डोळे आले नाहींत, ज्याचे डोळे अद्याप उघडले नाहींत, का ज्यास अद्याप पंख फुटलें नाहींत असें तें पक्ष्याचे पिलुं आपण होतो असें तें सेवेच्या आवडीचें अपारपणच एक तेथें (४००)

व श्रीगुरूंना पक्षिणी करून चंचुभर चारा घेऊन गुरुतारुला चिकटून राहातो व आपण कासेला लागलेला असा होतो (४०१)

अशा तऱ्हेच्या प्रेमाच्या धावानी–बळानें–ध्यान ध्यानातें प्रसवूं लागतें–ध्यानानें ध्यान ध्यानास येतें–ध्यान प्रसवतें व ध्यान हें आत बाहेर भरभरून येऊन असतें–जसें का सिंधूच तो, तेथे लाटांवर लाटा आदळणाऱ्या–का तरंगावर तरंग हे येऊन असणारे–उभरून येतो, सुभरून येतो असा तो सागरच जणूं सागरपणास आला. अहो लाटावर लाटा आदळणें–तरंग तरंगावर हेलकावे खात राहाणे हाच एक सागराचा विशेष असा गुण तो तिथे असतो–तरच बरे जळे बहार जशी–तसें तें ध्यान ध्यानास येणारें किंवा एकाग्रता होणारी. (४०२)

याप्रमाणें श्रीगुरू (प्रतिमा, आकृति, देह) ची मूर्ति ही अतरामध्यें उपभोगीत असतो–तेथेंच एकाग्र होऊन आपला सर्व व्यवहार, आचार, चर्या ही तेथेच मुळी एकाग्रतेनें स्थिर केली. असें ह्या जीवदशेचें जें काहीं एक होणें ते शिवस्वरूपी जी श्रीगुरुमूर्ति तेथेंच सामरस्यानें जी स्थिरता पाहिलेली अशी किंवा याप्रमाणें ती त्याची अंतरामधील सेवा व तिचें लक्षण हें सांगितलें. आता यावर बाह्यसेवा ती कशी तें सागतों (४०३)

तो अशा तऱ्हेची उमेद आपल्या जीवीं धरून असतो कीं तिथें अवसानच एक तो घेऊन म्हणूं करतो कीं निरभिमानी व लहान होऊन, कल्याणच एक व्हावें असा विचार पुढे घेऊन मी दास्य एक करीन, ज्यायोगे श्रीगुरु कौतुकास येऊन प्रसन्न होऊन म्हणूं करतील कीं काहीं जें पाहिजे असेल, इच्छित असेल तें, अपेक्षित असेल तें माग (४०४)

अशा तऱ्हेच्या खरेपणाच्या भक्तीनें–उपासनेनें–गोसावी स्वामी प्रसन्न होतील, सुप्रसन्न होऊन असतील. तेव्हां मी अशी त्याना विनंती करीन कीं— (४०५)

तेथें योग्यताच एक योग्य केली–महत्त्व महत्त्वास आणिलें–भक्ति भक्तीची झाली, उपासना ही खरेपणास आली तेथें गोसावी सुप्रसन्न होऊन असतात तेथें त्यांना भक्तीनें विनंती करीन कीं— (४०६)

अहो जी श्रीदेवा, तुमचा जो ( लवाजमा ) परिवार, आश्रित सर्व जो तितकीं रूपें मीच एकटा होऊन असावा – व्हावा – 'म्हणो अथवा परिवार येतुले रूपें मीच येकु हो आवा'— (४०७)

अहो जी स्वामी, जेतुकी उपकरती उपकरणी – उपयोगी पडणारीं उपयोगाचीं पूजापात्रें तेतुकीं माझीं रूपें अहो जी होआवीं – व्हावींत, असा वर मागेन. तेथें श्रीगुरु 'हो' म्हणतील व मग तो परिवार मीच होईन. (४०८)

श्रीगुरु बहुतांची ( विपुलतेची कामधेनु जशी का ) अनेकांची माय खरी तरी पण आपणच तिथे तिचें एकुलतें एक 'लेकरूं' अगदीं खरेपणानें आपण आहोंत अशी शपथच वाहून असणें जें तिचे कृपेकरितां जसें कां. बहुताची अनेकाची मायच ती, पण आपणच तें एकुलतें एक लेंकरूं होऊन आपली आपणच वाहिली – वाहून घेणें त्या माउलीच्या कृपेसाठी जसें कां (४०९)

उपकरणजात – साधन पदार्थ मात्र, समुदाय सकळ जे, ते एक एक मीच होईन, आणि तेव्हांच मग काय तें खरेंखुरें जें कौतुक ह्या उपास्तीस येणारें ह्या योग्यतेवर टेकणारें पदार्थसंपन्नता ती योग्य होऊन आली आहे, असें जें पाहाणें तेंच मग देखीपणाचें होईल – देखणें होईल – देखिजैल – पाहाण्यास मिळेल जसें का. (४१०)

त्या तेथीलच्या प्रेमास वेध लावून का स्वाभाविक ध्यास लावून एकपत्नीव्रतच त्या प्रेमानें – श्रीगुरूंनीं घेतलेलें असें करून ठेवितो जो – कां लोभ तो जसा का हा एका एकुलत्याच्या क्षेत्रामध्येंच सर्व कांहीं पोहोंचलेला जसा का तसा एक क्षेत्रसंन्यासच घेतल्याप्रमाणें हा लोभास करून ठेवितो (४११)

वारा हा चार दिशातच वाहातो. तेथून तो बाहेर निघतच मुळीं नाहीं त्याप्रमाणें गुरुकृपेसाठीं पिंजराच मी एक होईन (४१२)

गुरुसेवे – स्वामी गोसावी आपल्या गुणाचीं लेणीं लेववीन – भक्तीस मीच गंवसणी होईन गुरुभक्तीस मीच पृथ्वी होईन. (४१३)

श्रीगुरूच्या प्रेमाची – कृपेची – स्नेहवात्सल्याची वृष्टि मजवरच व्हावी ह्या हेतूनें तळवटी मी पृथ्वी होईन – वगैरे वगैरे अशा तऱ्हेच्या मनोरथाच्या अनंत सृष्टि तो रचीत राहातो (४१४)

तो म्हणूं करितो कीं श्रीगुरूचें भुवन म्हणजे जग किंवा उदक का भवन म्हणजे गृह किंवा क्षेत्र मीच आपण होईन. त्याचा दास होऊन तेथीलचें दास्य करीन, तेथीलची सेवा करीन. (४१५)

निर्गम म्हणजे बाहेर जाणें व आगम म्हणजे उत्पन्न होणें अथवा आंत येणें किंवा निगम आगम म्हणजे वेद जे तेथें आपण दातारानीं उंबरे ओलाडण्याचे करावेत ते मी होईन. तसेंच उंबरेही पण तेथीलच्या द्वारपाळासहित मी होईन. (४१६)

पाउवा, पादुका मी होईन व त्या मीच त्यांना लेववीन – मीच छत्र होईन व त्या छत्राचें वारीपणही मीच करीन. (४१७)

खाच, खळगा, उंचवटा आहे असें ललकारणारा छडीदार, भालदार का चोपदार, तसेंच चवरी घालण्यास हात देणारा, तसेंज स्वामीपुढें वाटाड्या मीच होईन. (४१८)

मी झारी धरणारा होईन – श्रीगुरूंना गुरुळा करण्यास मीच होईन व चूळ टाकण्याचें तस्तही पण मीच होईन – तसेंच थुंकण्याची पिकदाणीही पण मीच होईन. (४१९)

पानदान मी पुढें करीन – वोळगेन – चावलेला विडा मीच होईन – उगळु – व आघोळीची उळिग चाकरी मीच करीन. (४२०)

श्रीगुरूचें आसन मी होईन – अलंकार करणें तेंही पण मीच त्यांना करीन व चंदनादि पूजोपचार तेही पण मीच होईन. (४२१)

मीच सुवारू म्हणजे आचारी होईन व उपहार वाढीन (वोळगेन उपहारू) व आपल्या सर्वस्वानें श्रीगुरूंना ओवाळण्याचें करीन. (४२२)

ज्या वेळेस देव जेवतील – जेवतात तेव्हां त्यांच्या पंक्तीस बसणारा मीच पंक्तीला असेन; व जेवण झाल्यावर मीच पुढें होऊन त्यांना विडा देईन. (४२३)

मीच ताट काढीन; मीच अंथरुण झाडीन; मीच पाय दाबीन (पाय रगडणें) – चरणसंवाहन मीच करीन. (४२४)

आपण मीच सिंहासन होईन व त्यावर श्रीगुरु आरोहण – (आरोहण = शुद्धबुद्धिरूपी जी उत्तम स्त्री तेथें सर्व काहीं सेवेस घेतलेलें – मनुष्यलोकींचें रत्नच ती, का मनुष्यवंशाचा एक वृक्षश्रेष्ठ – असा तो) तेथें त्या सिंहासनावर चढण्याचें साधन मीच होईन. अशा तऱ्हेनें सेवेचें पुरतेपण मी आपल्या अगीं बाणून असेन. (४२५)

श्रीगुरूचें मन ज्याकडे अवधान देईल – लक्ष पुरवील तें मीच होऊन त्याचेपुढें होईन किंवा तो पदार्थ मीच होऊन त्याचे किंवा त्यानी पुढा होईन – व आतां तर एक चमत्कारच जसा – (का अगाचा तो तेथें आश्चर्यकारक गोष्ट चमत्कृतीच एक – ती माझी सेवा आश्चर्य करण्यासारखीच होईल ). (४२६)

त्याच्या श्रवणाच्या आगणामध्यें मी शब्दाच्या असंख्य सेना होईन व त्याचा स्पर्श जो तो आपण आपल्या अंगच्या छावणानें ( त्यांना लेववीन ) आपण मी होईन (४२७)

श्रीगुरूंच्या डोळ्यांनीं जी कांहीं वस्तु स्नेहाळपणानें पाहिली असेल तेथें तीं पाहातीं पाहिलेलीं तीं सकळ रूपें मीच होईन. (४२८)

त्याच्या रसनेला जो रस रुचेल तो मीच होइजेल व गंधरूपानेंही पण घ्राणसेवा कीजेल. (४२९)

ह्या प्रमाणें बाह्य मनोगततेची जी काहीं गुरुसेवा ती वस्तुजात होऊन मी आवरून घेईन. (४३०)

जोपर्यंत हे देह असेल तोपर्यंत अशी सेवा कीजैल व मग देहातीं तर नवलच एक – तेथें बुद्धि ही वाहाणारी होऊन मी असेन (४३१)

ह्या शरीराची माती जेथें श्रीचरण श्रीगुरूचे उभे ठाती, तेथेंच, त्याच क्षितीमध्यें मेळवीन (४३२)

**माझा स्वामी कवतिकें। स्पर्शत जिये उदकें।**
**तेथ लया नेईन निकें। आपी आप ॥ ४३३ ॥**

**श्रीगुरु वोवाळिजति। कां भुवनीं जे उजळती।**
**तथा दीपाचिये दीप्ती। ठेवीन तेज ॥ ४३४ ॥**

**चवरी हन विंझणा। तेथ लयो करीन प्राणा।**
**मग अंगीचा वोळंगणा। होईन मी ॥ ४३५ ॥**

**जिये जिये अवकाशीं। श्रीगुरु असती परिवारेसी।**
**आकाशा लया आकाशी। नेईन तिये ॥ ४३६ ॥**

**परि जितु मेला न संडी। निमिषु लोका न धाडि।**
**ऐसेनि गणावया कोडी। कल्पांचिया ॥ ४३७ ॥**

येतुकेवरी धींवसा । जयाचिया मानसा ।
आणि करुनिही तैसा । अगारुची ॥ ४३८ ॥

रात्री दिवो नेणे । थोडे बहु न म्हणे ।
म्हणियाचेनि दाटपणें । साजा होये ॥ ४३९ ॥

तो व्यापक येणे नांवें । गगनाहूनि थोरावे ।
एकला करी आघवे । एकेचि काळीं ॥ ४४० ॥

हृदयवृत्ती पुढा । आंगचि घे दवडा ।
काज करी होडा । मानसेसी ॥ ४४१ ॥

येकादिया आळामाळा । श्रीगुरुचिया खेळा ।
लोण करी सकळां । जीविताचे ॥ ४४२ ॥

जो गुरुदास्य कृशु । जो गुरुप्रेमें स्वपोषु ।
गुरुआज्ञेनि निवासु । आपण जो ॥ ४४३ ॥

जो गुरुकुळ सकुळीकु । जो गुरुबंधुसौजन्य सुजनु ।
जो गुरुसेवा सव्यसनु । निरंतर ॥ ४४४ ॥

गुरुसंप्रदाय धर्म । ते जयाचे वर्णाश्रम ।
गुरुचर्या नित्यकर्म । जयाचें गा ॥ ४४५ ॥

गुरुक्षेत्र गुरुदेवता । गुरुमाय गुरुपिता ।
जो गुरुसेवे परौता । मार्गु नेणे ॥ ४४६ ॥

श्रीगुरुचें द्वार । ते जयाचें सर्वस्व सार ।
गुरुसेवका सहोदर । प्रेमें भजे ॥ ४४७ ॥

जयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचे मंत्र ।
गुरुवाक्यावांचुनि शास्त्र । हातीं न सिंवे ॥ ४४८ ॥

सिवंतले गुरुचरणीं । भलते कां जे पाणी ।
तेथ तीर्थ यात्रे आणी । तीर्थे त्रैलोक्यींची ॥ ४४९ ॥

श्रीगुरुची उच्छिष्टे । लाहे जै अवचिटे ।
तैं तेणें लाभे विटे । समाधीसी ॥ ४५० ॥

कैवल्यसुखासाठीं । परिमाणु घे कीरीटी ।
उधळती पायापाठीं । चालतां जे ॥ ४५१ ॥

हे असो सांगो किती । नाहीं पार गुरुभक्ती ।
परि गा उपक्रम मती । कारण हे ॥ ४५२ ॥

जया इये भक्तीची चाड । जया इये विषयीचे कोड ।
जो हे सेवेवांचुनि गोड । न मनी कांहीं ॥ ४५३ ॥

तो तत्त्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेचि आवो ।
हे असो तो देवो । ज्ञानभक्तु ॥ ४५४ ॥

हे जाण पासाचौकारे। येथ ज्ञान उघडेनि द्वारे।
नांदतसे जगा पुरे। इया रिती ॥ ४५५ ॥

जिये गुरुसेवे विसी। माझा जीऊ अभिलाषी।
म्हणोनि सोयचुकी। बोली केली ॥ ४५६ ॥

येऱ्हवी असता हाती खुळा। भजना अवधानी आंधळा।
परिचर्येलागुनि पांगुळा। पासुनि मंद ॥ ४५७ ॥

गुरुवर्णनी मुका। आळसी पोसिजे फुका।
परि मनी आथी निका। सानुरागु ॥ ४५८ ॥

तेणेचि पै कारणे। हें स्थूळ पोखणें।
पडिले मज म्हणे। ज्ञानदेवो ॥ ४५९ ॥

स्पर्शति – स्पर्शिजति, स्पर्शत = जी उदकें भुवनें त्यांसी स्वामिनी स्पर्शिलीं जातात. उदकें = भुवनें, जगें. भुवनीं – भवनी उजळती – उजाळिजती. जे – जिये ( ४३४ ). विंझणा = वारा घालणें जेथें. वोळंगणा = सेवाधर्माचा अगच होऊन येईन ( ४३५ ). जितु – जीत. सोडी – संडी. निमेषु – निमेखु – निमिषोन्मेष. धाडी – धडी गणावया कोडी कल्पांचिया – ब्रह्मकल्प कोटि अशाच मोजाव्यात ( ४३७ ). अपारुची – अपारुजो ( ४३८ ). म्हणियाचेनि दाटपणें साजा होये – आज्ञा केली असतां उल्हास मानून – उल्हासयुक्त होऊन सज्ज होतो, साजा होतो ( ४३९ ). व्यापक – व्यापारु – व्यापार येके काळी – एकेचि काळी ( ४४० ) दवडा = धाव काज करी होडा मानसेसी = इच्छा ही सेवेची इच्छा ही मनाशी पैज बाधते ( ४४१ ). आळामाळा = वेळ, सहजपण. खेळा = कौतुकास ( ४४२ ) कृशु = रोडका. स्वपोषु = पालन, वृद्धि. आज्ञेनि निवासु = आज्ञेवरच मुळी ज्यानें आपलें राहाण्याचे ठिकाण किंवा घर तेथें एक आधारच जसा. सकुळीकु = उत्तम कुळातला, एक उत्तम ( पुरुष लक्षणाचा ) गुरुबंधु सौजन्यसुजनु = गुरुभाऊबंद मित्र – त्याचा तो कुलीन व भला असा शुभ, अनायासें लाभलेला योगच एक त्याने सुजन असा भला. सेवा सव्यसनु = सेवा हीच एक व्यसन जसें का – छंदच एक तो त्याने शीण हा नाहींच ( ४४४ ). सप्रदाय = गुरुपरंपरागत उपदेश – चाल – पंथ वर्णाश्रम = ब्राह्मणादि चार वर्णाचे ब्रह्मचर्यादि चार आश्रम. परिचर्या = सेवा. नित्यकर्म = स्वभावसिद्ध कर्म ( ४४५ ). क्षेत्र = पुण्यभूमि देवता = देवाची मूर्ति. परौता = विण दुसरा ( ४४६ ). गुरुचे द्वार = उपाय, साधन, वेळ, दार, द्वार सर्वस्व = तत्त्वांश, स्वसत्तेचें सगळें धन. सार = तात्पर्य, बळ, तत्त्वांश सहोदर = सख्खा भाऊ ( ४४७ ). वक्त्र = तोंड. शास्त्र = धर्मग्रंथ, आज्ञा, नियम, विद्येची शाखा ( ४४८ ) समाधि = चित्ताची एकाग्रता ( ४५० ) कैवल्य = मोक्ष. परमाणु = रज, कण. परिमाणु = मोजमाप ( ४५१ ). उपक्रम = प्रारंभ, चिकित्सा उत्क्रान्त = वृद्धि – वर जाणें ( ४५२ ). भक्ति = उपासना, उपचार, उपचार उपासना, आकृति रचना चाड = मनींची इच्छा, छंद ( ४५३ ). तत्त्वज्ञान = ब्रह्मज्ञान ( तत्त्वदर्शन = विचक्षण, ज्ञानी ). देव = ईश्वर, देवता, राजा ज्ञान = ज्ञाता, विशाळमति. भक्तु = उपासक अनुरक्त, तल्लीन ( ४५४ ) सार = उपाय, साधन. जगा = लोकांना, जगास ( ४५५ ) अभिलाष = इच्छा. सोय = प्रीतीची सोय, रसिकता ( ४५६ ) खुळा = लुळा. अवधान = लक्ष, सावधगिरी परिचर्या = सेवा ( ४५७ ) वर्णन = स्तुति, विवरण, रंगविणें आळसी = जडपणाचा, बुद्धिजड. अनुरागु = प्रीति, बुद्धीचे अवतरण जे शब्दब्रह्म ( ४५८ ) स्थूळ = पंचभूतात्मक देह [ इंद्रिय-ग्राह्य ] ( ४५९ )

जी भुवनें मोठ्या कौतुकानेंच माझ्या स्वामीनीं स्पर्श केलीं गेलीं – केलीं जात – केलीं जातील – केलीं जातात – तेथेंच जो आपधर्म – पाण्याचाधर्म – भुवनधर्म जगधर्म, उदकधर्म तेथीच्या आपी आप धर्मामध्येंच लयास नेईन – स्थिर करीन आपधर्म आपीच लय करीन (४३३)

श्रीगुरु हेच ओवाळिले जावेत अथवा ज्या भुवनामध्यें ते उजळले होतात – जातात तेथीलच्या दिव्याच्या – दीपान्चिया – दिप्तीमध्येंच, तेजामध्येंच तेज जें तें ठेवीन. (४३४)

जेथें उपचारामधील जो विंझणा वा श्रमपरिहारार्थ केलेलें जें वारणें पंख्याचे तेथेच ह्या प्राणाचा लय करीन – प्राण हा जेथें श्रमपरिहारानें विसावला गेला, तेथेंच हा प्राण लयाचा करीन. व मग सेवाधर्म हाच एक आगचा असा, मी होऊन येईन, होऊन असेन. (४३५)

ज्या ज्या अवकाशामध्यें (परब्रह्मी नाहीं अवकाश) श्रीगुरु हे आपल्या सर्व परिवारासहित – सेवक-जनांसहित असतील, तेथें आकाश जें ते आकाशींच लयास नेईन. (४३६)

परंतु जिवंत असो नि मी मेलों तरी बेहेत्तर अशीच एक प्रतिज्ञा करून तेथींचे निमिषोन्मेष का निमिष हे – सोडणार नाहीं. तेथें लागणारा जो वेळ तो कल्पकोटी अशाच मोजल्या जाव्यात पण त्या लोकाना नच धाडीन. अहो जें ब्रह्मच एक तेथे स्वर्ग का मृत्यु का पाताळ हें काय कांहीं बोलण्याचें कामच मुळीं नाहीं – तेथें एका अवकाशीच लय तो झालेला – (क्षण एक ह्या लोकीं धाडला व आता त्यानें आपलें ब्रह्मत्व विसरून जाऊन ते कसे ते ब्रह्मी नाहीं अवकाशुचे जे) त्या लोकींचे होण्यातच मुळीं त्यानें कमर बाधली का धाडस केले जसें – तसें मी न होऊं देता तेथींचें निमिष सुद्धा मेलों तरी न सोडतां त्या ब्रह्मीच स्थिर करीन व यामध्यें मला कल्पाच्या कोटीच्या कोटी अशा जरी लागल्या – मोजाव्या लागल्या तरी तेथें निमिषही सोडवतच मुळीं नाहीं (ते ब्रह्मीच – 'ब्रह्मी नाहीं अवकाशु' –) स्थिर करीन – साडणार नाहीं – सोडणार नाहीं – एक निमिष सुद्धा वाया जाऊं देणार नाहीं (४३७)

अशा हिंमतीचा ज्याच्या बुद्धीचा बाणा – धैर्यवंततेचे प्रमाण – ज्याच्या मनानें घेतलें आहे – ज्याच्या मानसामध्यें आहे आणि तसे करूनच मुळी तो तसल्या अमर्यादतेच्या पणास आला आहे – ब्रह्म-पदास आला आहे – सागरासारख्या अफाटपणास आला आहे (४३८)

रात्र का दिवस न जाणता – थोडे का फार न म्हणता – जे काहीं दाटपणानें म्हणियाचें झालेलें – तेथें आज्ञा केली असता उल्हासयुक्त होऊन – मज्ज होऊन – प्राणास येतो – जीविताचा होतो – असा ब्रह्मसपत्तीस येतो – येणारा जो. (४३९)

अशा तऱ्हेनें तो व्यापकच असा होऊन असल्यानें आपल्या व्यापकत्वानें गगनाहूनही थोर होऊन असल्याने सर्व काहीं तो एकलाच मुळीं एकेच वेळी करितो (४४०)

अत:करणांत वृत्ति ही आली तेथे तर आगच मुळी ते धाव घेऊन पुढें वृत्तिरूपानें होतें व इच्छा ही पैंजच एक करून असते ह्या मनाबरोबर सेवेची इच्छा मनाशी पैज एक बाधून असते तेथे अगानें धाव घेऊन ती हृदयींची वृत्तीच सेविली आज्ञा आग वृत्ति सेवा ही एकदमच जशी सेविली गेली (४४१)

एकादे वेळेस सहज लीला किंवा श्रीगुरूच्या खेळास आपल्या सकल जीविताचे लोण करून असतो. (४४२)

जो गुरुदास्यानें रोडका, गुरुप्रेमाने वृद्धीच्या पालनाचा गुरुआज्ञेने – गुरुआज्ञेवरच मुळीं ज्यानें आपलें राहाण्याचें ठिकाण अथवा घर तेथे आधारच एक जसा महत्त्वाचें मानलेलें त्या महत्त्वानें जो आपण महत्त्वाचा होऊन आहे (४४३)

तेथें महत्त्व घेतलेले जे त्या आज्ञेच्या महत्त्वानें तें गुरूचें कूळच जसें शोभविलें व अशा आज्ञाधारकपणानें जो उत्तम कुळातला उत्तम पुरुष असा म्हणविला – गुरुभाऊबंद मित्र त्याना त्याच्या सौजन्यतेवरच मुळीं सुजन – उत्तम जन – भले म्हणणारा जो गुरुसेवा – आज्ञासेवा हीच व्यसन एक ज्याचे असा जो निरंतर होऊन असलेला – असतो (४४४)

गुरुपरंपरागत उपदेश, चाल, पंथ, हाच ज्याचा – ब्राह्मणादि चार वर्णांचे जे ब्रह्मचर्यादि चार आश्रम-धर्म – गुरुसेवा हीच एक स्वाभाविक कर्म ज्याचें आहे. (४४५)

गुरु हीच पुण्यभूमि, गुरु हीच देवतामूर्ति, गुरु हीच मायबापे का गुरु माता, गुरु पिता – जो गुरूशिवाय अन्य मार्ग जाणत नाहीं – असें जो करून असतो – असा जो असतो (४४६)

श्रीगुरूचें द्वार हेच ज्याचे सर्वस्वाचे तात्पर्य व गुरुसेवकाला तर सख्ख्या बंधूच्या प्रेमाने जो भजतो. उपाय, साधन, वेळ, द्वार, दार हींच ज्याचें सर्वस्वपणें करून सार – तथ्यांश – अशी – स्वसेवेचें सगळें धन – तत्त्वांश – हेंच तात्पर्य, बळ कां तत्त्वाश तो गुरुसेवकास तर सख्ख्या भावाप्रमाणेंच भजून असतो – सेवितो – सेवा करितो – उपभोगितो, प्रकाशतो. त्यानें पुष्कळ ऐकिलें, विचाराम घेतलें तरी पण त्यास उपाय करणें, साधनाचें त्वरितेनें असणें व वेळ ही सर्व वेळाच एक अशी नेहमींच होऊन असलेली तिथें त्वरितता हीच उपयोजिलेली. तेथें उपाय हाच गुरु जसा पुढें झाला का साधनाचें त्वरित होणें हाच गुरु जसा एक त्यास भेटला असें जें उपायाचें व साधनाचें नेहमींच होऊन असणें हाच श्रीगुरु जसा व हेंच सर्वस्व – हेंच तत्व – तथ्य – सार – तो उपाय सेवकावर तर सख्ख्या भावाप्रमाणें प्रेम प्रकाशणारा करणारा केव्हाही असणारच हें योग्यच होय (४४७)

नाममंत्र ज्याच्या तोंडी तेथे गुरूच एक ते वागविणारा तेथे गुरु हे शद्ब उच्चारावे हेंही पण नच कोणी मानणारें पण तेथे एक तो उपाय तोच सर्वांना वडिलपण शिकविणारा असा वनवसंतच एक ह्या तव्येतीस सर्व पोहोंचविणारा केव्हाही होणारच – होतोच होतो – अशास इतर नियम का आज्ञा का धर्मग्रंथ ह्याची मातब्बरी नाहीं – कारण जिथे तत्त्वाशच मुळी उपासिला जात आहे तेथे सर्व धर्म आले – सर्व शास्त्रें तेंच एक पाहाणारी असल्याने बाह्य शोभा करणें ती कशास कोण करील. तो इतर गोष्टींना शिवतच नाहीं. (४४८)

ज्यास उपायानें का साधनानें गुरूचें सर्वस्वच लाभले त्यानें जसें का श्रीगुरुचरणींच स्पर्श केला – तेथें भलतेसें जरी ते पाणी (कां उदक, का भुवन, का जग) तरी सर्व महत्व तेथेंच स्थिर झाल्यानें आता जरी त्याने त्या चरणींच लागणारी अशी त्रैलोक्याची तीर्थे केलीं. अशी तीं तीर्थे जशी का ह्या एकाच तीर्थाची तीर्थयात्रा करण्यास आणिलीं श्रीगुरूचें महत्त्वच तेथे प्रस्थापित केलें असा तो होय (४४९)

अहो ‘व्यासोच्छिष्ट जगत्रय’ असें जें म्हटलेलें, तेथे ह्या उपायावर टेकल्यानें, श्रीगुरूंना उपायसिद्ध – तसें ते येथे ह्या शब्दब्रह्माची स्थिरता झाल्यानें, तें समाधीसच आल्यानें, चित्ताची एकाग्रता तेथेंच झाल्यानें, आता तें उच्छिष्ट अकस्मात् व सहजपणेच प्राप्त झालेले त्यामुळें तर तो इतका काहीं लाभाचा होतो कीं एरव्हीची जी बोलणीं ‘समाधी समाधीची’ तीं व्यर्थच होत एरव्हीचें, व्रताचें का मौनाचें नुसतेंच एक अहो माहात्म्य का महत्त्व नुसतेंच वर्णणें ते काय कशास बरें. जर तेथे त्यात रिझून जाणे नाहीं – तेच प्रत्यक्षतेचे होणें नाहीं (४५०)

जे चालत असताना त्याचे पायाच्या पाठी तर अशा रज-कणाचे अतिसूक्ष्म अंश हे उधळले होतात त्या मोक्षसुखाकरितां. जे चालतां बोलता हे किरीटी, कैवल्य त्याच्या पायासाठीं सुखासाठी उधळती घे. जे चालले असता हे अर्जुना, त्याच्या पायाच्या पाठीमागें – त्याच्यामागे, ह्या मोक्षसुखासाठीं का कैवल्याकरिता (हपापलेले) ते रज कण, सूक्ष्म अग (प्राणी) अतिमहत्त्वाचें असें मोजमाप घेऊन असतात – देऊन असतात तेथें त्या पायाकरिता – मागे अशा त्या रज कणाची उधळणी – दौड – पळणेंच होऊन असतें (४५१)

हें एकेक अमो – काय किती मागावें अहो ह्या गुरुभक्तीस – भक्तीच्या महत्त्वास महिमानास पार नाहीं. पण एक चिकित्सा किंवा प्रारंभ जो त्यावरच ती मति आपली उमज स्थिर करणारी व्हावी, एवढ्याच कारणाकरिता हें बोलणें झालें – तेथे मतीची वृद्धि का मतीचें हें वरणें व्हावें हेंच एक कारण जाण आरंभवादास हें कारण जाण (४५२)

ज्यास ह्या आकृतिरचनेची, का उपचारउपासनेची, का उपासनाउपचाराची चाड आहे; ज्यास ह्याविषयीं अति कौतुकास्पदतेचे असें तें आहे असें वाटतें व जो ह्या सेवेशिवाय इतर कांहींहि गोड म्हणजे मनास आवडणारें असें मानत नाहीं असा तो तर (ज्ञानाचा ठावच जाण) (४५३)

असा तो तर तत्त्वज्ञानाचा – ब्रह्मज्ञानाचा—ज्ञानी लक्षणाचा, विचक्षणतेचा एक ठावच ममज. अहो त्याच्याचमुळें तर ज्ञानास ज्ञानपण येतें – ज्ञान ज्ञान होतें – ज्ञानसूर्यासारखे तें त्याच्याचमुळें प्रकाश देणारें प्रकाश करणारें का प्रकटणारें जाण – अहो बहुत काय लिहावें पण तो तर एक देवच असा होय – ईश्वरच होय – एक राजाच होय – व ज्ञान ज्ञान जें विशाल मति असें तें तर त्याचे उपासक – त्यावर अनुरक्त झालेलें असें जाण – त्यामध्यें तल्लीन झालेले असेंच होय – तो ईश्वर होय – ज्ञान हें का ज्ञाता हा एक उपासक जाण – अनुरक्ततेमुळें तल्लीनतेमुळें तें तेथेंच 'रमलें' होतें (४५४)

अगदी खरेपणाचें असें हें बोलणें आहे – कारण असें ज्ञान ह्या उघड्या ह्यानी ह्या साधनांनीं का उपायानी जगास नांदणें देत राहिल्यानें ते जगास पुरतें – आवडतें – तें लोकाना लोक महत्त्व पोहोचविणारें झाल्यानें – पाहविणारें झाल्यानें ते ह्या रीतींनी – ह्य चालींनी लोकाना उत्तमतेचें नादणें देऊन त्यांना रंजवितें, रमवितें, मान्यतेस आणतें – लोक हें असें उपायाचें का साधनाचें ते अगदी स्पष्ट उघडें असें ज्ञान नादण्यास घेऊन आयुष्यास येतात – महत्त्वाचे होतात तेथें ती शक्ति ही जशी का एक ज्ञान – बहिणच प्रेमानें नांदणारी जगास का लोकाना प्रेमाने नांदण्यास लावणारी (४५५)

अहो! अशा ह्या गुरुसेवेबद्दल किंवा विषयीं माझा जीव जो अति इच्छा करून आहे – तेथें एक अभिलाष महत्त्वाचा होऊन आहे – प्राण माझा तेथे त्या सेवेची अति इच्छा करून आहे आणि म्हणूनच तर येथे ही प्रीतीची बोली केली – तेथे वचन, प्रतिज्ञा का रसिकता हीच जशी ह्या बोलीवर उभी होणारी झाली – ह्या लोकबंधुत्वाकरिता का तेथीलच्या त्या प्रीतीकरता (४५६)

एरव्हीं हाती तर लुळा, भजनी लक्ष हें आंधळाच एक जसा व सेवेकरिता तर पागळ्यापेक्षाहि पागळा बुद्धिमंद (४५७)

अहो जेथे विलास नाहीं, रंगविणे नाहीं 'रंग रज रम मनास रंजन नाहीं' तेथें मुकेंपणच एक जें ह्या उपायास का साधनास – जो उपाय का साधन हें त्या श्रीगुरूचें प्रत्यक्षत्व जेथे – तेथे आळशी असा हा जडपणाचा जड – बुद्धिजाड्याचा असा हा कशास बरें फुकटच पोसावा अहो येथे ह्याच्या मनात तर हिताची गोष्टच आहे, कल्याण व्हावें असा तेथे हेतु आहे तेथे गुरुसेवेचें प्रेम घेऊन आहे तेथें प्रीति आहे पण ती अनुरागाची केल्याशिवाय का होणारी? (४५८)

व ह्याच कारणाकरिता हे स्थूळ पंचभूतात्मक देह – इंद्रियग्राह्य असें हें मनाला पोसणें भाग घेऊन आहे असें श्रीज्ञानदेव म्हणतात. (४५९)

**तरी तो बोल उपसाहावा। आणि वोळगे अवसरु देयावा।**
**आतां म्हणेन जी बरवा। ग्रंथार्थुचि ॥४६०॥**

**आतां परियसा श्रीविष्णु। जो भूतभारसहिष्णु।**
**तो बोलतसे श्रीकृष्णु। पार्था आईके ॥ ४६१ ॥**

म्हणोनि शुचित्व गा ऐसें। जयापासीं दिसे।
आंग मन (आगमन) जैसें। कापुराचें ॥ ४६२ ॥

कां रत्नाचें दळवाडें। सबाह्य जैसे चोखडें।
आंतु बाहेर येके पाडें। सूर्य जैसा ॥ ४६३ ॥

बाहेरी कर्में क्षाळला। भीतरीं ज्ञानें उजळला।
ईहीं दोहीं परी आला। पाखाळा येका ॥ ४६४ ॥

मृत्तिका आणि जळें। बाह्य येणें मेळें।
निर्मळ होय बळें। वेदांचेनी ॥ ४६५ ॥

भलतेथ बुद्धि बळी। रज आरिसा उजळी।
कां सौंदणि फेडी थिगळी। वस्त्रांचिया ॥ ४६६ ॥

किंबहुना इयापरी। बाह्य चोख अवधारी।
आणि ज्ञानदीपु अंतरी। म्हणौनि शुद्ध ॥ ४६७ ॥

येऱ्हवी तरी पाण्डुसुता। अंतर शुद्ध नसता।
बाह्य (बाहेरी) कर्म तें तत्वता। विटंबु गा ॥ ४६८ ॥

मृत जैसा शृंगारिला। गाढव तीर्थीं न्हाणिला।
कडु दुधिया माखिला। गुळें जैसा ॥ ४६९ ॥

वोस गृहीं तोरण बांधिलें। कां उपवासिया अन्नें लिंपिलें।
कुंकु सेंदुरें केलें। कांतहीनें ॥ ४७० ॥

कळश ढिमाचा पोकळ। जळो वरील तो झळाळ।
काय करावे चित्रिव फळ। आतु सेण ॥ ४७१ ॥

तैसें कर्म वरिचिले कडा। न सरे थोर मोले कुडा।
नव्हे मदिरेचा घडा। पवित्र गंगे ॥ ४७२ ॥

म्हणौनि अतरीं ज्ञान होआवे। मग बाह्य लाभेल स्वभावें।
वरी ज्ञानें कर्म संभवें। ऐसें के जोडे ॥ ४७३ ॥

यालागु बाह्य विभागु। कर्में धुतला चांगु।
आणि ज्ञानें फेडिला वंगु। अंतरींचा ॥ ४७४ ॥

तेथ अतर बाह्य गेलें। निर्मळत्व येक जालें।
किंबहुना उरलें। शुचित्वचि ॥ ४७५ ॥

म्हणौनि सद्भाव जीवगत। बाहेरि दिसती फांकत।
ते स्फटिकगृहीचे डोलत। दीप जैसे ॥ ४७६ ॥

विकल्प जेणें उपजे। नांथिली विकृति निपजे।
अप्रवृत्तीचीं बीजें। अकुर घेती ॥ ४७७ ॥

ते आईके देखे अथवा भेटे। परी मनीं कांहींचि नुमटे।
मेघरंगें न काटे। व्योम जैसें ॥ ४७८ ॥

येऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें। विषयावरी तरि लोळे।
परि विकाराचेनि विटाळें। लिंपिजेना ॥ ४७९ ॥

मेटिलिया वाटेवरी। चोखी आणि माहारी।
तेथ नातळे तयापरी। राहाटो जाणे ॥ ४८० ॥

कां पति पुत्रातें आलिंगी। येकचि ते तरुणांगी।
तेथ पुत्रभावाच्या आंगीं। न लगेचि कामु ॥ ४८१ ॥

तैसें हृदय चोख। संकल्पविकल्पीं सनोळख।
कृत्याकृत्य विशेष। फुडे जाणे ॥ ४८२ ॥

पाणियें हिरा न भिजे। आधणीं हरळु न शिजे।
तैसी विकल्पजाते न लिंपिजे। मनोवृत्ति ॥ ४८३ ॥

तया नांव सुचितपण। पार्था गा संपूर्ण।
हें देखसी तेथें जाण। ज्ञान आहे ॥ ४८४ ॥

आणि स्थिरता सांचे। घर रिघाली जयाचे।
तो पुरुष गा ज्ञानाचें। आयुष्य गा ॥ ४८५ ॥

देह तरी वरिचिलीकडे। आपुलियापरी हिंडे।
परी बैसका न मोडे। मानसीची ॥ ४८६ ॥

वत्सा वरूनि धेनूचें। स्नेह राना न वचे।
नव्हती भोग सतियेचे। प्रेमभोग ॥ ४८७ ॥

तरि = परी वोळगे = सेवेला, आगचें होऊन येण्याला, वर्तणुकीला ( ४६० ). आतां परियसा श्रीविष्णु – परिसा परिसा श्रीकृष्णु. भूतभारसहिष्णु = भूतांचा भार सहन करणारा. श्रीकृणु – विष्णु. पार्था – पार्थ = ( गुणगरुवा ) ( ४६१ ). म्हणे – म्हणोनि. आंग मन – आगमन ( ४६२ ). दळवाडें = आकार. सबाह्य जैसे – जैसे सबाह्य आंतु बाहेर – आत बाहेरि. येके – एके ( ४६३ ) पाखाळा = शुद्धतेचा ( ४६४ ). मृत्तिका आणि जळें = मृत्तिका व जळ तसेंच कर्म ( योग ) मेळ – यानीं. बाह्य = मन. बळें = बोल वेदाचेनी = मंत्रांनीं, मंत्रोच्चारांनीं ( ४६५ ) ( भले तेथ ) भलतेथ बुद्धि बळी = बुद्धि सर्वत्र बलवान् आहे. रज = धुळी, धूळ – परमाणु – रज कण – अतिसूक्ष्म रजःकण – सूक्ष्म अश, रज कणांचें मोजमाप, मेज – उधळ्याने, उडणारे जे त्यानी, व्यापकपणामुळें ह्या कर्मयोगास नेहमीं आग्रहास पाहविणारे ते रज. सौदणि = सवंडणी, परटाचें वस्त्र पुसण्याचें पात्र, भाडें. थिगळी = डाग, ठिगळे ( ४६६ ). बाह्यकर्म = बाह्यात्कारी, बहिर्मुखाचें कर्म. तत्वता = सर्वथा ( ४६८ ) मृत्यु = मृत दुधया – दुधिया ( ४६९ ) उपवासिया – उपवासी. कुंकुसेंदुरें – कुंकुमसेंदुर कातहीनें – कांतहीनेनें – देखणेपण नसणाऱ्यारीनें. सुखकारक – सुखसंचारक. पति हीनेनें ( ४७० ). ढिमाचें = मुलाम्याचें. करावे – करू चित्रव – चित्रिव आतु सेण – आत शेण ( ४७१ ). कर्म – कर्मी ( ४७२ ). ज्ञानेंकर्म – ज्ञानकर्म. जोडे – घडे ( ४७३ ) विभागु – भाग. वंगु = कलंक, मळीनपणा ( ४७४ ). अप्रकृतीचे – अप्रवृत्तीची = कुकर्माची ( अप्रकृत = असंबद्ध, अनित्य, अनुचित ) ( ४७७ ). न काटे = मलिन होत नाहीं ( ४७८ ) मेळें = समुदायाचा संयोग ( ४७९ ) मेटिलिया – मेटलेया – मेटलिया. चोखी = उत्तमवर्णाची. नातळे = मन विकार पावत नाहीं त्यापरी – तियापरी – तयापरी ( ४८० ). आळंगी = आलिगी लगे – रिगे ( ४८१ ) संकलपविकल्पी परिचयः सन् = सनोळख ( ४८२ ). विकल्पज्ञाने – विकल्प-

जाते=विकल्प ज्ञान=मतभेद, बुद्धि शंकेची जाणीव विकल्पजात=मतभेदाचे प्रकार, पदार्थमात्रासंबधी शंका, मतभेदाचे समुदाय. ज्ञानजात=ज्ञान जाणलेले–ज्ञानाची जाणीव, ज्ञानाचा बोध, ज्ञानबुद्धि. सुचितपण–शुचिपण–शुचित्वपण=शुद्धपणा ( शुचि=तेज, प्रभा, स्वच्छपणा, शुद्धता ) आहे–असे ( ४८४ ). बैसका=स्वरूपाची बैठक. मानसाची–मानसीची ( ४८६ ) स्नेहे–स्नेह=प्रेम राणाराना ( रानावना ) भोग=भाग ( भोग=सुखदुःखाचा अनुभव, शरीर ) भाग=वाटा, दैव ( ४८७ ).

प्रीतीची बोली केलेली तेथें रंगविणें का स्तुतीच ती – मनात तर सेवेविषयी प्रेम घेऊन आहे – प्रीतीचा आहे व असें ते प्रीतीचें व्हावें एवढ्याचकरिता तर याच एका कारणास्तव मला हें स्थूळ पंचभूतात्मक ( इंद्रियग्राह्य ) देह पोसणे होत आहे पण तो बोल जो तो सहन करून असा – उपसाहा – सहनशीलतेच्या समीप – जी काहीं तेथें न्यूनता भासेल ती उपसाहावी, सहन करावी आणि सेवेला अवसर योग्य प्रसंग – वेळ द्यावा – ती सेवा अगदीं अगची होऊन यावी असें जर तर तेथे वेळ हा लागणारच. आता असें म्हणेन कीं तो जो ह्या पार्थासंबंधीचा गुणगौरव – तेथे ह्या देहास अवसर दिला वेळप्रसंग पाहावा त्यानें म्हणून एक वेळच तिथें पाहिला ह्या साधनसमृद्धीचें होण्याकरिता व तसें तें साधनाचें समृद्धीपण तेथें मग हा पार्थ म्हणजे एक गुणांना गौरवाचे करून असणारा – असा जो त्यास म्हणूं कीं अहो ह्या ग्रंथाचा अर्थ जो उत्तम असा तो मी सागण्याचें करितो तेथें सेवेस वेळ द्यावा व बोल सहन करून असा असे तें विनविणें. (४६०)

तरी आता ते श्रीविष्णु जे भूताचा भार सहन करणारे ते श्रीकृष्ण पुढें बोलूं लागले कीं हे पार्था, आईक. हे पार्था ऐक ऐक असे ते श्रीकृष्ण जे भूतांचा भार सहन करणारे श्रीविष्णु ते – पार्था जो ज्याच्या ठिकाणीं आता गुण जे ते गौरवास यावेत असें त्यांनीं घेतलेलें ते त्या पार्थास म्हणाले. (४६१)

ते म्हणतात कीं शुचित्व ( तेज, प्रभा, शुद्धता, स्वच्छता ) असें ज्याच्याजवळ दिसत असतें जसें का कापुराचें येणेंच तें असें शुचिपण ज्याच्याजवळ दिसतें तेथें कापुराचें आग व मन जसें तें. (४६२)

रत्नाचा आकार हा जसा सुंदर, निर्मळ बाह्यागाचा व तसाच पण आतही – म्हणून आतबाहेर एकाच ( रत्नाच्या ) प्रकाशाचा – तेथें रत्न तें रत्न का सर्व प्रकाशच एक जसा का सूर्यासारखा. (४६३)

बाह्य कर्मानीं प्रक्षाळिलें व अतर जें ते ज्ञानानें उजळ झालें व अशा दोन्ही तऱ्हानीं एका शुद्धतेस आलेला. (४६४)

देह जीवित जीवन जळ – पूर्वीं मातापितरानीं भक्षिलेलें जें अन्न त्या अन्नापासून झालेला हा अन्नमय कोश. देह हा म्हणजे भूमींत जाणारा असा असल्याने मृत्तिका म्हटला गेला. म्हणून येथें मृत्तिक देह जीव जीवित चैतन्य जळ असें ते सर्व एक मेळाचे बाह्याग ते मंत्रानी का मंत्रोच्चारानी – वेदाच्या बोलानीं किंवा त्याच्या मंत्रोच्चाराच्या बोलाच्या बळावर निर्मळ होणारे होय. ( मृत्तिका म्हणजे शरीररूपी जीवित चैतन्य जीवन ) शरीर व पाणी असा तो बाह्य मनाने मेळ बसला म्हणजे वेद अक्षरानीं निर्मळ होणारा होतो (४६५)

अहो! भले भले! असेंच येथे म्हणणें झाले येथे बुद्धि ही सर्व बलवती आहे रज हा ( मुखाचा ) आरसा उजळतो. किंवा सवदणी ती ( संवाद – सवादन – सवदणें–ती वस्त्राचे जग धुवून टाकते ) अज्ञान हेंच मोहन, जें तपामुळें होणारें तें सर्व देहधाऱ्यामध्यें आहेच – असें जें अज्ञान तेथीलचे डाग धुवून काढणें – टाकणें हे सवाद – सवादावर होणारे होते (४६६)

याप्रमाणे बहुतेक बाह्य सर्व चोख म्हणून शुद्ध जाण तसेंच ज्ञानदिवा अतरामध्यें आणि म्हणूनहि पण शुद्धच. देह जळामध्यें – मनाचा मेळ बसला म्हणजे – वेदाच्या बोलानीं बळास येणें केलेले तेथे निर्मळपण आलें असें तें वेदाच्या बोलामुळे, बळामुळे, अक्षरामुळें. व आता बाह्य हे शरीर जळ ( ही चोख ) व आत ज्ञानदिवा अक्षरानी लाविला म्हणून बाह्य चोख व अतर ज्ञानाक्षर दीप शुद्ध असें होय (४६७)

येन्हवी पाहिलें असतां हे पार्था, जर अंतर शुद्ध नाहीं, तेथें अक्षराचें येणें नाहीं, तेथें बाह्य बाह्यात्कारी का बहिर्मुखत्वानें केलेलें का बाहेरी कर्म हें सर्वथा विटंबनाच एक होय. (४६८)

मृत हा शृंगारिला – शोभिवंत दिसं केला – गाढव हा तीर्थामध्यें न्हाणिला (तरी गाढव तें गाढवच; तें उकिरड्यावर लोळणारें होतेच), कडू दुध्या गुळानें माखला तरी गूळ धुऊन गेल्यावर कडू तो कडूच होय. (४६९)

अहो जेथें कशाचीही वस्तीच नाहीं – सर्व ओसपणच एक ज्या गृहामध्यें तेथें तोरण बांधणें तें काय कामास येतें किंवा उपवासी जो त्यास अन्नाचें लिपण केलें का पति नसल्यानें स्त्रीनें कपाळी लाविलेला सिंदूर का तें कुंकुवाचे लेणें म्हणं केले कातहीन जी तिनें कपाळी लाविलेला सिदूरच आत कुंकू केलें किवा देखणे-पणाची नाहीं जी – ज्ञानदृष्टि नसणारी जी तिनें कुकूं तें तर शेंदूर असेंच केले. तेथे देखणेपण नाहीं दृष्टि ही ज्ञानाची नाहीं – सुखकारक जें काहीं एक त्याचा सचार कसा तें जी जाणत नाहीं किंवा पतीचे तें दृष्टि देणें तें जिला नाहीं – तेथे कुंकू ते सेंदूर केले किंवा सेंदुराचें तेच मुळी कुंकू केलें – असें होय. (४७०)

मुलाम्याचा पोकळ कळस – त्याजवरील ती झल्लाळ जळो! अहो तें आत शेण असलेलें चित्रिफळ तें काय कामाचें? (४७१)

त्याप्रमाणें कर्म किंवा कर्मी जो तो वरचिलिया बाजूंनीं – वरवरच्या नुसत्या ज्ञानगंगेच्या काठावरच बसणें तें काहीं थोरपणास येत नाहीं, महत्त्व पावत नाहीं – व मोलानें पाहिलें तर ते कुडे म्हणजे खरें नाहीं असें मिथ्यात्वाचें – खोटेपणाचें – वोखटपणाचें – खट्टूपणाचें तें बोलणें ते तर कुडे, खरें नव्हे असें होय – अहो मदिरेनें भरलेला घडा तो काय गंगेचें पाणी भरले आहे ज्या घड्यात त्याची बरोबरी का योग्यता कधींतरी पावेल काय? (४७२)

आणि म्हणूनच अतरीं ज्ञान व्हावें – अतरी ज्ञान अहो यावें आणि मगच सहजस्वभावेंकरूनच बाह्य तें लाभेल (तेथील लाभ देव का भावपणाचा जसा कां) (आता याहीवर जर असें म्हणावें कीं ज्ञानानें कर्म संभवतें, ज्ञानानें कर्म संभवेल, जन्मेल – असें जे काहीं एक तें कसें बरें साधेल – प्राप्त होईल – कर्में ज्ञान संभवे, ज्ञान कर्में संभवे का जन्मेल असें कसें होईल) पण ज्ञानानें कर्म कां कर्मानें ज्ञान हें सभवते असें कसें होईल बरें! असें भलतेच ते कसें जोडेल बरें? (४७३)

या कारणास्तव बाह्यविभाग जो तो कर्मानीं चागला धुतला (धुऊन), ज्ञानानें (त्यातील श्रम निरसावेत ज्ञानानें) अंतरामधील तो मलीनपणाचा कलंक धुऊन टाकावा (४७४)

तेथें आता अंतर का बाह्य असें दोन नच राहिलें तें आतां एका निर्मळपणाच्या एकत्वास आलें— किंवा एक तेथें निर्मळत्वच सर्व आहे असें झालें. (४७५)

म्हणून शुद्ध भाव, जीवन – प्रेमास आलेला तो, त्याचा प्रकाश बाहेर फांकून राहिलेला असतो, (काचेच्या गृहातून दिव्याचा प्रकाश जसा बाहेर फाकतो, पसरतो त्याप्रमाणें) तेव्हा तेथें असेंच म्हणूं केले होतें कीं ते तर स्फटिकगृहामध्यें डोलत असलेले ज्ञानदीपच होत. (४७६)

जेथे मनात शंका येते – जेथे मतभेद होतो, जेथे खरी नाहीं अशी रूपामध्यें विकाराची निपज होते व असबद्ध व अनुचित अशी कर्मबीजें अकुर घेऊन येतात – कुकर्माचीं अनित्य अशी तेथीलच्या बीजाना फळें येतात (४७७)

असें तें ऐकतो, पाहातों, देखतों अथवा त्यास भेटतोंहि पण मनानें तर कांहींच तो घेत नाहीं, जसें का मेघाच्या रंगानी आकाश (जळ) हें काहीं मलिन होत नाहीं (४७८)

येऱ्हवीं इंद्रियाच्या संयोगाच्या मेळानें विषयावर तर लोळत राहिला आहे तरी पण विकाराच्या विटाळानें जो लिंपला जात नाहीं. (४७९)

रस्त्यानें चालतांना जर एकादी उत्तमपणाची स्त्री का पाहिली, भेटली तरी तेथें मन हें मुळीच विकार पावत नाहीं, त्याप्रमाणें वागणें जाण, राहाटणे तें कर. (४८०)

किंवा तरुणीनें – आपल्या अगानें पतीस आलिंगिलें व पुत्रासहि आलिंगिलें – तेथें पुत्रभावाच्या अगीं काम हा शिरत नाहींच – तेथें कामास आपला कामवासनेचा लाग लागणारा होईल असें नाहींच (४८१)

त्याप्रमाणें अत करण निर्मळ व सकल्पाचें विकल्पाचें तें असणारें – होणें जें, तेथें ओळखी असणें व 'कार्य काय' व 'नच काहीं करणें' तें कोणते हें जो खरेपणानें जाणतो. (४८२)

पाण्यानें हिरा भिजत नाहीं – आधणामध्यें खडा शिजत नाहीं, त्याप्रमाणे विकल्पजातानी मनोवृत्ति ही लिंपिली का मळाली होत नाहीं (विकल्पजात = मतभेद का शंका – प्रकार, समुदाय, पदात्रमात्र). (४८३)

त्यासच हे पार्था, अत करणाची सुचितता, अत करणाची शुद्धता म्हणतात – असें हें जेथें पाहासील तेथेंच ज्ञान आहे – तेथेंच ज्ञान आहे असें जाण (४८४)

स्थिरता – स्थिरबुद्धि – प्रज्ञास्थिरता खरेपणाची – साचेपणानें – ज्याचे घरी का अतर्गी रिगावा करून आहे, तो पुरुष गा अगा अर्जुना, ज्ञानाचें आयुष्य जाण – त्याच्यामुळेंच ज्ञान हे आयुष्यास आलें – जगलें – जीवनाचें झालें – ज्ञानकलेचें झाले (४८५)

देह हा वरिच्चिलियाकडे – म्हणजे स्थूलदृष्ट्या आपआपल्यापरीनें हिंडत असतो पण मनाची ती स्थिरता स्वरूपाची बैसका ही मुळींच मोडत नाहीं (४८६)

अहो गाईचें ते (मन) प्रेम आपल्या वत्सावरून निघून रानाकडे केव्हांहि जाणार नाहींच अहो सतीचें ते सहगमनाच्या वेळचें प्रेम भाग काय तिचे प्रेमाचे भोग म्हणावेत (ती काय प्रीति का प्रीतीची थट्टा का प्रीतीच्या आनंदाची ती प्रेमथट्टा म्हणावी?) (४८७)

कां लोभिया दुरी जाये। परी जीव ठेवांचि ठाये।
तैसा देह चालता नव्हे। चल चित्ता ॥ ४८८ ॥

जातया अभ्रासवें। आकाश जैसें न धांवे।
भ्रमणचक्रीं न भ्रमे। ध्रुव जैसा ॥ ४८९ ॥

पांथिकाचिया येरझारा। सवे पंथु न वचे धनुर्धरा।
कां नाही जेवी तरुवरा। येणें जाणें ॥ ४९० ॥

तैसा चळणवळणात्मकीं। असोनि ये पांच भौतिकी।
(परी) भूतोर्मी येकी। चळिजेना ॥ ४९१ ॥

वाहदुळियाचेनि बळें। पृथ्वी जेवी न ढळे।
तैसा उपद्रव उमाळे। न लोटे जो ॥ ४९२ ॥

दैन्य दुःखि न तापे। भय शोकि न कांपे।
देह मृत्यु न वासिपे। पातलेनि ॥ ४९३ ॥

आर्ती आशा पडिभरें। वय व्याधि गजरें।
उजु असतां पाठिमोरे। नव्हे चित्त ॥ ४९४ ॥

निंदा निस्तेज दंडी । कामलोभा वरपडी ।
परि रोम नव्हे वांकुडी । मानसाची ॥ ४९५ ॥

आकाश हें वोसरो । पृथ्वी वरि वीरो ।
परि नेणें मोहरो । हृदय धृति ॥ ४९६ ॥

हातीं हाला फुली । पासवणें जेवि न घाली ।
तैसा नोहटे दुर्वाक्य सेली । सलिला सांता ॥ ४९७ ॥

क्षीरार्णवाच्या कल्लोळीं । कंपु नाहीं मंदराचळीं ।
कां आकाश न जळे जाळी । वणवियाच्या ॥ ४९८ ॥

तैसा आलां गेलां उर्मी । नव्हे गजबज मनोधर्मीं ।
किंबहुना धीर क्षमी । कल्पांतीही ॥ ४९९ ॥

पैं स्थैर्य ऐसीं भाष । बोलिजे जे सविशेष ।
ते हे दशा गा देख । देखणया ॥ ५०० ॥

हें स्थैर्य निधडें । जेथ आंगें जीवें जोडे ।
तें ज्ञानाचें उघडें । निधान सांचें ॥ ५०१ ॥

आणि ईसाळ जैसा घरा । कां दंदिया हतियेरा ।
न विसंबे भांडारा । लुब्धकु जैसा ॥ ५०२ ॥

कां एकलौतिया बाळका । वरि पडौनि ठाके अंबिका ।
मधु विषि मधु मक्षिका । लोभिणी जैसी ॥ ५०३ ॥

अर्जुना जो यापरी । अतःकरण जतन करी ।
नेदी उभे ठाको द्वारी । इंद्रियांच्या ॥ ५०४ ॥

म्हणे कामबागुल ऐकेल । हे आशा सयारी देखैल ।
तरी जीवा टेकैल । म्हणौनि बिहो ॥ ५०५ ॥

बाहिर धीट जैसी । दाटुगा पती कळेसी ।
परी देहांती तैसी । प्रकृतीसी ॥ ५०६ ॥

सत्तेचेनि वाडपणें । देहासकट आटणें ।
संयमावरी करणें । बुजुनि घाली ॥ ५०७ ॥

मनाच्या महाद्वारी । प्रत्याहाराचे ठाणांतरीं ।
जो यम दम शरीरी । जागवी उभे ॥ ५०८ ॥

आधारीं नाभी कंठी । बंधत्रयाची घरटी ।
चंद्रसूर्य संपुटीं । सोये चित्त ॥ ५०९ ॥

समाधीचे सेजेपासी । बांधोनि घाली ध्यानासी ।
चित्तचैतन्य समरसीं । आंतु रते ॥ ५१० ॥

अगा अतःकरण निग्रहो जो । तो हा हे जाणिजो ।
हा आथी तेथ विज्यो । ज्ञानाचा पैं ॥ ५११ ॥

**जयाची आज्ञा आपण। शिरी वाहे अंतःकरण।**
**मनुष्याकारें जाण। ज्ञानचि तो॥५१२॥**

दुरी – दूर. ठेवाचि – ठेवी देह – देहो. चाळिता – चालता. नव्हे – न होये (४८८). आकाश जैसें – जैसें आकाश भ्रम – भ्रमण – भगण (४८९). पंथु न वचे – पंथ न चले (४९०) असृनि – असोनि. भूतिकी – भौतिकी. चाळिजेना – चळिजेना (४९१) वाहटुळियाचेनि – वाहुटळीचेनि – वाहुटोळाचेनि = वावटळ. जेवी – जैसी. उपद्रव उमाळे लोटेना जो = उपद्रवाच्या उमाळ्याने जो घाबरून जात नाहीं (४९२) कापे – कंपे तापे – तपे देहमृत्यु न वासिये पातलेनि = देहास मरण आलें असतां भीत नाहीं (४९३) पडिभारें – पडिभरे अतिशयता = व्याधि – विविधा भवव्याधि गजरें = हलकल्लोळ आर्ती आशा पडिभरें – वयव्याधिगजरे – उजु अमता पाठिमोरे नव्हे जेथ = देह दु ख आशा याच्या अतिशयतेनें – वयोमान व्याधि विविध व्याधींनीं हलकल्लोळ केला तरी उजू म्हणजे अनुकूल असलेलें त्याचे चित्त डगमगत नाहीं, आपलें ध्येय सोडीत नाहीं (४९४) वरिपाडि – वरपडी = प्राप्त झालें तरी रोम = लोव (४९५). वोसरो = ओसरो, नाहींसें होवो वर – वरि मोहरो = बदल, बदलणें = उलटणें हृदय धृति = चित्तवृत्ति (४९६) हातीं हाला फुली = फुलाचा मारा हत्तीवर केला पासवणा – पासवण – जोपासन – जोपासना नो हटे – न हटे दुर्वाक्य सेली = मर्मावर घाव करणारी वाक्यें रूपी बोलणें रूपी शालजोडीचे वर शेल्याचेही एक शैलीच जशी का खुबी बोलण्यानें – खोचदार बोलण्याने साळला असता – छळला असतांहि (४९७). वणवियाच्या – वणवयाच्या (४९८). तैसा आला गेला = तैशा आल्या गेल्या. मनोधर्मी = समाधान, शांति व स्थैर्य हे मनाचे धर्म गजबजिले म्हणजे ढवळले जात नाहींत. धीर क्षमी = धीर धैर्यवंत, धीरवान् व क्षमाशील (४९९). भाष – भाख = वचन या – गा देखणया – देखणेया (५००) निधडें = हट, पक्के, बळकट आगे जीवे जोडे = अतर्बाह्य बाणलेले (५०१) ईसाळ जैसा घरा = भूत आपल्या झाडास. दंदिया – दंडिया = लढवय्या, वीर भाडारा = ठेवा, निधि, निधान, भरपूर उत्साहाचे साधन (५०२). अंबिका = आई (५०३) कामबागुल = कामरूपी बागुलबुवा हें ऐकेल, आशारूपी डाकिण (सयारी – सियारी) पाहील तरी जीवच टाकिला होईल – बाळ जसें का जीवच सोडील म्हणून भिऊन आहे (५०५). बाहिर – बाहेरी. धीट = व्यभिचारिणी स्त्री दादुगा = दाडगा. कळासी – कळेसी = बाधून, कोंडून ठेवतो. परी = हीच तऱ्हा देहाती = रक्षण, प्रतिबंध, टेहळणी प्रकृतीसी – प्रवृत्तीसी (५०६) सत्तेचेनि – सचेतनी. वाणेपणे – वाडपणें = देहासकट आटणे = जिवंतपणीं काटकसरीने देह झिजवितो सयेम – संयम. बुजुनि – बुझुनि (५०७) ठाणातरी = चौकीवर (५०८) घरटी = गस्त बंधत्रय = (मणिपूर, आधार, विशुद्ध) मूळबंध, जालंदर, उड्डियाणा (५०९) ध्यानेसी–ध्यानासी करण – करणें ते. आतु रते = अंतरी रमतो (५१०) विज्यो–विजो = विजय (५११). अत करण – अत करण देवता विष्णु (५१२)

अथवा पैशाचा लोभी (मनुष्य) जरी दूर गेला तरी त्याचा जीव हा ठेव्यापाशीच उभा असतो – त्याप्रमाणें देह हा जरी चालता चालिता (बोलता बोलिता – बोलविता) तरी चित्त हें केव्हांहि चळ घेत नाहीं – तें तत्त्वातच स्थिर असतें (४८८)

अभ्र हें केव्हाहि फिरतच असतें पण त्याच्या त्या फिरण्या धावण्याबरोबर आकाश हें केव्हांहि धावत नसतें. अहो जो ध्रुव केव्हाहि अचल व स्थिर असा तो भ्रमणचक्रामध्यें केव्हाहि भवंत नाहीं – भ्रमण चक्रामध्यें – जन्ममरणचक्रावर – का भ्रमचक्राबरोबर तो भवंत म्हणजे फिरत केव्हाहि नाहीं. (४८९)

प्रवासी जो पाथिक नित्य येरझारा करणारा त्याजमध्यें पंथ हा केव्हाहि सापडत नाहीं – त्याजबरोबर काय पंथ तो चालत असतो. ते कसें म्हणाल तर तरुवर जे श्रेष्ठवृक्ष जे ते निश्चल असे त्याना येणें कसचें व जाणें तरी कसचे! तेथें येणें जाणे नाहीं. (पाहा :—४२५) (४९०)

चळणवळणात्मक जो देह तो जरी ह्या पंचभूतांचा केलेला तरी सुद्धा ह्या भूताच्या क्षुधा, तृषा, जरा, मृत्यु इत्यादि ज्या उर्मी त्यामधील एकाहि उर्मीनें तो चळणारा होत नाहीं भूताच्या उर्मीच्या वेगानी —उर्मीच्या लाटानीं तो चाळविला – चाळिला गेला असें होत नाही (४९१)

वावटळ ही केवढाहि जोर करुन आली तरी पृथ्वी ही ढळत नाहीं, त्याप्रमाणें उपद्रवाच्या उसळण्यानें जो घाबरून जात नाहीं – जो लोटला जात नाहीं. (४९२)

दैन्य हेंच दुखणेंभाणें किंवा भय हाच कोणी एक शोक, त्यामुळें जो त्रस्त होत नाहीं का भीति घेऊन कांपरेंच एक भरलें असा होत नाहीं – देहबुद्धि हीच एक अज्ञानदशा तेथे – मृत्यूच एक तें अज्ञानलक्षण – किंवा देह हा मातापितरानी जें काहीं अन्न भक्षिलें असेल त्याचा बनलेला तो केव्हाहि नाशवंत आहे – तरी पण कदाचित् देह सोडावा लागला म्हणजे जरी ते मरण प्राप्त झालें तरी जो मुळीच भीक घालीत नाहीं – भीत नाहीं (४९३)

त्याचें चित्त हें उजविलेलें ते केव्हाहि पाठमोरें होत नाहीं – जरी तेथे आर्तता – संसारव्यथा का आशाच एक ह्या संसारास नीटनेटका करण्याची ही जरी अनेक ओझी घेऊन असली किंवा अनेक व्याधींनी कल्लोळ केला तरी मुद्धा. आशा, वार्धक्य व व्याधि यानी त्रस्त झाला तरी – त्यानी हलकल्लोळाचा उठाव केला तरी त्याचें तें अनुकूल असलेलें चित्त – उजू झालेलें चित्त – डगमगत नाही – तें आपलें ध्येय सोडीत नाही. (४९४)

लोभानें इच्छेवर स्वार होणें केलें – निस्तेज करणे हाच एक दंड दिला गेला निंदेनें तरी त्याच्या मनाचा एक बालही वाकडा होत नाही – त्याच्या मनाची एक लोब सुद्धा वाकडी होत नाही इतकें धीटपणाचें तें चित्तस्वरूपी स्थिर असलेलें.

एकादा वीर जो त्याच्या हातची काठी का शस्त्रच काढून घेतलें तेथे – देहयष्टीचे महत्त्व जिजमुळें ती दंडी ( दंडण ) जी तीच मुळीं जरी निस्तेज केली का निंदाच एक तिथें केली – लोभ हा कामावर – विषयेच्छेवर बळावला जरी तरी ज्याच्या मनाची काब ही मजबुतच राहाते – त्याच्या मानसाची एकही काही दशा ही वाकडी होत नाहीं तो आपल्या ध्यानसंपत्ति ध्येयापासून मुळीच चळत नाही – हालत नाही – तो तेथे स्थिर राहातो. (४९५)

आकाश हें वसरून जावो – नाहींसें होवो, किंवा पृथ्वी ही सुद्धा विरून जावो तरी ज्याची हृदयधृति – चित्तवृत्ति ही केहाहि बदलत नाहीं वाटेल तर आकाश हे नाहींसें होवो पृथ्वी ही पण विरून जावो तरी ज्याच्या अत करणाचें धैर्य हें केहाहि बदलणारें होत नाहीं. (४९६)

अहो हत्तीवर फुलाचा मारा केला, त्याजवर फुलांचा हाला – हल्ला – केला तरी तो बाजूला हटत नाहीं – तो बाजूला वळत नाहीं – त्याला मागें हटणें का बाजूला होणे ( पासवणा ) हें माहीत नसतें, त्याप्रमाणें जो दुर्वाक्य शेल्यानीं टोचला तरी हटत नाहीं, हालत नाहीं. दुर्वाक्य शेल्यानें सळला, छळला तरी जो हटत नाहीं – आपली बाजू देत नाही – जसा तो हत्ती जो तो फुलाचा मारा किंवा हल्ला झाला तरी आपली बाजू सोडीत नाहीं – बाजूला हटणें हें करीत नाहीं. (४९७)

अहो डोंगरास वणवा लागला तर त्याच्या जाळानें काय आकाश हें जाळवेल क्षीरसमुद्र जो तेथीलच्या कल्लोळानी मंदराचळ पर्वत हा कंपायमान होत नाहीं. (४९८)

त्याप्रमाणें उर्मी आल्या व नाहीशा झाल्या तरी पण त्याच्या मनोधर्मामध्यें मुळीच कसलीहि गजबज – फुगणें तटणें – ही होत नाहीत – किंबहुना तो तर कल्पातींहि धीर असा धैर्यवंत व क्षमी असा क्षमाशील ( सर्व काही साहून असणारा ) (४९९)

पण स्थैर्य अशी जी कांहीं भाष का भाख ती येथें 'सविशेष' अशीच म्हटली कारण त्या दशेस पाहाणारा देखणा जो आहे त्यास दिसणारी अशी ही स्थिति का दशा असल्यानें ह्या "स्थैर्य!" अशा भाषेस का भाकेस का बोलण्यास 'सविशेष स्थैर्य!' असेंच म्हटलें आहे. (५००)

असें हें स्थैर्य निधड्या छातीचें, बळकट व अति दृढ असें आहे – जेथें अंतर्बाह्य बाणलेलें असें तें स्थैर्य अंगानें व जीवभावानें माधलेलें असून – जोडलेलें असल्यामुळें तें अगदी उघडें स्पष्ट असें ज्ञानाचें खरें निधान ( साठा, निधि, खजिना ) होय (५०१)

स्पर्धा करणारा किंवा ईर्षा करणारा जसा आपल्या विषयाला सोडीत नाहीं, अथवा भूत जसें आपल्या झाडाला ( का घराला ) सोडीत नाहीं, किंवा लढवय्या जो आहे तो आपल्या हत्यारास केव्हाहि विसरत नाहीं तसा लुब्धक जो तो आपल्या भांडारास का ठेव्यास क्षणभरही विसबत नाहीं – विसरत नाहीं. (५०२)

अथवा आपल्या एकुलत्या लेंकरास अंबिका ही केव्हाहि आपल्या पुढेंच घेऊन असते का मधुमक्षिका जी ती मधाविषयी अति लोभ घेऊन असते – तेथें लोभिणीच ती जशी का अतिलुब्धतेनें तेथेंच सर्व काळ असलेली (५०३)

अर्जुना, जो याप्रमाणें आपलें अंत करण हे जतन करून असतो तो आपल्या अंत-करणास इंद्रियांच्या द्वारीं केव्हाहि उभें राहू देत नाहीं (५०४)

तो म्हणतो कीं ( तसें तें अंत करण दडियाचें केलें तरी ) काम जो बागुल वायाच भीति दाखविणारा तो ऐकेल, ही आशारूपी डाकीण पाहील, तर ह्या जीवितरूपी बालकास – ते जीव टाकील ह्या जीवास हानि पोहोचेल म्हणून आपण अगोदरच जसा भिऊन असतो ( भिऊन असावेंच ) – एवढ्याचकरिता ते अंतःकरण इंद्रियांच्या दारामध्यें तो जाऊं देत नाहीं. ( दारीं जाणें – दैन्य दर्शवून भीक बरी म्हणणें करीत नाहीं ). (५०५)

बाहेर धीट झालेली जी व्यभिचारिणी तिजला दांडगा असा तो तिचा नवरा बांधून कोंडून ठेवितो. अगदी तशीच ही तऱ्हा देहातीं प्रकृतीसंबंधी किंवा प्रवृत्तिसंबंधी होय ( कामें करीत शब्द करणें का खेळत शब्द करणें जें ह्या प्रवृत्तिसंबंधीचें का प्रकृतिसंबंधीचें बोलणें आहे तेथें देहाती – देहासी – ह्या देहासच मुळीं हातीं धरणें तेथें टेहळणी, रक्षण, प्रतिबंध इत्यादि पाहिजेतच. ) (५०६)

( जिवंतपण, जीवित, जीवन, पाणी – थोडथोडकेपणें अगर काटकसरीने – वाणेपणें – देह झिजवितो ) संयमावरच ही इंद्रियें बुजविलीं घातलीं – ( सद्रूपामध्येंच वाडपणानें ) – सचेतनीं अचेत असेंच तेथें देहासकट आटणेंच. इंद्रियें हीं समजविलीं जाऊन संयमच तीं करणारी झालीं. (५०७)

जो मनाच्या महाद्वारीं मनाला विषयापासून आवरतो असा जो प्रत्याहार त्याचे चौकीवर म्हणजे पाहाऱ्याच्या जागेवर यम दम जे जे या शरीरामध्यें उभे ( यम दम ) जागवितो. (५०८)

आधार, मणिपूर व विशुद्ध चक्रामध्यें तीन बंधाच्या – मूळबंध, जालंदर व ओढियाणा या तिन्ही बंधाच्या घरटीमध्यें गस्तीमध्यें – पाहाऱ्यांत इडा पिंगळाच्या मध्यभागी जी सुषुम्ना नाडी तींत चित्त स्थिर करितो. (५०९)

समाधी संजीवन जें तेथें जी शेज बाज – तेथें ध्यानास बांधून ठेवितो व अंतर जें तें चित्त – चैतन्य – योगानें समरसलेलें असें तो करितो. अंतर्मुख असें तें करणें करितो अंतरीं तो चित्तचैतन्य योगामध्यें समरसलेला असा असतो. ( अंतः = अगदीं जवळचें असें जें इंद्रिय ते अंत करण होय किंवा मन होय. अंतर जें त्यास अवकाश, सीमा, आच्छादन, मन [ मध्यें किंवा शेवटीं ] असें म्हटलें आहे. व करण जें त्यास क्रियेचें

साधन, कारण, इंद्रिय, का अर्थी तिथी असें म्हटलें आहे. कर्ण म्हणजे भोक पाडणें, टोंचणें. नांवेचें सुकाणु –काटकोनासमोरची रेघ – समाकर्ण किंवा उपाकर्ण म्हणजे ऐकणें.)

('योऽन्त.सुखोऽन्तरारामस्तथान्तज्योतिरेवय ') (५१०)

हे अर्जुना, अतःकरण निग्रह जो तो हा हें जाण – हें जाणावें – जाणून ध्यावें – व हा जेथें असतो तेथेंच ज्ञानाचा विजय (विज्यो – विजो) होय – जयश्री होय (५११)

अत करण जें का – अत·करणाधिष्ठित जो श्रीविष्णु भगवान् तो स्वत अशा ह्या ज्ञानाला आपल्या मस्तकीं वाहून असतो – असा तो मनुष्याकारानें, ज्ञानच प्रत्यक्ष, प्रत्यक्षत्वानें असलेलें जाण – होय. अशा त्या ज्ञानाची आज्ञा ही अत·करण हें अत करण जें तें आपल्या शिरीं वाहून असतें – शिरसावंद्य मानतें. 'आज्ञा जयति' असाच तेथील उल्लेख होय गुरु, आश्रय, गृह, शरण अशी ती आख्या का आख्यायिका ह्या लोकांनीं मानलेली – शिरसावंद्य अशी सर्व महत्त्व दिलेली होय – तेथें सर्व विनय का नम्रता ही त्यानी आपली आहे अशीच एक मान्यता पत्करलेली का अम्मलबजावणी घेतली असें जाण. (५१२)

**इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधि दुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

इंद्रिय = ज्ञानाचें किंवा कर्माचें साधन अर्थ = पैसा, शब्दाचा भाव, अभिप्राय, प्रकार. वैराग्य = प्रपंचाविषयी उदासीनता (इंद्रियाचा जो अभिप्राय का आवड, मनोविकार, सतोष तेथें उदासीन असणें जें). अनहंकार = मीपण जेथें नाहीं, उदासीनतेचा भाव, वृथाभिमान नसणें जरा = वृद्धत्व. व्याधि = रोग (आधि = मानसिक दु ख) दु·ख = कष्ट, पीडा, शोक अनुदर्शनम् = एकसारखे तेंच पाहाणें जें, एकसारखा तेथीलचा अभिप्रायच बोलिला जाणे जसें का, तेच एक अवलोकनात घेणें जें, नेंहमी तेंच एक ज्ञान, का तेथीलचा भार हाच एक पुढें घेऊन असणें जें दोष = अपराध, चूक, अनियम. (दोष म्हणजे संध्याकाळ होय. 'देव शिव' जो त्याची पूजा होत असणारी – तेथें विशेषत्वानें देहबुद्धि अपराध क्षमा व्हावा म्हणून केलेली ती स्तुति का प्रकाश पाहिला जाणारा असें दर्शन) एव = या प्रकारें निश्चयाचें

अन्वय—(एतद् ज्ञान इति प्रोक्तम् ।) इंद्रियार्थेषु वैराग्यम् । अन् अहंकार एव । जन्ममृत्युजराव्याधि दुःख दोष अनुदर्शनम् च । [अन् जन्म अनुदर्शनम् (न)। अन् मृत्यु अनुदर्शनम् (न)। अन् जरा अनुदर्शनम् (न)। अन् व्याधि अनुदर्शनम् (न)। अन् दुखं अनुदर्शनम् (न)। अन् दोष अनुदर्शनम् (न). (अन् = न)]

अर्थ—इन्द्रियाचा जो अर्थ, तेथे वैराग्यपर असणे, निर्लोभपर असणें, तसेंच निरभिमानी का उदासीन असणें. व जन्मणें, मरणें, क्लेश जे, वृद्धत्व (उपमर्द) का व्याधि (रोग), दु·खमय दोष – दुःख किंवा अपराध, याच्या ठिकाणीं तेंच तेच जें वरचेवर पाहाणे करणें ते नच करणें असें जें (तें ज्ञान होय).

[शोक, मोह जरा, मृत्यु, क्षुधा, तृषा हे जीवाचे सहा धर्म त्याना षड्‌र्मी म्हणतात). (उर्मिका = आंगठी)] (८)

**आणि विषया विखी । वैराग्याची निकी ।**
**पुरवणी मानसी कीं । जिवी आथी ॥ ५१३ ॥**
**वमिलिया अन्ना । लाळ न घोटी (जेवी) रसना ।**
**आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥ ५१४ ॥**

विषभक्षणें नागवे। जळत्या घरी न रिघवे।
व्याघ्रविवरा न वचवे। वस्ती जेवी ॥ ५१५ ॥

धडाडिते लोहरसी। उडी न घालवे जैसी।
न करवे उसोसी। अजगराची ॥ ५१६ ॥

अर्जुना तेणें पाडे। जयासी विषयवार्ता नावडे।
नेदी इंद्रियाचेनि तोंडें। कांहींचि जावो ॥ ५१७ ॥

जयाच्या मनीं आलस्य। देही अति कार्ष्य।
शमदमी सामरस्य। जयासी गा ॥ ५१८ ॥

तपोव्रतांचा मेळावा। जयाच्या ठायीं पांडवा।
युगात जया गावा। आंतु येता ॥ ५१९ ॥

वहु योगाभ्यासी हांव। विजनाचि कडे धांव।
न साहे जो नाव। संघाताचे ॥ ५२० ॥

नाराजाची आंथुरणे। पूयपंकी लोळणे।
तैसे लेखी भोगणे। ऐहिकेचे ॥ ५२१ ॥

स्वर्गाते मानसे। आइकोनि मानी ऐसे।
कुहिले पिशित जैसे। श्वानाचे का ॥ ५२२ ॥

ते हे विषय वैराग्य। आत्मलाभाचे महाभाग्य।
तेणे ब्रह्मानंदा यौग्य। जीव होती ॥ ५२३ ॥

ऐसा उभय भोगी त्रासु। देखसी जेथ बहुवसु।
तेथे जाण रहिवासु। ज्ञानाचा तू ॥ ५२४ ॥

आणि सचाडाचिया परी। इष्टापूर्ते करी।
परी केलेपण शरीरी। वसो नेदी ॥ ५२५ ॥

वर्णाश्रम तोषकें। कर्मे नित्यनैमित्तिके।
तया माजी कांहीं न ठके। आचरतां ॥ ५२६ ॥

परी हें मियां केलें। कां हें माझेनि झालें।
ऐसें नाहीं ठेविलें। वासनें माजीं ॥ ५२७ ॥

जैसें अवचितपणें। वायूसी सर्वत्र विचरणें।
का निरभिमान उदैजणें। सूर्याचें तें ॥ ५२८ ॥

कां श्रुति स्वभावतः बोले। गंगा काजेविण चाले।
तैसें अवष्टंभहीन भलें। वर्तन जयाचें ॥ ५२९ ॥

ऋतुकाळीं तरी फळती। परी फळलों हें नेणती।
तया वृक्षाचिया ऐसी वृत्ति। कर्मी सदा ॥ ५३० ॥

एवं मनीं कर्मीं बोलीं। तेथ अहंकारा उखी जाली।
येका वळीयेची काढिली। दोरी जैसी ॥ ५३१ ॥

संबंधेवीण जैसी। अभ्रें असती आकाशीं।
देहीं कर्मे तैसी। जयासी गा ॥ ५३२ ॥

मद्यपा आंगीचें वस्त्र। कां लेपा हातींचें शस्त्र।
कीं बैलावरी शास्त्र। बांधिलें आहे ॥ ५३३ ॥

तेणें पाडें देहीं। जया मी आहे हें सेचि नाहीं।
निरहंकारता पांही। तया नांव ॥ ५३४ ॥

हें संपूर्ण जेथ दिसें। तेथेंचि ज्ञान असें।
इयेविषीं अनारिसें। बोलो नये ॥ ५३५ ॥

आणि जन्ममृत्यु (जरा) दुःखें। व्याधि वार्धक्य कलुषें।
इये आंगा न येता देखे। दुरौनि जो ॥ ५३६ ॥

साधक विवसिया। कां उपसर्गीं यौगिया।
पावे उणेया पुरेया। वोथंबा जेंवी ॥ ५३७ ॥

वैर जन्मांतरीचें। सर्पा मनौनि न वचे।
तेवीं अतीता जन्मांचें। उणे जो वाहे ॥ ५३८ ॥

डोळां हरळ न विरे। कां घाई कोत न जिरे।
तैसे कालीचेनि विसरे। जन्मदुःख ॥ ५३९ ॥

पुरवणी = साह्य, मदत जिती = खरी = जिवंत (५१३) रसना = रशना = जीभ (५१४). नागवे = रुचत नाहीं व्याघ्रविवर = वाघाची गुहा वस्ती = राहाणें (५१५). धडाडिते = तप्तरस. उसोसी = उशी (५१६). विषयवार्ता = विषय, इंद्रियग्राह्य पदार्थ, व्यापार (५१७). आलस्य = आळस, जडपणा. कार्ष्य = कृशता, रोडपणा, रोडकेपण शम = मनोनिग्रह. दम = आत्मसंयम (इंद्रिय शासनाने इंद्रिय जिंकणें) सामरस्य – सौरस्य = गोडी (५१८). तपोव्रताचा = व्रताश्रमाचा मेळावा – हा देह जसा एक तपस्व्याचा – जेथें अनेक व्रतानीं आपला आश्रय केला आहे (५१९). विजन = एकांत, अरण्य. संघात = स्थूल देहाचा पिंड, समुदाय, जनसघ (५२०) नाराच = बाणाचीं टोंकें. ऐहिकीचे – आहिकीचे (५२१). कुहिले = कुजलेले. पिशित = मास. श्वान = कुत्रा (५२२) विषयवैराग्य = इंद्रियग्राह्य पदार्थाविषयीं वैराग्य. आत्मलाभाचे = जीवब्रह्मैक्य – आत्मप्राप्ती – या आत्मलाभानें आनंद पावणारा तो आत्माराम (ब्रह्मानंद). भाग्य = ऐश्वर्य, दैव यौग्य = योग्य = चतुर, समान. यौग्य = योग्य, संबंधीचा (५२३) उभय भोगी = ऐहिकसुख व स्वर्गसुख – इहपर (५२४). सचाड = सकाम पुरुष इष्टापूर्ती = यज्ञयाग = बागा करणें, तलाव बाधणें इत्यादि कार्ये जी इच्छित का सन्मानित अशीं (५२५) वर्णाश्रमतोषकें—पोषके = ब्राह्मणादि चार वर्णाचे ब्रह्मचर्यादि चार आश्रम – त्यांना संतोष, तृप्ति का आनंद (तोष) का पालन वृद्धि (पोष) कर्मे. नित्य = स्वाभाविक, रोजचीं नैमित्तिक = प्रसंगोपात्त न टके = न ठके = राहात नाहीं (५२६). झालें = सिद्धि गेलें (५२७.) विचरणें = हिंडणें. निरभिमान = सहज, जाणिवेशिवाय (५२८) श्रुति = वेद. स्वभावतः = प्रकृति याथातथ्यतेनें, सहज अवष्टंभहीन = गर्वाचा फुंज न उद्‌भवता, गर्वारंभ नसता. वर्तन – वर्तणें (५२९). तरु – तरी (५३०). अहंकारा उखी जाली = अहंकृतीचा अभिमान गळाला – निर्जीव होऊन आहे अशा सहज प्रकाशाचा एकावळी = एकेरी हार दोरी = रज्जु (५३१) मद्यपा = मदिरा किंवा मद्य पिणाऱ्याच्या लेप = चित्र (५३३) तेणें – तया 'आहें' – मी आहे निरहंकारता = गर्वहीनता (५३४) जरा = वृद्धत्व (आधि = मानसिक दुःख) व्याधि = रोग वार्धक्य – वार्धक = म्हातारपण.

कलुष = पाप, मळ, गढूळपणा, घातुकपणा. इये – तिये ( ५३६ ) साधक = उपासक, योगी. विवसिया – विवशीला. उपसर्ग – उपसर्गु – उपसर्गी = बाधा, त्रास, सकट ( ५३७ ) वैर = शत्रुता. सर्पा = सरपटत जाणारा जो साप. मानौनि – मनौनि. अतीता = पार गेलेल्या, मागच्या, अमर्याद, भुक्त. उणे = पाप ( ५३८ ). हरळ = खडा. घाई = घाव लागलेल्या जागीं. कोत = भाला, शल्य. कालिचे न – कालिचेनी – काळीचे न ( नि ) ( ५३९ ).

इंद्रियग्राह्य पदार्थ जे त्याविषयीं लोभपर न होता वैराग्यानें असणे हीच एक कल्याणाची वृत्ति ह्या मनास जशी का साह्यच का मदत करणारी ती ( वृत्ति ही ) नेहमीं खरेपणानें जिवंत असते.　　( ५१३ )

ओकलेल्या अन्नाला ज्याप्रमाणें जीभ ही मुळीच हुंकूनही पाहात नाहीं, तेथें लाळ घोटणें तें कसचें? व मन जें त्यावर जीभ लाळ घोटण्याचे करीत नाहीं तिच्या तोंडास पाणी सुटत नाहीं, का प्रेतास आलिंगन देण्यास आग हे केव्हाहि कोणीहि देण्यास धजत नाहीं.　　( ५१४ )

विष खाणें रुचत नाहीं जळत्या घरी शिरवत नाही वाघाच्या गुहेंत एकदम प्रवेश करवत नाही – अहो असें जे काही ते मुळीच रुचत नाही – शिरवत नाही – जाणवत नाही तेथें वस्ती करून असणें हें जसें का – तेथें वस्ती ही केव्हाहि नच होणारी　　( ५१५ )

अति तप्त लोखंडाच्या रसात ज्याप्रमाणे उडी घालवत नाही अहो! मोठा सर्प जो अजगर त्याची काय उसोशी – उशी करणे करवत नाहीं जसें　　( ५१६ )

हे अर्जुना, अगदी त्याप्रमाणें ज्याला या इंद्रियग्राह्य पदार्थाची वार्ता का व्यापन हे आवडत नाहींत तो ह्या इंद्रियाच्या तोंडामध्यें काहींच पडूं देत नाही – त्यांना कोणताहि विषय म्हणजे इंद्रियग्राह्य पदार्थ देत नाहीं.　　( ५१७ )

ज्याचें मन जें सुखदुःखादि ज्ञानाचें इंद्रिय आहे तें – ( " मन एव मनुष्याणा कारणं बंधमोक्षयोः " ) – उठावलें होत नाहीं तें – नेहमी आळस करून असतें – जडपणा ज्याच्या मनात असतो – देह पाहिला तर रोडपणच का रोडकेपणाचा असा ब्राह्मणाची सपत्ति जी शमदम – मनोनिग्रह, शाति, अत.करणाची स्थिरता व आत्मसयमन ( इंद्रियें हीं व्रतादिकानी शासन करून जिंकणें जें ) – तेथे समरसणें का गोडी का सौरस्य हें ज्याचे आगी आहे.　　( ५१८ )

तपाचरण हें व्रतादीनीं साधावें व अशा व्रताचा ज्याने ह्या देहातच मुळी आश्रय केला आहे – सर्व तपें का व्रते ही एकत्र होऊन ज्याच्या ठायीं वस्तीस आलीं आहेत त्यास तर ह्या इंद्रियग्राह्य पदार्थाच्या गावामध्यें येतांना तर युगातच वाटतो.　　( ५१९ )

आचरणांत आणण्यास कठीण असा जो भाग तो म्हणजे जिकडे प्रवाह म्हणजे ओघ वाहील तिकडेच मुळीं वाहून जाणें, त्या ओघांत फसणें हें घात झाल्यासारखें होणारें. म्हणून जो ह्या जनसंघाचे का समुदायाचे ( ढीगच जसा तेथें एक नच आटोपला जाणारा ) निकट संबंधाचें होणें हें ज्यास सहन होत नाहीं. तेथें ती योगासंबंधीची जी चित्तवृत्ति ती निरोध करण्याकडे, स्थिर करण्याकडे त्याचें सर्व लक्ष असल्यानें तो केव्हांहि योगाभ्यासाची सर्वथैव हाव घेऊन तेथेच रमणारा होय – एकांतप्रिय असाच होय.　　( ५२० )

लोखंडी बाणाच्या टोकाची आथरुणें जशी का तीं – ऐहिकेची वार्ता का पूयपंकामध्येंच, पूयपातका-मध्येंच लोळणें एक जसें तसें तो ह्या ऐहिकभोगाविषयींची आळी ती पाहातो – मानतो.　　( ५२१ )

स्वर्गाविषयीं मनाने ऐकून असे मानितो कीं जसें तें ( श्वानाचें ) एक कुजके ( वसादि विकाराचें ) मास तें श्वानाचें जसें.　　( ५२२ )

असें तें विषयवैराग्य इंद्रियग्राह्य पदार्थाविषयींचे प्रपंचाविषयींची उदासीनता – वैराग्य – जें ब्रह्मैक्य – आत्मप्राप्तीचें महत भाग्य – आत्मलाभानें आनंद पावणारा आत्माराम तो ब्रह्मानंदच – अशा त्या ब्रह्मानंदाच्या योग्यतेस हा जीव येतो – आनंदाच्या योग्यतेचे जीवप्राणि होतात तेथें योग योग्य चतुरतेचें तें समानत्व ते योगच जसा आनंदास आला असें होय योग हा योग्य का सवयीचा असाच आनंदाचा होऊन येतो – असतो – तेथे जीवप्राणी हे त्या आनंदाच्या समानतेस येणाऱ्या योग्यतेचे होतात (५२३)

अगा तऱ्हेच्या त्या ऐहिकसुखाविषयींचा – विषयभोगामागे असलेला – इहसंबंधीं का स्वर्गसुखाच्या मागें असलेला जो त्रास तो मानून ते जो डावलितो – टाळून असतो – असें एकसारखे का त्याचे नेहमीचें वर्तन, तेथे ज्ञानच एक रहिवासी ज्ञान जें तेच होय (५२४)

त्याचें त्या यज्ञयागाचें करणे – बागा करणे – तलाव बांधणे इत्यादि सार्वजनिक सन्मानित का इच्छित कामें तो अगदी सकाम पुरुषाप्रमाणेच करीत असता पण ते त्याचे केलेपण हें तो आपल्या शरीरी मुळीच वसूं देत नाहीं. (५२५)

वर्णाश्रम, सतोष पावणारा, तृप्तीस येणारा – आनंदास येणारा – वर्णाश्रमाचा पालनकर्ता, का तेथे वृद्धिच एक, तसेंच कर्में जी स्वाभाविकपणे रोजची का प्रसगोपात्ततेची तीं सर्वत्र मुळी त्याने आचरली होतात – त्यामधील काहींहिसुद्धा तो आचरल्याशिवाय राहात नाही (५२६)

पण हे ( इष्टापूर्ते, तोषकें, नैमित्तिके का नित्यजें ) मी केलें किंवा हें माझ्यामुळे सिद्धीस गेले किंवा हे माझ्यामुळें झालें असें तो वासनेमध्यें मुळीच ठेवीत नाहीं त्याची वासना तेथे अडकून पडत नाहीं – कारण 'जन्म घेणें लागे वासनेच्या सगें । तेचि झाली अगे हरिरूप ।' अशी ती स्मृति ( स्मरण, सस्कार, वासना ) ईशाचरणींच वाहिलेली निरभिमानीपणें (५२७)

ज्याप्रमाणें वायु हा अगदीं सहजपणेंच – स्वाभाविकपणेंच सर्वत्र हिंडतो, चुकतो, विचरतो – वायूचें हिंडणें, चुकणें चहूंकडे जसें सहज आहे तसें सहजपणेंच ज्याचे तें काम करणें का कर्में आचरणें हें होत राहिलेलें. अहो ! सूर्याचें जें उगवणें तेथे काय तो सूर्य मी उगवलो असा अभिमान घेऊन असतो. सूर्याचें उदैजणें जसें निरभिमान तसें ज्याचे बुद्धीच्या प्रकाशावर प्रवृत्तिचे होणें का निवृत्ततेनें असणे ते (५२८)

श्रुति ही स्वभावेंकरून सहज प्रकृति, याथातथ्यतेनें – बोलत आहे – बोलते – ज्ञानकथन हें वेदाचें सहजत्व होय ( चार वेद, ब्राह्मण, आरण्यकें व उपनिषदें ह्या सर्वांना मिळून श्रुति म्हणतात ) 'नाहीं श्रुतिपरौति माउली जगा', स्वर्धुनि गंगा किंवा ती गंगानदी ही काही हेतु न धरिताच चालत वाहात आहे – त्याप्रमाणें – श्रुति ही सहज बोलते, गंगा ही हेतुकाजाशिवाय वाहाते – त्याप्रमाणें त्याचे वर्तन गर्वाचा फुंज न उद्भवता भलेपणाचें असें वर्तणें – वर्तन होय. (५२९)

तरूंना वसताचा बहर आला म्हणजे का हंगामासच ते फळें देतात – ते त्याचें फळें देणें का फळणें हें काही ते जाणत नाहीत अशी त्या वृक्षासारखी त्याची नेहमीं वृत्ति कर्मीं असते. (५३०)

याप्रमाणें मनामध्यें, कर्मामध्यें व बोलण्यामध्यें 'मनी, कर्मीं, बोलीं,' तेथें अहंकार जो त्यासच मुळी प्रात.काळचा प्रकाश पोहोचल्यामुळें तेथे कर्तृत्वाची जाणीव तीच लोपली – नव्हे सर्व प्रकाशली – मीपण जें तेथें अविद्येचा जो काही एक प्रकार तोच मुळीं नाहींसा झाला, तेथे सजीवतेचें जसें एका प्रकाशावर हें जीवित उभें आहे असें – तेथे आता 'सूत्रे मणिगणा इव' असें जें तेंच आता ती एकपदरी माळेची दोरीच मुळीं काढून टाकिली व मीपण जसें एकवळाची दोरीच वळली म्हणजे एकलयाचे प्रकाशाचे असें जीवन प्रकाशणारा एक असें झालें. तेथें 'मन तेच कर्म, तेच बोल' असें एकत्रित नव्हे तर व्यापकत्वाचे असे ते प्रात.कालचे जसे का. (५३१)

आकाशामध्यें येणारीं अभ्रें हीं सहजच काहीं कशाशी संबंध घेऊन येत नाहींत त्या प्रमाणें ह्या देहांतील कर्में ज्यास असतात (५३२)

मदिरासेवन केलेल्याच्या अंगावरचें वस्त्र जसें का एक किंवा चित्राच्या हातचें शस्त्र जसें का. तेथें शास्त्राची गोष्ट ही बैलावरच बाधून ठेविली जशी का आहे – शास्त्राचे ओझें बैलावर बांधून ठेविलें आहे (५३३)

त्याबरोबरीच्या अशा उपमेने ज्यास ह्या देहामध्यें मी आहें अशी आठवणच मुळी नाहीं तशा त्या असण्यास निरहंकारता म्हणतात (५३४)

हें सपूर्ण ज्यामध्यें दिसतें तेथेंच ज्ञान आहे ( असें समज ) या विषयीं काहीं दुसरें निराळें बोलणें नाही. (५३५)

जन्ममृत्युवृद्धत्वादि दु खास व्याधिवार्धक्य याच्या घातकीपणास जो आपल्या अगावर न घेतां दुरुनच पाहातो असा जो (५३६)

साधकास विवशीचा त्रास होऊ नये, योगी जो त्यास बाधा किंवा त्रास होऊं नये म्हणून उणें किंवा पुरें असें जें तेच मुळी दुरून पाहातो उपसर्ग व विवशी ही योगी जो त्यास का साधक जो त्यास त्रास होऊं नये म्हणून उणेपुरें जें काही तेथे होणारे होते ते जसें का भित मागेपुढें डोलूं नये म्हणून गवंडी ओळंबा लंबक लावतो तसेंच असते विवशीनें साधकास – उपासकास – योग्यास जो काही त्रास दिला जाणारा तो कसा नाही परिणाम करणारा म्हणशील तर जसा तो ओळंबा हा अधातरी अतराळींच सोडून तेथीलच्या भितीचें एक पातळीचे येणें पाहाणें करणें त्याने त्या भितीमधील दोष पार नाहीसें होऊन एक सरळ भित उभी होते त्याप्रमाणे मागें पुढें होणें – अस्थिर राहाणें, त्रास, बाधा, का संकट हें जेव्हा म्हणून आत डोकावूं लागतें तेव्हा ती वृत्तीची पातळीच मुळीं ह्या साधकसिद्धतेनें का योगी योगपरत्वानें आपल्या योग्यतेची करतो – तो साधक सिद्ध होतो, योगी योगच होतो – तेथे आता ती योगाची का सिद्धतेची समानरेषा अतराळी ही सिद्ध झाल्यानें तें विवशीचें येणे का उपसर्गाचें तें बाधणे हें नाहीसे होतें व वोळंब्याप्रमाणेंच जसा तो साधक का योगिया एक पातळीत राहिला – तेथे ह्या चित्तवृत्तीस समानतेची एक दिशा लाभली – एक पातळीच जशी ह्या स्थूललिग कारण वगैरे देहांनीं शुद्धतेस आणली – तेथे चित्त तेंच मुळी ह्या सिद्धाचें का योगाचें झाले. (५३७)

जन्मातरीचें वैर सापाच्या मनातून जात नाही, त्याप्रमाणें जो गेलेल्या – झालेल्या जन्माचे उणें का पुरें म्हणजे पाप, दोष आपल्या मनात वाहून असतो, दुरून पाहातो (५३८)

डोळ्यात शिरलेला बारीक खडा का रज कण हा सलतोच – घाव घातलेल्या ठिकाणीं शल्य जिरत नाही त्याप्रमाणें कालीचें म्हणजे ह्या जन्माचें जें दु ख तें विसरत नाही – दुरून पाहातो. (५३९)

**म्हणे पूयगर्तें रिगाला। अहो मूत्र रंध्रे निघाला।**
**कटा रे मिया चाटिला। कुच स्वेदु ॥५४०॥**

**ऐसऐसिया परी। जन्माचा कंटाळा धरी।**
**म्हणे 'आता ते मी न' करी। जेणें ऐसें होय ॥५४१॥**

**हारी उमजावया। जुंवारु जैसा ये डाया।**
**का वैरा बापाचिया। पुत्र जपे ॥५४२॥**

**मारिलियाचेनि रागें। पाठीचा जेवी सूड मागे।**
**तेणे आक्षेपे लागे। जन्मापाठी ॥५४३॥**

परी जन्मती ते लाज। न संडी जयाचे निज।
संभाविता निस्तेज। निलाजरे जैसे ॥ ५४४ ॥

आणि मृत्यु पुढे आहे। तोचि कल्पांती का पाहे।
परी आजीच होये। सावधु जो ॥ ५४५ ॥

माजी अथावे म्हणता। थडियेचि पांडुसुता।
पव्हणारा आईता। कासी जेवी ॥ ५४६ ॥

कां न पवता रणाचा ठावो। सांभाळिजे जैसा आवो।
वोडण सुईजे घावो। न लागताचि ॥ ५४७ ॥

पाहेचा पेण वाटबंधा। तंव आधीची होइजे सावधा।
जिऊन निघता वोखदा। धाविजे जेवी ॥ ५४८ ॥

येऱ्हवी ऐसे घडे। जो जळत्या घरीं सांपडे।
तो मग न पवाडे। कुहा खणो ॥ ५४९ ॥

चोंढी पायस गेला। तैसेनि जो बुडाला।
तो बोंबेसकट निमाला। कोण सांगे ॥ ५५० ॥

म्हणोनि समर्थेसी वैर। जया पाडे हाड खाईर।
तो जैसा आठों पाहर। परजुनि असे ॥ ५५१ ॥

ना तरी केळवली नोवरी। का संन्यासी जियापरी।
तैसी न मरता जो करी। मृत्यु सूचना ॥ ५५२ ॥

प गा जो या परी। जन्मेचि जन्म निवारी।
मरणे मृत्यु मारी। आपण उरे ॥ ५५३ ॥

तयाचें घरीं ज्ञानाचे। साकडे नाही सांचे।
जया जन्ममृत्यूचे। निमाले शल्य ॥ ५५४ ॥

आणि तयाचि परी जरा। न टेकता शरीरा।
तारुण्याचिया भरा—। माजि देखे ॥ ५५५ ॥

म्हणे आजिच्या अवसरी। पुष्टी जे आहे शरीरी।
ते पाहे होईल काचरी। वाळिली जैसी ॥ ५५६ ॥

निर्दैवाचे व्यवसाये। तैसे ठाकती हातपाये।
अमंत्री राजाची परी आहे। बळा यया ॥ ५५७ ॥

फुलाचिया भोगा—। लागी प्रेम टांगा।
ते कन्हेयाचा गुडघा। तैसे होईल ॥ ५५८ ॥

वोढाळाच्या खुरी। आखाड वाते बुरी।
हे दशा माझ्या या सिरी। पावेल गा ॥ ५५९ ॥

पद्मदळेसी इसाळे। भांडताति जे हे डोळे।
ते होती पडवळे। पिकली जैसी ॥ ५६० ॥

**भंवईची पडळे। वोमथती सिनसाळे।**
**उरु कुहिजैल जळे। आसुवांचेनी ॥ ५६१ ॥**

**जैसे बाभुळीचे खोड। गिरबडुनि जाती सरड।**
**तैसे पिचडी तोंड। सरकटिजैल ॥ ५६२ ॥**

**रांधवणी वोळी पुढे। पन्हिवे उम्हताति खातवडे।**
**तैसेचि ये नाकाडे। बिडविडती ॥ ५६३ ॥**

पूयगर्ते = पुवाच्या खाड्यांत. आहो – अहो. मूत्ररंध्र = मूत्रद्वार. कटा रे = (हाय) रे देवा (५४०) कांटाळा – कंटाळा. ते न—ते मी न. (५४१). हारी = हारलेलें धन. उमचावयालागी – उमजावयालागी = परत मिळविण्यासाठीं. जुंवारु = जुंवारी. बापाकिया – बापाचेया. जपे – जचे – जाचे (५४२). पाठीचा – पाठराखा. मागे – माघे. आक्षेपे = काळजीनें, दक्षतेनें (५४३). संडी – सांडी. निज = मन. निलाजरे जैसे – न जिरे जेवी = सभाविताला अपकीर्ति सोसवत नाहीं (५४४). पुढे – पुढा. कल्पांतिक – कल्पांती का. आजीचि = आजचि – आजीच (५४५). अथावे = अथाव = खोल पाणी. पव्हणारा = पोहणारा. कासी जेवी – कांस = कासेसि = कास घालतो (५४६). वोडण = ढाल. लगताचि – लागताचि (५४७). पाहेचा पेण वाटबंधा = उद्याचा मुक्काम वाटवधा – दंगा होण्याचा. आधीची – आजीची. जिऊ न निघता – जीव न वचता = प्राण जाण्यापूर्वींच. वोखदा = औषधा (५४८). जळत्या – जळत खाणो – खणो. न पवाडे कुहा खणो = मग विहीर तो खणत नाहीं (५४९). चौढी – चौढिये = डोहांत. पाथरुं = दगड, पत्थर (५५०). पाडे – पडिले – पडले. हाडखाईर = हाडवैर, हाडाम भेदणारे. आठो = आठही. परजुनि = शस्त्र सज्ज करून. केळवली = केळवण केलेली, उपवर. तैसी – तैसा (५५२). तयाते – तया (५५४). पाहे = उद्या काचरी = पाला, भाजी. वाळिली = वाळली (५५६). अमंत्र्या राज्याचि परी – अमंत्री – अमंत्रिया राजाची परी येया – यया (५५७). टागा = टांगे = मस्तक कन्हेयाचा – करेयाचा = उंटाचा. ऐसे – तैसे (५५८). आखरु वाते – आखाड – आषाढ – वाते. बुरी = कुजणें (एक रोग). हे दशा माझ्या सिरी – ते दशा मा या सिरी (५५९) इसाळे = ईर्षा किंवा स्पर्धा धरून (५६०). भवैंची – भंवईची पडळे = पडदे. वोमथती = लोबतात. सिनसाळे – शिनसाळे = वाळकेल्या सालीसारखी. कुहिजैल = कुजेल. आसुवाचेनी = अश्रुंच्या (५६१). बाभुळेचे – बाभुळिचे. गिरबडुनि = चिकानें बरबटून. पिचडी = थुंक्याने. सरकटिजैल = भरेल (५६२). वोळी = चुली पन्हिवे – पन्हिये – पन्हवे = मोरीत, चरात उधाति – उम्हताति = बुडबुडे येतात. खानवडे = साचलेल्या घाण पाण्यानें. बिडबिडिती – बिडबिडती (५६३)

तो म्हणूं करितो कीं अहो पुवाच्या खाड्यात रिगालेला – का अहो मूत्रद्वारातून निघालेला हा जन्म अहा कटा रे! अहा! हाय रे!! मी जसा हा कुचस्वेद चाखिला होय (५४०)

अशा अशा तन्हेनें तो जन्माचा कंटाळा धरितो व म्हणूं करितो कीं ज्या योगें पुन्हा जन्म येईल असें काहींच मी करणार नाही (५४१)

हारवलेलें – हारलेले धन पुन्हा मिळविण्यासाठी जसा जुंवारी डावास येतो अथवा बापानें दिलेला जो हा जन्म तेथें वैरच एक जसें का साधलें या कारणास्तव पुत्र हा जाच करितो – जपतो – जपून असतो. (५४२)

मारल्याची आठवणच नाही पण पाठिराखा पाठीचा सूड मागतो अशा तन्हेच्या दक्षतेने – का काळजीनें जो ह्या जन्माच्या पाठीमागे लागतो. (५४३)

पण जन्मती ती लाज ज्याचे मन सोडीत नाहीं – निज जे – ते ही जन्मती लाजच मुळीं साडीत नाही – खंडित नाहीं – अहो सभावितास निलाजरेपण हे निस्तेज करणारे होय. सभावितास अपकीर्ति सोसवत नाहीं – जिरत नाही तसं ही जन्मती लाज त्याचें तें मन का निज सोडीत नाहीं – ती जिरत नाही. (५४४)

आणि पुढें मरण आहे तेंच जसें कल्पातीं आहे असें पाहाणारा जरी तरी आजच तें पाहूं करून जो सावध होतो. (५४५)

अहो पुढें फार मोठा डोह आहे, पुढें पाणी खोल आहे असें ऐकिलें तर अलीकडच्या काठी असतानाच आयता पोहणारा पोहणें जाणणारा जो तो कास घालून असतो (५४६)

रणाचा ठाव न पाहातां जसा तो तेथीलचा आव–आविर्भाव हा साभाळावा लागतो–का घाव न लागताहि ढाल ही पुढें घेऊन असणें हें करावें लागतें–तें शिकावें लागतें (५४७)

अहो उद्याचा जो मुक्काम आहे तेथें वाटवध किंवा वाट ही सबंध आडविली जाणारी होईल असें समजून जो आधींच किंवा आजच सावध होतो का जीव जाण्याचे अगोदरच मुळीं व्याधीचें औषध हें धांवाधाव करून आणावें लागतें, मिळवावें लागतें (५४८)

एऱ्हवीं पाहिलें असता असेंच घडतें कीं एकादा जळत्या घरी सापडावा व मग त्यानें ती आग विझवि-ण्यास, आड खोदण्यास सुरुवात करावी–तेथें कुवा खणणें–खणण्याचा उद्योग जो जसा एक दीर्घ प्रयत्नाचा –मेहनतीचा तो काय कामाचा बरें! (५४९)

अहो अगदीं खोल पाण्यात पत्थर गेला तेथे तो दगड बुडालाच जसा–तेथे तो बोम्बी म्हणजे अगदी वाटेसहित–नाभीसकट बुडाल्या कारणानें आता तेथें ते त्यानें कुणास बरें सांगावें–कीं कोणी त्याची कींव करील. (५५०)

असें आहे म्हणून समर्थ जो काळ किंवा हा जन्म जो तो त्याजबरोबर एक हाडवैर पडले आहे तेथे जन्मलेला त्यानें जर आठही प्रहर आपलें शस्त्र (वैराग्यवृत्ति) परजूनच असावे समर्थाशी ज्याचे वैर आहे तो आठही प्रहर आपलें हत्यार परजून असतो (कारण कोणत्या वेळेस ती हाडवैराची बाजू त्याजवर पडेल का उलटेल याचा मुळींच काहीं नियम नाही म्हणून). (५५१)

केळवण झालेली नोवरी–उपवर झालेली कन्या तिजबद्दल बाप नेहमीं चिंता वाहात असतो किंवा संन्यासी जो तो त्या विषयाटवीची नेहमीं मोठी एक चिंता घेऊन असतो–तेथे खबरदारीनें असतो त्याप्रमाणें न मर-ताही जो मृत्यूची चिंता करतो–स्वतःस साभाळतो–मृत्यूस वरचढ होऊं देत नाहीं (५५२)

याप्रमाणें जो जन्मास येऊन जन्माचें निवारण करतो किंवा मरणे पाहून मृत्यूसही हारी देतो व आपण स्वतः वाचतो–स्वतःस उरवितो–स्वतःस जगवितो–जागवितो (५५३)

त्याच्या घरी ज्ञानाबाबत साकडे नाहीं, कारण त्याचें ते जन्ममृत्यूचें (मनास नेहमीं) टोचणारें शल्यच मुळी बाजूस झालें, नाहींसें झालें (५५४)

त्याचप्रमाणें जोपर्यंत हें म्हातारपण चढ घेऊन आलें नाहीं तो आधीच त्या तारुण्याचा भर हाच पाहून असावा–नेहमीच आपलासा केलेला असावा (५५५)

तो म्हणतो कीं असें करण्याचें कारण काय तर आज जी काहीं एक त्या शरीरानें पाहिलेली जी पुष्टता तीच मुळीं उद्या जशी का वाळलेल्या झाडाच्या पालीसारखी होईल–ती वाळली जाईल किंवा वाळिलेली होईल (५५६)

तो असें म्हणतो कीं–जो आपलें दैव उजवीत नाहीं–जो दैवावरच हवाला टाकून असतो असा जो निर्दैव त्याचे हातपाय काहींहि काम न जाणणारे असल्यानें ते ते मुळींच व्यवसाय नसलेले असे वाळून जातील–का ज्या राजास मंत्री हा नाहीं किंवा जेथे राज्य हें मंत्रीच मुळीं नसलेलें ते जसें बिनबळाचें,–तसें होईल. त्या बुद्धीस जर शिकवण नाहीं का शिकणें देणें नाहीं तर ती मुळीं काहींच कामाची नव्हे–ती कुचकामाची होते जशी का तसें त्या बळाचे (तपोबळाचें) जाण. (५५७)

फुलें मस्तकीं पडावीत म्हणून मस्तकच एक त्या प्रेमास दिलें–मस्तक हें फुलांनीं शोभिवत दिसते–उपभोगाचें होतें–पण तें म्हातारपणीं उंटाच्या गुडघ्यासारखें टेंगळाचें असें होईल–म्हणून प्रेमाचें बळच मुळी त्या प्रधान गात्रास शोभवितें–तसें करून असावें–नाहीं तर साडेसाती उदरीं आली जसा का उंटाचा गुढघाच. तेथें मस्तक तें काय कशाचें केलें आहे हें समजतच नाहीं　　(५५८)

पायओढाळ जे गुरूं त्याच्या खुरामध्यें आषाढ महिन्याची बुरबुर जशी एक उठवणीचा रोग करणारी होते तशी दशा त्या माझ्या शिरावर येऊन बसेल–बळ करून असेल. (उठवणी आलेल्याम केव्हांहि हालावेसें वाटतच मुळी नाहीं–तेथें पायच मुळी कुजणे घेऊन असतात)　　(५५९)

(डोळे)–अहो कमलपत्राशी सौंदर्याच्या चढाओढीनें असणारे हे डोळे–पद्मदळापेक्षां सुंदर असे हे डोळे–नेहमीं भाडण घेऊन असणारे–स्पर्धेनें का ईर्षेने–ते डोळे जशीं का पिकलीं पडवळें असे होतील.　　(५६०)

(ऊर)–शिवाय भुवईंचे पडदे हे वाळलेल्या सालीसारखे होतील व ऊर जे ते तर त्या आसुवाच्या गळण्यानें कुजून जाईल (कुहिजैल).　　(५६१)

(तोंड)–बाभुळीचे खोड जसें सरड हे चिकानें बरबटून त्यावरून जाणारें झाल्यानें जसें ते खोड बरबटलेलें होणारें तसें थुंक्यानें हे तोंड भरेल　　(५६२)

(नाक)–स्वयंपाकाच्या चुलीपुढें मोरीत का चरात घाण पाणी साचविते त्या पाण्यात जसे पऱ्हे वळवळल्याप्रमाणे बुडबुडे येतात तशी ही नाकाडे शेंबडाच्या बुडबुड्यांनी बिडबिडतील　　(५६३)

**तांबूलें ओठ रांऊं । हांसतां दांत दाऊं ।**
**सनागर मिरवूं । बोल जेणें ॥ ५६४ ॥**

**तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटांचा लोंढा ।**
**इया उन्मळती दाढा । दाता सहित ॥ ५६५ ॥**

**कुळवाडी रिणे दाटली । का वांकडिया ढोरे बैसली ।**
**तैसी नुठील कांहीं केली । जीभचि हे ॥ ५६६ ॥**

**कुसळे कोरडी । वाटेनें जाती बरडी ।**
**तैसी आपदा तोंडी । दाढियेसी ॥ ५६७ ॥**

**आषाढियेचेनि जळे । झिरपती जैसी मौळे ।**
**तैसे खांडीहूनि लाळे । पेटती पूर ॥ ५६८ ॥**

**वाचेसी अपवाडु । कानी अनुघडु ।**
**पिंडु गरुवा माकडु । होईल हा ॥ ५६९ ॥**

**तणाचे बुझवणे । आंदोळे वारे गुणे ।**
**तैसे येईल कांपणे । सर्वांगासी ॥ ५७० ॥**

**पाया पडती बेंगडी । हात वळती मुरकुंडी ।**
**बरवेपणे बागडी । नाचविजैल ॥ ५७१ ॥**

**मळमूत्र द्वारें । होऊन ठाती खोंकरे ।**
**नवसिये होती इतरे । माझिया निधनी ॥ ५७२ ॥**

देखोनि थुंकिल जगु । मरणाचा पडैल पांगु ।
सोयरिया उबगु । येईल माझा ॥ ५७३ ॥

स्त्रिया म्हणती विवसी । बाळे जातील मूर्च्छि ।
किंबहुना चिळसी । पात्र होईन ॥ ५७४ ॥

उभळीचा उजगरा । सेजेया जाईलेया घरा ।
सिणविल म्हणती म्हातारा । बहुतातें हा ॥ ५७५ ॥

ऐसी वृद्धाप्याची सूचणी । आपणया तरुणपणी ।
देखे मग मनीं । विटे जो गा ॥ ५७६ ॥

म्हणे पांहे हे येईल । आणि आतांचे भोगिता जाईल ।
मग काई उरेल । हितालागीं ॥ ५७७ ॥

म्हणोनि नाइकणे पावे । तंव आइकोनि घाली आघवें ।
पंगु न होता जावे । तेथ जाय (तेथुनिया) ॥ ५७८ ॥

दिठी जंव (जायजाये) आहे । तंव पाहावें तेतुलें पाहे ।
मूकत्वा आधी वाचा वाहे । सुभाषिते ॥ ५७९ ॥

हात होती खुळे । हे पुढील मोटकें कळे ।
तव करूनि घाली सकळें । दानादिकें ॥ ५८० ॥

ऐसी दशा येईल पुढे । तैं मन होईल वेडें ।
तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥ ५८१ ॥

जैं चोर पाहे झोंबती । तंव आधीच्चि (आजीच्चि) रुसिजे संपत्ती ।
कां झांकाझांकीं वाती । न वचताच्चि कीजे ॥ ५८२ ॥

तैसे वृद्धाप्य जैं हे यावे । मग जैं वाया जावे ।
ते आतांच्चि आघवें । सवते (वसते) केले (करी) ॥ ५८३ ॥

आतां मोडूनि ठेली दुर्गें । कां वळित धरिली खोंगे (खगे) ।
तेथ उपेक्षूनि जो रिगे । तो नागवला की ॥ ५८४ ॥

तैसे वृद्धाप्य होये । जालेपणे वाया जाये ।
जे तो शतवृद्ध आहे । नेणो कैंचा ॥ ५८५ ॥

झाडिली कोळे झाडी । तया न फळे जेवी बोंडी ।
जाला अग्नि तरी राखोंडी । जाळिल काई ॥ ५८६ ॥

म्हणोनि वृद्धाप्याचेनि आठवे । वृद्धाप्या जो नागवे ।
तयाच्या ठाई जाणावे । ज्ञान आहे ॥ ५८७ ॥

तांबोळे – तांबूले = विडा, पान. रांऊं = रंगऊं. सनागर = उत्तम (५६४). तयाच्चि पाहे – पाहे. जळबंधाचा – जळंबटाचा = लाळेचा, खाकेऱ्यांचा. उन्मळती = पडतील. दातेसहित – दातासिही – दातासकट = दातासहित (५६५). कुळवाडी = व्यापार, शेती. वांकडिया = पावसाच्या झडींत. नुठील – नुठेल – नुठी (५६६). कोरडी = वाळलेल्या गवताची (कुसळें). आपदा तोंडी दाढियेसी – आपत्ति तोंडी पाळियेसी

(५६७). जेवि मौळे – जेवि शैलाची मोळे. खांडीहूनि = दाताच्या खिंडींतून (५६८). आपवाडु – अपवाडु = अस्पष्टता. अनुघडु = दहे बसल्यासारखे. गरुवा = जीर्ण, जरठ (५६९). तणाचे – तृणाचे. बुझावणे आडोळले – बुझावणे (बुजगावणे) आंदोळे. वारे गुणे – वारेनु (नि) गुणे (५७०). बेंगडी = वेडेवाकुडेपणाचीं वळणें, बागडी (बागडे) = सोंग, मुरकुंड = शरीराचें संकोचन (५७१). खाकरे – खोकरें = फुटकी. नवसिये = नवस करणारे (५७२). पांगु = इच्छा. उबगु = त्रास, उपेक्षा, कंटाळा (५७३) विवसी = भूत, जखीग (५७४). उभळींचा = (उभळ = खोकला) खोकल्याची उंभळ. उजगरा = जागरण. सेजेया जाईलेया घरा – शेजारिया – सेजिया – सोइलिया = शेजाऱ्याना, शेजारच्या घरात निजलेल्याना (५७५) वृद्धाप्याची = वार्धक्याची. आपणया – आपणिया. विटि जो – विटे जो (५७६) पाहे = उद्यां (५७७). नाइकणे पावे – बहिरेपण जोंपर्यंत आलें नाही तोंवर. न ऐकणें जोंपर्यंत आलें नाही. आवे – आघवे. तेथुनिया – तेथ जाय (५७८). दिठी – दृष्टि. जाय जाये = आहे आहे. सुभाषिते – सुभाषित = गोड बोलावें (५७९) पाहे = पाहाटेस, उद्यां. आधींचि – आजीचि दृसिजे = दूर करावी (५८२) वृद्धाप्य = वार्धक्य ये यावे – जै हे यावे. जे – जैं. सवते केले – वसते करी (५८३). मोडूनि ठेली = असुरक्षित झाली. वळित धरिलि खगे (खोगे) = पक्षी परत घरव्यात्रडे फिरले. न रिगे = न निघे. नागवला = अशा ह्या स्थितींत सांपडत नाहींसा झाला – सांपडणारा झाला नाही (५८४). जालेपणे – जालेपण – आलेपण = जन्मलेपण, जन्म. शतवृद्ध = शतायु (५८५). कोळे = तिळाचीं बोडें. अग्न = अग्नि. राखोंडी = राखुंडी, राखाडी (५८६). वृद्धाप्याचेनि = वार्धक्याचेनि. वृद्धाप्या = वार्धक्या. नागवे = सापडत नाहीं (५८७).

ताबूल विडा खाऊन ओठ हे रंगवूं. हासताना दात दाखवूं. जेणेंकरून हें बोलणें कसें तें अगदीं उत्तम असें मिरवणेंच एक ह्या बोलण्याचे. (५६४)

त्याच ह्या तोंडाला उद्या लाळेच्या का खाकऱ्याच्या जळमटाचा लोढाच येईल – व दातासहित ह्या दाढाच मुळीं उन्मळून जातील. (५६५)

व्यापार, शेती, कुळवाडी रिणाने पार खचून केली किंवा गुरेंढोरें हीं पावसाच्या झडींत उघडींच (वाकडी – उघडी वाघडी) बैसलीं त्याप्रमाणें ही जीभच मुळी नच हलणारी होईल – ही जीभच मुळीं लुळी पडेल. (५६६)

वाळलेल्या गवताचीं कुसळें, कोरडी कुसें हीं वाऱ्यानें माळरान जमिनीवर जशी उडून जातात त्याप्रमाणें ह्या दाढासी किंवा तोंडास दाढासहित एक आपत्तीच जशी येईल. (५६७)

आषाढांतील पावसानें – पाण्यानें – पाऊसपाण्यानें – डोंगरावरचीं, पर्वतावरचीं – पर्वताच्या शेंड्यावरचीं गवतें झिरपतात त्याप्रमाणें दांताच्या खिंडींतून लाळेचे पूरच्या पूर चढीला पेटल्याप्रमाणें येऊं लागतात, झिरपूं लागतात. (५६८)

वाचा ही अस्पष्ट होते – कानानी ऐकूं येत नाहीं – कानीं दहे बसल्यासारखें होईल – व पिंड जो जीर्ण का जरठ माकडासारखा हा होईल. (५६९)

तणांचें किंवा तृणाचें बुझवणें किंवा बुजगावणें जसें वाऱ्यानें हेलकावे खात असतें त्याप्रमाणें सर्वांगास कापरें भरूं लागेल. (५७०)

पाय वेडेवाकडे होतात – पडतात – पडतील. हात तर मुरकुंडी वळल्यासारखे कडबुळयासारखे आतच संकोचन घेऊन असतील – असतात – व मग ही बरवेपणाची मानलेली ह्या देहाची ती आता सोंग (संपादणी) च एक नाचविजेल. (५७१)

मळमूत्रद्वारें हीं फुटकीं होऊन जातील–व इतर जन तर ह्या माझ्या मरणाबद्दल नवस करणारे होतील–हा म्हातारा केव्हा एकदांचा मरेल तर बरें असें म्हणणारी होतील (५७२)

ही अवस्था पाहून सारें जग थुंकेल व मरण केव्हा एकदाचे येईल असें होऊन जाईल–व शेजाऱ्याना उपेक्षा, त्रास, कंटाळा माझा येईल. (५७३)

ते पाहून बायका भूत म्हणतील. मुले मूर्च्छनेस येतील एका किळसीच मी पात्र होईन असें होईल. (५७४)

खोकल्याची उभळ आली म्हणजे शेजाऱ्याना जागरणच करील व ते म्हणतील कीं हा म्हतारा बहुताना शिणवीलच नुमता. (५७५)

अशी वार्धक्याची सूचना आपल्या तरुणपणी पाहून जो मनीं वीट घेतो (५७६)

म्हणतो कीं उद्या हें म्हातारपण येईल व आताचे जे शरीर हे भोग भोगण्यातच नाहीसें होईल व मग हिताचें किंवा कल्याणाकरिता आपल्याजवळ काहीच उरणार नाहीं. (५७७)

आणि एवढ्याच करितां जोपर्यंत तें न ऐकणें येऊन ठेपलें नाहीं म्हणजे बहिरटपण जोपर्यंत आलेलें नाहीं तोपर्यंत हें सर्व काही ऐकोन असावें व पगु न होता आपल्या स्वत:च्या कल्याणास यावें–जो उत्तम असा जागा का स्वर्ग तेथेंच जावें–जाऊन असावें (५७८)

दिठी म्हणजे दृष्टि जोपर्यंत आहे–ती जिकडे जातेच जाते–जाऊनही जाते–जाण्याचे करिते तोपर्यंत जें काहीं पाहावें असें आहे तें पाहावेंच, तें पाहाच पाहा व मुकेपण येण्याच्या अगोदर, वाचा पागुळी होण्याचे अगोदरच मुळी चागलें बोलणें ते–गोड बोलणें ते बोलत असावे. (५७९)

हात लुळे होणारे हें पुढील आताच कळून चुकलें आणि म्हणून आताच मुळी जी काहींएक पुण्यें तीं करून असावें हेंच बरें (असें तो म्हणू लागतो). (५८०)

अशी ती म्हातारपणाची दशा पुढें येईल–पुढें झाली तर तेव्हा तर मन हे वेडेंच होईल आणि म्हणून जो उत्तम असें आत्मज्ञानाचे चितन अगोदरच करून ठेवितो–असतो. (५८१)

जर का पांहाटे का उद्या चोर (पडले–झोबूं लागले) झोबणार आहेत असें पाहूं केलें तर अगोदरच मुळी ह्या सपत्तीची वासलात जो लावतो तो (उपयोग दानपुण्य करण्याकडे करावा) किंवा दिवा विझण्याचे मुळीं अगोदरच झाकापाकी करावी (जोंपर्यंत वात म्हणजे बुद्धि का वाचा ही शाबूत आहे). (५८२)

वार्धक्य आल्यावर मग वाया जाण्यापेक्षा हें आताच सर्व काहीं वसतें केलेलें बरें–(तें आपदेचें दुखणे दूर केलेलें बरें). (५८३)

दुर्ग–अवघड जागा मोडून ठेविल्या–त्या असुरक्षित केल्या–का पक्षी परत घरट्याकडे वळले–तेथे उपेक्षा करून जो असतो तो फसला समजायचा नव्हे का तेथे उपेक्षा करून जो असत नाहीं तो अशा ह्या स्थितींत सापडत नाहीं–सापडेनासा झाला होतो. (५८४)

तसें वार्धक्य आलें–जन्मलेपण–ह्या जन्मास आलेंपण ते जन्मलेपणानें वाया जाऊ देणें हें काहीं बरें नव्हे! अहो काय हा जन्म शतायु आहे! हा जन्म काय कसचा एक कीं तो शतायूच मानला गेला!!! तेथे कल्याणाच्या मार्गाचा अवलंब करणें हे कल्याणाच्या मार्गाच्या जवळच न होता ते दूरदूरच टाकले जात आहे जसें (५८५)

तिळाचीं बोडें झाडिली म्हणजे तेथें काहींच उरत नाहीं–(त्या बोडानीं काय पुन्हा फळें देण्याचे होईल?)–अहो अग्नि जरी झाला तरी पण तो राखाडी (राखोडी) जेव्हा, तेव्हा काय जाळणारा होतो?–अग्नि झाला तरी राखोडी (राखाडी) काई जाळील? (५८६)

आणि म्हणून वार्धक्याची आठवण ठेवून जो वार्धक्यामध्यें सापडत नाहीं त्याच्या ठिकाणीं असेंच जाण कीं 'ज्ञान' आहे. (५८७)

**तैसेनि नाना रोग। पडिघाली पुढां आंग।**
**तंव आरोग्याचें उपेग। करूनि घाली ॥ ५८८ ॥**

**सापाचें तोंडी। पडली जे उंडी।**
**ते लावूनि सांडी। प्रबुद्ध जैसा ॥ ५८९ ॥**

**तैसा वियोगु जेणे दुःखें। विपत्तु शोकु पोंखें।**
**ते स्नेह सांडूनि सुखे। उदासु होये ॥ ५९० ॥**

**आणि जेणें जेणें कडे। दोष सूतील तोंडे।**
**तया कर्मरंध्रीं गुडे। नियमाचे दाटी ॥ ५९१ ॥**

**ऐसिया आईती। जयाची परी असती।**
**तोचि तो ज्ञानसंपत्ती। गोसावी गा ॥ ५९२ ॥**

**आतां आणीकही येक। लक्षण अलौकिक।**
**सांगेन आईक। धनंजया ॥ ५९३ ॥**

पडिघति – पडिघालिना जंव = व्यापलें नाहीं (५८८). लावूनि – लागूनि (५८९). दोष सूतील तोंडे = जेथे दोष आपली तोंडें आतमध्यें करितील अशा कर्मेंद्रियाच्या मार्गात नियमाचे गुंडे बसवून त्या वाटा वर करितो (५९१). आईती = एकान्तानें, युक्तीनें. परी = परोपरीनें करणे जें (५९२). अलौकिक – अलौकिक (५९३)

त्याचप्रमाणे अनेक रोग जे अथवा रोग हा अगदीं व्यापला नाहीं तोच आरोग्याचे उपाय करितो जो. (५८८)

सापाचे तोंडी पडलेली जी ही उडी ती जो काढून टाकतो – दूर फेंकून देतो – जसा का एक प्रबुद्ध झालेला ज्ञानानें जो. (५८९)

त्याप्रमाणे ज्या दु.खामुळें वियोग किंवा विपत्ति का शोक हा पोखरणारा होतो तसा तो स्नेह का लोभ सोडून जो सहज उदास होतो, विरक्त होतो, निरिच्छ होतो. (५९०)

आणि जिकडे तिकडे म्हणून हे दोष आपलीं तोंडें घालतील – आत करतील – दोष तोडे वीतील – अशा त्या कर्मेंद्रियाच्या मार्गात नियमाचे धोडे बसवून तीं छिद्रे बंद करतो जो (५९१)

अशा युक्तीने जो परोपरीनें ते तसें केलेंच, करणेच करणें, करणें तोच मुळीं ह्या ज्ञानसपत्तीचा स्वामी गोसावी जाण. (५९२)

आता यावर आणखीहि एक लक्षण – अलौकिक असें तें – हे धनंजया, सांगण्याचें करतो तें ऐक (५९३)

**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु।**
**नित्यं च समचित्तत्वं इष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

असक्ति = वैराग्य (आसक्ति = भोगेच्छा, संसर्ग, तल्लीनपणा) अभिषंग = आलिंगन = तिरस्कार (अन् + अभिषंग = नापसंतपण, नावडणें, तिरस्कार) समचित्तत्वम् = निःपक्षपातीपणा. उपपत्ति =

संगति, संबंध, मूळ कारण. इष्ट = इच्छित, प्रिय, सन्मानित (इष्ट = यज्ञ). अनिष्ट = इष्ट किंवा प्रिय नसलेले – का अशुभ दार = विवाहित स्त्री.

अन्वय—पुत्रदारगृहादिषु असक्तिः (पुत्रदारगृहादिषु) अनभिषु – अगः । नित्यं इष्ट अनिष्ट उपपत्तिषु समचित्ततवं च ।

अर्थ—स्त्री, पुत्र, गृह इत्यादींच्या ठिकाणीं वैराग्यपर असणें किंवा आसक्त नसणें, अतिशय आवड घेऊन नच असणें, तसेंच शुभ वा इच्छित जें त्याच्या विषयीं का अशुभ जें, प्रिय नाहीं जें, त्याच्या ठिकाणीं नि.पक्षपातीपणानें असणें, असा जो नेहमीं असतो – स्वभावसिद्ध असें जें एक नि·पक्षपातीपणाचें पाहाणें त्यानें जो असतो (अशा ह्या लक्षणांना ज्ञान म्हणतात). (९)

तरी या देहावरी । उदासु ऐसियापरी ।
उखिता जैसा विढारी । बैसविला असे ॥ ५९४ ॥
कां वृक्षाची साउली । वाटे जाता मीनली ।
गृहावरी तेतुली । आस्था नाही ॥ ५९५ ॥
साउली सारखीच असे । परि असे हे नेणिजे जैसे ।
स्त्रियांचेही तैसे । लोलुप्य नाही ॥ ५९६ ॥
आणि प्रजा जे जाली । तिये वस्ति करू आली ।
का गोरुवे बैसली । रुखातळी ॥ ५९७ ॥
जो संपत्तिमाजीं असतां । ऐसा गमे पाण्डुसुता ।
जैसा का वाटे जाता । साक्षी ठेविला ॥ ५९८ ॥
किंबहुना पुंसा । पांजिरेयामाजि जैसा ।
वेदाज्ञेसी तैसा । बिहूनि असे ॥ ५९९ ॥
येऱ्हवी दारागृह पुत्री । नाही जया मैत्री ।
तो जाण पा धात्री । ज्ञानासी गा ॥ ६०० ॥
(आणि) महासिंधू जैसे । ग्रीष्मवार्षिये सरिसे ।
इष्टानिष्ट तैसे । जयाच्या ठाईं ॥ ६०१ ॥
कां तिन्हीं काळ होता । त्रिधा नव्हे सविता ।
तैसा सुखदुःखी चित्ता । भेदु नाही ॥ ६०२ ॥
जैसे नभाचेनि पाडे । समत्वा उणे न पडे ।
तेथचि ज्ञान रोकडे । वोळख तू ॥ ६०३ ॥

उदासु – उदास. उखिता = वाटसरु, प्रवासी. बैसविला – बैसला. असे – आहे (५९४). गृहावरी = घरावरी. आस्था = कळकळ, आधार (५९५). साउ – साउली. सरीसीचि = बरोबरच. परि असे हे – परि हे. स्त्रियांचेही – स्त्रियेचेही. लोलुप्य = अति लोभ, आसक्ति. [ लालुप्य (लिप्सा) = मिळविण्याची इच्छा, उत्सुकता, मनोरथ ] (५९६). प्रजा जे – जे प्रजा, मुलेंबाळें. वस्ति करू – वस्तिकरे – वस्तीकीरे – वस्तिकीरे – वस्तीकर = प्रवासी. गोरुवे = खिल्लारें, गोरुवे, गुरें. रुखातळीं = वृक्षाखालीं (५९७). पुंसा = पोपट पाजिरेयामाजी – पांजरियामाजी (५९९). धात्री = स्थान (धात्री = दाई, पृथ्वी) (६००). वारिषी – वारिसी – वर्षी – वर्षिये – वरिषिये – वर्ष = (वर्षा ऋतु) पर्जन्यकाळ, वर्षाकाळ, पावसाळा (वर्ष = जंबुद्वीप, मेघ, पृथ्वीचे खंड, वत्सर, वृष्टि). ग्रीष्म = उष्ण ऋतु (६०१). उणे = न्यून (६०३).

जो ह्या देहावर उदास असतो. कर्ज वसूल करणारा जसा दारांत बसविलेला असतो किंवा वाटसरु जसा का वाटेंत भेटतो का वस्तीला जसा घरीं वसला होतो. (५९४)

वाटेनें जातां जातां झाडाची साउली ही जशी भेटते त्याप्रमाणें घरावर त्याची तितकी आस्था का प्रेम नाहीं. (५९५)

सावली ह्या देहाबरोबर असतेच, पण ती असते हें काहीं जाणलें जात नाहीं–मुद्दाम ती कांहीं जाणीव घेतलेली अशी नसते. ती साउली सहजच असते त्याप्रमाणें ज्यास स्त्रियाविषयींचें आसक्तपण नसतें–अतिलोभ तेथें नाहीं. अति उत्सुकता का मनोरथ (भोगेच्छा त्या विषयीं) नाहीं. (५९६)

मुलेंबाळें जीं झालेलीं तीं वस्ती करण्यास राहिलेलीं—प्रवासी जसे. किंवा भल्यामोठ्या वृक्षाखालीं बसलेलीं गुरें (ढोरेंच) घटकाभर राहाण्यास प्रवासी जसे किंवा वृक्षाच्या छायेखालीं बसलेलीं गुरेंढोरें जशीं—खिलारें जशी का. (५९७)

सपत्तीनें वेढिलेला असला तरी तो असा दिसतो कीं जसा एक साक्षी (देखणाच नुसता ह्या सपत्तीचा झालेला) जसा का—देखी का देखरेखीकरिता. (५९८)

पोपट जसा पिंजऱ्यात ठेविलेला तसा तो ह्या वेदाज्ञेस भिऊन असतो—जीव जो स्वच्छंदी तो ह्या जन्मानें देहानें जसा का आडविला तो आता ह्या धर्म आज्ञेस भिऊन असतो व या आज्ञेप्रमाणें वागतो. (५९९)

एरव्हीं पाहिलें असतां दारा, गृह, पुत्र याचे ठायीं मैत्री जशी नाहीं, पण तो जसा एक ज्ञानाचें राहाण्याचें ठिकाणच जसा का असा (दाईप्रमाणें कनवाळु व पृथ्वीप्रमाणें सहनशील, क्षमाशील असतो). (६००)

सिंधू—महासिंधू—समुद्र जे ते काय ग्रीष्मऋतूमध्यें का वर्षाऋतूमध्यें एकसारखेच तुडुंब भरलेले असायचे—गांभीर्यदृष्ट्या ते दोन्ही काळीं सारखेच होत तसें इष्ट (इच्छित प्राप्त झालें असता) का अनिष्टाच्या ठायीं (नच आवडणारें असें काहीं प्राप्त झाले तरी) दोन्ही फरकानें पाहिले जात नाहीं—तो दोन्ही सारखेच मानितो. (६०१)

प्रातःकाळ, मध्यान्ह व सायंकाळ अशा ह्या तिन्ही काळीं सूर्य जसा सारखाच असतो—तो काहीं तीन प्रकारचा होत नाहीं त्याप्रमाणें सुख प्राप्त झालें का दुःख लाभलें तरी ज्याचें चित्त हें भेदत नाहीं—चित्त हें स्थिर असतें (६०२)

आकाश हें चहूंकडे सारिखें म्हणजे सम असतें त्याप्रमाणें जो समतेच्या ठायीं न्यून का उणें पाहूं करीत नाहीं—जेथें चित्ताचें समत्व एक—तेथें रोकडें असें ज्ञान आहे हें ओळख—तेथेंच रोकडें असें ज्ञान आहे असें जाण—असें ओळख. (६०३)

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी।**
**विविक्तदेशसेवित्वम् अरतिर्जनसंसदि॥ १०॥**

अनन्ययोगेन=एकनिष्ठतेनें. अव्यभिचारिणी=नियमभंग करणारा नाहीं जो, नियमाविरुद्ध वागणारा नाहीं जो. विविक्तदेशसेवित्वम्=निर्जन किंवा पवित्र अशा जागीं आश्रय (विविक्त=निर्जन, एकांत)–सेवा करणारा (सेवितृ=सेवा करणारा). अरति=जनसंसदि=(अरति=अप्रीति)—लोकसमुदायात जाण्याचा कंटाळा=(संसद=समुदाय).

अन्वय—मयि भक्ति । च अनन्ययोगेन अव्यभिचारिणी । विविक्तदेशसेवित्वम् । जनसंसदि अरति ।

अर्थ—माझे ठायीं अनन्य अशी, चित्तानुरोधानें-जीव व परमात्मा यांच्या संयोगानें, योगानें असण्याचा नियमभंग न करणारा अशा भक्तीचा. पवित्र, एकान्त का निर्जन अशा स्थळाच्या ठिकाणाचा आश्रय करणारा-सेवा करणारा-व लोकसमुदायामध्यें जाण्याची अप्रीति-कटाळा असणारा (हीं ज्ञानलक्षणे जाणावींत). (१०)

आणि मियावांचूनि कांहीं । आणिक गोमटेंचि नाही ।
ऐसा निश्चयो तिही । जयाचा केला ॥ ६०४ ॥

शरीर वाचा मानस । पियाली कृतनिश्चयाचे कोश ।
येक मी वाचूनि वास । न पाहासी आन ॥ ६०५ ॥

किंबहुना निकट निज । जयाचे जाले मज ।
तेणे आपणिया आम्हां सेज । येकी केली ॥ ६०६ ॥

रिगता वल्लभापुढे । नाहीं आंगीं जीवीं सांकडें ।
तिये कांतेचेनि पाडे । एकसरला जो ॥ ६०७ ॥

मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसे ।
मी होऊनि मज तैसे । सर्वस्वे भजती ॥ ६०८ ॥

सूर्याचिया होणा होइजे । का सूर्यासवेंचि जाइजे ।
जे हे विकिलेपण साजे । प्रभे जेवी ॥ ६०९ ॥

पै उदकाचिये भूमिके । उदक तळपे कौतुकें ।
ते लहरी म्हणती कौतुकें । ये-हवी ते तोय की ॥ ६१० ॥

जो अनन्य ययापरी । मी जालाही माते वरी ।
तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा ॥ ६११ ॥

आणि तीर्थें धौते तटें । तपोवळे चोखटें ।
आवडती कपाटें । वसऊं जया ॥ ६१२ ॥

शैल कक्षांची कुहरें । जळाशयें परिसरें ।
अधिष्ठी जो आदरें । नगरा न ये ॥ ६१३ ॥

बहु एकांतावरी प्रीति । जया जनपद वरी खंती ।
जाण मनुष्याकारे मूर्ती । ज्ञानाची तो ॥ ६१४ ॥

आणिकही पुढती । चिन्हें गा सुमती ।
ज्ञानाचिये निरुती- । लागी सांगो ॥ ६१५ ॥

मिया-मी. गोमटेंचि-गोमटे निश्चयो तिही-निश्चयचि पाहीं (६०४) पियाली=प्याली निश्चयाचे-निश्चयाचा. आना-आन (६०५). निकट निज=मन आपणिया-आपणया येकी-एकी (६०६). तये-तिये. येकसरला-एकसरला-ऐक्यतेस आला (६०७). होणा-होण्या=उदयाबरोबर विकिलेपण-विकलेपण=आत्मार्पण प्रभे-प्रभेसी (६०९). उदकाचिये-पाणियाचिये उदक-पाणी

तळपे=हालते. तोय–पाणी. की–(६१०) अनन्य–अनन्यू. ययापरी–यापरी जालाही–जाहलाही मूर्तिधारी–मूर्तधारी=देहधारी (६११). धौते=पवित्र कपाटे=गुहा वमऊ=वसवूं (६१२). शैल्य–शैल कक्षाची कुहरे=पर्वताच्या बाजूच्या गुहा. जळाशये परिसरे=उदकाच्या काठची स्थाने (६१३) जनपदवरी–जनपदाची=लोकसमुदायाची (६१४). निरुती लागी=निश्चयासाठीं (६१५)

मजशिवाय–मिया कीं मी वाचून इतर दुसरे–माझ्या आश्रयाशिवाय, काहीहि चागलें असें (होत) नाहीं असा निश्चयच एक ज्यानीं केलेला (६०४)

काया वाचा मनें करून मनोवृत्ति ही कृतनिश्चय करून आहे त्या माझ्या स्वरूपी राहाण्याचा, माझ्या आश्रयाने असण्याचा तेथे शरणगृहच एक आपलेसें केलेले, शरीराने, वाचेने व मनोदेवतेने (का मानसानें) निश्चयावर उभे राहाणे हेंच एक कुळदेवतेचे तीर्थच जसें का तेच ती पिऊन आहे–घेऊन आहे–तिथे शपथ एक घेतली कृतनिश्चयाची–निश्चयावर उभे राहाण्याची दुसरा कोणी माझा आश्रय व्हावा म्हणून शरण अर्थीच जसा एक तेथे मीच एक उपासिला गेला–मी गृहच केले गेलो व आता दुसरें तिसरें काहीही आपणास उपयोगी पडेल किंवा काय अशी एक कदाचिततेची ती आशा ही भेटली नाही–तेथे निराशेवर जर का तिष्ठणे झालें तर मग सकटच एक ते निरसन होणेंच नाही–म्हणून दुसऱ्याची वाम न पाहाता, दुसरें काहीं पाहूं न करिता त्याने शरीरानें, वाचेनें व मनोदेवतेनें निश्चयाचे होणे हीच एक कृतकृत्यता, हीच तिने समृद्धतेचे कोशच ते–जो मी त्या माझा आश्रय व्हावाच व्हावा म्हणून–ती पिऊन उभी झाली

[कोश म्हणजे आत्म्याचे आवरण (अन्न, मन, प्राण, विज्ञान व आनंद ही पाच) अन्न–स्थूळशरीर, प्राण–पंचप्राणयुक्त, सजीव, मन–कल्पित, विज्ञान–बुद्धिउपाधि असलेला, आनंद–परब्रह्म] (६०५)

दोघेही पहुडु केले–कुळाची शेज का पहुडण्यास आथरुण आम्हा दोघाना एकच–एकाच अथरुणावर–त्याने तर अगदी निकटचें, अगदी जवळ असलेलें असे जें निज म्हणजे मन हेच माझें जवळचें असें निजाचें केल त्यानें तर आपणा स्वत करिता व आम्हाकरिता मिळून एकच जशी एक शेजबाज केली–चित्त ते जें ते मदनाचे राहाण्याचें घर केले आम्ही व तो असे दोघाना मिळून एकच शेजबाज एकच आथरुण पहुडण्यास –निसर्गसिद्धतेचा आनंदच एक असें त्याने केलें शेजेचे ऐक्य केलें तेथे आता जेव्हा म्हणून त्या शेजेची गोष्ट ती ऐक्यतेची–तेथे आम्ही एक व तो निराळा असा राहिलाच नाही (६०६)

काता ही वल्लभापुढें–स्त्री ही नवऱ्यापुढें–पत्नी ही पतीपुढे रिघाली म्हणजे तेथे अग व जीव हा मुळीच सकोच केलेला नाही–अग तसेंच जीव हा सर्वच तेथे दिलेला अशा त्या कातेच्या उपमेचे (त्या प्रकृतीचे करणे–शरीराचे वागविलेलें) ऐक्यच एक सर्वथैव–'एकसरणें' च तेथे–एकाच हाराने दोन्ही शोभलीं जशी–दोन्ही एकाच हाराने शोभूं लागलीं–आनंदोत्सवाची झाली–तेथे सर्वथैव ऐक्यच एक ऐक्यतेचे झालें (६०७)

समुद्रास मिळून नेहमीं मिळणीने आहे असें तें गंगाजळ जसें, त्याप्रमाणे मी होऊन मजला सर्वस्वपणें भजतात जे—मीच झाले व मजलाच ते भजूं करणे केले—भजलें असेंच एक नव्हे का? (६०८)

सूर्याच्या उदयाबरोबर आलेली जी प्रभा ती सूर्याबरोबर आली व सूर्याबरोबर गेली, तेथे जसें तें प्रभेचें विकिलेपण म्हणजे आत्मार्पणच एक जसें शोभणारें. प्रभेला–काति जी तिला हे सूर्याबरोबर येणे व सूर्याबरोबरच जाणे जसें शोभतें (–तेथे सज्जता ही काय तिला करावी लागते कीं आता सूर्य वर आला व तिनें त्याजसवें जावे व जाणे तेही पण सूर्याबरोबरच आता करावें लागणार असें काही ती आपली सज्जता का तयारी ही करीत असते–) अहो जेथे सूर्य तेथें प्रभा, तेथे सूर्य उदय पावला कीं ती त्याजसवेंच येणारी जाणारी–म्हणून सूर्य तोच प्रभा होय (जसें रत्न व त्याची काति ही निराळी नव्हे ती दोन्ही एकच) तसें

त्या शरीराबाबत म्हणावें तर जेथें आत्मप्रभा तेथेंच तें ऐक्य सहजच असें होय. तेथें अंग जीव (जीवनजळ) हें सर्व प्रजेचें जसें (जीवनजळच एक) तेथें जीवात्माच नटलेला, विराजलेला. (६०९)

अहो! उदकाची - पाण्याची - भूमिका (भूमि, वृत्ति) तेथें उदकच सर्व एका कौतुकानेंच तळपणारें, हालणारें तेथील तळपणें जें तें लौकिकानें लहरी म्हटली जाते, एऱ्हवी पाहिलें तर तें उदकच - तोयच - नव्हे काय? (उदक × पाणी × तोय) [उदककर्म, उदकदान - तोय अंजलि - तोयकर्मन् = तर्पण (पाणी = ), पाणि = हात]. (६१०)

अनन्य म्हणजे अभिन्न, तोच आपण एक असा जो तो मीच झाला व मलाच तो वरून आहे - असा जो तोच मूर्तिमंत - मूर्तधारी - देहधारी 'ज्ञानच' होय. ज्ञानच तो देहधारीपणानें असलेला, तो आपणच एक सर्वथैव अभिन्न असा, व असा अभिन्न तोच मी होऊन त्यानें मला वरलें, तो मजला वरून आहे - मलाच वरयोजनेचें केलें - (कन्याच वरली) - (कन्येचा स्वीकार केला जसें. मंगलकार्यातील अग्नि जसा का त्यानें मजलाच अभीष्ट वर केलें). जो देहधारी एक, पण तो ज्ञानच एक, अनन्यपणें. (६११)

असा तो त्यास तीर्थें वसवावींत असेंच आवडतें. पवित्रपणाचीं तट म्हणजे शेतें का क्षेत्रे वसविणें त्यास आवडतें. त्यानें केलेलें तें आपल्या चोखट अशा उत्तम तपश्चर्येस महत्त्वमान्यतेनें तें सकळास मनापासून आवडणारें असें त्यानें तपोबळानें, तपोवनच, पुण्याश्रमच वसविला, उभा केला (असें करणें त्यास आवडतें) - त्यास गुहा का एकान्ताच्या जागा कराव्यात असें आवडतें (६१२)

जनपद जे किंवा नगर जे तेथें न येता जो बहु आदर देऊन उदकाच्या काठचीं स्थानें - तसेंच अंतर्गृहें, पर्वतरानें, गुहा येथेंच वस्ती करुन असतो - अशा तऱ्हेनें पर्वताच्या बाजूमधील गुहा का जळाशयाभोवतालचा प्रदेश - नदीपर्वताजवळची भूमि विस्तार जो तोच प्रिय वाटल्यामुळें तेथेंच तो आपलें ठिकाण करतो, तेथेच जो नांदतो, वागतो. (६१३)

एकान्त आवडतो, एकान्तिक म्हणजे एकनिष्ठता ज्यास आवडते - मनुष्यसमुदायाचे ज्यास महत्त्व वाटत नाहीं - तेथें जो खंत करून असतो असा तो मनुष्याच्या आकारानें (तोंडाचे भाव जे त्यास आकार म्हणतात), मनुष्य आकृतीनें ज्ञान एक मूर्तीचें झालें, प्रतिमेचे झालें असें जाण - ती देहधारणा प्रतिमा जशी ज्ञानच मूर्तीनें देहधारीपणानें मूर्त झालें असें समज - मूर्तत्वास आलेलें प्रत्यक्षत्व ज्ञानाचें तें. (जन = प्राणी, जीव. अयं जनः = मी. जनातिक = शेजाऱ्याशीं इतरास न ऐकूं येईल असें बोलणें. जनपद = प्रजेला प्रमाण मानणारा समाज, लोक, देश, खेडेंपाडें.) (६१४)

आतां पुढें आणीकहि काहीं चिन्हें ह्या ज्ञानाच्या निश्चयासाठीं - खरेपणाच्या पुष्टीकरितां हे सुमति - सुष्ठुमतिः यस्य सः - गा अर्जुना - सांगतो. (६१५)

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थ दर्शनम्।**
**एतद् ज्ञानमिति प्रोक्तम् अज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

अध्यात्मज्ञान = ब्रह्मज्ञान, वेदान्त (अध्यात्म = आत्म्याबद्दलचें, व्यक्तीचे. मन = देद, ब्रह्म.). नित्यत्वम् = [नित्य = स्वभावसिद्ध, सनातन (नित्यकर्म = रोजचें संध्यादि आवश्यक कर्म)] अविनाशी भाव, नित्यब्रह्म. तत्त्वज्ञान = यथार्थ ज्ञान, ब्रह्मज्ञान (तत्त्वसंख्यानम् = सांख्यमत) (यथार्थ = खरें, अन्वर्थक, योग्य) त्या त्या मतीप्रमाणें किंवा आपल्या अक्कलेप्रमाणें. तत्त्व = स्वरूप, प्रकृति, अवस्था, ब्रह्म, पदार्थ, चित्त. अर्थदर्शनम् = अर्थ = शब्दाचा भाव, कारण, प्रकार, अभिप्राय (अर्थशास्त्र = राजनीति व लोकव्यवहार यांचें शास्त्र.). अर्थवाद = स्तुति, अर्थाचा पाल्हाळ. अर्थान्तरन्यास = एका काव्यालंकाराचें नाव. अर्थापत्ति = प्रत्यक्षादि सहा प्रमाणांपैकीं एक, अर्थाची सिद्धि आर्थिक = याचक, वैतालिक (स्तुतिपाठक).

अर्थोष्मिन्=पैशाची ऊब. दर्शन=अवलोकन, पाहाणें, ज्ञान, नेत्र, आरसा, रूप, अभिप्राय, सांख्य, योग, मीमांसादि प्रत्येक. तत्त्वज्ञानाचा पंथ, तत्त्वज्ञानाचें शास्त्र, अध्यात्मज्ञान, सद्गुण, दृष्टीचा टप्पा, चेहरा, स्वरूप, हजर करणें, राजा, परीक्षा, प्रदर्शन, स्वप्न, प्रश्न, विचार, मत.

यद् अत् अन्यथा=या शिवाय दुसरें जें अज्ञान.

अन्वय—अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम्। एतद् ज्ञानं इति प्रोक्तम्। अतः अन्यथा यत्। अज्ञानं। यत् अतः अन्यथा।

अर्थ—आत्म्याबद्दलचें जें ज्ञान, तेंच नित्यत्वानें असणें, तेंच नित्य असणें–तत्त्वज्ञान म्हणजे स्वरूप ज्ञानानें नेहमीं पाहाणें, स्वरूप अवलोकनाच्या नेत्रानें असणे, त्यास ज्ञान म्हणतात व याशिवाय दुसरें जें तें अज्ञान होय (११)

तरी परमात्मा ऐसे। जे येक वस्तु असे।
ते जया दिसे। ज्ञानास्तव ॥ ६१६ ॥

ते येक वाचुनि आने। जिये भवस्वर्गादि ज्ञानें।
तें अज्ञान ऐसा मनें। निश्चय करी ॥ ६१७ ॥

स्वर्गा जाणे हे सांडी। भवविषी कान झाडी।
दे आत्मज्ञानीं बुडी। सद्भावाची ॥ ६१८ ॥

भंगलिये वाटे। शोधुनिया आव्हांटे।
निगिजे जेवि नीटे। राजपंथे ॥ ६१९ ॥

तैसे अज्ञानजाता करी। आघवेचि येकीकडे सारी।
मग मनबुद्धि मोहरी। आत्मज्ञानी ॥ ६२० ॥

म्हणे हेचि येक आथी। येर जाणणे ते भ्रांती।
ऐसी निकुरेसी मती। मेरु होय ॥ ६२१ ॥

एवं निश्चय जयाचा। द्वारीं अध्यात्मज्ञानाचिया।
ध्रुवदेवो गगनीचा। तैसा राहिला ॥ ६२२ ॥

तयाचिया ठाईं ज्ञान। या बोला नाही आन।
(म्हणसी व्यवधान) जे ज्ञानी बैसले मन। तेव्हाचि तो ते मी ॥ ६२३ ॥

तरी बैसलेपणे जे होये। ते बैसताचि बोले न होये।
तरी ज्ञाना तया आहे। सरिसा पाडु ॥ ६२४ ॥

आणि तत्त्वज्ञान निर्मळ। फळे जे येक फळ।
ते ज्ञेयही वरी सरळ। दिठी जया ॥ ६२५ ॥

येऱ्हवी बोधा आलेनि ज्ञाने। जरी ज्ञेय न दिसेची मने।
तरी ज्ञानलाभही न मने। जाला सांता ॥ ६२६ ॥

आंधळेनी हातीं दिवा। घेऊनी काय करावा।
तैसा ज्ञाननिश्चयो आघवा। वाया जाय ॥ ६२७ ॥

जरी ज्ञानाचेनि प्रकाशे। परतत्त्वीं दिठी न पैसे।
ते स्फूर्तिचि असे। अंध होऊनी ॥ ६२८ ॥

म्हणौनि ज्ञान जेतुले दावी। तेतुलीही वस्तूचि आघवी।
ते देखे ऐसी होआवी। बुद्धि चोख॥ ६२९॥

या लागी ज्ञाने निर्दोषे। दाविलें ज्ञेय देखे।
तैसेनि उन्मेखे। आथिला जो॥ ६३०॥

जेवढी ज्ञानाची वृद्धी। तेवढीच जयाची बुद्धि।
तो ज्ञान हे शाब्दी—। करणे न लगे॥ ६३१॥

पैं ज्ञानाचिये प्रभेसवे। जयाची मती ज्ञेयी पांवे।
तो हातधरणिया सिवे। परतत्त्वातें॥ ६३२॥

तोचि ज्ञान हे बोलता। विस्मो कवण पांडुसुता।
काय सवितयाते सविता। म्हणावे असे॥ ६३३॥

तंव श्रोते म्हणितले असो। न सांग तयाचा अतिसो।
ग्रंथोक्ति तेथें अडसो। घालिसी कां (हा)॥ ६३४॥

तुझा हाचि आम्हां थोरू। वक्तृत्वाचा पाहुणेरु।
जो ज्ञानविषो फारू। निरोपिला॥ ६३५॥

रसु व्हावा अतिमात्रु। हा घेतासि कविमंत्रु।
तरी आवंतूनि शत्रु। करितोसि कां गा॥ ६३६॥

ठायी बैसतिये वेळे। जे रससोय घेउनि पळे।
तियेचा येरु ओडवू मिळे। कोणा अर्था॥ ६३७॥

आघवाचि विषी भादी। परी सांजवणे टेको नेदी।
ते खुरतोडी नुसधी। पोसी कवण॥ ६३८॥

तैसी ज्ञानी मती न फांके। येर जल्पति नेणो केतुके।
परी ते असो निके। केले तुवा॥ ६३९॥

जया ज्ञानलेशोद्देशे। कीजेती योगादि सायासे।
ते धणीचे आथि तुझिया ऐसे। निरूपण॥ ६४०॥

अमृताची सात वांकडी। लागो का अनुघडी।
सुखाच्या दिवस कोडी। गणिजेत का॥ ६४१॥

पूर्णचंद्रेसी राती। युग एक असोनि पाहाती।
तरी काय न पाहात आहाती। चकोर ते॥ ६४२॥

तैसे ज्ञानाचे बोलणे। आणि येणे रसाळपणे।
आता पुरे कोण म्हणे। आकर्णिता॥ ६४३॥

आणि सभाग्य पाहुणा ये। सुभगाचि वाढिती होये।
तैं सरो नेणे रससोये। ऐसे आथी॥ ६४४॥

तैसा जाला प्रसंगु। जे ज्ञानी आम्हासी लागु।
आणि तुजही अनुरागु। आथी येथे॥ ६४५॥

**म्हणौनि यया व्याख्याना। पासी ते आली चौगुणा।**
**न म्हणो न ये देखणा। होसी ज्ञानी ॥ ६४६ ॥**
**तऱ्ही आता यावरी। प्रज्ञेच्या माजघरी।**
**पडे साच करी। निरूपणी ॥ ६४७ ॥**

येक–एक (६१६). येक–एक. आने–आन. निश्चयो करी–निश्चय केला (६१७) जाणे–जाणो. भवविषी कान झाडी=प्रपंचाचा कंटाळा. आत्मज्ञानी=अध्यात्मज्ञानी (६१८). भंगलिये वाटे =जिथें वाटा फुटतात अशा जागी आव्हासे=आडमार्ग सोडून (६१९) आज्ञानजाता–ज्ञानजाता–अज्ञानजाता मोहरी=लावतो (६२०) हेचि येक–एक हेचि निकुरेसी–निकरेसी (निकर=कुबेराचा द्रव्यनिधी. समूह=सार) निकरेसी मती मेरु होय=मेरूप्रमाणे अशी तत्वसारनिधि मति, बुद्धि स्थिर करतो (६२१). धृव देव–ध्रुव देवो (६२२). म्हणसी व्यवधान–नाहीं आन (व्यवधान=आच्छादन, अतर, झाकणें) (अवधान= लक्ष). तो ते मी–तो ते (६२३) बैंसताचि–बोले नव्हे–वेळी नोहे–वेळी न होये=अनुभवानें आच्छादनाचे का अतराचे झाल्याने ज्ञान प्राप्त होते ते शब्दपाडिल्यानें होत नाहीं (६२४). फळेजे–फळे जे ज्ञेयहीवरी–ज्ञेयापर्यंत (६२५). न मने जाला साता=झाला असता मानीत नाहीं (६२६). आधळेनी–आधळया घेऊनि–देऊनि (६२७). परतत्वी दिठी न पैसे ते स्फूर्ति=ती स्फूर्ति, बुद्धि जेथें आत्मतत्त्वी दृष्टिप्रसर पावत नाहीं (६२८). तेतुलीही–तेतुली. देखेन–देखे=ते तत्त्व मी देखेन–तें वस्तुतत्त्व, ती बुद्धि देखे='देखे' (६२९). निर्दोष–निर्दोखे. उन्मेखे आथिला=ज्ञानानुभवाने सपन्न (६३०) तो–ते, ते–तो (६३१) हातधरणिया–हातोहात, लीलेने (६३२). ज्ञान–ज्ञात=ज्ञान (बोध), ज्ञात (जाणलेला), जाणता (६३३) श्रोता–श्रोते सगे–साग–मागे. आडसो–अडसो=प्रतिबंध, अडसर का–का हा (६३४). अतिमात्रु=अतिशय (पाल्हाळाच्या वर्णनाचा) कविमंत्रु=सर्वज्ञ उपाय, स्तुत्य युक्ति, व्यवहार आवंतूनी=आमंत्रण करून करिताति–करितोसी (६३६) ठायी=पात्रावर रससोय=सिद्धान्न. घेऊनि–होऊनि. येरु ओडवू मिळे कोणा अर्था=तिथे इतर आदर आतिथ्य काय कामाचे (६३७). आघवाचि विषीभादी=सर्व तऱ्हेने बहुगुणी चागली गाय साजवणे=धार काढतेवेळीं. खुरतोडी–खोडी=लाथाळ. पोपी–पोसी (६३८). फंके–फाके. केतुके=पाल्हाळ, कितीतरी (६३९). कीजेती–कीजती. धणीचे=पोटभर (६४०). सात वाकडी=सात दिवसाची सर, झड. अनुघडी=सतत, एकसारखी, न उघडता. सुखाचा–सुखाचिया. दिसि–दिवस गणिजेत–गणिजतु (६४१). असोन–असोनि–असो न. पाहाती–पाती=नेत्रपाती एक मारख्या पाहाती. पाहात–न पाहात (६४२) सुभगाचि=सुभद्रा, सुभगा (६४४). येथे–तेथ (६४५) व्याख्याना–वाखाणा =व्याख्यानाला. से आली=प्रेम चढे ना म्हणो नये देखणा–ना म्हणो न ये देखणा–न म्हणोन ये देखणा–म्हणो न येसी देखणा (६४६) प्रज्ञेचा– प्रज्ञेच्या माजुघरी–माजघरी (६४७).

परमात्मा अशी जी वस्तु आहे, ती ज्ञानाने दिसते. ती जी ज्ञानास्तव दिसते— (६१६)

—त्या एका ज्ञानाशिवाय जी दुसरी संसारस्वर्गाबद्दलचीं ज्ञानें ती अज्ञाने होत, असा निश्चय ज्यानें केला आहे मनानें–असाच एक निश्चय त्या मनाने करावा–कर. (६१७)

स्वर्गास जावें हे किंवा स्वर्गास जाणावें हें काही एक नसणें–स्वर्गास जाणणें हें सोडून दे. प्रपंचाचा कंटाळा कर, संसाराविषयींची कानगोष्ट एकूं नको–संसारास आपला कान देऊं नको. पण अध्यात्मज्ञानामध्यें मात्र सद्भावाचा होऊन बुडून ऐस. आत्मज्ञानी जो आहे तो एक सद्भावच पुढें घेऊन असतो त्याप्रमाणें अस–ऐस. (६१८)

जेथें अनेक वाटा फुटतात तेथें आडमार्ग सोडून देऊन एका नीट अशा राजमर्गावर आरूढ हो – एका नीट सरळ अशा राजमार्गाचा आश्रय कर. (६१९)

त्याप्रमाणें इतर सर्व ज्ञानें बाजूस सारुन – सर्व अज्ञानें टाकून देऊन – तीं नच घेऊन – अज्ञानें बाजूस कर, व मगच ह्या एका अध्यात्मज्ञानामध्येंच आपलें मन व बुद्धि हीं लावून ऐस. आत्मज्ञानी जो तो आपलें मन व बुद्धि हीं एक करून तेथीलच्या सादाचा, पावा छंदच तो जसा एक त्याचा, होतो. (६२०)

तो म्हणूं करतो कीं हेंच एक काय तें खरें ज्ञान होय. इतर जें कांहीं जाणणें आहे ती निव्वळ भ्राति आहे व अशा तत्त्वसारनिधीमध्यें तो आपली मतिबुद्धि मेरूप्रमाणें स्थिर करितो. (६२१)

ह्याप्रमाणें ज्याचा निश्चय ह्या अध्यात्मज्ञानाच्या द्वारामध्यें होतो तो निश्चितपणाचा स्थिर निश्चय असा एक देवच जसा गगनींचा ध्रुव तसा होतो – तसा होय. (६२२)

त्याच्या ठिकाणीं ज्ञान आहे असेंच जाण. जेव्हा का त्याचें मन त्या ज्ञानाचे ठायीं स्थिर झालें तेव्हा तो मीच झाला. तें ज्ञान जें तें तो मीच होऊन आहे असा झाला. (तें ज्ञान जें तें इतर अंतर झाकणारें) – इतर ज्ञाने जीं व्यवधानाची तीं या ज्ञानाचीं आच्छादनें – किंवा तीं ह्या ज्ञानाचीं झाकणेंच होत; असेंही कोणी म्हणतात – असेहीं पण वाटेल तर म्हणा. (६२३)

जें बसलेपणावर येतें – बैसलेपणानें वर येते तें त्यावर बसल्यावर – बोलण्याने आहेपणास येत नाहीं – बोलास येत नाहीं – त्यावर बसताच ऐन वेळीं ते आहे असें होत नाही – असत नाहीं – तें अनुभवानें प्राप्त होणें तें, शब्दपाडिल्यानें असत नाहीं – आहे असें होत नाहीं – तरी पण ज्ञानास व त्यास समानत्व आहे योग्यता ती दोहीना सारखीच आहे. (६२४)

निर्मळ असें तत्त्वज्ञान जें फळ देणारें असें ते जें जें एक फळ देतें ते ज्ञेय पाहाण्यापर्यंत ज्याची दृष्टि सरळ आहे – त्यास तें ज्ञेय दिसूं लागतें. (६२५)

येऱ्हवीं पाहिलें असता ज्ञानानें बोध झाला, बोधास येणें केलें. व ज्ञेय जर तेथें मनानें दिसत नाहीं तर ज्ञानलाभ झाला असताही तो ह्या मनानें मानला (जात) नाही असें म्हणावें लागतें – तेथें मन हें तो ज्ञानलाभ आहे असें मानीत नाहीं. (६२६)

अहो आंधळयानें हातीं दिवा घेऊन काय कामाचा , त्याप्रमाणें सर्व जो हा ज्ञानाविषयींचा निश्चय तो वायाच जाणारा होतो. आधळयाच्या हातीं दिवा दिला तर ज्ञाननिश्चय हा कांहींच तेथें होत नाहीं. तो प्रकार वायाच, व्यर्थच असा होतो – तेथें काहींच ह्या ज्ञानाविषयीं निश्चय होत नाहीं (६२७)

जर ज्ञानाच्या प्रकाशानें परतत्त्वामध्यें – आत्मतत्त्वांत – वस्तुतत्त्वात जर दृष्टि प्रसर पावत नाहीं तर तेथें ती स्फूर्ति का बुद्धि ही आधळीच अशी होऊन असते असेंच म्हणावें लागतें. (६२८)

जेवढें म्हणून ज्ञान स्फूर्ति दाखविते तेवढी सर्व वस्तूच जाण. पण तेथें तें (पाहाणें) देखणें, देखणें व्हावें अशी स्पष्ट बुद्धि तेथें असावी (६२९)

आणि म्हणून निर्दोष अशा ज्ञानानें दाखविलेलें देखणें होणें – दाविलेलें जें ज्ञेय तें पाहील अशा ज्ञानानुभवानें संपन्न व्हावें – अशा ज्ञान अनुभवानें संपन्नता साधावी. (६३०)

ज्ञानाची वृद्धि जेवढी तेवढीच ज्याची बुद्धि. जसजशी ज्ञानवृद्धि होते तसतशी बुद्धि ही पण महत्त्व घेऊन असते. पण जेवढी वृद्धि तेवढीच बुद्धि (ज्ञान) असें ह्या ज्ञानास शब्दाच्या आटोक्यात आणणें हें केव्हांहि नव्हे. तो (जेवढें तेवढेंच ज्ञान) ज्ञान असें शब्दानें बोलतां येण्यासारखें नव्हे. (६३१)

ज्ञानाच्या प्रभेबरोबर त्याची मति ज्ञेयाच्या ठिकाणीं पोहोचते. तो सहज लीलेनेंच त्या परतत्त्वास शिवतो–स्पर्श करून असतो. (६३२)

तसें तें त्याचें परतत्त्वास स्पर्श करणें तेंच 'ज्ञान' असें बोलणें जें तेथें विस्मय तो काय कसचा ! काय सूर्य जो त्यास सूर्य असें म्हणावें लागतें? ज्ञानप्रभेने ज्याची मति ज्ञेयी पोहोंचली तो हातोहात–सहज लीलेनेंच परतत्त्वास स्पर्श करून असतो–आता तोच ज्ञान (बोध, जाणीव, बुद्धि) असें म्हणणें हें काय नवलाचें असें नव्हेच. कारण जो सूर्य त्यास सूर्य म्हणणे तें काय–तो केव्हाहि सूर्यच ! (तोच ज्ञान म्हणजे ज्ञानेंरूप असा जाणलेला होतो)–तोच जाणता असें होय (६३३)

तेव्हां श्रोत्यानीं म्हटलें कीं हें असो. तेथे आता निर्भर बोलणें तें नको. तेथचें अतिशयतेच्या बोलण्यानें ह्या ग्रंथोक्तीस प्रतिबंधच जसा होणारा ते बोलणें आता कशास (६३४)

तुझा हाच आम्हास सन्मानाचा असा एक पाहुणेर झाला आहे जो हा ज्ञानविषय फार उत्तम तऱ्हेनें निरूपिला आहेस. (६३५)

रस हा अतिशयतेचा असावा–वर्णनाचा व्हावा–असा स्तुत्य उपाय अशी सर्वज्ञतेची युक्ति–व्यवहार्यतेची, व्यवहारानें यथार्थतेचें तें–गुणमयीचें सगुण जेथें–माझे स्मरण करीत जें–व्यवहारणें तेथें–आवंतणें करून, आमंत्रणें करून, आमत्रण देऊन बोलावणे करून तेथें त्रुटि म्हणजे शंका, न्यूनता तीच एका शत्रुत्वावर उभी होणारी अशी ते करणें नको–(प्रपंचाविषयीं उदासीनता ही वैरीपणाची केली जशी)–करित आहासी–करीत आहेस–करितोसी–तें तसें करणें नको (६३६)

रस म्हणजे शब्द करणें तिथें षड्रस ते प्रीतीच एक सरसिकतेवर उभारली जाणारी–रसवंती अशी ही बोलणी बोली ती अतिशयतेची, समृद्धपणाची, प्रशस्तपणाची–मनाच्या मोठेपणाची–अशींच केव्ह हि व्हावींत असेंच प्रत्येकजण इच्छितो–तेथे वेळ हीच मुळीं–ऐन वेळीं न होणें–अशी नको असते–व ती तशी जर ऐन वेळी नच सरसिकतेस आली तर जसें नीरसतेस आमत्रणच दिलें तेथें कसें होते म्हणशील तर (जेवण्यास) पानावर बसते वेळीं जी सिद्धान्न घेऊन पळणारी होते–जी अन्नच ती सिद्धतेचें अशी होऊन पळूच लागते–पळणारी होते–दूर होते–दूर जाते–तिचे तें इतर आदराचें असणें का आतिथ्यावर भर दिलेला असें महत्त्व मान्य होणारें ते काय कामाचें वोडव–वोडवू–ओडऊ म्हणजे (सिद्धान्नाला वेळेस न येऊं देता तें) इतर आतिथ्य ते कसल्या अर्थास पाहणारें होतें–तेथे महत्त्व तें नाहीच कारण— (६३७)

एऱ्हवीं सर्व तऱ्हेने बहुगुणी पण धार काढणेचे वेळेस जी मुळीं कानेखालीं टेकूनच देत नाहीं अशी ती दुभती लाथाळी गाय ती (व्यर्थतेने) कोण बरें पोशील? (६३८)

त्याप्रमाणें ज्ञानामध्यें मति ही फाकत नाहीं–ज्ञानप्रभेची होत नाहीं म्हणून ज्ञानाशिवाय इतर जीं काहीं बोलणीं होणारी कौतुकाची नुसतीं अशी कितीही केली तरी तीं नुसत्या पाल्हाळाची होते. पण हें असो तुवा जें हें ज्ञानदान केलें आहेस ते हितकारक असेंच, ते कल्याणकारक आहेच आहे हें केव्हाही (६३९)

ज्या ज्ञानाच्या एका लेशमात्राकरिता–ज्ञान लेशमात्रही मिळावें ह्या हेतूनें जें योगयागादि बारा सायास करणें तें आता येथे तर ज्ञानानें जसें पोटच भरलें असें आहे कारण असें हें तुजप्रमाणें, तुजसारखें निरूपण जें तेच मुळीं धणीचें असें सहजज्ञानाने पोटच एक भरलें–समाधान झालें असें आहे. (६४०)

अमृताचा एकसारखा सात दिवस तेथे नच उघडता, पाऊसच पडत आहे किंवा सुखाचे दिवसाचे दिवस जेथें जात आहेत तेथे कोणी काहीं त्याची गणना ही करतो का? (६४१)

पूर्णचंद्र जेथें उगवला आहे तेथें युगाचीं युगे पाहाणें लाभलें तरी तेथें पाहाणें हें आवड घेऊन असतें तें थांबतच मुळीं नाहीं–तेथे नेत्रपातीं हीं (युगपर्यंत जरी तरी) न कंटाळता पाहाणारी असतात. पण तें

पाहाणें होत आहे हें मुळींच नसून असल्यासारखें जसें – तें एकसारखें होत असलेलें तेथें नेत्रपातीं हीं मिटतच मुळीं नाहींत अशीं जरी तरी तेथें चकोर जे ते काय पाहाणारे होत नाहींत, ते पाहात असतातच, ते पाहातातच, तेथें कंटाळत मुळींच नाहींत – तेथें चकोर ते पाहात असतातच. (६४२)

त्याप्रमाणें येथें ज्ञानविषयींचें बोलणें हें इतक्या रसाळपणानें होत आहे कीं तें तेथीलचें ज्ञान आकर्णनेत्र प्राशन करावें असेंच आम्हास होऊन आहे – येथे तें पुरे असें कोणीही म्हणणें मुळीं करणारच नाहीं आतां तें ज्ञान आकर्णिता पुरे कोण म्हणे !!! (६४३)

सभाग्य म्हणजे सुंदर, दैवशाली, प्रिय असा नामधारक शिव जो तोच पाहुणा आला व सभाग्य अशी सुभगा कल्याणीच एक सुभद्रा तीच जेवण वाढणारी झाली तर ते जेवण केव्हांही सरणारें नव्हेच तें सरसेंच होऊन येणारें असें आम्हास होऊन आहे. तेथें जेवण हें केव्हाहि पुरे असें म्हणणेंच होत नाहीं. (६४४)

अशातऱ्हेचा प्रसंग – समय – संयोग – चटकच एक ज्यामुळें आम्हास या ज्ञानाचा लागच साधला जात आहे व तुजलाही पण येथेंच, अनुरंजन, अनुरक्तता, तुजला येथेच ह्या ज्ञानावर अनुरक्त होऊन असणें होत आहे. (६४५)

आणि म्हणूनच ह्या व्याख्यानाजवळच ती आठवण ही चौपटीची होऊन आली आहे – येथें स्मृति ही सडोळस झाली आहे – हें केव्हाहि खरेंच होय – येथें तुजलाही पण हें केव्हाही मान्यच करावें लागणार कीं ज्ञानद्रष्टा असा तूं ज्ञानी आहेस. अशा ह्या वाखाणणीस तर प्रेमच तें ज्ञानजातीचें चढ घेऊन आहे तेथें प्रेमास चौपट – चौगुण असा चढ आला आहे. तेथें सर्व आठवण से ही चढ घेऊन आहे – असा तूं केव्हाही ज्ञानी आहेस, देखणा आहेस, ज्ञानद्रष्टा आहेस असें केव्हाही तुझें मानणें – होऊन आहेच आहे. चातुर्यास गुण लागावा तसा प्रेमासही गुण लागून तें चौपट वाढ घेऊन आहे. व्याकरणात 'अ, ए, ओ' असा गुणच तेथें लागून आहे. (६४६)

तर आतां यानंतर प्रज्ञेच्या बळाबळामध्यें प्रज्ञेच्या बळानें तीं जीं पदें – 'अज्ञानं यदतोऽन्यथा' तीं पदें सांचपणानें निरूपणास यावींत असें करी. तीं पदें प्रज्ञाभारानें शोभविलीं असें ते त्या पदाचे निरूपण करावें. (६४७)

या संतवाक्य सरिसे। म्हणितले श्रीनिवृत्तिदासें।
माझें ही जी ऐसें। मनोगत ॥ ६४८ ॥
यावरी आतां तुम्ही। आज्ञापिला जी स्वामी।
तरी वाया वागूजाळ मी। वाढो नेदी ॥ ६४९ ॥

येवं इये अवधारा। ज्ञान लक्षणें अठरा।
श्रीकृष्णे धनुर्धरा। निरुपिली ॥ ६५० ॥

मग म्हणे या नावें। ज्ञान येथे जाणावे।
हे स्वमत आणि आघवे। ज्ञानिये ही म्हणती ॥ ६५१ ॥

करतळावरी वाटोळा। डोलत देखिले आंवळा।
तैसें ज्ञान आम्ही डोळां। दाविले तुज ॥ ६५२ ॥

आतां धनंजया महामती। अज्ञान ऐसी वदंती।
तेही सांगो व्यक्ती। लक्षणेसी ॥ ६५३ ॥

येऱ्हवी ज्ञान पुढें जालिया। अज्ञान जाणवे धनंजया।
जे ज्ञान नव्हे ते अपसया। अज्ञानची ॥ ६५४ ॥

पाहें पां दिवस आघवा सरे। मग रात्रीची वारी उरे।
वांचूनि कांहीं तिसरें। नाहीं जेवी ॥ ६५५ ॥

तैसें ज्ञान जेथें नाहीं। तेंचि अज्ञान पाहीं।
तऱ्ही सांगो कांहीं कांहीं। चिन्हें तियें ॥ ६५६ ॥

तरी संभावनें जिये। जो (म) मानाची वाट पाहे।
सत्कारें होये। तोष जया ॥ ६५७ ॥

गर्वपर्वताची शिखरें। तैसा महत्त्वावरुनि नुतरे।
तयाच्या ठायीं पुरे। अज्ञान असे ॥ ६५८ ॥

आणि स्वधर्माची वाग्वल्ली। बांधे वाचेच्या पिंपळीं।
उभैला जैसा देऊळीं। जाणोनि कुंचा ॥ ६५९ ॥

घाली विद्येचा पसारा। सुये सुकृताचा डांगोरा।
करी तेतुलें मोहरां। स्फीतीचिया ॥ ६६० ॥

आंग वरीवरी चर्ची। जनातें अभ्यर्चिता (अर्चिता) वंची।
तो जाण पां अज्ञानाची। खाणी येथ ॥ ६६१ ॥

आणि वन्ही वनीं विचरे। तेथ जळती जैसी जंगम स्थावरें।
तैसे जयाचेनि आचारें। जगा दुःख ॥ ६६२ ॥

कवतिकें जे जे जल्पे। ते सावळीहूनि तिख रूपे।
विषाहूनि संकल्पे। मारक जो ॥ ६६३ ॥

तयाते बहु अज्ञान। तोचि अज्ञानाचे निधान।
हिंसेसी आयतन। जयाचे जिणे ॥ ६६४ ॥

आणि फुंकें भाती (भाता) फुगे। रेचिलिया सवेचि उफगे।
तैसा संयोगवियोगे। चढे वोहटे ॥ ६६५ ॥

पडिली वारियाचिया वळसा। धुळी चढे आकाशा।
हरिखा वळघे तैसा। स्तुती वेळे ॥ ६६६ ॥

निंदा मोटकी ऐके। आणि कपाळ धरुनि ठाके।
थेंबे विरे वारेनि सुके। चिखल जैसा ॥ ६६७ ॥

तैसा मानापमानी होये। जो कोण्हीचि उर्मी न साहे।
तयाच्या ठाईं आहे। अज्ञान पुरे ॥ ६६८ ॥

आणि जयाच्या मनीं गांठीं। वरीवरी मोकळी वाचा दिठी।
आंगे मिळे जीवें पाठीं। भलतया दे ॥ ६६९ ॥

व्याधाचे चारा घालणे। तैसें प्रांजळ जोगावणें।
चांगाचीं अंतःकरणें। विरुद्ध करी ॥ ६७० ॥

गार सेवाळें गुंडाळी। कां निंबोळी जैसी पिकली।
तैसी जयाची भली। बाह्य क्रिया ॥ ६७१ ॥

अज्ञान तयाच्या ठायीं। ठेविले असे पाही।
या बोला आन नाहीं। सत्य मानी ॥ ६७२ ॥

आणि गुरुकुळे लाजे। जो गुरुभक्ती उभजे।
विद्या घेऊनि माजे। गुरुसीची ॥ ६७३ ॥

तयाचें नांव घेणें। ते वाचेसी शूद्रान्न होणे।
परी घडली लक्षणें। बोलतां इये ॥ ६७४ ॥

आतां गुरुभक्ताचें नांव घेवो। तेणे वाचे प्रायश्चित्त देवो।
गुरुसेवका नाव पाहो (वो)। सूर्य जैसा (हा) ॥ ६७५ ॥

येतुलेनि पांग पापाचा। निस्तरेल हे वाचा।
जो गुरुतल्पगाच्या। नामीं जाला ॥ ६७६ ॥

हा ठावोवरी। तया नावाचे भय हारी।
मग म्हणे अवधारी। आणिकें चिन्हें ॥ ६७७ ॥

तरी आंगें कर्मीं ढिला। जो मनी विकल्पे भरला।
आडवीचा अवगळला। कुहा जैसा ॥ ६७८ ॥

वाया वाग्जाळ मी–वायाचि वाग्मी (वाग्दोरे–वाग्वल्ली–मायाजाळ)–वाग्जाळ–वाग्डंबर=वाक् त्रीयते यत् तत् मात्रा)=शब्दसमूह का विनाकारण विशेष वाटणारें भाषण मी वाढवीत नाहीं (६४९). अवधारा–अठरा. अठरा–अवधारा (६५०). वदंती=लोकवार्ता (६५३). पुढें–फुडे=खरें. अपसया–अपैसया (६५४) उरे–वाउरे (६५५) तेचि अज्ञान–तें अज्ञानचि (६५६). मनाची–मानाची (६५७). गर्वे–गर्त्रे नुतरे–नितुरे असे–आहे (६५८) वाग्वल्ली–मागळी (पिंपळाची पानें बांधलेलें तोरण–मांग लोक वेशीवर व चावडीवर बांधतात तें) उभैला–उभिला जाणोनि=मुद्दाम. कुंचा=काठीस बांधलेली केरसुणी (६५९). मोहरा स्फीतीचिया=निव्वळ प्रतिष्ठा व्हावी म्हणून (६६०). अभ्यर्चिता–अर्चिता=पूजासत्कार करणें त्यात (६६१) जंगम–अंगमे (६६२). कवतिके=कौतुकें. साबळ–सबळ=पहार. तिख=तीक्ष्ण. रुपे=रुते–रुतसे (६६३) भाती–भाति–भाता रेचिलिया=सोडला म्हणजे. उफगे=दवतो (६६५). पडिली–पडली. वारियाचिया–वारयाचिया. वळसा–धाळसा. हरिखा–हरीखी=हरिखा वळघे=हर्षानें चढतो (६६६) मोटकी=अल्पमान. ऐके–आइके सुके–शोखे=शुष्क होतो (६६७). वरी–वरिवरि (६६९). जोगावणें=पालन करणें. विरुद्ध–विरु (६७०). गार=शिळा (६७१). कुळे–कुळी. उभजे=कंटाळतो. गुरुसीचे–गुरुसीचि जो (६७३) वाचेसी–वाचे शूद्रान्न होणे=शूद्राच्या घरचें अन्न सेवन केल्यासारखें. घटली–घडले. यिये–इये (६७४) वाचेसी–वाचे. गुरुसेवका–गुरुभक्ताचें. पावो–पाहो. जैसा–जैसा हा (६७५) पाग=दोष. तल्पकाच्या–तल्पगाच्या. नामि–नामीं (६७६). ठावोवरी–ठायवरी. नावाचे–नामाचे भय–भये (६७७) कर्मीं–कर्में. मनी–मने. आडविच्या–अडवीच्या=रानातली. अवगळला=घाणेरी, घाणेरडी. कुहा=विहीर (६७८).

असें तें 'संतवाक्य' ऐकण्याबरोबर श्रीनिवृत्तिदासानीं म्हणूं केलें कीं अहो जी, माझेंही पण तेंच म्हणणें आहे—माझ्या मनातही पण तसेंच आहे (६४८)

आतां ही आपली आज्ञाच झाली जशी का तेथें वायापणाचें जास्त असें वाग्जाळाचें बोलणें हें मुळींच मी वाढूं देगार नाहीं. दुर्धरतेचें का समजण्यास कठिण असें बोलणें होऊं देगार नाहीं–नच करीन. (६४९)

त्याप्रमाणें ऐक की हीं अठरा ज्ञानलक्षणें श्रीकृष्णानीं धनुर्धरास निरूपणानें सांगितलीं. (६५०)

नंतर म्हटलें की या नांवानें म्हणजे या लक्षणानीं युक्त असें जें एक ज्ञान हें नांव तेथें आलेलें तें येथें ज्ञान असें जाणावें, हेंच आमचें आपुलें स्वमत होय व असेंच इतर ज्ञानी म्हणून जे आहेत त्यांचेंही मत होय (६५१)

तळहातावर ज्याप्रमाणें वाटोळा आवळा डोलत असलेला पाहावा त्याप्रमाणें ज्ञान हें आम्ही तुजला दाखवितो (६५२)

आता हे धनंजया महामती, अज्ञान अशी जी एक वदन्ती आहे ती ही पण व्यक्तीची करून किंवा व्यक्तीच्या लक्षणावर किंवा नावावर (अज्ञान हें नाव जेथे येते असें करून) उभी करून सांगतों. (६५३)

येऱ्हवीं ज्ञान पुढें झालें – ज्ञानाची पूर्ण प्राप्ती झाली तर अज्ञान हें जाणवेल – अज्ञानाची जाणीव होईल – जें ज्ञान नाहीं ते आपमुकच मग – सहजच मग अज्ञान होय. (६५४)

असें पाहा की सर्व दिवस हा सरला म्हणजे मग रात्रीची पाळी का फेरी वावरून असते – उरून असते – त्या रात्रीशिवाय तेथें तिसरें काहींच असत नाहीं – जसें (६५५)

त्याप्रमाणें जेथे ज्ञान नाहीं तें अज्ञानच पहा किंवा जाण म्हणून आता तीं अज्ञानाचीं (नांव × लक्षण × व्यक्ति) चिन्हें काहीं काहीं सांगण्याचें करितों (६५६)

संभावना मिळाली – संभावना झाली तर जो मान व्हावा अशी मानमान्यतेची इच्छा धरून असतो – एक मनवणें व्हावें असें जो इच्छितो – का सत्कारानें ज्यास संतोष होतो (६५७)

सर्व महत्त्व आपणाकडेमच घेऊन महत्त्वमान्य असा गर्वपर्वताच्या शिखरावरच जाऊन बसला – हरभऱ्याच्या झाडावर चढला – तेथून जो मुळीच खालीं उतरत नाहीं. स्वत चें महत्त्वच जेथे तेथें पुढें करून असतो जो त्याच्या ठायीं पुरें पुरें असें अज्ञान आहे असें जाण. (६५८)

स्वधर्माची वाग्वल्ली (वाचारूपी वेली) ही वाचेच्या पिंपळावर बांधिली आहे (मुंजाबाची जशी एक महत्त्व पाहणारी मान्यता) तेथे जाणून बुजून मुद्दाम जसा का देउळावर उभविला – जसा एक ताठरपणा असा जो ताठच होऊन आहे – महत्त्व घेऊन आहे तेथे – असेंही म्हणूं केलें होतें की वाचा ही सर्वथैव एक तोरणाची – सर्व महत्त्व तेथेच एक देऊ केले त्यामुळें तर इतका ताठरपणा आला कीं काठीस बांधलेला कुंचाच एक जसा का देउळावर उभा केला (आता येथें ह्याच्या बाजूस एक नामाचा गजर हा काहीं पाहूं करीत नाहीं असेंच होय म्हणून येथे ह्या कुंचा शब्दाचा जो फेर मोरचेलीदीनीं पाहिला जातो तो येथें नावास सुद्धा आत डोकावीत नसलेला) [मागाने केलेले तोरण तेथे पिंपळाची पानें बांधलेलीं आहेत असें जें वेशीवर का चावडीवर बांधलेलें व तेथे – हा एक जसा एखाद्या देउळावरच उभावलेला एक कुंचा – एखाद्या मोठ्या काठीला बांधलेला – असें महत्त्व – ताठरपणाचे जसें] (६५९)

विद्येचा पसारा घालतो जो – सुकृताचा डांगोरा पिटितो जो – जें काहीं करतो तें सर्व निव्वळ प्रतिष्ठेसाठीं म्हणून. (६६०)

अंग नुसतें वरवरच चर्चितो – सत्कार, पूजा, नमस्कारादीनीं जो जनास वंचितो (फसवितो) तो अज्ञानाची खाणी आहे असें समज. (६६१)

वनास वन्ही लागला असता तेथें स्थावर जंगम सर्व काहीं जळूं लागतें त्याप्रमाणें ज्याच्या आचरणानें जगास दु ख होतें. (६६२)

सहज कौतुकानें केलेलें त्याचें बोलणें हें तीक्ष्ण पहारेपेक्षाही (वाक्प्रहाराचें तें) जास्त रुपतें, खुपतें व त्याचे संकल्प हे तर विषापेक्षांही जास्त मारक असतात – असा जो. (६६३)

त्याचे ठिकाणीं बहुत अज्ञान आहे असें समजावें – तो तर अज्ञानाची खाणीच – निधानच – समजावी – व हिंसेस राहाण्यास तर तो गृहस्थ – गृहआश्रम – असा (आयतन) म्हणजे स्थान. (६६४)

भाता फुंकला असता फुगतो – रेचन केल्यावर तो लगेच ओसरतो त्याप्रमाणें संयोगानें व वियोगानें जो मदभराचा होऊन चढून जातो व वोहटतो जसा. (६६५)

वाऱ्याच्या भोंवऱ्यात पडलेली धुळी आकाशावर चढते त्याप्रमाणें स्तुति होऊं लागली असता जो अति चढ अशा वृत्तीनें असतो – अति फुगलेला असतो – फुगतो. (६६६)

थोडीशी का निंदा ऐकिली की लगेच डोक्यात तिडीक भरली होते – कपाळदुखीवा होतो वारा लागला असतां चिखल जसा सुकून जातो किंवा चिखलामध्यें थेंबभर पाणी पडलें असता जसें सर्व चिखलाचें असें तें होतें – तें पाणी विरल्यामुळें सर्वत्र विरून जातें – थेंबभर पाण्यानें जसा चिखल विरतो का वारें लागलें असता जसा चिखल सुकतो, शुष्क होतो, सोखतो त्याप्रमाणें. (६६७)

मान झाला असता विरून जातो व अपमान झाला की शुष्क होऊन जातो – तसा जो कोणतीच ऊर्मि सहन करूं शकत नाहीं – त्याच्या ठिकाणीं पुरें अज्ञान आहे (असें समज). (६६८)

जो आंतल्या गांठीचा असतो – ज्याचे मनामध्यें एक आतली गाठ असते – तो नुसता वरवरच मोकळें बोलणारा व पाहाणारा असतो तसा तो भलत्यासही अंगानें मिळून जातो. तसेंच आपल्या जीवदशेची पाठ ही भलत्यासच देऊं करतो – भलत्याला तो पाठीवर वाहून असतो आतल्या गाठीचा व वाचा, दृष्टि, अंग, जीव व पाठी-पाठ हीं भलत्यासच देणारा जो. (६६९)

व्याध जो पारधी त्याचें (सावजाना) चारा घालणें जसें त्याप्रमाणें त्यानें जोगावणें करणें, पालन करणें तें अति प्राञ्जळ असें – परिपूर्ण असें असतें. तो तर चांगाची – चांगल्याचीं अंत करणें हीं आपल्या विरुद्धतेचीं करून असतो – त्याचें बोलणें हें त्यास मुळींच खपत नाहीं. (६७०)

पिकलेल्या निंबोळीप्रमाणें ज्याचें सर्व बाह्य आचरण असतें – (कावळ्यांना सुकाळ) शिळा ही शेवाळ्यानें भरलेली – किंवा पावसातून पडलेली गार जशी शेवाळ्याने भरलेली त्याप्रमाणें ज्याचें बाह्य आचरण असतें – (शेवाळ्यानें झाकलेलें पाणी जें तिकडे काहीं हंस जात नाहींत अशी ज्याची बाह्य क्रिया). (६७१)

त्याच्या ठिकाणीं अज्ञान ठेविलें आहे असें जाण – ह्या बोलण्यात केव्हांहि आनपण म्हणजे निराळें कांहीं असें तें बोलणें आहे असें नाहीं हें सत्य होय (६७२)

आणि आपल्या गुरुकुळाला जो लाजतो – गुरुभक्तीस कंटाळतो व विद्या घेऊन गुरूशींच जो माजतो – त्याचें नांव घेणें तें वाचेला शूद्रान्नाचें होण्यासारखें होय पण लक्षणें जीं घडलेलीं – हें बोलताना घडलीं जीं का घडलेलीं लक्षणें तींच बोलिलीं. म्हणून आता गुरुभक्ताचें नांव घ्यावेंच – घेणें – घेतल्यानें ह्या वाचेस प्रायश्चित्त दिलें – द्यावेंच – अहो गुरुसेवकास नाव पावो (का असेंच नांव पाहो किं जसा का हा) सूर्यच एक – गुरुसेवकास जसा का हा सूर्यच एक – असें नांव पाहो – असें नाव त्यास पावो – मिळो. सूर्य जसा का हा, का सूर्य असें जें नाव तें त्यास पावो – पावन करो, त्यास प्रायश्चित्त देवो (६७३–६७४–६७५)

एवढ्यानेंही ह्या वाचेनें केलेल्या पापाचा पांग फिटेल, वाचेनें पाप केल्याचा दोष (तो) नाहींसा होईल, जो काहीं गुरुसेवावंचकाच्या नामानें जाहलेला. (६७६)

तेथीलच्या पापाचा सर्व ठावच तेथें पाहिला असल्यानें आता त्याच्या नावाचें भय घेण्याचें कारणच नाहीं. आतां आणीक काहीं चिन्हें सागतों ऐक. (६७७)

तरी आपल्या अंगानें – स्वतः आपण होऊन, पुढें होऊन जीं काहीं कामें का कर्में करावीं लागतात – महत्त्वास घ्यावीं लागतात तेथें जो ढिलाई करतो. ज्याच्या मनात नुसतेच अनेक विकल्प भरलेले असतात – तो कसा आहे म्हणशील तर ज्याप्रमाणें रानांतल्या विहिरीवर असलेलें तें घाणेरीचें झाडच एक होय – रानांतली (अवगळली) – घाणेरडी अशी विहीरच एक, कूपच एक (६७८)

तया तोंडी काटिवडे। आंत नुसधी हाडें।
अशुचि तेणे पाडे। सबाह्य जो ॥ ६७९ ॥

जैसे पोटालागी सुणे। उघडें झांकले न म्हणे।
तैसे आपुलें परावें नेणें। द्रव्यालागी ॥ ६८० ॥

यया ग्रामकोळांच्या ठायीं। जैसा मिळणी ठाव अठावो नाहीं।
तैसा स्त्रीविषी काही। विचारीना ॥ ६८१ ॥

कर्माची वेळ चुके। कां नित्यनैमित्तिक ठाके।
ते जया न दुखें। जिवामाजीं ॥ ६८२ ॥

पापी जो निसगु। पुण्याविषी अति निलोगु।
जयाच्या मनीं वेगु। विकल्पाचा ॥ ६८३ ॥

तो जाण निखळा। अज्ञानाचा पुतळा।
जो वांधोनि असे डोळां। वित्ताशेते ॥ ६८४ ॥

आणि स्वार्थे अळुमाळे। जो धैर्यापासोनि ढळे।
जैसे तृणबीज चळे। मुंगियेचेनि ॥ ६८५ ॥

पाव सुदलिया सवे। थिल्लर जेसे कालवे।
तैसा भयाचेनि नांवे। गजवजे जो ॥ ६८६ ॥

मनोरथांचा धारसा। वहाणे जयाचिया मानसा।
पूरी पडला जैसा। दुधिया पाही ॥ ६८७ ॥

वायोचेनि सावाये। धूम दिगंतवरी जाये।
दुःखवार्ताहि होये। तैसे जया ॥ ६८८ ॥

वाऊधाणाचिया परी। जो आश्रो केहीचि न धरी।
क्षेत्री तीर्थी पुरी। थारो नेणो ॥ ६८९ ॥

(जैसे का) मातलिया सरडा। पुढती बुडुख पुढती सेंडा।
हिंडणवारा कोरडा। तैसे जया ॥ ६९० ॥

जैसा रोविलिया विणे। रांझण वैसोचि नेणे।
तैसा पडे ते राहाणें। परव्ही हिंडे ॥ ६९१ ॥

तयाच्या ठाईं उदंड। अज्ञान असे वितंड।
जो चांचल्ये-भावंड। मर्कटाचे ॥ ६९२ ॥

आणि पै धनुर्धरा। जयाचिया गा अंतरा।
नाहीं वोढावारा। संयमाचा ॥ ६९३ ॥

लेंडिये आला लोंढा। न मनी वाळवेचा वरवंडा।
तैसा निषेधाचिया तोंडा। बिहेना जो ॥ ६९४ ॥

व्रतातें आड मोडी। धर्मातें पायें वोलांडी।
नियमाची आस तोडी। जयाची क्रिया ॥ ६९५ ॥

नाहीं पापाचा कंटाळा। नेदी पुण्यासी जिव्हाळा।
लाजेचा पेंडवळा। खाणोनी घाली ॥ ६९६ ॥

कुळेसी जो पाठिमोरा। वेदाज्ञेसी दुऱ्हा।
कृत्याकृत्य व्यापारा। निवाडु नेणे ॥ ६९७ ॥

वसो जैसा मोकाट। वारा जैसा अफाट।
फुटला जैसा पाट। निरंजनी ॥ ६९८ ॥

आंधळे हातियेरु मातले। का डोंगरी जैसे पेटले।
तैसे विषयी सुटले। चित्त जयाचे ॥ ६९९ ॥

पैं ऊकरडा काई न पडे। मोकाट कोण्हा नातुडे।
गांव दारीचे आडे। नोलांडी कोण ॥ ७०० ॥

जैसे सत्री अन्न जाले। का सामान्या बीक आले।
वागसिवेचे ऊभले। कोण न रिघे ॥ ७०१ ॥

तैसे जयाचें अंतःकरण। तयाच्या ठाई संपूर्ण।
अज्ञानची जाण। ऋद्धि आहे ॥ ७०२ ॥

आणि विषयाची गोडी। जो जीत मेला न सोडी।
स्वर्गीही खावया जोडी। येथूनीचि ॥ ७०३ ॥

जो अखंड भोगा जचे। जया व्यसन कामक्रियेचे।
मुख देखोनि विरक्तिचे। सचैल करी ॥ ७०४ ॥

विषये सिणोनिया जाये। परी न सिणे सावधु नोहे।
जेणें कुहिला हाती खाये। कोटी जैसा ॥ ७०५ ॥

खरी टेको नेदी उडे। लातौनि फोडी नाकाडे।
तऱ्ही जेंवी न काढे। मागौता खरू ॥ ७०६ ॥

तैसा जो विषयालागी। उडी घाली जळतिये आगीं।
व्यसनांची आंगी। लेणी मिरवी ॥ ७०७ ॥

फुटोनि पडे तंव। मृग वाढवी हांव।
परी न म्हणे हे माव। रोहिणीची ॥ ७०८ ॥

तैसा जन्मोनि मृत्युवरी। विषयीं त्रासिता बहुतीपरी।
तऱ्ही त्रास नेघे धरी। अधीक प्रेमा ॥ ७०९ ॥

काटिवडे = काट्यांची जुंबाडें, पुंजके अशुचि – अशौच – 'पति नसता सर्व अशुचि तिला' त्याच्या उलट अशौच – म्हणजे अंतर्बाह्य शुद्धता नसणें जें ( शौच = अतर्बाह्य शुद्धता राखणें जें ) ( ६७९ ). सुणे = कुत्रे ( ६८० ). यया – इया ग्रामकोळाच्या – ग्रामसिहाचिया [ ग्राममृग – ग्रामसिंह – ग्रामकोल – ( कोल = वराह ). ठाव – ठावो = कुत्र्यानें कुत्रीशी संग करिताना काहीं ठाव का अठाव आहे असें पाहाणें नाहीं तसें. विषी – विषयीं ( ६८१ ) कर्माची वेळ – कर्माचा वेलु दु:खे – दुखे ( ६८२ ). पापिजो निसगु – पापी जो निसुगु = निलाजरेपणानें पापच एक आचरणारा पुण्याविषी – पुण्याविषयीं अति निलोगु = अत्यत तिटकारा करणारा वेग – वेगु = प्रवाह, ओघ ( उद्वेग ) ( ६८३ ) निखळा – निखिळा ( सर्वथैव ) ( ६८४ ) स्वार्थे अलुमाळे = अल्पशा स्वार्थाकरिता. ढळे – चळे = चळे ढळे ( चलते = हालते ) ( ६८५ ). पांव – पावो = पाय. सुदलिया सवे = घातल्याबरोबर थिल्लर जैसे – जैसे चिल्लर = पाण्याचें लहानसें डबकें. कालवे = मिसळतें ( ६८६ ). धारसा = वेग, प्रवाह, ओघ ( ६८७ ). वायोचेनि – वायुचेनि सावाये = मदतीनें, बरोबरीनें. धूम – धुई दिगंतवरी – दिगंतरा ( ६८८ ). वाऊधाणा = वावटळ, वादळ आश्रो – आश्रय. केहीन्चि – काहीन्चि ( कोठेंही ) ( ६८९ ) बुडुख – बूड. सेंडा – शेंडा. पुढती बुडुख पुढती शेंडा = झाडावरून उतरणें व पुन्हा झाडावर चढणें. हिंडणवारा = नुसतेंच भटकणें, वाऱ्याचें वाहाणें तैसे जया – का तैसा जया ( ६९० ). रोविलिया – रोविलया. रांझण – रांजणु बैसोनि – थारो ( ६९१ ). चाचल्य – भावंड – चाचल्यें भावंड ( ६९२ ) वोढावारा = धरबंध ( ६९३ ). लेंडिये = ओहाळाला वखंडा – वरंडा = बाधा ( ६९४ ). धर्मातें – स्वधर्मु नियेमाची – नियमाची. आस = मर्यादा, बाध ( ६९५ ). नेदी पुण्यासी – नेदी पुण्याचा. पेंडवळा – पेडोळा = बाध, मर्यादा, सीमा ( ६९६ ) कुळेसी = कुळधर्मास निवाडु – निवाड ( ६९७ ). वसो – वसू = मोकाट सोडलेला बैल ( अष्ट दिक्पाळ – पावक – छंद – नंदीज्योति ). आफाट – अफाट. निरंजनी = निर्जनीचा, रानातला, वनात ( निरंजन = रागद्वेषरहित, शुद्ध परमात्मा, उपाय वन वसंत, एकांत ) ( ६९८ ). हातियेरु – हातिरु = हत्ती ( गजेंद्र ) ( ६९९ ). ऊकरडा – उबधडा काई – काय मोकाट = सैराट, आश्रय सुटलेला ( पोळ, गोऱ्हं ). कोण्हा – कोणा नातुडे = सापडत नाहीं गावदारीचे = ग्रामद्वारीचें, गांवातळे, गावातल्या वेशीचे आडे = उंबरा, सीमा ( ७०० ) छत्री – सत्री सामान्या = सामान्य मनुष्याला. बीक – बिक = बळ, तेज, ऐश्वर्य, सत्ता वाणसिवेचे – वाणसियेचे = वेश्येचे ( वाणसी = वणिग् स्त्री, वेश्या ) ऊभले – उभविले = दारवंटा ( ७०१ ) रिद्धि – ऋद्धि = ( संतोषवल्ली ) संतुष्टता ( ७०२ ) जीत – जीतु सोडी – सडी ( ७०३ ) जचे = जपतो, जाचतो कामक्रियेचे – काम्यक्रियेचे – कामक्रीडेचें – विरक्तीचें – विरक्ताचें. सचिल – सचैल करी = वस्त्रासकट स्नान करितों ( ७०४ ) विषये – विषो सिणोनिया – सिणोनि. सावधु – सावध ( जेणे सावधु ) कुहिला = ( कु = कुत्सित ) कुजकें, कुजकेंनासके, कुजलेलें हाति – हाती. कोटि – कोटी ( कुहली = विड्याचे पान, पानवेल ) ( ७०५ ) खरी = गाढवी लातोनि – लातौनि = लाथांनीं. नाकाडे = नाक, पोकळ असें जें नाक – अशीं जीं नाकाडे – नाकाची छिद्रें मागौता – माघौता ( ७०६ ). उडी घाली – घाली जळतिये – जळते. आगी = कुडती, फुडते ( ७०७ ). फुटोनि = ऊर फुटून, मोहानें फुटणें – गळलें जाणें – तें जसें हे – ते रोहिणीची = मृगजळाचे मिथ्यात्व ( ७०८ ). बहुता परी – बहुती परी. अधिक प्रेमा – ( आधिके प्रेमें ! ) ( ७०९ ).

तसा जो घाणेरीचें झाड का घाणेरडी विहीरच एक तेथे त्याचे तोडी काट्याचीं जुंबाडें नुसतीं – आंतमध्यें तर नुसतीं हाडेंच असलेलीं असा एक अतर्बाह्य अशुचि – अशुद्ध – असा तेथे काटेच बोचणारे व चालच मुळीं – का तोंडच मुळीं बंद केलें असें तें बोलणें का वागणें तेथें नुसते चघळणेंच एक होणारें असो अशुचि म्हणजे अशुद्धतेचा अंतर्बाह्य असा – तेथें बोलणें तें वर्मच बोलणारे व नेहमी भाडणच एक पुढें घेऊन चालत असणारें असें तें तेंच तेंच जसें का चघळणें तेथें लाळच एक घोटिली जाणारी असा तो म्हणजे विधिनिषेधास

मुळींच न पाहाणारा ( पाठ दाखविणारा असा ) एक अशुभ असाच – अशुचि असा – अशुद्ध असा होय – पाणउताराच एक जेव्हा तेव्हा केलेला असा चित्तशुद्धतेचा असलेला ( ६७९ )

कुत्रे हे पोट भरण्यासाठीं जेथें तेथे पडणारें – तेथे काय उघडे असणारें तें का झाकलेलें असें तें जें काहीं त्यामागे लागणारे झाल्याने काहीं मागचा पुढचा विचार हा तेथें नाहींच – काय उघडें, काय झाकलेलें अशा सर्वावरही तें पडणारें होतेंच त्याप्रमाणे द्रव्यामागे जो लागला आहे, ज्यास द्रव्याचा नुसता एक लळाच तेथें तें द्रव्य काय कुणाचें, का कसलें, का आपले किंवा दुसऱ्याचे, का परावा जो त्याचे ( जरी ) तेथें विचार हा पुढें नच येता ते द्रव्यलोभाचे मन त्याजवर पडतेच – आलुकणे हेच तेथें होऊन असते ( ६८० )

ग्रामकोळ म्हणजे ग्रामसिंह का कुत्रे जें – का ग्रामसूकर जे त्याचे ठिकाणीं काहींही ह्या विषयमिळणी- बाबत थागच न पाहिला गेलेला – तेथें थाग लागतो आहे का नेमकेपण का ठाव सांपडतो आहे का नाहीं, का सर्व अठावच एक – हें पाहाणेंच नाहीं त्याप्रमाणें जो ह्या स्त्रीसबंधी मुळीच कांहींही मागचा पुढचा विचार न करिता जेथे तेथे पडणाराच होतो – असा जो ( ६८१ )

कर्तव्यकर्माची वेळ चुकली तरी ज्या जीवीं दुखत नाहीं किंवा नित्यनैमित्तिक जें तें जर का थांबलें गेलें, हातूनच घडलें गेले तरी ज्याच्या जीवीं तें दुखणारें होत नाहीं, टोचणारें होत नाहीं – जो स्तब्धच असतो – मात्र एक निष्काळजीचा जो – अव्यवस्थितपणास आलेला जो होतो वेळेवर, नेमक्या वेळेसच प्रत्येक गोष्ट का काम घडलेच पाहिजे – नित्याचें जें असणारें असें कर्तव्य तें जरी हातून घडलें नाहीं – तरी ज्यास तें लागत नाही – टोचत नाही – बोचत नाहीं – मनास खुपत नाही असा अगदी मठ्ठपणाचा का सर्वथैव स्तब्धतेच्या अशा मनाचा जो ( ६८२ )

नेहमीच मनात विकल्पाना थारा दिल्यानें, कर्तव्याची वेळ ही गेली काय व राहिली काय अशी ज्याच्या मनास काहीं महत्वाकाक्षाच नाहीं तेथे जो निलाजरेपणाने व्यर्थतेच्या विकल्पाच्या भारानें कुथणारा जसा सर्वथैव एका त्या विकल्पासच पाहाणारा असा एक महामूर्खतेचा जो कोणी निलाजरेपणाचा असलेला – झालेला, तेथे ते कर्तव्य चुकणे झाल्यानें पापच एक आचरिले गेलें ते हें ज्याच्या मनास टोचत नाहीं तसेंच पुण्य जें ते काय घडले, हातून झाले काय किंवा न झाले काय – असा केवळ निसरड्या मनाचा तो – तेथे ते त्याचे ते मनाचे ढिलेपण हे अत्यंत तिरस्काऱ्यावरच जसें उभे असणारे, एक तिरस्कारच सर्वथैव तेथे वागत आलेला असा जो, त्याच्या मनामध्यें तर सर्वथैव एक विकल्पाचा वेगच गतीचा म्हणजे सर्व विकल्पाचा असा ( ६८३ )

असा तो तर सर्वथा निखळ अज्ञानाचा, एक ( निखळ ) पुतळाच होय. तो शुद्ध दगडच जाण – त्याचा सर्व डोळा तर एका द्रव्याच्या आशेसच पाहाणारा होय – असा जो – वित्ताची आशा एक – त्याची दृष्टि ही सर्वथा द्रव्याच्या लोभाची होऊन आहे तेथे त्याचे सर्व जगणें, पाहाणें, वागणें हें द्रव्याकडेसच दृष्टि लागलेलें असें होय ( ६८४ )

आणि थोड्याशाहि स्वार्थाकरिता जो धृति का धैर्य यापासून चळतो – नीतिमत्तेकडे काणाडोळा करून स्वार्थच एक पाहाणारा असतो – होतो, तेथे तर यःकश्चित मुंगीच्याही बळानें तृणबीज हें चळू लागणारें जसें का – एकाद्या मुंगीच्या बळानेंही तृणबीज हालतें तसें जो धैर्यापासून ढळतो व स्वार्थाचा होतो – थोड्याशा स्वार्थाकरिता जो धृति, नीतिधैर्यमत्ता ही टाकून देतो – नीतिमत्तेपासून चळतो – नम्रपण, लहानपण हेंच महत्त्वाचे तें मुंगी होऊन साखर खावी – तेथे दूध हेंच तृणामुळे ते पशू जसे विसरले – तेथे एक त्या ऐरावता- सारखे रत्न जरी तरी अंकुशाचा मार घेणारे असे – होणारे होते म्हणून दूध न विसरता एका मुंगीसारख्या लहानपणानें साखरेची गोडी घेऊं पाहावें असेंच होय – मुंगीसारखें लहानपण हेंच मुळी आता दूध विसरल्या- मुळें तृणाचें ते झाल्यामुळें तेथे स्वार्थच एक नीतिमत्तेस न जुमानता उभा झाला – स्वार्थ हा धृतीस पाहीचना असें झालें

(कसल्याहि महत्त्वाचें नाहीं असें य कश्चिततेचे जें, तें तृणाचे असें)–स्वार्थ देहबुद्धीवर टेकला–तृणाचेंही महत्त्व वाटतें–तेथें आईचें दूध प्यालेलें जें तेंच विसरलें होतें–त्यामुळें आता लहान होऊन, नम्र होऊन, साखर खाणें तें कसचें? –"लहानपण देगा देवा मुंगी साखरेचा रवा। ऐरावती रत्न थोर त्यास अंकुशाचा मार। महापुरें झाडे जातीं। तेथे लव्हाळें वाचती। येता सिंधूच्या लहरी। नम्र होता जाती दुरी। तुका म्हणे कळ। पाय धरिल्या न चले बळ॥"–तसें दूध नच विसरता लहान होऊन साखर व्हावी–तेथें अल्पशी जी का अगदी थोडीच अशी जी स्वार्थबुद्धि वा देहबुद्धि तीस महत्त्व ते कसले बरें–तेथे धृतीच एक सर्वथैव नीतिमत्तेवर उभी होणारी होते–धैर्यवततेचे असेंच ते पाठबळ होत असते. (६८५)

आतमध्यें पाय घातल्याबरोबर–किंवा पावो आत पडल्याबरोबर जसें लहानसें तें पाण्याचें डबकें सर्वच एक कालविले होतें–तसें जो भयामुळें–भयाचें नाव घेतल्याबरोबर–जो अगदींच गडबडून जातो–ज्याच्या आत सर्व गजबज होऊन जाते–ज्याचा जीव टाकिला होतो (६८६)

मनाच्या मनोरथावर–उभारलेला जो कांहीं एक संकल्प का निश्चय–का वेग, ओघ, अथवा प्रवाह तोच मुळी ज्याचे मन पाठीवर वाहून असतें–मनोरथ महत्त्वाचे असें ज्यानें मानिलेलें तो तर जसा का (प्रसंगाचे वेळेस) अगदींच पार फिसकटून जाऊन–तो तर ऐन आणीबाणीचे वेळेस अगदीच नडलेला होऊन जसा एकादा सागडीचा, सागडीतून सुटून पडलेला कडू दुध्या का नुसताच एक भोपळा पुरामध्यें वाहूं लागून धारेस लागतो–वाहूं लागतो–तसा जो. पुरामध्ये पडलेला कडू भोपळा जसा प्रवाहाबरोबर वाहूं लागतो तसा जो नुसत्याच मनोरथावर उभा असलेला जो असतो (तेथे मनोरथ हे काय नुसतें एक मनोराज्यच मुळी–तेथे गंधर्वनगरी उभे झालेले मनोरथ त्याना प्रवृत्तीचा का कर्माचा कसलाही मुळी आधारच नाहीं जेथे. (६८७)

नुसती एकादी दुःखवार्ता ऐकल्याबरोबर जो सर्वच्या सर्व आपलेपणाचे (धैर्य–धीर–विश्वरचनेचा धरच नसल्यामुळें–प्रकृति ही जेथें मुळीच थारा घेऊन नाहीं असा जो नुसत्या संकल्पाचा–जेथे नाम हें महत्त्व घेऊन सगुणाच्या साचेपणानें पाहिलेले नाहीं–जेथे वाचा ही सगुणशोभेची स्थिर अशी सगुणाने जोडलेली नाहीं–सगुणाने सगुण जोडलेलें नाही जेथे—जेथे नुसताच एक संकल्प का मनोरथ तेथे नसतेंच एक आकाशावर उभारलेलें गंधर्वनगर, तेथे कांहींच नाहीं पण संकल्प मात्र अनेक महत्त्वें घेऊन आहेत तेथें) महत्त्व का मानमान्यता हीच मुळी अगदी दिगन्तापलीकडे फेकून देणारा–अकाडताडव करणारा–आक्रोश का आकांत करणारा होतो तो, जसा धूर हा वायूच्या साहाय्यामुळें जसा दिगंताही पलीकडे गेला असें होते–त्यानें आपलेपण सर्वच्या सर्व टाकून दिल्यामुळें थोडीशी दुःखवार्ताही त्यास पारचे पार दिगंतापलीकडे करणारी होते–जो स्वतःस तसें करून घेतो–असा जो–जो दुःखवार्तेनें आपला सर्वच्या सर्व धीर टाकून देतो तो तर अगदींच धुराप्रमाणें विस्कळित मनाचा होऊन जातो–असा जो (६८८)

अहो, त्यानें तर कोठेंच ह्या मनास आश्रय दिलेला नाही–जो ह्या मनास कोठेंही स्थिर करीत नाहीं–ह्या मनास कांहीं तरी आश्रय हा पाहिजेच त्याशिवाय त्यास मुळी आधार हाच न राहिल्यामुळें ते भलतीकडेसच वाहूं लागतें–तसें ज्यानें–आपले मनास कशाचें आश्रित केले नाही तो एकाद्या वावटळीप्रमाणे सर्वत्र मोडतोडीचा होऊन जातो, कारण त्याने कांहीं एकाद्या क्षेत्राचा का तीर्थाचा का एकाद्या आश्रमाचाही पण स्वीकार का आश्रय नच घेतलेला–एकाद्या क्षेत्राचा तो आश्रितही पण नच झालेला असल्याने–तो तर वाउधाणा म्हणजे वावटळीप्रमाणे स्वतःस युगातच ओढवला आहे असें करून असतो–(म्हणून क्षेत्र का तीर्थ का पुर म्हणजे आश्रय हाच एक थटविलेला असावाच असावा हें बरें नव्हे का?) कसलाच आश्रय न घेतल्यामुळें त्याचे पायच मुळी ठरत नाहींत–कसल्याच थाऱ्याने असत नाहींत जसे का. (६८९)

अहो वाऱ्याचे नुसतेंच भटकणें—ह्या वाऱ्याचें वाहाणें जें तें तर हिंडणें फिरणारें असें नुसतेंच एक कोरडेपणाचें—भलत्याच ठिकाणीं वाहाण्याचें तें तर जसें का एखाद्या मातलेल्या सरडास बुंध्यावरून पुढें शेंड्यास जाणें का पुन्हा शेंड्यावरून बुंध्यास येणें असें नुसतेंच एक हिंडणें तें—हा वारा गर्दच जसा का, का हिंडणारा, फिरणारा, भटकणारा जसा का कसल्याहि हेतूचा नाहीं—का एखाद्या न्यायावर उभा नाहीं—का कारण एक पुढे घेऊन जो चालत नाहीं—कारण ह्या सर्व कर्मास मुळीं आधार असलेलीं तीं पाच कारणें तीं ज्यानें पाहणें नाहीं—तो तर नुसताच हेतुशिवाय ताठणारा का फिरणारा ( जन्मलेला—तेथें देहाचें सार्थक तें कसें ते ज्याच्या स्वप्नीसुद्धा नच येणारे असा जो एक नुसता मातलेला—तसा तो तर नुसता ह्या मनाच्या—मनोरथाच्या चढउतारावरच तो कसल्याच उपयोगाचा न होता—स्वतःस कसलेंच महत्त्व नच देऊन असल्यानें व्यर्थच जसा का ) अहो, तेथें केव्हांही वाहाणारा तो वारा देवाचा समजून, तो स्वाधीन करून घ्यावाच लागणारा असतो हें पण जर समजेस घेतलें तरच ना उपयोगाचा होणारा! ( ६९० )

रांजण जो आहे तो जमिनींत नीट बसविल्याशिवाय का रोविल्याशिवाय मुळींच धर न धरणारा असतो—तो तर मुळीं रोविल्याशिवाय इकडे तिकडे कलंडणारा का डगमगणारा असा असतो—रांजणास रोविल्याशिवाय बुडाचें होता येत नाहीं—त्यास काहींच थारा सापडत नाहीं जसें तसें जो पडलेला असा जेव्हा तेव्हांच मुळीं उगा राहाणारा, एऱ्हवीं पाहिलें असता हिंडणेंच एक ह्या मनाचें ज्याच्या जो उभा असताना, जिवंत असतांनाच मुळी कोठेंही स्थिर नच होणारा तो तर पडला असतानाच मुळीं उगा होणारा—उगा राहाणारा—(असा जो उभा असताना—ह्या जीवितानें असताना जसा नुसताच एक इकडे कलंड तिकडे कलंड असा कुठेंच मुळी कसलाही स्थिरपणाचा भाव ज्याच्या ठायी नाहीं असा तो तर पडला—निजला—कलंडला—लवंडला—तरच एके ठायी राहिला असें होय—तेथें त्याचें मन तो उभा असताना जसें का एका कड्याचें का वेटोळयाचें तें जसें नेहमी कसल्या तरी एखाद्या नसल्या व्यापानें चक्राप्रमाणें भ्रमण करणारें असेंच होय—जसा का नाग का सर्पयोनी ही आपल्या त्वेषास येणारी ती एका कड्यासारखीच त्या वेगामुळें दिसणारी ) एऱ्हवीं पडलेपण हें जेव्हा तेव्हाच मुळी तें स्थिर होणारें, एऱ्हवी जसें एका त्वेषाचें असेंच त्याचें तें जीवित धारणेनें असणें तें काहीच कामाचें नव्हे ( ६९१ )

असा जो त्याच्या ठिकाणीं ( वितंडपणाचे ) उदंड असें अज्ञान वास्तव्याने असते—तो तर चंचलपणानें एका मर्कटाच्या चंचलपणासच उपमिला होतो—तो त्या मर्कटाचें चाचल्य—भावंडच एक—चंचलपणामुळें तो माकडाची बरोबरी करणारा होय. ( ६९२ )

तो कसा म्हणशील तर ज्याच्या अंतःकरणामध्यें—हे धनुर्धरा, मुळीं ह्या संयमाचा—वोढावारा—धरबंध हाच नाहीं—सयम जो ध्यानधारणा समाधीचा असा तिहींचा म्हटलेला तेथें जो ह्या देहावर वाहाणारा देवाचा वारा तोच मुळीं ज्यानें आवरून धरणें नाहीं तोही पण त्या चाचल्याचें भावंडच एक असें होय. ज्याचे हृदय ( ध्यानधारणा का समाधि ) सयम हा जाणीत नाहीं—जेथें वाऱ्याचें वोढाळपणच सर्वथा—तेथें देवाचा वारा तो काय व कसला हें जाणणेंच नसल्यानें तेथें तेंही पण त्या चंचलपणाचे भावंडच म्हटला जातो—तो तर जिकडे वारा नेईल तिकडे भटकणारा—वळणारा झाल्यानें त्यास चाचल्याच्या भावंडाची उपमा दिलेली होते.

[ वोढावारा—देहावर वाजणारा देवाचा वारा वोढणीनें—आवरणानें—आवरण आवरून धरून आपलासा केला नाहीं तर जसें—तेथे तो देवाचा वारा ह्या देहावर वाहाणारा तो आवरून घेऊन ध्यान ( नासाग्रदृष्टि ) का धारणा ( देहधारण रचना ती आपलीशी केलेली—रचना ही भोगनैवेद्य, खाणेंपिणें जें त्यावर पेललेली ) का अक्षर सजीवनाचे करणें तेंच समाधीचें जसें त्या देवाचे आज्ञेप्रमाणें चालणें करणें तें—

नेहमींच केलेलें असावें – त्या आज्ञेप्रमाणेंच चालत असावें हें बरें – म्हणून असारवृत्ति का शील अनुस्थिति हीच एक परिणत केलेली असावी, तेथें देवच एक नेहमींचा सोबती का सांगाती होऊन असणारा – केव्हांही असतोच असा तो. ] (६९३)

लेंडी ओहळास पावसाचा का पाण्याचा लोंढा आला असता वाळूचा वरवंडा असला तरी तो ओलांडून जातो – मोडून टाकून त्यावरून जातो, त्याप्रमाणें निषेधक्रिया जी तीही पण करण्यास जो भीत नाहीं. अहो, ओहळास काय तुमचा तो वरंडा का वरवंडा ह्या चटके बसणाऱ्या त्रितापाचा – तेथें त्रिताप हे तापदायक आहेत असें माहीत असूनही तो ओहाळ, ओढाळ तो वरंडा ओलाडतोच, त्याप्रमाणें निषेध आचरणें जें तेंही पण तसल्याच त्रितापाच्या चटक्याचें तरी तो त्रिताप न जुमानता जो ओलाडण्यास भीत नाहीं. (६९४)

व्रतास मोडून टाकितो – सद्धर्म जो त्यास तर पायानें ओलाडून असतो – जातो – नियम जो आस, इच्छा, आकांक्षा, वाञ्छा, काक्षा – ही तोडून टाकणारी अशी ज्याची क्रिया करणी ही. (६९५)

पाप करण्यास कंटाळत नाहीं – पापाचा ज्यास कंटाळा नाहीं – भलतीकडेसच तोंड देणें – जेथें तेथें तोंडच एक दिलें जाणें ज्यानें – आपलें तोंडच जो उष्टें करून घेतो – करण्यास कंटाळत नाहीं – कांहीं तरी अंत.करणात जीवीचा जिव्हाळा हा पुण्यकर्माकडे धावा लागतोच केव्हाही तोही ज्यानें केलेला नाहीं – पुण्या-विषयीं ज्याचे मनांत आचार आदर नाहीं – व एक लाजणेंच जेथें तेथें तेंच जसें त्यानें अंगावर ओढवून घेतलेलें – एक जें लाजणें ह्या लोकलज्जेसच लाजेचें पुट दिलें जसें – अहो, लोकलज्जा ही केव्हाही अवश अशी ती उल्लंघिली पाहिजेच पाहिजे – पण जो तसें तें उल्लंघणें न करिता ती लज्जेची खाणच मुळीं खणीत राहातो – लज्जेची खाणच जो खणून ठेवितो ( गळयात घातलेलें लाजेचें पेंडवळेंच जसें एक तें तो तर खणीतच राहातो ) असा तो. (६९६)

कुळाचार जो जुमानीत नाहीं – पाठमोरा अथवा पाठच दाखविणारा कुळाचारास जो – वेदआज्ञा ही जो दूर लोटितो – दुरावलेला अनोळखीचा वेदाज्ञेस जो व कृत्य अकृत्य कोणते तें जो उमजत नाहीं – ज्यास चागलें काय व वाईट काय एवढाही पण निवाडा करतां येत नाहीं (६९७)

जसा रानांतील वणवा हा अगदीं मोकळेपणानें चहूंकडे पेटतो – अष्टावसूपैकीं एकादा – पावक – छंद – अग्नि – अगदींच मोकळा म्हणजे स्वैर झाला तर जसा अगदीं प्रशस्तपणानें चहूंकडे वाहून असतो किंवा वारा हा वाहूं लागला असता जसा अफाटपणानें वाहून असतो, तो उपमेनें पाहिला असता जसा एकादा रानामधील, निर्जन प्रदेशामधील मायेचा प्रवाह हा निरंजनी – शुद्ध परमात्म्याच्या सभोवतीं असलेलें तें माया-वन ( उपाय वनवसंताचें येणें व्हावेंच असें अगदीं सैराट होऊन असतें ). (६९८)

आधळे हातिरु मातलें असता तें जसें भांबावलेलें असें चहूंकडे फिरणारें – सभोंवार कांहीं का एकादा आश्रय सापडतो का म्हणून चांचपडणारें – किंवा जसें का डोंगरावर वणवा पेटला तो जसा चहूंकडे पसरणारा, त्याप्रमाणें ज्याचें चित्त विषयवनामध्यें सुटून आहे – विषयवनच एक ज्याचें चित्त पाहून आहे त्यास विषयच एक सर्वथैव मेटणारा होतो. (६९९)

अहो, ह्या विषयांना उपमा दिली गेली ती जशी का – काय अहो ! उकिरड्यावर काय काय म्हणून पडत नाहीं – तेथें सर्वथैव केरकचरा, मोडतोड ही टाकलेली – पडलेली असते – तसें तें तेथीलचें असतें हें काहीं तरी कोणाच्या पदरात पडणारें होईल ? अहो, अफाट सुटलेला बैल हा काय सहजपणेंच कोणास आवरतां येईल ? – अहो गांवातील उंबरे हे सर्वांकडून ओलांडिले जातील काय ? – गांवदारीचे – गांवच्या वेशीचे – गांवांत शिरण्याचा जो रस्ता, मार्ग, वेस तेथीलचा उंबरा कोण ओलाडित नाहीं – तसे विषयग्रामाचे उंबरे हे कोणासही ओलांडवणार नाहींत असें नव्हे का ? पण तेथें प्रत्येकजण जात येत असतोच. (७००)

अहो, अन्नसत्रामध्यें कोणीही जाऊन जेवावें – अन्नसत्रामधील अन्न कोणीही खावें – सामान्य जें त्यासच जसें महत्त्वाने – महत्नें व्यापिलें – सर्वसाधारण जें तेथे कोणीही यावें जावें असेंच होय – तें कोणीही लुटावें असेंच होय – अहो, वेश्या जी, तारुण्यतेजास आलेली, तिला कोणीही उपभोगावें असें नव्हे काय ? – तेथे दासीपणच जसें ते अवलंबिलेले – तेथे कोणासही कोणीही अटकाव करणारा नव्हे – वणिक स्त्रीनें उघडलेलें दुकान तेथे खरेदीकरिता कोणीही आत जावें असेंच होय (७०१)

अशा तऱ्हेचें ज्याचे अंत करण आहे त्याच्या ठायीं सपूर्ण अशा अज्ञानाचें समृद्धपण आहे असें जाण – तेथें अज्ञानाचें पूर्ण प्रमाणाचें ततपरपण आहे असें जाण – हें लक्ष्यात घे (७०२)

ह्या विषयानीं जिकला गेला – पार नामशेष केला तरी जो ह्या विषयाची आवड सोडीत नाहीं, एवढेंच काय पण जसें का स्वर्गामध्यें गेलो तर तेथें खाण्यास काहीं मिळेल का नाहीं असें समजून जो इथूनच मुळी तेथें स्वर्गामध्यें खाण्यापिण्याची व्यवस्था करीत असतो – करीत राहातो असा जो (७०३)

जो अखंड भोग जोडण्यासाठीच श्रम घेऊन असतो – श्रम करीत असतो – जचणें, जाचणें – फार श्रम घेणें – जपून असणें, टपून असणे – तेथें स्वत.सच मुळीं जसा जाचक केला असें होऊन असतें असा तो तर कसा म्हणाल तर विरक्ताचे मुख पाहिल्याबरोबर – का विरक्तीचें दर्शन झाल्यास – अगदी वस्त्रासकट स्नान करणारा – जसा का एकादा दोषच पदरात पडला असें समजून जो सचैल स्नान करणारा असा जो. त्याच्या त्या कामक्रीडेमध्ये वावरणारी जी त्याची वृत्ति व तेथील त्यानें जी साभाळली जाणारी मानसाची चिर्ली-पिर्ली हींही पण अगदीं सचैल स्नान घालून त्या विरक्तामधूनच उजवून घेतली – पुन्हा ताजीं तवानी केलीं जशी का (७०४)

विषयामुळें, विषयामध्यें वावरण्याने अगदी शिणला – श्रमला – दमला तरी पण जो तेथे शीण झाला असें मानून सावध होत नाहीं व त्यामुळें काय होते तर जसें का एकादें नासकें कुजकें असेंच ते त्यास अगि-कारण्यास लावलें जाणारे – कु म्हणजे कुत्सित व हल्य म्हणजे निंद्य का कुरूप असें जे कुजलेलें तेंच तो ग्रहण करतो, खाण्याचे करतो – जसा का कुष्ठरोगी जो तो तर अशा ह्याच प्रकारचे तें त्याचे खाणे, पिणे, भोगणे हें तसल्याच कुजलेल्या हातानी ग्रहण करणारा असतो – होतो (७०५)

गाढवी ही तर मुळी वर टेकूनच देत नाहीं – शिवाय उड्या घेऊन आपल्या लाथानीं गाढवाचें पोकळ असें तें नाकाडच मुळी फोडून टाकते – टाकणारी जरी तरीपण गाढव तो मागे मुळीं हटतच नाहीं – तो बाजू-सच मुळी होत नाहीं – तो मागे सरत नाहीं (७०६)

त्याप्रमाणें जो विषयाकरिता जळत्या आगीमध्यें उडी घालतो, तो तर अनेक व्यसनांचीं आपल्या अंगा-मध्यें लेणींच मिरवून असतो – त्याच्या अगामध्यें असलेली व्यसने हीं जशी का अनेक व्यसनरूपी अलंकारच अगीं मुरून असलेले – जशी का एक व्यसनरूपी अगीं चोळी कुडतीच त्यानें लेइलेली. (७०७)

त्याप्रमाणें काळीज फुटून पडेपर्यंत, ऊर फुटून जाईपर्यंत, मोहानें गळून जाईपर्यंत, तो जो मृग तो तर आपली हाव्रच वाढवीत राहातो – असतो – परंतु हें त्याच्या मुळीच लक्ष्यात येत नाहीं कीं ही तर मृग-जळाची – मिथा – मायाच एक. तें रोहिणीचे माया – मिथ्या – मृगजळ आहे हें तो मुळी म्हणतच नाही – (तें पाणी) व्यर्थ माया आहे – नुसते मायिक आहे असें तो समजतच नाही. (७०८)

त्याप्रमाणे जन्मल्यापासून मरेपर्यंत ह्या विषयाटवीमध्यें अनेक तऱ्हानी त्रासला गेला तरी जो, तो त्रास आहे असें न मानता – समजता त्या विषयाविषयीं जास्तीच प्रेम धरून असतो, आवड घेऊन असतो असा जो. (७०९)

पहिलिये बाळदशे। आई बा हेचि पिसे।
ते सरे मग स्त्रीमांसे। भुलोनि ठाके ॥ ७१० ॥

मग स्त्री भोगिता थावो। वृद्धाप्य लागे येवो।
तेव्हा तोचि प्रेमभावो। बाळकाचा आणी ॥ ७११ ॥

आंधळे व्याले जैसे। तैसा बाळे परिवसे।
परि जी मरे तो न त्रासे। विषयासी जो ॥ ७१२ ॥

जाण तयाच्या ठायी। अज्ञानासि पार नाही।
आता आणिके काही। चिन्हे सांगो ॥ ७१३ ॥

तरि देहे हेचि आत्मा। ऐसेया जो मनोधर्मा।
वळघोनिया कर्मा। रंभु करी ॥ ७१४ ॥

आणि उरे का पुरे। जे जे काही आचरे।
तयाचेनि आविष्करे। कुंथो लागे ॥ ७१५ ॥

डोईये ठेविलेनि भोजे। देवलसी जैसी फुंजे।
तैसा विद्या वयसा माजे। उताणा चाले ॥ ७१६ ॥

म्हणे मीचि येक आथी। माझ्याचि घरी संपत्ति।
माझी आचरिती रीती। कोणा आहे ॥ ७१७ ॥

नाही माझेनि पाडे वादु। मी सर्वज्ञ येकचि रूढु।
ऐसा गर्व तुष्टि गंडु। घेऊनि ठाके ॥ ७१८ ॥

व्याधि लागलिया माणुसा। नये भोग दाऊ जैसा।
निके न साहे (जो) तैसा। पुढिलांचे ॥ ७१९ ॥

पै गुण तेतुला खाये। स्नेहे की जळतु जाये।
जेथ ठेविजे तेथ होये। मसी ऐसा ॥ ७२० ॥

जीवनें सिंपिला तिडिपिडी। विजिला प्राण सांडी।
लागला तरी काडी। उरो नेदी ॥ ७२१ ॥

अळुमाळु प्रकाश करी। तेतुलेनीचि उबारा धरी।
तैसा दीपाचिये परी। सुविद्यु जो ॥ ७२२ ॥

औषधाचेनि नांवें अमृतें। नवज्वरु जैसा आंबुथे।
कां विष होऊनि परते। सर्पा दूध ॥ ७२३ ॥

तैसा सद्गुणी मछरु। व्युत्पत्ति अहंकारु।
तपोज्ञानें अपारु। ताठा चढे ॥ ७२४ ॥

अंत्यु राणिवे बैसविला। आरे धारणु गिळिला।
तैसा गर्वें फुगला। देखसी जो ॥ ७२५ ॥

जो लाटणे ऐसा न लवे। पायस तेवी न द्रवे।
गुणियासि नागवे। फोडिसे जैसे ॥ ७२६ ॥

किंबहुना तयापासी । अज्ञान आहे वाढीसी ।
हे निकरे गा तुजपासी । बोलत असो ॥ ७२७ ॥

आणीकही धनंजया । जो गृह देह सामग्रिया ।
न देखे काळींचिया । जन्माते गा ॥ ७२८ ॥

कृतघ्ना उपेगु केला । का चोरा व्यवहारु दिधला ।
निसुग स्तविला । विसरे जैसा ॥ ७२९ ॥

वोढाळिता लाविले । ते तैसेचि कान पुंस वोले ।
कीं पुढती वोढाळु आले । सुणे जैसे ॥ ७३० ॥

बेडुक सापाच्या तोंडी । जातसे सबुडबुडी ।
तो मक्षिकाचिया कोडी । स्मरेना कांहीं ॥ ७३१ ॥

तैसी नवही द्वारे स्रवती । आंगी देहाची लुती जिती ।
जेणे जाली ते चित्तीं । सलेना जया ॥ ७३२ ॥

मातेचिया उदर कुहरी । सूनि विष्ठेच्या दाथरी ।
जठरी नवमासु वरी । उकडिला जो ॥ ७३३ ॥

ते गर्भीची व्यथा । का जे जालें उपजता ।
ते काहीचि सर्वथा । नाठवी जो ॥ ७३४ ॥

मळमूत्रपंकीं । लोळती बाळे अंकीं ।
ते देखोनि जो न थुंकी । त्रासु नेघे ॥ ७३५ ॥

कालिचेनि जन्म गेले । पाहेचि पुढती आले ।
हे ऐसे काही वाटले । नाही जया ॥ ७३६ ॥

आणि पै तयाची परी । जिविताची फरारी ।
देखोनि जो न करी । मृत्युचिंता ॥ ७३७ ॥

जिणेयाचेनि विश्वासें । मृत्यु येकु येथ असे ।
हे जयाचेनि मानसे । मानिजे ना ॥ ७३८ ॥

अल्पोदकीचा मासा । हे नाटे ऐसिया आशा ।
न वचेचि कां जैसा । अगाध डोहा ॥ ७३९ ॥

का गोरीचिया भुली । मृग व्याधा दृष्टि न घाली ।
गळु न पाहाता गिळिली । उंडी मीने ॥ ७४० ॥

स्त्रीमासे = ‘एतन्मासवसादि विकारं मनसि विचारय वारंवारम्’ = स्त्रीदेहामध्येंच भुलतो ( ७१० ). थावो = स्थान, ठाण. बाळकाच्या – बालकासी ( ७११ ) परिवसे = आलिंगितो, स्पर्शतो, कवटाळतो. जी – जीवे – जीये ( ७१२ ) आणिके – आणीक ( ७१३ ) देहे हेचि – देह हाचि – देहचि. वळघोनिया = वळण घेऊन, चढून, येऊन. कर्मा रंभु – आरंभु ( ७१४ ) आविष्करे – आविष्कारे = आविर्भावानें, आवेशानें, दाखविण्यानें ( ७१५ ). डोईये = डोईवर, डोक्यावर. देवलसी – देवलविसे = देवाचा पुजारी, भगत. फुंजे = गर्वानें फुगतो, वाढूं लागतो, घुमतो डोईये ठेविलेनि भोजे । देवलविसे जेवि फुंजे ॥ = डोक्यावर

ठेविलेल्या देवमूर्तीनें भगत जसा घुमतो (७१६). आथी – अर्थी – अथी = धनवान् (७१७). वाढू – वाड. रुढु, रूढ = प्रसिद्ध. गर्वेतुष्टिगंडु – सर्वेतुष्टिगंडु = सर्व गोष्टींचा ताठा, सर्व गोष्टींबद्दल गर्व (७१८). न ये – नयेचि – न येचि. साहे – साहे जो पुढिलाचे = पुढें असणारे दुसरे जे त्याचें, दुसऱ्याचें (७१९). गुण = वात, सुताची वात, गुण स्नेहे की जळतु जाये – स्नेह की जाळित जाय स्नेह = तेल. मसी ऐसा–मसी ऐसे = काजळा-प्रमाणें (७२०). जीवनें = पाण्यानें सिपिला – शिपिला. तिडिपिडी – तिडपिडी = तडतडतो विजिला – विंजिला = वारा घातला तर (वाऱ्यानें विझविला तर) (७२१). अलुमाळु – अलुमाळ = किंचित् किंचित. तैसा – तैसिया. सुविद्यु – सुविद्य = गुणी, ज्ञानी. उबारा = कढतपण, असह्यपण (७२२). अमृतें = दुधानें. नवज्वरु जैसा – जैसा नवज्वरु आवुथे – अंवुथे = विकोपास जातो (७२३). मछरु – मत्सरु. व्युत्पत्ति – वित्पत्ति (७२४). अंत्यु – अंत्यज. राणिवे = राज्यावर आरे = अकुरानें, अजगराने धारणु = मोठा खांब (७२५). पाथरुं – पाथरे. गुणियासि = विषवैद्यास, गारुड्यास. नागवे = दाद देत नाहीं. फोडिसे – फोडसे = फुरसे = गारुड्याला फुरसें जसें मुळींच दाद देत नाहीं (७२६). वाढीसी – वारियासी = वाढते दशेस. निकरे = निकरानें, निश्चयानें तुजपासी – तुजसी. असे – असो (७२७). काळीचिया – कालचेया. न देखे काळीचिया जन्माते गा = पुढें होणाऱ्या किंवा गतजन्माच्या, चालू जन्माचा का जन्म मृत्यूचा (७२८). उपेगु = उपकार. व्यवहारु = व्यवहार = भांडवल. निसुग – निसुगु = निलाजरा, निर्लज्जपणानें ओढाळ (७२९) वोढाळिता लाविले = ओढाळपण केल्यामुळें बाहेर घातलें, हाकून लाविलें. ते ऐसेचि – तैसेचि पुंस = शेंपूट (सेवक, पुल्लिंग). सुणे = कुत्रें. वोढाळिता लाविले। ते ऐसेचि का न पुंस बोले। की पुढती ओढाळ आले। सुणे जैसे ॥ = ओढाळ अशा भटकणाऱ्या कुत्र्यास शेंपूट कापून हाकून दिलें तरी ते रक्त गळत असतानाच पुन्हा घरात शिरतें (७३०). सापाच्या – सापाचिया. सबुडबुडी = जीवासकट, मुळासकट. मक्षिकाचिया – मशकाचिया. कोडी = आशेनें (७३१) नवही द्वारे = कान दोन, मूत्रद्वार, डोळे दोन, मुख, मलद्वार, नाक-पुड्या दोन. लुती – लुत. चित्ति – चित्तीं (७३२). (मातृकोदर) मातेचिया उदर कुहरी – मातेच्या उदर-कुहरी = मातेच्या उदररूपी गर्भ गुहेंत "मातेचिया उदर कुहरी। पचौनि विष्ठेच्या दाथरी। उकडोनि नवमासवरी। जन्मजन्मोनि मरती ॥" (९ अ – ३३० ओवी). सूनि – पचूनि. दाथरी = चिमट्यांत, घरात. उकडिला – उकडिला जो (७३३). व्यथा – जे वेथा (७३४). लोळती बाळें अकीं – जे लोळते बाळ अकीं. देखोनि – ते देखोनि (७३५). कालिचेनि – कालचिना. पाहेचि – पाहेच, लागलेंच, उद्या, पुन्हा हे ऐसे – ऐसे हे (७३६). फरारी = आभासामर्ध्यें, भरांत, चाचल्यानें, भागात (७३७) जिणियाचेनि – जिणयाचेनि = जीविताच्या (७३८). नाटे = आटणार नाहीं जैसा – तैसा (७३९). गोरीचिया – गोरि-याचिया (गोरी – गोरिया) = पारध्याच्या गाण्याला भुलून. उंडी = आमिष, मासाचा गोळा मीने = मत्स्यानें, माशानें (७४०).

पहिल्यादा बाळपणीं आई का बा – बाप हेंच वेड लागलेलें असते. ते संपल्यावर सर्वथैव स्त्रीदेहाकडेसच – स्त्रीदेहामध्येंच भुलून असतो. तेथे मनुष्यप्राणिधर्म जे सविकार ते 'मास व सादिविकारम्' हेच महत्त्व घेऊन असतात. (७१०)

स्त्री भोगता भोगतां तेथें ठावच जसा का एका वृद्धाप्याचा तोच येऊ लागतो. तेव्हा त्या वार्धक्या-मध्येंही पण तोच प्रेमभाव – जसें का बालकच एक बोबडें, बचडे, छबणें तसेंच जो – तसलाच एक आविर्भाव जो करतो – जसें का तें बालक स्वतःच तो आपण आहे – किंवा बालक हें तो तसल्याच प्रेमभावानें वागविणारा होतो. (७११)

ज्यास डोळे नाहींत ते हपापले जसे – तेथें आंधळे ते व्याले तर बाळाना – बालकाना कवटाळणेंच एक जेथें – आलिंगिणेंच एक का स्पर्श करणें तें नेहमीं होणारें परंतु जी जीवित हें मेलेलें जरी तरी पण जो ह्या

विषयांना जो मुळीच त्रासत नाहीं – कंटाळत नाहीं. जीवित असो वा नसो जित्रंतपणींच मेलेला जरी तरी सुद्धां ह्या विषयाना जो कंटाळत नाहीं. जी जिये मरे तरी जो ह्या विषयांना त्रासत नाहीं. (७१२)

त्याच्या ठिकाणीं अज्ञानाचा अत नाहीं असें जाण. आता यावर आणीक कांहीं दुसरी लक्षणें सागतो – सागण्याचे करितों. (७१३)

तरी देह हाच आत्मा – देह म्हणजे शरीर जें तेंच आत्मा होय. अशा तऱ्हेचा मनाचा जो धर्म, स्वभाव तोच जो पुढे घेऊन कार्याम आरंभ करितो – जो कर्म – कर्तव्य का कार्य हें शरीरासच आत्मा समजून आरंभण्याचें करितो, ह्या वाणीस योजण्याचें करितो (त्याचे ठायी अज्ञान लक्षण आहे असें समज). (७१४)

तेथे हे बरें, ते बरें का अमुक कमी (पडलें) का तमुक पुरतें (झालें) असें जे जें कांही तो आचरितो त्या त्याचया आपल्या आचरण्यानें जो आविर्भावास येऊन कुंथूं लागतो, एका आवेशास येऊन असतो, जो कुतु लागतो – का फुगून जातो, बडबडूं लागतो (७१५)

कसें म्हणशील तर डोक्यावर ठेविलेल्या देवमूर्तीमुळें भगत जसा फुगतो, घुमतो – देवाचा पुजारी (का पुजारीण) डोईच्या देवमूर्तीने जसा गर्वानें फुगतो, वाढूं लागतो त्याप्रमाणे जो विद्येच्या माजानें किंवा वयाच्या – तारुण्याच्या माजाने – का मीच एक अफाट शरीर धनी असें समजून उताणा चालतो – चालण्याचें करतो जसा का. (७१६)

तो म्हणूं करतो कीं मीच एक धनवान्! माझेच घरी सपत्ति! आचरण करण्याची जी तऱ्हा ती दुसऱ्या कोणामही नसेल – नाहीं. मीच एक काय तो 'आहे आहे' असा होय. सवज्ञता ही मजजवळच सर्व आहे – रीतिरिवाज, रीतभात जी मी आचरितो ती दुमरीकडे कोठेही नसणारी का नच सापडणारी अशीच आहे. (७१७)

माझ्याहून चढ का माझ्या बरोबरीचा असा कोणीच नाहीं – सर्वज्ञतेबद्दल मीच एक प्रसिद्ध असलेला आहे – माझी सर्वज्ञता ही तर लोकात एक रूढीच होऊन आहे – सर्व गोष्टींमध्यें असा जो ताठा घेऊन आहे – सर्व गोष्टीबद्दल ताठा का गर्वाचा होऊन सतुष्टताच ती त्याची असा जो होऊन आहे, असा तो. (७१८)

क्षय झालेल्या मनुष्याच्यानें भोग विलाम हें दाखविणें शक्यच जसें नाहीं – तो त्या भोगामध्यें का विलासाच्या ठायी केव्हाही रममाण होतच नाहीं – आनदास येत नाही – तो क्षीण का औदासीन्याचा जसा त्याप्रमाणें जो दुमऱ्याचे काहीं एखादें चागले झालें का हित साधलें हे ज्यास सहन होत नाहीं. (७१९)

अहो, जो दिवा त्यानें तर वातच मर्व खाऊन टाकली व नुसत्या तेलानेच तो जळत राहिला तर जेथे तो ठेवावा तेथें नुमनी काजळीच एक वाढलेली असा होत नाहीं काय? जो उत्तम गुण तेवढा खाऊन टाकतो व स्नेह मैत्री तर जसा का नाहीशी करणारा असा नेहमी आत जळफळत असणारा जो तो तर जेथे जाईल तेथे – जेथे ठेवावा का योजावा तेथे तो जसा मसी म्हणजे काजळीच एक तमरूपी असा होय. (७२०)

त्यात जीवित जीवन भरलें – तेथे पाणी जर पडलें का टाकले का त्यावर ओतलें तर तो तडतडूं लागतो – विझविला किवा अशुद्ध हवा काढून शुद्ध हवा आत घेणें दिलें तर – (वारा घातला) विझतो, तेथे तो प्राणच आपला टाकणारा होतो – (देहावर जो, देवाचा वारा जो ह्या देहास आधारभूत तो जर त्याजवर कदाचित् आला तर तेथे तो मरणच आले असें समजून प्राण टाकणारा होतो) व एकादे ठायी लागला तर काहीही उरूं देत नाही – तो घराला स्पर्शला तर काडीही पण उरूं देत नाहीं. (७२१)

(असा तो दिवा) तो किंचित् प्रकाश करणारा व तेवढ्या किंचिततेवर जो असह्य होऊन असतो – जो कढतपणच एक अवलंबून असतो, तसा त्या दिव्याप्रमाणें ज्याचे गुण आहेत – ज्याचे ज्ञान त्या दिव्याप्रमाणें आहे (७२२)

कांहीं एकाद्या औषधीबद्दल पाहिलें तर जसें एरव्ही दूध हें अमृतच एक तेंच नवज्वराच्या ठायीं योजिलें तर जसें तें दुखणें विकोपास जाणारें होतें. नवज्वर हा दुधानें विकोपास जातो जसा, का सर्पास दूध पाजिले तर तें विषाच्या रूपानें बाहेर येणारें, तसा. (७२३)

त्याप्रमाणें जो सद्गुणाचा मत्सर करणारा, व्युत्पत्तीने तर अहंकाराचा होणारा (तेथे विपत्ति जरी तरीही पण ती विपत्तीच मुळी जशी का गर्व करणारी असा जो) तपाने किंवा ज्ञानाने तर ज्यास भलताच ताठा चढून असणारा असा जो (७२४)

नीच वर्णाचा शूद्र का चांडाळ (पतित का क्षुद्र) जर राणिवा (का राहाणिवा) वर बसविला, अंत्यज हा राज्यावर जर बसविला तर तो गर्वानें फुगलेला होतो, जसा का अजगरानें एक मोठा खांबच गिळिला आहे, तसा खांबासारखा जो गर्वामुळें फुगणारा होणारा – जो. (७२५)

लाटण्यासारखा जो नेहमी ताठून असतो, जो मुळीच लवत नाहीं – का दगडासारखा जो कधीही द्रव पावत नाही – द्रवत नाहीं तो कसा म्हणशील तर जसें फुरसें हें गारुड्यास का विष उतरणाऱ्या वैद्यास दाद देत नाही तसें (७२६)

एवढेंच काय पण तेथें असेंच जाणण्याचें कर कीं अज्ञान हे तेथे वाढीस घेऊन आहे – ते वाढते दशेस येऊन आहे. असे हें तुजजवळ का तुजला निश्चयाने का निकरानेच सांगण्याचें करीत आहे, तुजला सांगण्याचे आम्ही करीत आहोत. (७२७)

आणखी हे धनंजया, (असें जाण कीं) पुढें होणाऱ्या का झालेल्या, का चालू जन्मामध्ये (का जन्म व मृत्यु हे अपरिहार्य आहेत असें समजून) जो गृह, देह इत्यादि ज्या सामुग्री त्या सबंधीं मुळीच काहीही पाहाणें करीत नाही असा जो. (७२८)

तो कसा म्हणशील तर जसा का एकाद्या कृतघ्नावरच उपकार केल्याप्रमाणें होय – कृतघ्नासच उपयोग दिल्यासारखे (विसरणेंच एक जेथे), किंवा चोरासच मुळी व्यापार व्यवहाराकरिता भांडवल दिले (तेथे तो तें विसरतोच जसें) तेथे जसा एक निलाजराच का एक निर्लज्जच एक स्तविला गेला जसा, निलाजरेपणानें ओढाळ जो तोच प्रार्थिला गेला तो जसा विसरतो कृतघ्न उपकार स्मरत नाही, चोरास व्यापार व्यवसाया-करिता दिलेले भांडवल आठवत नाहीं, का निर्लज्जाची प्रार्थना केली तरी तो ती मनावर मुळीच घेत नाही जसें (७२९)

ओढाळपणामुळें हाकून दिलेलें कुत्रे जसें पुन्हा ओढाळपणच, भटकणेंच एक ते घरात आले असें जरी ते त्याचे कान व शेपूट हे नुकतेच कापले गेल्यामुळे बोले जरी. जेथें पुरुष अर्थ हा नाहीं तेथे जसें का तें बोलणें एका नपुंसाचे – नच पुरुषाचें – का नपुंसकाचें – तेथे मन हें जरी टक्क्या टोणप्यानी हाकललेलें, टाकून बोललेलें तरी ते मन (कुत्र्याप्रमाणे पुन्हा ओढाळपणच घेऊन असते जसें) पुरुषाच्या अर्थास, का सेवक-धर्मास का सेवाधर्मास नच पाहून असते जसें – पुन्हा ते तसलेंच वागणें करून असते जसे. (७३०)

मक्षिकाच्या (का मशकाच्या) आशेवर असलेला बेडूक स्वतःच मुळीं सापाच्या तोंडामध्यें अगदीं बुडासकट फसलेला, गिळिला जात आहे हें पाहात नाहीं जसें का. (७३१)

त्याप्रमाणें जेथें ह्या देहाची नऊही द्वारें (कान दोन, मूत्रद्वार, डोळे दोन, मुख, मलद्वार, दोन नाकपुड्या) नेहमीच वाहाणारी – पाझरणारीं – स्रवत असणारी तेथें अगास त्वचारोग, लूतच एक भरून आहे – (जिती) लूतच ती मुळीं जिंकून आहे – ती जिवंत होऊन आली आहे असें जें काही ज्याचे चित्तामध्यें सलत नाहीं असा जो. (७३२)

मातेच्या उदररूपी गर्भगुहेंत व विष्ठेच्या थरांत पचून जठरामध्यें नऊही महिने उकडिलेला जो. (७३३)

ती गर्भीची व्यथा – जन्माचें दुःख – जो आठवीत नाहीं, का जे काहीं कष्ट उपजताच झालेले ते काहींच मुळीं जो आठवीत नाहीं – त्याबद्दल विचार करीत नाहीं – स्मरत नाहीं. (७३४)

मलमूत्ररूपी चिखलामध्यें लोळतें बाळ मांडीवर घेऊन जो आहे – तें पाहून जो विटत नाहीं, त्रास घेत नाहीं – तसल्या त्या स्थितीस पाहून जो कांही एकाद्या त्यागाचा का व्रताचा अवलंब धरीत नाहीं. (७३५)

अहो कालचेचना हे जन्म ते वायाच गेले व पुन्हा उद्या तसलेच एक पुढें येणारे आहेत असें काहींच त्यास मुळीं वाटलें नाहीं. (७३६)

त्याचप्रमाणे त्या जीविनाचा भास, भर, चाचल्य व आभास पाहून जो मृत्यूविषयी काहींच काळजी वाहात नाहीं – हें जीवित नुसतें एक नसल्या भासाचें आहे असें मानून जो मरणाबद्दल काहींच खंत का चिंता बाळगीत नाहीं. (७३७)

हें जीवित का जिणे जगणें हा एक विश्वासच जसा जगण्यास मिळालेला, तेथें मृत्यु हा आहेच आहे हें ज्याचे मनास मुळींच पटत नाहीं असा जो – त्याचें मन मृत्यु आहे असें मानीतच नाहीं. (७३८)

लहानशा डबक्यामधील मासा तें डबकें केव्हाही मुळीं आटणारे नव्हे कदाचित् असें समजून मोठ्या अगाध डोहाचा आश्रय करणारा होत नाहीं जसा. (७३९)

गोरीवें म्हणजे पारध्याचें गाणें ऐकण्यास भुललेलें हरण (ऐकण्याकडेच हरिणाची दृष्टि वेधल्यामुळें तें हरीण) पारध्यास मुळींच लेखीत नाहीं, पाहात नाहीं – त्याची सर्व दृष्टीच मुळीं त्या गाण्यानें भुलली तेथे त्यास पारधी हा दिसतच नाहीं जसा का. त्याचे सर्व कंठ नरडेंच मुळी ओढून नेणारा गळ हा माशानें न पाहाता तो मासाचा तुकडा गळास लाविलेला तेवढाच त्यास दिसला – तेवढें आमिषच त्यानें पाहिलें व ती उंडी गिळून टाकिली (७४०)

दीपाचिया झगमगा। जाळिल हे पतंगा।
नेणेचि पैं गा। जयापरी ॥ ७४१ ॥

गव्हांरु निद्रासुखें। घर जळतसे हे न देखे।
नेणतां जेंवी विषें। रांधिलें अन्न ॥ ७४२ ॥

तैसा जीविताचें निमिसें। हा मृत्युचि कीं आला असे।
हें नेणेचि राजसे—। सुखें जो गा ॥ ७४३ ॥

शरीरीची वाढी। अहोरात्रांची जोडी।
विषयसुखें प्रौढि। सांचुचि मानी ॥ ७४४ ॥

परि बापुडा ऐसे नेणे। जे वेश्येसि सर्वस्व देणे।
तेचि ते नागवणे। रूप येथे ॥ ७४५ ॥

संव चोराचे साजणें। तेंचि पैं प्राण घेणें।
लेपा स्नपन करणें। तेंचि मरण ॥ ७४६ ॥

पांडुरोगें अंग सुटलें। तें तयाचि नांवें तया खुंटलें।
तैसे नेणो भुललें। आहार निद्रा ॥ ७४७ ॥

सन्मुख शूळा। धांवतया पायें चपळा।
प्रतिपदीं ये जवळा। मृत्यु जेवी ॥ ७४८ ॥

तेंवी देहीं जंव जंव वाढु। जंव जंव दिसाचा पवाडु।
जंव जंव सुखाडु भोगाचा हा ॥ ७४९ ॥

तंव तंव अधिका अधिके। मरण आयुष्यातें जिंके।
मीठ जैसे उदकें। घांसिजतसे ॥ ७५० ॥

तैसे जीवित जाये। तयास्तव काळु पाहे।
हे हातोंहातींचे नव्हे। ठाऊकें जया ॥ ७५१ ॥

किंबहुना पाण्डवा। हा आंगींचा मृत्यु नीचनवा।
न देखेचि जो मावा। विषयांचिया ॥ ७५२ ॥

तो अज्ञानदेशीचा रावो। या बोला महाबाहो।
न पडे गा ठावो। आणिकांचा ॥ ७५३ ॥

पैं जीविताचेंनि सुखे। जैसा का मृत्यु न देखे।
तैसाचि तारुण्य तोखें। जरा न गणी ॥ ७५४ ॥

कडाडी लोटिला गाडा। का शिखरौनि सुटिला धोंडा।
तैसा न देखे जो पुढा। वृद्धाप्य आहे ॥ ७५५ ॥

का आड ओहळा पाणी आले। का जैसे म्हैसयाचे जुंझ माजले।
तैसे तारुण्याचे चढले। भुररे जया ॥ ७५६ ॥

पुष्टी लागे विघरो। कांती पाहोनि सरो।
माथा आदरी शिरो—। बागी बळ ॥ ७५७ ॥

दाढी साउल धरी। मान हालोनि वारी।
तऱ्ही जो करी। मायेचा पैसु ॥ ७५८ ॥

पुढील उरी आदळे। तंव न देखे जेंवि आंधळे।
का डोळिया वरिलेनि गदळे। आळसी तोखे ॥ ७५९ ॥

तैसें तारुण्यपण आजीचे। भोगिता वृद्धाप्य पाहेचें।
ने दखे तोचि सांचे। अज्ञान गा ॥ ७६० ॥

देखे अक्षमे कुब्जे। कीं विटावूं लागे फुंजे।
परी न म्हणे पाहे (हे) माझे। हेंचि भंवें ॥ ७६१ ॥

आणि आंगीं वृद्धतेची। संज्ञा ये मरणाचि।
परी जया तारुण्याची। भुली न फिटे ॥ ७६२ ॥

तो अज्ञानाचें घर। हें सांचचि घे घे उतर।
तेंवीचि परियेसी थोर। चिन्हें आणीक ॥ ७६३ ॥

तरी वाघाचिये आडवें। चरोनि येकवेळ आला दैवे।
तेणे विश्वासे पुढती धावे। वसो जैसा ॥ ७६४ ॥

का सर्प घरा आंत। अवचटे ठेवा आणिला स्वस्थ।
येतुलिया साठी निश्चित। नास्तिक होये ॥ ७६५ ॥

तैसेंचि अवचटें पाहे। येक दोन वेळा लाहे।
येथें रोग एक आहे। हें मानीना जो ॥ ७६६ ॥

वैरिया नीद आली। आतां द्वंद्वें माझी सरली।
हे मानी तो सपिली। मुकला जेंवी ॥ ७६७ ॥

तैसी आहारनिद्रेची उजरी। रोग निवांत जंववरी।
तंव जो न करी। व्याधीची चिंता ॥ ७६८ ॥

आणि स्त्रीपुत्रादि मेळें। संपत्ती जंवजंव फळें।
तेणें रजें डोळे। जाती जयाचे ॥ ७६९ ॥

सवळेचि वियोग पडेल। विळेनि विपत्ती येईल।
हे दुःख पुढिल। देखेना जो ॥ ७७० ॥

तो अज्ञान गा पांडवा। आणी तोही तोचि जाणावा।
जो इंद्रिये अव्हासव्हां। चारी येथें ॥ ७७१ ॥

झगमग = प्रकाश, चकचकाट. जाळिल – जाळील (७४१). गव्हांरु – गवार = मूर्ख. जळतसे – जळत असे. हे – ते. जेवी – जेवितो. विषें – विखें = विषानें (७४२). जीविताचेनि = जीविताच्या. मिसें – मिषें = मिषानें. आला – कीं आला राजसे – राजहंसे = रजोगुणाच्या सुखानें चोंच व पाय तावडे असलेला शुभ्र राजहंस (येथें राजस सुख हेंच राजहंसासारखें पाय तावडे व चोचही पण तावडी असलेली असा तो पुरुष राजहंसास उपमिलेला) (७४३). सुखें – सुख सांचुचि – साचचि (७४४). ऐसा – ऐसे. वेश्येसि – वैश्येचें. सर्वस्व = तन, मन, धन. तेचि – तेचि ते. येथे – एथ (७४५) संवचोर = ठग. साजणें = संगती, संगत. पैं – ते लेपा स्नपन करणें = मातीच्या चित्राला, भितीवर काढलेल्या चित्राला स्नान, स्नपन, आंघोळ घालणें तेंचि मरण – तोचि नाशु (नाश) (७४६) तयाचि – ते तयाचि. नांव – नावे. खुंटलें – तया खुंटलें नेणो – नेणे भुललें – भुले (७४७). शूळा – सुळा – सूळा = सुळाच्या. जवळा – ये जवळा (७४८). वाढु – वाढ. दिसाचा = दिवसाचा. पवाडु – पवाड = विस्तार. सुरवाडु – सुरवाड = अनुकूलता. हा – यथा (७४९) अधिका – अधिके – अधिकाधके जैसें – जेंवि. घांसिजतसे – घासिजत असे = विखरतें, विरघळवतें, विरघळतें (७५०). जीवित – जीवित्व. काळु – काळाते = काळास, यमराजास नव्हे – न होये. ठाउके – ठाऊवे (७५१). आगींचा – आणीचा = प्रखर असा, प्रखरतेचा असा. नीचनवा – नित्यनवा. दैखे – देखेचि मावा = भुलीमुळें, कपटामुळें (७५२). सुखे – तोखे – तोषे – पोंखे = सुखानें. तारुण्य – तारुण्ये. तोखें = संतोषानें (७५४). कडाडी = कड्यावरून, डोंगरावरून. लोटिला–लोटला. सिखरौनि–कां शिखरौनि. सुटिला–सूटिला – सुटला. ने दखे – न देखे. वृद्धाप्य – वार्धक्य (७५५). आड ओहळा = आड रानातील ओहळास, ओहाळास. म्हसयाचे – म्हैसयाचे – का जैसे म्हैसयाचे = रेड्यांचे. जुंझ = झुंज. माजले = मातले. भुररे – भुररे = धुंदी, वेड, भुरळ (७५६). विघरो = कमी होऊं लागते, नाश पावूं लागते. पाहो निसरो – पाहे निसरो. माथा – मस्तक. बागी बळ – बागि बळ – भागी कंप = मस्तकप्राप्तीं, मानेला (७५७). साउल – साउळ = पाढरेपण हालोनि – हालौनि. पैसु = विस्तार (७५८). पुढिल – पुढील. ने दखे – ने देखे डोळिया वरिलेनि गदळे – डोळ्यावरले निगळे – डोळ्यावरळे न गळते = डोळ्यावर आलेली जी झापड ती नाहींशी न झाल्यामुळें आळशी आळसातच सुख मानतो (७५९). तारुण्यपण – तारुण्य. पाहिचे – पाहेचे = उद्याचे जो – तोचि (७६०). अक्षमे = अशक्त, आंधळे. कुबूजे – कुब्जे. विटावूं लागे = वेडावूं लागतो. फुंजे = (आधळा का कुबडा पाहिला म्हणजे)

तोऱ्यानें, अभिमानानें (वेडावतो). हे – पाहे = उद्या हेंचि भंवें – ऐसेचि होईल (७६१) ये = येते, येऊनि. भुली = घमेंड, भ्रम. वृद्धाप्य तेचि संज्ञा ये मरणाची = वृद्धपण हेंच का मरणाची खूण (७६२) परियेसी – परियेस. आडवें – अडवे = आडरानातून, रानात चरोनि येक वेळ – येक वेळ आला चरोनि वसो – वसू = बैल, पोळ (७६४). सर्प घरा आंत = सर्पाचे बिळातून स्वस्थ – स्वस्थु – स्वस्त. (७६५). पाहे – हे. दोन – दोनीचि रोगे – रोग – उरग (७६६) द्वंद्वें = भाडणें सपिली = मुलाबाळासह (७६७). उजरी = चांगुलपण, उत्कर्ष, वाढ जंववरी – जोवरी. व्याधि – व्याधीची (७६८). रजें = धुंदीनें, धुरानें (७६९). सवळेचि = तात्काळ, अल्पकाळातच, सवेचि विळेनि – विळौनि = वेळानें, कालानें. विपत्ति – ईपत्ति. येयिल – येईल (७७०). अव्हासवा – अव्हामव्हां = वाटेल तशी, पाहिजे तशी. येथें – एथ (७७१).

जसें पतंगास दिव्याच्या ज्योतीची झगमग – चकचकीत प्रकाश – हा (पतगास) त्यास जाळील असें वाटत नाहीं. (७४१)

गव्हार म्हणजे नेणतेंपण जें जाणत नाहीं असें अजाण तेथें मूर्खपणच – मुखरलेलें मुख, मूरख मूख (ज्यास उच्चाराचें ऊर्ध्व कसें तें माहित नाहीं) तेथें डोळेच त्याचे लपविलेले, उच्चारविलेले गेलेले – मूर्ख जो तो तर घर जळत आहे हें पाहातच नाही. अहो, नेणता असा जो – ज्यास अन्नाच्या विषक्रियेबद्दल काहीं माहीत नाही असा तो केव्हाही विषाचें (राधिलेलें) असें ते जरी अन्न विषाने राधिलेले तरी जेवतोच. (७४२)

त्याप्रमाणें ह्या मनुष्य देहधारण रूपानें – ह्या जीविताच्या रूपाने जसा का मृत्यूच एक रागावलेला असा जन्मला – असें हें देहधारण काय विचित्रच. तेथें सगोपनादि सस्कार हेच सुस्थितीस आणावे लागणारे होत – व हे न जाणणारा हा प्राणी ह्या राजम सुखाचा सर्वथैव होऊन स्वस्थच (असतो) असणार असा जो. (ह्या राजस गुणाची उपमा जशी का पाय तांबडे व चोच ही पण ताबडी अशा शुभ्र राजहंस पक्ष्याची घेतलेली – ह्या राजस गुणाच्या मनुष्यानें) तेथें हें राजस सुखच एक ह्या जीवितास आधारभूत असें होऊन तेथेंच सर्व सुखें प्रस्थापित केलीं असें जें कांहीं मानणें किंवा असा जो (तेथेच महत्त्व घेऊन असणारा) मनुष्य तो ह्या जीविताच्या मिषानें आलेला – (रागावलेला) मृत्यूच एक तेथें आहे असें मानण्याचें करीत नाहीं पण ह्या राजस सुखाचा मात्र यथेच्छ उपभोग घेत राहातो जसें का. (७४३)

दिवसेंदिवस शरीर हें वाढत असणारें – आलेलें – अहोरात्राची जोडी – जेथें दिवस व रात्र हे एकसारखे एकामागें एक जोडलेले आहेत तेथें काळच्या काळ जात आहे – तेथें ह्या विषयसुखाची प्रौढीच मिरवत असलेला असा तो, तें सुख अगदीं सांचेंच असें लटिकें नव्हेच नव्हे असेंच मानून असतो; तेथें त्यास सुखाचा अनुभव असो वा नसो पण त्या सुखाबाबत एक प्रौढी मिरवणारा का विषयाच्या सुखानें, अनुभवानें एक मोठेपण, प्रौढपण गाणारा, वाहाणारा. (७४४)

परंतु तो बिचारा हें जाणता होत नाहीं कीं हें जें आयुष्याचें उभे जीवित हेंच मुळीं त्या वेश्येसच आपल्या जीवनाचें उत्तम असें सर्वस्व दिलेलें, तें म्हणजे ह्या देहाचें असणें जें कांहीं एका आकारानें का रूपानें असणें तेंच मुळीं जें सर्वस्व तेंच व्यवहार्य व्यापाराकरितां दिलें – तेथें विकणेंच तें जीवित जाणणें जसें ह्या व्यापारास – जीविताच्या सर्वच्या सर्व हालचालीस – जीवितक्रियेस अहो, वेश्या किंवा वणिग्वृत्ति ही तर जगतामधील जी रजोगुणाची साठवण, डोळ्याचें जें ह्या ब्रह्मदेवाचें ठेवणें, तेंच मुळी लुटविणारी का लुटणारी – तेथें आपखुषीनेंच दिलें जाणारें तें जीवित असेंच ह्या इंद्रियाच्या गावच्या मनुष्याचें जगणें ते कसें ते येथें स्पष्ट करून सागितलें जसें. तेथें 'रूप डोळसपण' हें जें एकच सर्वस्व आपलें तेच विकलें, देऊन टाकलें.

वेश्येनें आपलें सर्वस्व दिलें ( आपलें सर्वस्व लुटविलें ) तेथें रमणें जें तेंच येथें आपलें ( डोळसपण का ) रूप दुरविणें होय. (७४५)

संवचोराचें जें नाद सादणें – ध्वनीस उचलणारें जें संगतीचें जोडणें – सोबत करणें – संवगडी मानणें – तें प्राणच घेणारें होय. अहो, मातीच्या चित्राना स्नान घालणें का जीवितरूपी भिंतीवर काढलेली चित्रविचित्रतेचीं जीवित जगण्याचीं जीं चित्रें तेथें आघोळ घालणें, नसलेल्यासच आपली पुण्यसंपदा मातब्बरी देऊन टाकली, जागविली का, म्हणजे काय एक मरणेंच होय. तेथें नाशच एक आपलासा केला असें होय – असें नव्हे काय ? लेप म्हणजे चुकीवर पुन्हा चूक करणें – तेथें कोणत्याहि तऱ्हेनें ह्या जन्माचें सार्थक ज्या योगें होईल – जेथें ऐहिक, पारमार्थिक जोडून घ्याव्या लागणाऱ्या असतात तसें – असें नच तपश्चर्येचें का वैराग्यवृत्तीचें होणें तें म्हणजे अगोदरच मुळीं ह्या जडाची माती तीच सर्व विकिली गेली, वर तर एक आंघोळ घालणें हें म्हणजे काय म्हणावें – तेथें सर्वस्वाचा नाशच जसा का व त्यांतच रमणें करणें तें जसें कां (७४६)

पांडुरोगानें अंग सुटलेलें तेथें तें जीविताचें अंगच मुळीं संपलें – त्या जीविताच्या अंगासच, गोडीसच मुकल्यासारखें होय. तेथें मुकणें तें जसें सर्व मातीच झाली ह्या देहाची तेथें कसचें तें जीवित जगणें. तेथें गतीच मुळीं खुटली थांबविली, थोपविली गेली असें असून – हें जसें तसेंच अगदीं या आहारनिद्रेसच भुले, भुललेलें ते जाणण्यास मुळीं येत नाहीं तेथें भुलीच पडली, भुलणेंच एक सर्वस्वी होतें, होणारें का झाल्यानें तेथें जीविताची गोष्टच मुळीं नाहीं – तर एक मातीच ती सर्व व तेथेंच जीवित खुंटविलें गेलें – तसें ह्या आहारानें व निद्रेनें झकविलें का झुलविलें होतें व येथें 'तूं जाग जाग हो त्वरिततेनें'. (७४७)

पायानें धांव घेणारा – ( चपला धावतया पां जवळा ये ) तेथें शूळच एक रोविलेला जो त्याच्या सन्मुख होणें म्हणजे त्याच्या अगदीं जवळ जवळ जाणें जें तेथें मरणच एक आपलेंसें केलेलें जसें – प्रत्येक पाऊल उचलिलें तें जसें उचलून टाकतेंच असें तें प्रत्येक पाऊल तें मृत्यूकडेसच जाणें का मृत्यूसच जवळ करणें होय. 'सन्मुख शूळा पाये धांवतया चपळा पां जवळा ये तेंवी पदोपदी ( धावतया ) मृत्यु जवळा ये का जेवि' त्रिविध तापाचें का चित्ताचें विविधत्व तेथेंच आलिंगन का एक जो धांवच घेऊन असणारा त्याचे जवळच मुळीं प्रतिपदी चपला चंचला येणारी होते, त्याप्रमाणें तेथें मृत्यूच्या जवळ जाणें हें होत असलेलें शूळाकडे चपळपणानें – पायानें धांव घेणाऱ्याला पदोपदीं मृत्यूच जवळ करणें होतें जसें. (७४८)

त्याप्रमाणें जसाजसा हा देह वाढूं लागतो – मोठा होत जातो, आयुष्यास येतो तों तों किंवा तसतसें आयुष्य हें विस्ताराचें होतें – वयोमान वाढतें – आयुष्याचें होणें होतें – देहाचें महिमान, महत्त्व हें पवाड्याचें असें – मोठा होत जातो. तसतशी ह्या भोगाची अनुकूलता ही पण विस्तार घेऊन असते – सुखाड असा हा भोग होऊन असतो – वाढ घेऊन असतो, महत्त्व घेऊन असतो – जसा का देवाघरचा एक विस्तृततेचा असा एक विस्तारच – ( विश्रांतीच का ) एक. (७४९)

तों तों अधिकाहूनहि अधिक – जास्तीपणाहूनही जास्तपणाचें असें जवळ येणारें मरण हें आयुष्याला जिंकून असतें – जिंकणारें होतें – ज्याप्रमाणें मीठ हें उदकानें जसजसें विरघळलें जातें – विरवलें जातें, तसतसें तें – ( पाण्यानें मीठ हें जसें घासणारें होऊन ) – घणाचें होऊन ( तें सर्व ) आटलें गेलें असें होतें – तेथें एक जी ह्या जीवदशेस का देहाच्या वाढीस पुरविणारी ती दशाच मुळीं पुरविली गेली का असें होय. (७५०)

हें जीवित त्याप्रमाणें ( वाया ) जात आहे हें कांहीं त्यास अगदीं हातोहातीं – सहजपणें – समजण्यासच मुळीं येणारें होत नाहीं – नसतें – हें जीवित मोठेपणास म्हणजे वयोमानास आल्यानें तें वयोमानाचें म्हणजे अमुक एका काळाचें – इतक्या इतक्या वयोमानाचें झालें असें पाहाणें होतें – अमुक एक काळ लोटला असें

म्हटलें जातें—तें काय महजपणेंच आतां लहान व्हावें असें नव्हे—याचें लहान होणें, वयाचें न होणें हें कांहीं आपल्या हातचें आहे असें नाहीं—पण हें कांहीं त्यांस मुळींच समजत नाहीं (७५१)

पण हे पाडवा, येथें तर मृत्यूच एक जसा नित्यनवेपणानें आपल्या अगींच भरून येत आहे असें जाणणेंच होत नाहीं, हेंच तर मुळीं ह्या विषयाचें एक मायेचें असें—विषयाच्या भावाचें असें तें लाघवीपण होय (७५२)

असा तो अज्ञानगांवीचा एक रावच होऊन असतो—होऊन येत आहे—असें म्हणणें हें महाबाहो अर्जुना, हें दुसऱ्या कसल्याहि आणीक तऱ्हेच्या बोलण्यानें पुरतें होत नाहीं—येथें दुसरें कसलेंही व तेंही पण कितीही जरी बोलणें केलें तरी तें—दुसऱ्या अनेक अशा ठावाचें जरी तें बोलणें झालें तरी तें मुळींच उपयोगाचें होत नाहीं—तेथें त्या बोलण्याचा काहींच उपयोग नाहीं असें होय (७५३)

जसा ह्या जीविताच्या सुखानें मृत्यूस पाहात नाहीं—मृत्यूस मुळींच न गणणारा असा—नच जाणणारा असा—तसाच तो तारुण्याच्या तोषानें—तोऱ्यानें—संतोषानें का पोंखण्यानें म्हातारपण जें पुढें येणारें तेंहीपण मुळींच त्याच्या मनांत येत नाहीं—लेखाच मुळीं का महत्त्व देऊन (कांहीं ह्या जन्माच्या सार्थकतेची सोय पाहावी हें मनावरच मुळीं घेत नाहीं) तो असत नाहीं—काहींच उपाययोजनेचें करीत नाहीं—त्यामुळें जोम जुमानणारा असाच तो होऊन असतो. (७५४)

अहो, शिखरावरून सुटलेला धोंडा जसा खालीं खडबडत जाणारा—त्याच्या अगाचें असलेलें कठिणपण हें तर आपटल्यानें आपटत धोपटत जाण्यानें तें सर्व ढिलेपणास का ढिसूळपणास येणारें होतें—किंवा कड्यावरून गाडा खालीं लोटला गेला तर जसे त्याचे भाग, विभाग हे मोडतोडीस येणारे—मोडतोडीचे होणारे—तसें जो पुढें वृद्धपण का बाधेसूदपण का नितरपण अवयवांचें तें पुढें वृद्धत्वामुळें विस्कळित होऊन जीवितऊर्मीसच मुळीं मरणाचा डाव देणारें होईल हें तो पाहाण्याचें करीत नाहीं—यांस काहीं उपाय करावा हें पाहाण्याचें करीत नाहीं. (७५५)

आडरानांतल्या ओघळीस-ओहाळीस पाणी आलें तर तें जसें चहूंकडे पसरलें होतें—चहूंकडे पसरल्यामुळें केव्हांच नाहींसें होणारें होतें—किंवा जसें का मातलेल्या म्हैशाचें झुंज हें मातलेपणानें सैराटाचें तें कुणीकडे जाऊन पडेल—व तसें तें जाण्यानें तें कसें संपणारें, का नच संपणारें हें का कदाचित् फजिततेचें असें होणारें, का नच होणारें असें, त्याप्रमाणें तारुण्याचें भुररें हें अंगीं चढलेलें तें कसें वसरणारें का त्वरित भंग होणारें का कुणीकडे जाऊन पडणारें—हें जर जसें का एकाद्या पक्ष्याचें भुर्‌दिशीं उडून जाणेंच जसें का, तें आलें का नाहीं याची मुळीं त्या पक्ष्याच्या बसण्यानें तें बसलें न बसलें तोंच भुर्‌दिशीं उडून जाणारें तसें येथें—काहीं आठवणच न राहाणारी—ह्या तारुण्याच्या चढतेपणाची, त्याबरोबरच जीविताचीही. (७५६)

अंगाची पुष्टी ही वोसरूं लागते—नाश पावूं लागते—कमी कमी होत जाते—विघरूं लागते—कांति, अंगचें तेज मागें हटूं लागतें, कमी होतें—मागचा पाय घेऊं लागतें, मस्तक हें मानेच्या प्रातीं, शिरोभागीं कंप पावूं लागतें—तरीपण बांगी बळ—बाग म्हणजे कंप घेऊन बोलणें होतेंच, होणारें—तेथें मान ही ह्या बोलण्याच्या धक्क्यानें हादरूं लागते, असलें बळ सकंप होऊन असतें, असें जरी होऊं लागलें तरी जो—— (७५७)

दाढीचे केस पांढुरके होऊं लागतात—पिकूं लागतात—मान ही एकसारखी हालत राहाणारी—तरीपण जो मावेचा सोसच करून असतो—मायेसच पैस फैलावाचें महत्त्व करून असणारा असा जो. (७५८)

दुसऱ्याचें पुढिलाचें करणें हें उरावर आदळत असणारें तरी जो डोळ्यावर कातडें ओढून असतो, आधळे जसे एक तसें जो पाहातच नाहीं—अशी का डोळ्यावर आलेली झापड ती बाजूस झाली नाहीं—

केली नाहीं – डोळयावरील पडदा – गदळ जरी तसेंच राहिलें तरी जो आळसाची गुंगी झाडण्याचा प्रयत्न करीत नाहीं, वर संतोषाचा असाच होऊन असतो – जसा का सुस्तपणाचा आळशीच एक (७५९)

आजचें तरुणपण भोगता भोगतां जो उद्याचें का पुढें येणारें वृद्धपण तें पाहात नाहीं तो खरा अज्ञान जाण. (७६०)

अक्षम म्हणजे अशक्त, आंधळें, अयोग्य का कुबडे एकादें पाहिलें तर जो त्याची विटंबना करूं लागतो, अभिमानानें फुगून जाऊन त्यास वेडावूं लागतो, पण असें तो मनांत मुळींच समजत नाहीं कीं अशी ही अवस्था ही पण मजला उद्या येऊन गाठणार आहे – असेंच माझेंही पण होणारें आहे हें जो उमजत नाहीं – हेंच मजलाही पण उद्या भंवणारें होईल असें जो समजत नाहीं. (७६१)

आणि देहावर का अंगीं येणाऱ्या ज्या वृद्धतेच्या वृद्ध असें नांवाचें निशाणाचें जें येणें तें म्हणजे मरणच एक आपली खूण घे म्हणून म्हणणारें असें, पण ज्यास तारुण्याची लागलेली घमेंड, भ्रम, भूली ही फिटणारी – कीं वोसरणारी ती होईलच असें वाटत नाहीं. (७६२)

तो अज्ञानाचें घर होय असेंच पण येथें ह्या प्रश्नास उत्तर घे – त्याचप्रमाणें आणीकही कांहीं थोरलहान अशीं चिन्हें सांगतों, ऐक (७६३)

रानांतून – वाघ असलेल्या अडवामधून एकदां सहजपणेंच जसें दैवयोगानेंच जरी चरून आला – संचरून – विचरून आला व आतां त्यास जसा का एक विश्वासच आला व त्या विश्वासावर जो एकाद्या पोळाप्रमाणें पुढेंही पण त्याच रानाचा आश्रय करीत राहातो (७६४)

एकाद्या सापाच्या बिळांतून अकस्मात् एक भला मोठा (अगदीं स्वस्त असाच तर काय) निधीच द्रव्याचा आणलेला व एवढ्याच कारणामुळें जो अगदीं बेधडकपणें अगदी स्वस्थ राहून नास्तिक वादाच्या गोष्टी करूं लागतो – निश्चितपणें नास्तिक असाच जो होऊन जातो – असतो. (७६५)

त्याचप्रमाणें आणीकही एकदोन वेळा अकस्मिततेनें तसला ठेवा त्याच्या हातीं आला – पण येथें जो एक रोग का सर्प (का रोंगे) आहे हें जो मुळींच मानण्याचें करीना – त्यास मुळीच मिईना, मान्यतेस घेईना असा जो. (७६६)

वैऱ्याला आलेली झोंप – वैरी झोंपी गेलेला पाहून तेथें माझीं जीवनकलहाचीं भाडणें संपलीं असें जो मानतो तो तर चिलापिलासहितच मुळीं जीवितास मुकणारा होतो असें जाण. (७६७)

तशी ती आहाराची का निद्रालूपणाची ती वाढती चांगुलपणाची संवय (का उत्कर्ष) ही – तेथें जोंपर्यंत रोग भोग हा निवांत आहे तोंपर्यंत जो आधिव्याधीची चिंता का काळजी करून असत नाहीं. (७६८)

स्त्रीपुत्राच्या मेळयानें – मेळाव्यानें (गर्दीनें) जों जों ही शरीरसंपत्ति ही फळें देणारी का फळणारी अशी जरी व अशा त्या रजाच्या – रजोगुणाच्या धुंदीनें – धुरानें त्याचे डोळे गेलेले होतात. (७६९)

अल्प काळांतच वियोग घडणारा, कांहीं वेळानें का कांहीं काळानें विपत्ति, आपदा ही येणारी होईल असें तें पुढें येणारें दुःख जो मुळींच पाहात नाहीं. (७७०)

असा तो अज्ञान होय. तसेंच जो येथें इहलोकीं इंद्रियें हीं वाटेल तशीं मनसोक्त चारतो तोहीपण तोच समज – जाण. (७७१)

**वयसेचेनि उवाये। संपत्तीचेनि सावाये।**
**सेव्यासेव्य जाये। सरकटितु ॥ ७७२ ॥**

न करावे ते करी। असंभाव्य मनी धरी।
चिंतु नये तेचि विचारी। जयाची मती ॥ ७७३॥

रिगे जेथ न रिगावे। मागे जे न घ्यावे।
स्पर्शी जेथ न लगावे। आंग मन ॥ ७७४ ॥

नव जावे तेथ जाये। न पाहावे ते पाहे।
न खावे ते खाये। तेवीचि तोषे ॥ ७७५ ॥

न धरावा तो संग। न लगावे तेथ लाग।
नाचरावा तो मार्ग। आचरे जो ॥ ७७६ ॥

नायकावे ते आईके। न बोलावे ते भुंके।
परी दोष होईल हे ने दखे। प्रवर्तता ॥ ७७७ ॥

आंगा रुची यावे। इतुलेनि कृत्याकृत्य नाठवे।
जो करणेयाचेनि नावे। भलतेचि करी ॥ ७७८ ॥

परी पाप मज होईल। का नरकयातना येईल।
हे काहीचि पुढील। न देखे जो ॥ ७७९ ॥

तयाचेनि आंगलगे। अज्ञान जगी दाटुगे।
जे सज्ञानाही संगे। झोंबो सके ॥ ७८० ॥

परी असो हे आईक। अज्ञान चिन्हे आणीक।
जेणे तुज सम्यक्। जाणावे ते ॥ ७८१ ॥

तरी जयाची प्रीती पुरी। गुंतली देखसी घरी।
नवगंधकेसरी। भ्रमरी जैसी ॥ ७८२ ॥

साखरेचिये राशी। बैसली नुडे माशी।
तैसेनि स्त्रीचित्त आवेशी। जयाचे मन ॥ ७८३ ॥

ठेला बेडुक कुंडी। मशक गुंतला शेंबुडी।
जैसा ढोर सबुडबुडी। रुतला पंकी ॥ ७८४ ॥

तैसे घरौनि निघणे। नाही जीविते मरणे।
जया सर्प होउनि असणे। भाटी तिये ॥ ७८५ ॥

प्रियोत्तमाच्या कंठी। प्रमदा घे आटी।
तैसी जीवेसी कोपटी। धरुनि ठाके ॥ ७८६ ॥

मधुरसोद्देशे। मधुकर जचे जैसे।
गृहसंगोपन तैसे। करी जो गा ॥ ७८७ ॥

म्हातारपणी जाले। माणिक येक उपायिले।
तयाचे का जेतुले। मातापितरां ॥ ७८८ ॥

तेतुलेनि पाडे पार्था। धरी प्रेम जया आस्था।
आणि स्त्रीवांचूनि सर्वथा। जाणेना जो ॥ ७८९ ॥

महापुरुषाचे चित्त। जालिया वस्तुगत।
ठाके व्यवहार जात। जिया परी ॥ ७९० ॥

तैसा स्त्रीदेही जो जीवे। पडोनिया सर्वभावे।
कोण मी काय करावे। काही नेणे ॥ ७९१ ॥

हानी लाज न देखे। परापवाद नाईके।
जयाची इंद्रिये येकमुखे। स्त्रिया केली ॥ ७९२ ॥

चित्त आराधी स्त्रियेचे। स्त्रियेचेनि छंदे नाचे।
वानर गारुडियाचे। तैसे होय ॥ ७९३ ॥

आपणपेही सिणवी। इष्टमैत्रही दुरावी।
मग कवडाचि वाढवी। लोभिया जैसा ॥ ७९४ ॥

तैसा दानपुण्यादिके खांची। गोत्रकुटुंबा वंची।
परी गारी भरी स्त्रियेची। उणी हो नेदी ॥ ७९५ ॥

पूजिते देव जोगावी। गुरुते बोले झकवी।
मायबापा दावी। निदारपण ॥ ७९६ ॥

स्त्रियेच्या तरी विशी। भोग संपत्ती अनेकी।
आणी वस्तु निकी। जे जे देखे ॥ ७९७ ॥

प्रेमाथिलेनि भक्ते। जैसेनि भजिजे कुळदेवते।
तैसा एकाग्रचित्ते। स्त्री जो उपासी ॥ ७९८ ॥

सांच आणि चोख। ते स्त्रियेतेचि अशेष।
येरे विसी जोगाणुक। तेही नाही ॥ ७९९ ॥

इयेते हन कोणी देखेल। इयेते वैखासे आईल।
तरी युगचि बुडेल। ऐसे जया ॥ ८०० ॥

नाइटेया भेण। न मोडी नागांची आण।
तैसी पाळी उणखुण। स्त्रियेची जो ॥ ८०१ ॥

किंबहुना धनंजया। स्त्रीचि सर्वस्व जया।
आणि तियेच्या जालेया। लागी प्रेमा ॥ ८०२ ॥

वयसेचेनि उवाये=तारुण्याच्या सुखानें, आवेशानें, उत्कर्षानें. सावाये=सहवासानें, साह्यानें, संगतीनें. सेव्यासेव्ये–सेव्यासेव्य. सरकटितु=रगळीत, गिळीत (सरसकटितु=सरसकट सर्व कांहीं सेवीत राहातो) (७७२). चिंतु नये–चिंतू नये (७७३). रिगे–रिघे. नेघावे–न घ्यावे. स्पर्शी–स्पर्शे. लगावे–लागावे (स्पर्शू लागू नये जेथें)=स्पर्शामध्यें आंग व मन न लगावें, योजावें–आंगानें, मनानें जें न स्पर्शावे तेंच जो स्पर्शितो (७७४). नव–न. ते–ते जो (७७५). भुंके=बरळे, बफे, बडबडतो. होईल–होती–होईल. ने देखे –न दखे (७७७). आंगा रुची यावे–अंगा मनासी रुचावे–आंगा मनासी रुचि यावे (७७८). न देखे–देखे ना (७७९). अज्ञान जगी–जगी अज्ञान. दाटुगे–(प्रबळ) सबळ. शके–सके (७८०). जाणावे ते–जाणवेल (७८१). नवगंधकेसरी=नव्यानें उमललेल्या कमळाच्या केसराबर (७८२). साखरेच्यिये–साखरेच्चिया. नुखे–नुठे (७८३). घरौनि–घरीहूनि. निघणे–निगणें.

नाहीं जीविते मरणे-नाही जीवे मने प्राणे. सर्प-साप भाटी=बखळीमध्यें, जमिनींत, क्षुद्र प्राण्याप्रमाणें तेथेंच असणें जें (क्षुद्र का निंद्य), ओसाड जमिनींत (७८५). आटी=मिठी कोपट=खोपट (७८६), जचे=जपतो, जाच सोसून असतो (७८७). जाले=आले माणिक=रत्न, पुत्ररत्न उपायिले-विपाइले=विरळेपणाचें, सायासानें झालेलें (७८८). प्रेम जया-जया प्रेम (७८९). वस्तुगत=ब्रह्मरूप, ब्रह्मरूपीं लीन. जिया-जया (७९०). लाज-लज्जा. परापवाद=निंदा (७९२). स्त्रियेचेनि छंदे-आणि स्त्रियेचेचि संदे. वानर-माकड तैसे-जैसे (७९३) इष्टमैत्रही दुरावी-इष्टमित्र दुखवी-दुन्हावी. लोभिया-लोभी (७९४). दानपुण्यादिके-दानपुण्य खांची=कमी करितो परी गारी भरी-परि गार भरी=वायदा, मागणी उणि-उणी (७९५). पूजिते देव-पूजिती दैवतें. जोगावी=कशीं बशीं पाळतो. निदारपण=दरिद्रपण (७९६) विसी-विखी-विषी-विषयीं (७९७). कुळदेवते-कुळदैवतें (७९८) अशेष-अशेख. येरे विसी-येराविषयीं. जोगाणुक-जोगवणुक=जागणूक, सांभाळणें तेंही नाहीं (७९९). हान-हन. देखेल-देखैल. इयेते वैखासे-इयेसी (वेखासे=विरुद्ध) (८००). नाइटेया मेण-नायटया मेण. न मोडी-न मोडिजे. उणखुण=मनोगत, पूर्ण खूण, हेतु, कामना (८०१). सर्वस्वे-सर्वस्व. जालेया-जालिया लागी=अपत्यावर प्रेमा-प्रेम (८०२)

तारुण्याच्या उत्कर्षानें सुखात व संपत्तीच्या सहवासामुळें अमुक एक सेवावें का न सेवावें-तेथें सेव्यासेव्य हें न पाहातां सरकटित, सेवीत, रगडीत, गिळीत जातो जो-असा जो (७७२)

जें (काहीं एक) करूं नये तेंच करितो-जें अशक्य असेल तेंच चिंतीत राहातो-मन तेथेंच गुंतवितो-जें चिंतिण्यासारखें नाहीं त्याचाच विचार करीत बसतो-ज्याची मतिबुद्धि ही करूं नये तें करते-अशक्य दुर्घट असें जें तेथेंच मन लावितो व जें चिंतिण्यासारखें नाहीं त्याचाच विचार करीत बसतो (७७३)

जेथें जाऊं नये तेथें ती मतिबुद्धि रिघण्याचें करिते-जेथें रीघ करूं नये तेथेंच शिरते-जें घेऊं नये तेंच मागते-(काहीं एकादी गोष्ट, वस्तु मागून घेऊं नये असें जें काहीं)-जेथें आगही मुळींच देऊं नये का मनही नच लावावें तेथें ती बुद्धिमति ही स्पर्शते-स्पर्शच मुळीं जें करूं नये तें ती स्पर्शण्याचें करिते. (७७४)

जाऊं नये तेथें जाते-जें कांहीं नच पाहावें असें तेंच ती पाहूं करते-जें खाऊं नये तेंच खाते-व असें करूनसुद्धां पुन्हां सतोष मानून असते-अहो, जें काहीं करूं नये तेंच करून ती सतुष्ट होणारी अशी ती मति ज्याची-असा जो. (७७५)

जो संग धरूं नये तोच ती धरते-जेथील लाग-ठावठिकाणा-मूळ ज्या मार्गास मुळींच लागूं नये तेथेंच ती लागून असते-तेथेंच ती राहाण्याचें पाहाते-राहूं लागते-जो काहीं मार्ग आचरूं नये तोच ती बुद्धि आचरिते-आचरण्यास-आचरण्यांत घेते-अशी ज्याची बुद्धि तो— (७७६)

जें कानीं पडूं नये-जें ऐकूं नये-ज्यास कान देऊं नये तेंच ती ऐकण्याचें करिते-जें बोलणें बोलूं नये, जें बोलावें असें नाहीं तेंच ती बोलते-बरळते-भुंकतेच जशी का-पण तेथें तें तसें करण्यात-आचरण्यांत-दोष असतो का दोष पदरीं येईल हें ती मुळींच पाहात नाहीं-नच पाहून असते-असणारी ती-असा तो. (७७७)

आंगास व मनास रुचावें असें तें पाहून तो असतो-आगीं लागावें-अहो, कांहीं खाल्लेलें का बोललेलें तें आंगीं लागावें असेंच असलें पाहिजे-(म्हणून आंगीं लागत नाहीं तेथें अंगच मुळीं तुटून पडतें-का तुटलें होतें असें कांहीं एक बोलणें का करणें जें)-आग हेंच निवतें-का मनासहित रुचीस येतें-एवढ्यावरच मुळीं तें त्यास कोणतें कृत्य करण्यास योग्य का अयोग्य-कृत्याकृत्य-तें त्यास आठवतच मुळीं नाहीं-व जो जें कांहीं एक कार्य करणें आहे तेथें आपलें लक्ष्य मुळींच न देता भलतेंच काहीं तरी करीन राहातो-भलत्या ठायीं भलतेंच असें-अप्रासंगिकतेचें तें त्याचें करणें होत असतें-असा जो. (७७८)

आंगच का मन तेंच मुळीं रुचीस आणिलें गेल्यानें – तेथें केलेलें जें काही तें आंगीं लागतें असें होऊन असतें, नाहीं तर तेथें एक आगच तें मुळीं नच पाहिलें गेलें जसें. तेथें मजला पाप होईल किंवा नरकाची व्यथा का नरकाचें दुःख होईल हें जो पुढें येणारें – परिणामकारक असें जें काहीं यातनाचे का दु खाचें येणें तें जो पाहात नाहीं (७७९)

अशांच्या आंगलगें म्हणजे समागम का संबंध ठेवल्यानें, अशांचा संबंध का सग का लगट केल्यानें, झाल्यानें जगामध्यें अज्ञान हें सबळ असेंच होऊन असते – तें प्रबळ असें होतें – ज्याचा, ज्या अज्ञानाचा सग केला असता तें सज्ञासही पण झोबतें – लागतें – नाचवितें – बोचतें (७८०)

पण हें आता नको – यावर आणीक काहीं अज्ञानाची चिन्हें सागतों, ज्यायोगें करून तें अज्ञान तुजला सम्यक् असें जाणवेल – सम्यक् असें तें जाणीवेस येईल – जाणलें जाईल – जाणिवेचे होईल – जाणणें असें जें जाणतेपण ज्ञानाचें समर्थन – तेथें तें तुझें मन आपला रीघ करूं शकेल (तें अज्ञान जाणील जाणतेपण – ज्ञानाचें जें – तें सम्यच् (सम्यक्) – तें खरेपणाचें – बिनचूक – अगदीं बरोबर असें – योग्य असें – चागलें असें – प्रिय व रम्य असें जें जाणणें ज्ञानाचें तें— (७८१)

तरी ज्याप्रमाणें नव्या उमललेल्या फुलाच्या ठिकाणीं भ्रमरी मक्षिका का मधुमक्षिका ही गुंतली होते तेथें ती प्रीतीची अशी होते – तिथेंच गुंगून असते – तशी ज्याची प्रीति घरीच सर्वथैव पुरून आहे असा जो

[ "असा धरि छद । जाय तुटोनिया भवबध ॥ धृ ॥
छंद लागला टिटवीला । तिनें समुद्रही (प्रासिला) शोषिला ।
मैनावतिनें कृतार्थ केला । गोपीचद ॥ १ ॥
दुधाचा सागर उपमन्यूला । अढळ पदावरि तो ध्रुव बसला ।
मार्कंडेये यम हटवीला । झाला मद ॥ २ ॥
झाले तीन देह भरताला । रावण रामरूप तो झाला ।
गोपी चढल्या गोलोकाला । यशोदानद ॥ ३ ॥
आळीस भ्रमराचा अध्यास । होता भ्रमरपण ये तीस ।
तैसा सोडुनि जीवपणास । भोगी आनद ॥ ४ ॥
छदे असाध्यही साधिती । नर ते नारायणही होती ।
दीनजन हरी आपुलासा करिती । जो सुखकंद ॥ ५ ॥ ]

**भक्तिमार्गप्रदीप**—गोविंदबुवा ]

हें येथें पुरत नाहीं पण – भ्रमरी कीटक न्याय सांगतांना हेंच पद पुढें आलें म्हणून दिलें, जेथें योग्य तेथेंच योजावें – (कारण येथें घराच्या प्रीतीचें पुरतेंपण हें नवगंध केसरीं भ्रमरी गुंतली तसें) – काय तें येथें पुरतें होत नाहीं – किंवा एका छंदावरच आरूढलें. (७८२)

साखरेच्या राशीवर बसलेली माशी ही मुळींच कांहींही केल्या उठणारी नच. ती उडून मुळींच जात नाहीं – त्याप्रमाणें स्त्रीचित्ताचा जो कांहीं एक आवेश – त्या मध्येंच ज्याचें मन हें एकसारखें लागलेलें असतें तसा जो – तेथून मुळींच हालत नाहीं – असा जो. (७८३)

तसा तो स्त्रीचित्ताच्या आवेशाचा – आवेशाच्या मनाचा जो तो कसा उपमिला आहे तें पाहावें तो, तो जसा का बेडूक एकादा हा कुंडातच ठरून आहे – माशी किंवा मशक हा शेंबुडांतच फसलेला, का ओढाळ गुरुं का ढोर जसें अगदीं बुडासहित चिखलामध्यें रुतलेलें का फसलेलें जसें. (७८४)

त्याप्रमाणें घरामधून निघणें – घराहून – घरातून बाहेर जाणें नाहीं ज्याचें – व तसा तो बाहेर निघा-लाच तर मरणच एक ओढवेल असें ज्यास वाटतें – जीव, मन व प्राण हा तेथेंच सर्वमेव जीविताचा झालेला तो घराबाहेर येणें केलें असता जीवच जसा जीवनपणास मुकला असें वाटणें ते – असा तो तर त्या बखळीरूप घरामध्यें जीवितानें असलेला – का ओसाड अशा जमिनींतील एक सापच जसा का होय – असें म्हटलें गेलें – असें म्हटलें जातें – कृश, निष्ठुर, निंद्य का क्षुद्रपणाची ती घरासच अगदी लिगटून असावें – तेथेंच चिकटून असणें ही भावना होय असें म्हटलें आहे.

( भाटी = बखळ, ओसाड जमीन )

जया घरीहूनि ( घरौनि ) निघणें नाहीं – तया जीवितें मरणें का जीवें मनें प्राणे – घरौनि निघणें नाही जया, तया भाटी तिया सर्प होउनि असणें जसें

[ जीवित्वाने – जीविताचें – जीवितास मरणच एक ओढवलें असें वाटतें – जीव, मन व प्राण हा सर्वथा घरींच ठेवलेला – सर्व जीव घरीच लागलेला – लाविलेला – तेथें बाहेर येणें – जाणें – निघणें ( ते कर्म म्हणशील तर ) नाहीं, तो जसा का एक सापच मुळीं ओसाड जमीनीतला ]　(७८५)

प्रियोत्तमाच्या कंठीं प्रमदा ही आलिंगन देऊन आहे – मिठी घालून आहे – तेथेंच ती सर्वथैव रमून आहे, आटून आहे – तेथे थबकून असते. तसें जो आपल्या जीवितास एक कोपटच करून असलेला, असा तो होय – जो ह्या जीवितास राहण्याकरिता एक कोपट करून असलेला – तेथें शरीर, गृह, देह, क्षेत्र इत्या-दीचे जें भारदस्तपण हें नच मनावर घेतलेलें पण एक क्षुद्रतेची तेवढीच ती भोगेच्छा सर्वथैव त्या प्रमदेच्या मिठीची झाली – झालेली – काय तेथें तें भोगेच्छेचे का तेवढ्याच एका ठिकाणीं रमत असलेलें तें क्षुद्र असें म्हटलें का जसें.　(७८६)

'मधु मधु' रस तेथें मन, वाचा, प्राण ह्याच सर्व जीविताचा आनंद असणारा – अशा ह्या आनंदाचा उद्देश पुढें घेऊन – हेतूचा करून मधुकर, भृंग, द्विरेफ हा जसा जपतो, टपून असतो, जाच सोसून असतो त्याप्रमाणें जो गृहाचें संगोपन ( नच गरज भागविणें – मोडतोड दुरुस्त करणें – गोपनगौप्य लपविणें – अंग-संग शुद्धि इत्यादींचें व्यवस्थित करून असणें तें ) यथासाग असें करून असतो　(७८७)

अगदीं विरळा, मोठ्याच मुष्कीलतेने प्राप्त होणारें असें मानलेलें तें रत्न, पुत्ररत्न जसें का माणिकच एक तें म्हातारपणीं झालेलें का हातीं आलेलें – प्राप्त झालेलें, त्याजबद्दल प्रेम हें मातापितराना तर अगदी जीवींच बांधलेलें असें होऊन असतें.　(७८८)

तितक्याच आस्थेनें ज्यानें घर आपल्या प्रेमाचें केलेलें, हे पार्था, व स्त्रीशिवाय तर जो दुसरें काहींही मुळीं जाणतच नाहीं असा तो.　(७८९)

तो कसा म्हणशील तर ज्याप्रमाणें महापुरुषाचें चित्त हें वस्तुगत झालें – ब्रह्मरूप झाले तेथे सर्व व्यवहार हेही पण वस्तूवरच होणारे. ब्रह्मरूप झालेल्याचे सर्व व्यवहार ब्रह्मच होऊन असतात जसे ( महापुरुष = पंचमहाभूते अहंकार व महत्तत्त्व अशीं जगताची मूळ सात तत्त्वें, वल्ली = नाग ) कर्मे महा – महाकर्मे – सर्व कर्मे – वस्तु ( गृहवस्तु – वस्तुपाठ – वस्तु – श्रेष्ठपणाचें जें ब्रह्म – परब्रह्म – पुरुषाचे – झालेलें तें त्याचें चित्त हें 'पुरुषच' पाहाणारें जसें. )　(७९०)

त्याप्रमाणें सर्व जीवभावासहित, स्त्रीभावामध्येंच – असा तो स्वत:स योजून आहे – फेकून आहे – ठेवून आहे – असा असल्यानें तो 'मी कोण आहें' व 'मी काय करावें' हें कांहींच जाणत नाहीं जसा.　(७९१)

हानी – ( हानोपाय ) – नफानुकसान – किंवा लाज येणें तें किंवा लज्जा ही जी तीस तर तो मुळींच पाहात नाहीं – दुसऱ्यांनीं केलेले निंदापवाद हे तर तो मुळींच ऐकत नाहीं – ज्याचीं इंद्रियें हीं सर्व एक मुखाचीं झालेलीं तेथें स्त्री हीच एक सर्व आराधिली गेली जशी – ह्या वृत्तीचें, मनाचें, प्राणाचें, जीविताचें जें सौंदर्य उत्तमत्व तेंच मुळीं येथें त्यानें स्त्रीस दिलें – तिचेंच तें सर्व झालें – स्त्रीच्या देहात तो मुरून गेला – स्त्रीनें – त्याचीं सर्व इंद्रियें एक मुखास आणिलीं – स्त्रियां–स्त्रियेनें तो सर्व जसा एकाच मुखाचा केला व तिचाच सर्व गौरव हाच गायिला, पाळिला, झेपला, आपलासा केला गेला – आतां तो म्हणजे एकाच मुखाचा व तें मुख तेंही पण स्त्रीच्या सर्वथैव स्वाधीनतेचें असेंच झालेलें. (७९२)

स्त्रियेचें चित्तच सर्वथैव रससोईचें करण्यास – राध, राध, एक परिपाक असा सिद्धतेचा, एक जसें भक्तीस लागणें जसें का तसें केलें – तेथें सर्व आवड ही आवडणारी झाली – व एका स्त्रीशिवाय दुसऱ्या सर्व गोष्टी तुच्छतेच्या कोटींत जाऊन बसल्या – तेथें काय पैसा काय सोय काय एक ह्या दृष्टीचें का स्वभावाचें जें रम्य जें तिला रुचणारें तेंच तो करीत राहिल्यानें सर्वथैव तिच्याच कह्याचा झाला – दुसरें तिसरें आप्तपणाचें का नात्याचें तें विरुद्ध का रुसलेलें करून त्याचा तो जो व्यवहारास लागणारा सर्व पैसा अडका का माण-साळणें तेंच मुळीं त्यानें येथेंच उपयोजिलें – व आतां स्त्रीच्या छंदानें, नादानें त्यानें चालण्याचें केल्यानें जसें का गारुडी हा जसें म्हणेल तसेंच तें माकड नाचतें, त्याप्रमाणें ह्याचें किंवा त्याचें होऊं लागतें (७९३)

स्वतःस खस्त देऊन सर्व शीणच आपलासा केला, इष्ट मित्र हेही पण दूरतेचे केले ते, त्याजपासून दूर जाऊं लागले – झालेले होतात व मग काय पैसा पैसाच एक एक कवडीही पण का होईना ती ही त्यानें संचयात टाकूं केली–करून पैशाचा लोभीच जसा असा तो आतां होऊन गेला – आहे – जातो – का. एका जो पैशाचा लोभ तोच तो मूर्तिमंत आतां होऊन आलेला असाच होतो. (७९४)

त्याचप्रमाणें दानें किंवा पुण्यें जीं तींही पण आता मागचें पाऊल घेऊ लागलीं – आतां कमी केलीं, कमी तीं झालीं – तेथें आता दृष्टि जी व्यापकपण घेऊन होती ती सर्वथैव पैशाच्या लोभाकडेसच वळल्या कारणानें तेवढ्या एका पैशांतच बसली – गणगोतांना का कुटुंबामधील ज्या अनेक व्यक्ती त्यानाही पण – त्याचेंही पण जें कांहीं एक सोईचें होणारें असें जीवनजीवित तेंही त्यानें आपल्या त्या लोभांतच बाधून टाकिलें – त्यामुळें तें गोत्रकुटुंबही पण वंचिलें गेलें – नडविलें गेलें – आकुंचित दृष्टीचें झालें – त्याच्या दृष्टीस, मनास का स्वभावास आतां रम्यता ही दिसेचना. स्त्रियेस मात्र जें जें काहीं पाहिजे तें तें पुरवूं लागला – तिचाच शब्द झेलूं लागला व तिचीच गार जी एक पोटापाण्याची तेवढीच मुळीं त्यानें आता भरण्याचें केलें – तिची मागणी जी तेथें वायदा करून तीच मुळीं कसेंही करून पुरती झालीच पाहिजे एवढीच एक त्यानें गोष्ट आपलीसी केली व जेव्हा तेव्हां तें कसें पुरतें होईल तेथें गमूं लागला, उणें पडूं देईना असें होतें (७९५)

जे देव पूजेमध्यें असलेले ते कसेबसे पाळतो, आपल्या गुरूस ह्या शब्दच्छलानें झकवूं लागतो व आईबापांना तर दरिद्रपणच एक दाखवूं लागतो. (७९६)

स्त्रियेसंबंधीं अनेक सोईच्या का भोगाच्या का पदार्थांच्या संपन्नता ह्याच त्यानें खरेदी केल्या व काहीं एकादी साधी वस्तु तीही पण त्यानें जर पाहिली तर खरेदी करून घरीं पोहोंचती केली असें होतें. (७९७)

भक्त हा कुळदेवतेच्या प्रेमानें, श्रद्धेनें, परायणतेनें, आस्तिक्यानें जसा एका प्रेमाचा असा होतो – त्या कुळदेवतेकरितांच सर्व कांहीं त्याचे व्यवहार होत असलेले जसे त्याप्रमाणें अगदीं एकाग्रचित्ताचा होऊन जो स्त्रीस मुळीं उपासण्याचें करितो. (७९८)

सांच म्हणजे खरें व चोख म्हणजे उत्तम असें जें तें स्त्रियेसच पोहोंचतें केलें – स्त्रियेचें सर्वथैव असें केलें – करितो व इतरांचा जो काहीं सांभाळ, पोसणें का पासवणें तेहीपण त्याने करण्याचें टाकिलें – सोडलें – करीत नाहींसा झाला – होतो. (७९९)

स्त्रीला कोणी पाहील – ती कोणाच्या दृष्टीस पडेल का तिच्या विरुद्ध कोणी जाईल – तिला नाराज करील जर का तर जसें युगच बुडालें असें ज्यास – असा जो (८००)

कदाचित् कांच्याचा नायटा होईल म्हणून नागाची घेतलेली आण का शपथ ही जो मोडीत नाहीं – पण स्त्रियेचे मनोगत, पूर्ण खूण, हेतु, कामना हीं मात्र सर्वथा पाळून असतो – अगदीं हृदयाशीं धरून असतो – जो मनामध्यें राहिलेली गोष्ट ती जशी का एक कांटाच रोविलेला – मन मुळीसुद्धा जो मोडीत नाहीं – मर्जीविरुद्ध काहीं करीत नाहीं – कदाचित् एकादी गोष्ट झाली तर ती वाढत जाऊन – वाढत राहून मनच मुळीं विरुद्ध होऊं पाहील कदाचित् ! स्वभाव जो ह्या जिव्हेचा तो 'दु' असा – नेहमी डावच धरणारा – व संधि येईल, मिळेल तेव्हा नागाप्रमाणेंच जसें डाव धरणें तें नको म्हणून नागाची आण न मोडणारा असा – (ह्या जिव्हेस फार साभाळून वागविणारा, मर्जीची खातरजमा जेव्हा तेव्हा करणारा) म्हणजे या जिव्हेचें चपळपणच मुळी त्यानें नच पाहिले – व जें जें काहीं मागितलेलें तिनं, ते तें सर्व काहीं पुरविण्याचें केलें व या जिव्हेस का मनास कुरकुरण्यासच मुळी वाव दिला नाहीं. जिव्हेचे लघाळपण का पघळणें हें त्यानें नच करितां ते ते स्त्रीच्या मनाचें प्रसन्नपणच साधलें सर्व काहीं पुरवून (८०१)

हे धनंजया, एवढेंच काय पण ज्यास सर्वस्वपणें स्त्रीच एक (होऊन आहे) – ज्याचें सर्वस्व म्हणजे स्त्रीच (एक) आणि तिच्याच करिता मुळीं तिला झालेलीं जी मुलेंबाळें इत्यादि त्याच्या ठायी तेवढें प्रेम ज्याचें असा जो (८०२)

**आणीकही जे समस्त । (तेथिचे) तियेचे संपत्ति जात ।**
**ते जीवाहूनि आप्त । मानी जो गा ॥ ८०३ ॥**

**तो अज्ञानासी मूळ । अज्ञाना तेणे (त्याचेनि) बळ ।**
**हे असो केवळ । तो तेंचि रूप ॥ ८०४ ॥**

**आणि मातलिये सागरी । मोकलिली तरी ।**
**लाटांच्या येरझारी । आंदोळे जेवी ॥ ८०५ ॥**

**तेवी प्रियवस्तु पावे । आणि सुखें जो उंचावे ।**
**तैसाचि अप्रियासवे । तळवटु घे ॥ ८०६ ॥**

**ऐसेनि जयाच्या चित्तीं । वैषम्य साम्याची वोखती ।**
**वाहे तो महामती । अज्ञान गा ॥ ८०७ ॥**

**आणि माझ्या ठायीं भक्ती । फळालागी जया आर्ती ।**
**धनोद्देशे विरक्ती । नटणे जेवी ॥ ८०८ ॥**

**नातरी कांताच्या मानसी । रिगोनि स्वैरिणी जैसी ।**
**राहाटे आणिकेसी । जावया लागी ॥ ८०९ ॥**

**तैसा माते कीरीटी । भजती गा पाउटी ।**
**करूनि जो दिठी । विषो सूये ॥ ८१० ॥**

**आणि भजिनलियासवे । तो विषय जरी न पावे ।**
**तरी सांडी म्हणे आघवे । टवाळ हे ॥ ८११ ॥**

**कुणबट कुळवाडी । तैसा आनेआन देव मांडी ।**
**आदिलाची परवडी । करी तया ॥ ८१२ ॥**

तया गुरुमार्गा टेके। जयाचा सुगरुवा देखे।
तरी तयाचा मंत्र सिके। येर ने घे ॥ ८१३ ॥

प्राणिजातेसी निष्ठुर। स्थावरी बहुभर।
तेवीचि नाही येकसर। निर्वाहो जया ॥ ८१४ ॥

माझी मूर्ती निफजवी। ते घराच्या कोनी बैसवी।
आपण देवोदेवी। यात्रे जाय ॥ ८१५ ॥

नित्य आराधन माझे। काजे कुळदेवता भजे।
पर्वे विशेषे कीजे। पूजा आना ॥ ८१६ ॥

माझे अधिष्ठान घरी। आणि वोवसे आनाचे करी।
पितृकार्या अवसरी। पितरांचा होये ॥ ८१७ ॥

एकादसीच्या दिवशी। जेतुला पाड आम्हासी।
तेतुलाचि नागासी। पंचमीच्या दिनी ॥ ८१८ ॥

चौथ मोटकी पाहे। आणि गणेशाचाचि होये।
चवदशी म्हणे माये। तुझाचि वो दुर्गे ॥ ८१९ ॥

नित्यनैमित्तिके कर्मे सांडी। मग बैसे नवचंडी।
आदितवारी वाढी। बहिरवा पात्री ॥ ८२० ॥

पाठी सोमवार पावे। आणि बेलेसी लिंगा धांवे।
ऐसा एकलाचि आघवे। जोगावी जो ॥ ८२१ ॥

ऐसे अखंड भजन करी। उगा नसे क्षणभरी।
आघवेसी गावेदारी। अहेव जैसी ॥ ८२२ ॥

तैसेनि जो गा भक्तु। सैरा देखसी धावतु।
जाण अज्ञानाचा मूर्तु। अवतारु तो ॥ ८२३ ॥

आणि एकांते चोखटे। तपोवने तीर्थे तटे।
देखोनि जो विटे। तोहि तोचि ॥ ८२४ ॥

जया जनपदीं सुख। गजबजेचे कौतुक।
वानु आवडे लौकिक। तोही तोची ॥ ८२५ ॥

आणि आत्मा गोचरु होये। ऐसी जे विद्या आहे।
ते ऐकोनि डौर वाहे। विद्वांसु जो ॥ ८२६ ॥

उपनिषदाकडे न वचे। योग शास्त्र न रुचे।
अध्यात्मज्ञानी जयाचे। मनचि नाही ॥ ८२७ ॥

आत्मचर्चा येकी आथी। ऐसिये बुद्धिची भिंती।
पाडुनि जयाची मती। वोढाळ जाली ॥ ८२८ ॥

कर्मकांड तरी जाणे। मुखोद्गत पुराणे।
ज्योतिषीं तो म्हणे। तैसेचि होये ॥ ८२९ ॥

**शिल्पीं अति निपुण । सूपकर्मीही प्रवीण ।**
**विधि अथर्वण । हाती आथी ॥ ८३० ॥**

**कोकीं नाही ठेले । भारत कीर म्हणितले ।**
**आगम आफाविले । मूर्त होती ॥ ८३१ ॥**

**नीतिजात बुझे । वैद्यक सुझे ।**
**काव्य नाटकी दुजे । चतुर नाही ॥ ८३२ ॥**

तेथिचे – तियेचे मानी जे गा – मानी जो गा (८०३). तेणे – त्याचेनि (८०४). मातलिया – मातलिये मोकलिलेया – मोकलिया – मोकलिल्या – मोकलि = मोकळी (या = जर) तरी = नौका आंदोळे = हेलकावे खाते (८०५) तळवटु घे – तळवट ये (८०६) जयाच्या = जयाचें वैषम्य साम्याची वोखती – वैषम्याची वोळखती – वाखती = वैषम्याची ओळखती खुण (८०७). काताच्या – नातरी काताच्या नटली – स्वैरिणी आणिकेसी – जारेसी (८०९) तैमा – तैसी. पाउटी = पद्धत, पायरी, मार्ग. सुये – सूये (८१०). भजितलिया – भजनलिया. तो विषो – तोचि विषय पवे – पावे. टवाळ = सब झूट (८११) आने आन – आन आन परवडी = सारे प्रकार. आदिलाची = पहिल्या असलेल्या देवान्नी (८१२) मुगुरुवा – मुगरुवा – गरुवा – सुगरवा = डामडौल करणाऱ्या गुरूचा शिष्य होतो (८१३) निष्ठुठ – निष्ठर स्थावरी = प्रतिमेवर येकसरु – एकसर = एकनिष्ठपणा निर्वाहो – निर्वाह (८१४). घराच्या – घराचे जाये – जाय (८१५) नीच = नित्य काजे – काजी = कार्यापुरतें. पर्वविशेष – पर्वविशेषे (८१६) वोवसे – वौसे = व्रतें, नवस. पितृकार्यावसरी – पितृकार्या अवसरी होये – होय (८१७). आमसी – आम्हासी (८१८). चौथि – चौथ. चवदशी – चावदसी तुझा – तुझाम्चि (८१९) [ नित्य-नैमित्ये – नित्यनैमित्तिके साडि – ] नवमीते माडी. आदितवारी – आदित्यवारी. वाढि – वाढी. पात्रि – पात्री (८२०) पाठि – पाठी जोगावि – जोगावी = सेवी (८२१) ऐसे – ऐसा नसे – नोहे. आघवेनि – अवघे न गावेदारि – गावद्वारी आहेव – अहेव = वेश्या (८२२) तैसेनि – ऐसेनि जो – जो गा सैरा देखसी – देखसी मैरा धावतु – धावत जाणे – जाय मूर्तु – मूर्त. अवतारु – अवतार (८२३) येकाते – एकाते जो – जो गा (८२४) ऐकोनि – आईकोनि डौर वाहे – वाये = बडबड करतो (डौर हें गवळयाचे वाद्य आहे). विद्वामु – विद्वास (८२६) येकी आथि – एकी आथी बुद्धिची – बुद्धीची. जाली – जाहाली (८२८) होये – होय (८२९) सिल्पी – शिल्पी. प्रविण – प्रवीण विधि – विद्धि अथर्वण – आथर्वण हाती – हातीचे (८३०) कोकीं = कामशास्त्रात कीर – करी. आफाविले – आपविले, प्राप्त केले (आपादिलें – आपाविले – आपादणें – फावे) (८३१) नीतिजाति – नीतिजात बुझे – सुझे = जाणतो. वेद्यक – वैद्यकही सुझे – बुझे (८३२)

आणीक तेथीलचें तियेचे जे काहीं सपन्नपण का सपत्तिजात ते सर्व जो आपल्या जीवापेक्षाही जास्त प्रिय असें अहो ! जो मानून असतो – मानतो (८०३)

मूळच मुळी तो ह्या अज्ञानास असा जाण अज्ञान अज्ञान जे त्यास तर त्याचेमुळेंच बळ येणार – अज्ञान हें त्याजमुळेंच बलवान होणारें जाण – बरें हें असो, पण असे जाण की तो तर केवळ अज्ञानरूप होय – तो तर तेच अज्ञानाचें रूप होऊन असलेलें – अज्ञान हें त्याजमुळें रूपाचे झालें असें जाण. (८०४)

सागर हा गर्जू लागला – मातलेलें इंद्रिय जसें सागरासारख्या अवाढव्यतेचें ते प्रमत्त होऊन असलेलें तेथें मोकळी एकादी नाव, नौका जशी हत्तीच्या अगासारख्या लाटाच्या अवाढव्यतेमुळें आदोळत असणारी – हिंदोळे घेऊन असणारी दिमत असते त्याप्रमाणें (८०५)

त्याप्रमाणें (एकादी) प्रिय म्हणजे आवडती वस्तु मिळाल्यामुळें सुख होऊन आकाशाइतकें उंच होणें जें त्या आवडीमुळें, आवडतेपणामुळें, तमाचही तो अप्रिय म्हणजे नच आवडणारें भेटलें का लिगटलें तर अगदीं पायातळीच येतो, जो तळवटच घेऊन असतो असा जो कां (८०६)

अशामुळें ज्याच्या चित्ताच्या ठिकाणीं विषमता, वैषम्यवार्ता हीच मुळीं ओळखती खूण तेथे सर्व विषम हें एक साम्यतेस झालें जसें – अनेकत्व एकत्वास आलें (गगनचि झाले मेघ, फुलेंचि झालीं भ्रमर, जसे) तसें येथें चित्त हेंच मुळीं सर्व (वैषम्य) विषमता ही झाले – तेथे सर्व कांहीं वैषम्याचें असें – तेथें तें सर्व जग विषम असेंच होणारें, असा जो, हे महामती अर्जुना, तो अज्ञान जाण.

स्वतःच्या कल्याणाची जी एक गोष्ट करणें – जें काहीं एक काम करणें तेथें घरांतून बाहेर जाऊन जरा मोकळी हवा ह्या मनास दिल्यानें त्या वैषम्याच्या ज्या ह्या चित्तावर झालेल्या अनेक वार्ता – प्रसंग – त्यांनीं मुळीं चित्त किंवा मन हें व्यापल्यामुळें तो उत्तम प्रसंग – तें स्वत चें कल्याणच मुळीं ह्या वैषम्यवार्तानी आडविले – म्हणून असा जो आपल्या चित्तास वैषम्याचें सर्वथैव करितो तो अज्ञान जाण म्हणून असें कर कीं,

"म्हणौनि आश्रयचि न करावा । मनेही आठव न धरावा ।
एक निजवृत्तीचा ओलावा । नासो नेदी ॥" २१८ (३) (८०७)

आणि ज्याप्रमाणे द्रव्याच्या इच्छेने विरक्तीनें नटावें – सोग घ्यावें – धनाच्या लालचीनें विरक्ती ही इतकी उत्तम नटली कीं ती म्हणजे मूर्तिमंत अगदी विरक्ताची मूर्तिच एक जशी – तसल्या सोगसपादणीची – का सोगाची – तेथे प्रत्यक्ष योग जो तोही पण लाजविला तिनें अशा फमवेगिरीनें जसें का – तेथे माझ्या ठिकाणीं भक्ति आहे, तेथें इच्छा ही तापत्रय नाहीसें करण्यास (ह्या भक्तीनेंच) जशी का नटली, सोगच तिनें भक्तीचें घेतलें जसें. (८०८)

अथवा असेंही म्हणूं कीं प्रिया, कात जो त्याच्या अगदी आतल्या मनात शिरून – त्याची सर्वतोपरी मनधरणी करून जशी का (नटली) स्वैरिणी ही जाराबरोबर का आणीक दुसऱ्या एकायाबरोबर जाण्यास, रममाण होण्यास नटून आहे – तेथे प्रियाचें मन हेंच मुळी तिनें (रम्य केलें) राहाटविलें, रमविले जसें का. (८०९)

त्याप्रमाणें मला भजण्याची रीति ही पद्धतीची, मार्गाची कर, एका पायरीची करून जो ह्या दृष्टीने विषयच एक सर्व विकूं करतो – वीतो (८१०)

आणि भजल्याबरोबर, भजिन्नल्यावर जर का तो विषय (का द्रव्य) त्यास न भेटेल का मिळेल तर तो ते नटणे, ती विरक्ति इत्यादि सर्व काही सब झूट आहे, ते सोडून द्यावें अशा शब्दांनींच त्याची सांगता (शेवट) करणारा होतो

[ टवाळ।टवाळी =

पदपदार्थ सपन्नता । व्यर्थ टवाळी का सागता ।
हरिनामी नित्य अनुसरता । हें सार सर्वांथी ॥ ज्ञा.गा ९४

वेदाच्या अगर शास्त्राच्या पदपदाचा अर्थ कळावा अशी खटपट कां करतां? अहो, हरिनाम हें सर्वार्थाचें सार समजून, त्याचा नित्य जप करा वैदिक धर्माच्या सर्व ग्रथांतून हरिनामाचें महत्त्व गायिल्यामुळें त्याबद्दलचा विचार न करिता ज्यानी हरिनामजप केला, ते कृतार्थ होऊन त्याचा जन्ममरणरूप ससार कायमचा मिटला रे बाबानो! ज्यांनी नामजप केला, तो व त्याचें सर्व कुळही उद्धरून जाते त्याला यमाची भीतीच राहात नाहीं, तसेंच त्याला काळाचाही विधिनिषेध नाहीं हरि नेहमीच अविकळ म्हणजे अव्यंग

आहे म्हणून त्याचें स्मरण करणारा, योग्यांना देखील धन्य वाटतो. "स्मरे तो योगिया धन्य केवळ। त्याचेनि दर्शनें सर्व काळ, सुफळ संसार होतसें" त्याच्या केवळ दर्शनानें संसार सुफळ वाटतो. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात – आम्ही हरिनामाचा जप केला व अंतर्मुख होऊन हरीचें ध्यान केलें त्यामुळें आमच्या बाह्य क्रिया मंदावल्या व आम्ही हरिरूपच बनलों. "मन मुरडुनि हरी ध्यायिला। तेणें सर्वांगीं निवाला। हरि झाला निजांगें ॥"] (८११)

कुणबी का कुळवाडी करणारा शेतकरी हा जसा निरनिराळ्या जमिनी मशागतीकरितां घेऊन तेथें मशागत करणारा, त्याप्रमाणें नवेनवे देव घेऊन त्यांना देव्हाऱ्यांत ठेवतो, त्यांची पूजा करितो व त्याजवळ असलेल्या पहिल्या देवाप्रमाणेंच त्या नव्या नव्या देवांची ती सेवारीति का सेवाप्रकार करीत राहातो जो. (८१२)

त्याच गुरुमार्गावर टेकतो – त्या डामडौल करणाऱ्या गुरूचा शिष्य होतो व दुसरें तिसरें काहींहीं न घेतां त्याचाच कानमंत्र घेऊन असतो – (सुगरुवा – जसा का – सुगरीणपणाचा थाटमाट). (८१३)

प्राणिजाता (बरोबर) वर निष्ठुर होतो – (प्रतिमापूजेवर) प्रतिमेवर सर्व भर देऊन असतो. त्याचप्रमाणें (त्याचें पोटही पण) एकनिष्ठ नसल्यामुळें (नच भरणारें जरी तरी – तो) अनेकाचा होऊन निर्वाह संपादन करितो – त्याचें त्या एकाच्याच भक्तीनें निर्वाहच मुळी होत नाहीं म्हणून तो एकनिष्ठ नच होतां – राहाता – अनेकांच्या नादी लागून असतो (८१४)

माझी मूर्ति घडतो, निफजवितो – ती आपल्या घराच्या कोनशिलेच्या जागीं बसवितो व आपण तर देवाच्या का देवीच्या यात्रा करीत फिरतो (८१५)

जो नित्य माझी पूजा, आराधन करतो. कार्यापुरतें म्हणजे मंगल कार्य असलें म्हणजे मात्र कुलदेवतेस भजतो. विशेष असें एकादें पर्व (का पर्वणी आली) असलें म्हणजे आणीक एकाद्या तिसऱ्याच किंवा नव्याच देवाची पूजा अर्चा करूं लागतो (८१६)

घरी माझें अधिष्ठान, स्थापना असलेली जरी तरी व्रते उपवास हे दुसऱ्याच एका देवाकरितां करतो व पितराच्या दर्शप्रसंगी पितराचा होतो जो (८१७)

एकादशीच्या दिवशीं (जितका काहीं पाड, महत्त्व) सर्व महत्त्व देऊन तेथेंच तो आम्हास जितक्या प्रेमानें आळवितो – तितक्याच प्रेमानें पण (नाग) पंचमीच्या दिवशीं नागासही जातो – विनवितो – भजतो. (८१८)

लहान किंवा व्यापक अशी ती गणेशचतुर्थी आली म्हणजे श्रीगणेशाचा होतो व चतुर्दशी आली म्हणजे चवदशीस 'हे माये, हे दुर्गे, तुझाचि मी' असें म्हणूं करतो (८१९)

नवचंडीच्या दिवशीं चंडीच्या अनुष्ठानास बसतो व रविवार आला म्हणजे बहिरोबास का भैरवास (खिचडी – खिचडा) पात्र वाढतो. (८२०)

नंतर सोमवारीं बेल हातीं घेऊन लिंगपूजेस बसतो अशा तऱ्हेनें एकला जो सर्व देवताना पोसतो का साभाळतोच जसा का (८२१)

अशा तऱ्हेनें जो अखंड भजनामध्येंच असतो, एक क्षणभर सुद्धा जो उगा नसतो, स्वस्थ राहात नाहीं. वेश्या जशी सर्वांशींही मर्जी राखून वागते, राहाते. (८२२)

त्याप्रमाणें जो भक्त सैराट धांवणारा असा तो तर अज्ञानाचा पूर्ण अवतारच जाण. (८२३)

आणि जो उत्तम अशा एकांताच्या जागा का तपोवनें, तीर्थें किंवा निश्चयाचीं ठिकाणें पाहून विटतो तोही पण तोच जाण. (८२४)

ज्याम ( जनपद ) देशींच सुख वाटतें, मनुष्यसमुदायांत असणें आवडतें, जो ( जानपद ) देशांत राहाणारा असा, देशच नेहमीं आवडतो असा जो – व नेहमीं गजबजलेलें – गडबडीनें – असावें – जसा का बाजारच एक भरलेला अशा कौतुकाचें होणें ज्यास आवडते, ज्यास लौकिकाची चाड वानावी, स्तवावी आवडते– लोकात रूढ असलेल्या लौकिक देशवार्ता म्हणजे लौकिकाच्या गोष्टी, प्रापंचिकाच्या गोष्टी, सामान्य असलेला असा व्यवहार वानणें, आवडतें तोही तोच जाणावा त्याचा दृष्टिकोन, दृष्टिदेश, दृष्टिटप्पा हा समृद्धतेचा नसून आकुंचित असाच – तेथें दिव्य सहज वागावें असे त्याचे दृष्टिकोन हे आकुंचिततेचे म्हणजे नुसतें ते लौकिकाचें एक वानणेंच – येथें प्रापंचिकाच्या गोष्टी करणें तें महत्त्वाचें नव्हे पण तेथें ती जी परम दिव्यानें रंगणारी जी देवता ती कशी व्यापक दृष्टीच्या कौतुकाची तें पाहाणें तेच दिव्य होय. (८२५)

आत्मा ( जीवात्मा, परमात्मा, महत्तत्त्व का स्वभाव किंवा धर्म ) काय ! अहो, आटोक्यांतच आहे, दृश्य आहे, माहीत आहे, काय तो अगदीं सुलभ असा आहे, तो अगदी सहजपणें ताब्यात येणारा असा आहे – रूपादि पंचविषयात तो जवळच सापडणारा आहे असें जें नुसतेच एक बोलण्याचें कौतुक पाहाणारा – आत्मविद्या जी तिजमुळें आत्मा हा प्रकाशणारा होतो त्या विद्येचे गोडवे गाणारा – जसें का गाई, म्हशी बाळगणाऱ्या गवळयाचें जें वाद्य तसें जो नेहमी बडबड करितो – विद्वत्ता नेहमी बडबडीने प्रदर्शनाची करितो असा जो – तेथे बडबडण्यानें जसें का मित्रत्वच काढून टाकलेलें होणे, होणारें असा जो विद्वान् – सभ्य – चतुर – नागर – सुंदर का ( कारस्थानी ! )—

( पण जो त्या अध्यात्माबद्दलचे का ज्या ब्रह्मप्रतिष्ठेवर हा देह उभा असलेला तेथीलच्या देहाचें, का मनाचें, का ब्रह्माचें, का व्यक्तीचें जो जाणत नाहीं तो मूळ नक्षत्रीं जन्मलेल्या मुलाप्रमाणें पाहातच नाहीं – तेथें देहदिवसाची गोष्टच तो जाणत नाहीं असा होय ) (८२६)

उपनिषदाकडे त्याची दृष्टि जात नाहीं ( रहस्यतत्त्व, एकान्त, धर्मविधि, मंत्र का ध्यानाकडे जो मुळींच पाहात नाहीं ) – योगशास्त्र रुचत नाहीं ( योग म्हणजे जोडणें, मिलाफ, सान्निध्य, कामी लावणे, उपयोगाचें करणें का वापरणे, पद्धत, रीत, क्रम, चित्तवृत्तीचा निरोध करणें का ईश्वरप्राप्तीचा उपाय, उपासना एकाग्रता, कार्यकुशलता सामर्थ्य, अनुष्ठान आचरणे का योग्यता सपादणें हें ज्यास समत नाहीं )– ज्याचें मन अध्यात्मज्ञानाकडे वळत नाहीं – लागत नाहीं – ( अध्यात्म म्हणजे अक्षर ब्रह्माचा प्रत्येक देहामधील अंश जो जीवस्वभाव – असा तो जो जीव किंवा स्वभाव त्याकडे ज्याचें मनच मुळी लागत नाहीं असा जो ) (८२७)

आत्मज्ञानचर्चा करणे हे एक ज्ञान आहे अशा तऱ्हेची जी आपल्या बुद्धीची, विवेकाची, शुद्धीवर असण्याची का जाणिवेची भित म्हणजे तट, आधार, आश्रय, श्रद्धा ती त्यानें पार उलथून पाडून टाकली त्यामुळें ज्याची मति, मनोवृत्ति ही अति ओढाळ म्हणजे न आवरणारी अशी झाली आहे (८२८)

तो कर्मकांड जाणतो – त्याचीं पुराणें मुखोद्‌गत आहेत – ज्योतिषशास्त्रात तर हातखंडा आहे. (८२९)

शिल्पशास्त्रामध्यें अतिशय निपुण आहे, पाकशास्त्रात प्राविण्य मिळवून आहे, कुलोपाध्यायाचें विधि-विधान अगदीं हातचे असे आहेत (८३०)

कोकशास्त्रापेक्षाही जास्त माहिती आहे – भारत ( तसेंच ग्रंथरचना का भाषण ) हे तर अगदीं सहजचें असें ज्याचें आहे – आगम ( तंत्रशास्त्र, शब्दप्रामाण्य, पूजाप्रकार, स्त्रीगमन इत्यादि ) हें तर सहज स्वीकारानें मूर्त होणारें असें सहजच (८३१)

नीतिजात ( न्याय्य वर्तन, सदाचार शास्त्र, शिष्टाचार ) सर्व माहीत आहे – समजतें – वैद्यशास्त्रांतही ज्याची गति आहे. काव्यप्रबंध, नाट्यकला ह्यामध्येंही अगदी सरशी होणारी ज्याची असा जो. (८३२)

स्मृतीची चर्चा । दंश जाणे गारुडिचा ।
निघंट प्रज्ञेचा । पाइकी करी ॥ ८३३ ॥

पै व्याकरणी चोखडा । तर्की अति गाढा ।
परी एक अध्यात्मज्ञानी फुडा । जात्यंधु जो ॥ ८३४ ॥

ते येक वांचुनि आघवा शास्त्रीं । सिद्धांत निर्माणधात्री ।
परी जळो ते मूळनक्षत्रीं । न पाहे गा ॥ ८३५ ॥

मोराच्या आंगीं असोसे । पिसे आहाती डोळसे ।
( परी ) पै येकली दिठी नसे । तैसें ते गा ॥ ८३६ ॥

जरी परमाणु येव्हडे । संजीवनी मूळ जोडे ।
तरी बहु काये गाडे । भरणे येरे ॥ ८३७ ॥

आयुष्येविण लक्षणे । कीं सिसेविण अलंकारणे ।
बोहरेविण वाधांवणे । विटंबु गा ॥ ८३८ ॥

तैसे शास्त्रजात जाणे । अवघेचि अप्रमाणे ।
पार्था, अध्यात्मज्ञानेवीण । येकलेनी ॥ ८३९ ॥

यालागी अर्जुना पाही । अध्यात्मज्ञानाच्या ठायीं ।
जया 'नित्यबोध' नाही । शास्त्रमूढां ॥ ८४० ॥

तया शरीर जे जाले । ते अज्ञानाचे बीज विरूढले ।
तयाचे व्युत्पन्नत्व गेले । अज्ञानवेली ॥ ८४१ ॥

तो जे जे बोले । ते अज्ञानचि फुलले ।
तयाचे पुण्य जे फळले । ते अज्ञानचि गा ॥ ८४२ ॥

आणि अध्यात्मज्ञान काही । जेणे मानिलेचि नाही ।
तो ज्ञानार्थु न देखे । हे काई बोलावे असे ? ॥ ८४३ ॥

ऐलीची थडी न पवता । पळे जो माघौता ।
तया पैलद्वीपाची वार्ता । कायि होये ? ॥ ८४४ ॥

का दारवंटाचि जयाचे । सिस रोंविले खांचे ।
तो केंवि परी वरीचें । ठेविलें देखे ॥ ८४५ ॥

तेंवी अध्यात्मज्ञान जाया । अनोळख धनंजया ।
तया ज्ञानार्थु देखावया । विषो कायी ॥ ८४६ ॥

म्हणोनि आतां विशेषे । तो ज्ञानाचे तत्व न देखे ।
हें सांगावे आंखे-लेखें । न लगे तुज ॥ ८४७ ॥

जेव्हां सगर्भे वाढलें । तेव्हांचि पोटीचें थालें ।
तैसें मागिलेनि पदें बोलिलें । तेंचि होये ॥ ८४८ ॥

वांचूनिया वेगळें। रूप करणें हें न मिळे।
घेईं आवंतिले आंधळे। तें दुर्जेनसी ये ॥ ८४९ ॥

एवं इये उपरती। ज्ञानचिन्हें गा मागुती।
अमानित्वादि प्रभृति। वाखाणिली ॥ ८५० ॥

जें ज्ञानपदें अठरा। केलिया येरी मोहरा।
अज्ञान या आकारा। सहजें येती ॥ ८५१ ॥

मागां श्लोकाचेनि अर्धार्धें। ऐसे सांगितले श्रीमुकुंदे।
ना उफराटी इये ज्ञानपदें। तेचि अज्ञान ॥ ८५२ ॥

म्हणौनि इये वाहाणी। केली मिया उपलवणी।
वांचुनी दुधा मेळवुनि पाणी। फार कीजे? ॥ ८५३ ॥

तैसे जी न वडवडी। पदाची कोर न संडी।
परी मूळध्वनीचि वाढी। निमित्त जाली ॥ ८५४ ॥

तंव श्रोते म्हणती राहे। के परिहारा ठाव आहे।
बिहिसी का वाये। कवीपोखका ॥ ८५५ ॥

तूते श्रीमुरारी। म्हणितले हे प्रगट करी।
जे अभिप्राय गव्हरी। झांकिले आम्ही ॥ ८५६ ॥

ते देवाचे मनोगत। दावीत आहासी तू मूर्त।
हेही म्हणता चित्त। दाटेल तुझे ॥ ८५७ ॥

म्हणौनि असो हे न बोलो। परी साविया गा तोषलो।
जे ज्ञान तरीये मेळविलो। श्रवणसुखाचिये ॥ ८५८ ॥

आता इयावरी। जे तो श्रीहरी।
बोलिला ते करी। कथन वेगां ॥ ८५९ ॥

या संतवाक्यासरिसे। म्हणितले श्रीनिवृत्तिदासे।
जी अवधारा तरी ऐसे। बोलिले देवो ॥ ८६० ॥

म्हणती तुवा पाण्डवा। हा चिन्हसमुच्चयवो आघवा।
आईकिला तो जाणावा। अज्ञान भाग ॥ ८६१ ॥

इया अज्ञान विभागा। पाठीं देऊनि पैं गा।
ज्ञानविषीं चांगा। दृढ होईं ॥ ८६२ ॥

मग निर्वाळलेया ज्ञानें। ज्ञेय भेदले मनें।
ते जाणावया अर्जुनें। आस केली ॥ ८६३ ॥

तंव सर्वज्ञांचा रावो। म्हणे जाणोनि तयाचा भावो।
परियेसी ज्ञेयाचा अभिप्रावो। सांगो आता ॥ ८६४ ॥

स्मृति = धर्मशास्त्र, कायद्याचा ग्रंथ चर्चा = वादविवाद (चर्या = धर्माचरण) दंश = मर्म, वर्म, हृद्गत निघंट = शब्दकोश प्रज्ञा = बुद्धि, ज्ञानशक्ति, विचारशक्ति पाइकी = सेवा (प्रज्ञाचक्षु म्हणजे आंधळा = प्राज्ञ अभिमानी जो त्याच्या डोळयास, दृष्टीस पडणारें ज्ञान नाहीं म्हणून आंधळा किंवा हपापलेला असा जो – तो देहबुद्धि पुढें घेऊन चालणारा अगा – त्याच्या दृष्टीचा विषय – किंवा दृष्टीचा टप्पा हा कांहींच न पाहणारा असें ते कारण देहाच्या अभिमान्याचे ते स्थूलदृष्टीस नच दिसणारें) (८३३). व्याकरण = शब्दशास्त्र, पृथक्करण, कौशल्य. तर्क = न्यायशास्त्र गाढा = निष्णात. अध्यात्मज्ञान = परमार्थासंबंधीं ज्ञान, जीवस्वभावज्ञान आत्मज्ञान – (आत्मविद्या) = वेदांतविद्या. फुडा = खरा (८३४). सिद्धांत निर्माणधात्री – सिद्धात निर्वाणसूत्री = प्रमाण पाहे – न पाहे मूळनक्षत्रीं पाहे गा = मूळनक्षत्रीं जन्मलेल्या मुलाप्रमाणें (८३५) मोराच्या – मोरा अमोसे – अशेषे आहाती – असती. पै – परी. दिठी – दृष्टि (८३६). परिमाणु–परमाणु संजिवनी – संजीवनी (मूळ) = अमृतसंजीवनीची मुळी. काये–काय (८३७) आयुष्येविण – आयुष्याविण सिसेविण = मस्तकाशिवाय बोहरेविण = वधूवराशिवाय वाधावणे = वाजंत्र्याचा डंका विटंबु = विडंबना (पीडा, भोग) (८३८) शास्त्रजात = सर्व धर्मग्रंथ (धर्म, आज्ञा, नियम, उपदेश) जाणे – जाण अवघेंचि – अघवेंचि. अप्रमाणे – अप्रमाण = अविश्वसनीय, आधार, पुरावा इत्यादींनें रहित (अप्रमा = चुकीचें ज्ञान) (८३९) बीज – बी (८४१) फळलें – जें फळलें (८४२). ज्ञानार्थु – ज्ञानार्थ हे काइ – काइ हें (८४३) अैलीची – ऐलीची पैलद्वीपाची – पैलद्वीपीची [द्वीप = बेट, आश्रय, व्याघ्रचर्म (द्वीपिन् = वाघ, चित्ता), द्वीपे सात–जंबु, प्लक्ष, शाल्मली, कुश, क्रौंच, शाक, पुष्कर] (८४४) सिस = शिर रोविले खाचे = (कापून) खाचेंत पुरले वरीचें ठेविलें देखे = तो घरातलें काय पाहील? (८४५) कायी – काइ (८४६) सागावे – हें सागावें आखे-लेखें = आंकडे माडून (८४७) सगर्भे वाढले = गरोदर स्त्रीला जेवण अन्न वाढले मागिलेनि – मागिले हेचि – तेचि. होये – होय (८४८) (घेईं) – जेवी आवंतिले = जेवायला बोलाविलेले दुजेनसि – दुजेनसी (८४९) ये – इये मागुती – गा मागुती. इये उपरती – ये उपरति (याच्या उलट रीतीने) (८५०) (एकि – येयी – येई) – येरी – (येअी) – येरी मोहरा = उलट पक्षी अर्धार्धे – अर्धोर्धे ये – इये (८५२) इये वाहाणी = या प्रकाराने मिया – म्या उपलवाण – उपलवणी = विस्तार फार कीजे - फार कीजे काइ (८५३). कोर – काठ – कडा सडी = साडी, टाकणें, सोडणे मूळ ध्वनिचिये – परि मूळध्वनिचिये जालो – जाली – जाहलो (८५४) परिहारा = निरसन, दूरीकरण कविपोखका – कविपोषका (८५५) प्रगट – हे प्रगट गव्हरी = गुप्तस्थळीं, आमचे हृदयात (गव्हार = अडाणी, गावढळ गव्हर = हृद्गत, अभिप्राय) आम्हि – आम्ही (८५६). मूर्त – तू मूर्त. दाटेल – दाटैल = गंहिवरेल (८५७) साविया = सर्वथा. जे ज्ञानतसिये मेळविलो श्रवणसुखाचिये = जे श्रवणसुखाच्या ज्ञाननौकेंत बसविलो गेलो, मिळविलों गेलों (८५८). या – इया वेगा – वेगी (८५९) सतवाक्यासरिसे – संतवाक्यसरिसे देवो – देवे (८६०) समुच्चयो – समुच्चय = समुदाय, समूह समुच्चय = साहित्यशास्त्रात अलंकार विशेष, व्याकरणात परस्परनिरपेक्ष शब्दाचा समूह आईकिला – आयकिला – आयिकिला भाग – भागु (८६१) या अज्ञान विभागा – इया अज्ञान भागा = ह्या अज्ञान भागास, पोटविभागास पाठी देऊनि = सोडून देऊन, मागें टाकून. विषी – विसी दृढ होई – दृढा होइजे ज्ञानविषीं चागा दृढ होईं = ज्ञानाविषयीं चागला निश्चयी हो (८६२) निर्वाळलेया – निर्वाळलेनि (= सिद्ध) मेदले (गमे) – मेटेल – मेदल (मनें) (८६३) परियेसि – परिसे. ज्ञेयाचा अभिप्रावो = जाणण्यास योग्य जी परमात्मवस्तु तिचें प्रियपण का प्रियापण (तें सागतो) (८६४).

धर्मशास्त्राविषयीं वादविवाद करणारा आहे – गारुडी विद्येमधील मर्म किंवा दंश जाणतो. शब्दकोश हे तर त्याच्या ज्ञानशक्तीचें का विचारशक्तीचे सेवकपण करणारे – त्याच्यापुढें हात जोडून असणारे. (८३३)

तसेंच व्याकरण म्हणजे शब्दशास्त्र, पृथक्करण कौशल्य यांमध्यें तर अगदी हातखंडा आहे – न्यायशास्त्रामध्यें अति निष्णात आहे पण एका अध्यात्मज्ञानासंबंधीं कांहींच जाणत नसल्यानें तो तर केवळ जात्यंधच असा जाण (अध्यात्मज्ञान म्हणजे अक्षरब्रह्म अंश जो जीव त्याचा स्वभाव जो त्याबाबत – सर्व उपाधींच्या पोटीं असून ज्याची सहज निर्विकार नित्य स्थिति अभंग असते तें अध्यात्म होय ) (८३४)

त्या एका अध्यात्मज्ञानाशिवाय तो म्हणजे जसा का प्रमाणभूत केलेले सर्व सिद्धांतच (त्याजमध्यें वागत असलेले), सिद्धांताचा कर्ता का दाईच एक जसा का तरी पण जें मूळनक्षत्रीं जन्मलेलें तें पाहाणें पाहातच नाहीं – त्यास दिसतच नसतें – तेथें दिवसच नसतो जसा – आरंभ, मूळ का आदिकारण तें पाहातच नाहीं – तें तें जीवस्वभावाचें नित्यत्व पाहातच नाही – आदिभव जो ब्रह्मा का आदिशरीर जें लिंगदेह का अज्ञान तेथीलचा दिवस न पाहणारे पण दुसरीकडीलच तो देह लिंगदेह स्वतः आडविलेला – तेथीलचें आयुष्यच वेढलेलें जसें (८३५)

मोराच्या अंगी असोसे म्हणजे निःशेष सर्व जागी डोळे असणारी पिसें आहेत पण एक ती दृष्टि तेथें नाहीं तसें तें होय (काय उपयोगाचें). (८३६)

अगदी सूक्ष्म अंशाइतके जरी अमृतसंजीवनी बुटीचें मूळ सापडले – जोडले तर इतर वनस्पती त्या गाड्याच्या गाड्या भरणें ते कशास (८३७)

आयुष्याशिवाय (देह आहे पण त्यात जीवचैतन्य हें बिनआयुष्याचे) असणारी जी लक्षणें, चिन्हें – तेथें जीवस्वभावाचें लक्षणच नाही मस्तकाशिवाय असलेलें तेथें अलंकार करणें, तेथे (बुद्धीच नाहीं) डोकेंच मुळी नाहीं. अहो ! वधूवराशिवायच मुळी ते लग्न वाजविणें का वाजंत्र्याचा डंका जसें असें हें तर सर्व विडंबनच होय, सोंगच होय, पीडाच होय. (८३८)

त्याप्रमाणे हे अर्जुना, एका ह्या अध्यात्मज्ञानाशिवाय असा जो तो बाकीची सर्व शास्त्रें जरी जाणत असला तरी ते त्याचें जाणणें हें अप्रमाणाचेंच जाण – अहो ! तेथें प्रमाणच नाहीं – प्रामाण्यक्रम नाहीं (जीवस्वभाव ज्ञान नाहीं) – तेथे सर्व काही अविश्वसनीय असेंच म्हटलें जाते – तेथें आधार, पुरावा इत्यादींनीं रहित असें ते पुष्कळ जरी ज्ञान जाणणें असले तरी ते अप्रमाणाचे म्हटले जाते – अविश्वसनीय म्हटले जाते – ते 'अप्रमा' म्हणजे चुकीचें ज्ञान आहे असें म्हटलें जाते (८३९)

या कारणास्तव हे अर्जुना, अशा ह्या जीवस्वभावाचे जे ज्ञान, त्या ज्ञानाचे ठिकाणीं ज्यास नित्य जागणें नाहीं – नित्य असणें नाहीं असा जो तो एक शास्त्रमूढ जाणावा – त्याचे शरीर म्हणजे अज्ञानाचें बीजच पेरलेलें – तेथे त्याचें व्युत्पन्नत्व का व्युत्पत्तिज्ञान हें अज्ञान वेलीसच फोफावणारें असें असतें – असें झालेलें होतें. (८४०–८४१)

तो जें जें काहीं बोलेल, का बोलतो तें अज्ञानच उमललेलें – तेथे त्याचें पुण्य जें कांहीं एक फळ देणारें का फळणारें, परिणामास येणारें तेंही पण अज्ञानच होय. (८४२)

आणि ज्याने अध्यात्मज्ञान हें मुळीं मानलेंच नाही – महत्त्वाचें असें म्हणूं केलेंच नाही – तेथेंच जो महत्त्व देऊन नाहीं – जो तेंच एक आदरणीय आहे असें मानून तेथें तें आपल्या नित्य स्वभावाचें, भावाचें करीत नाही असा जो तो, ज्ञान म्हणजे काय, तेथीलचा अर्थ तो कसा किंवा कसल्या उपयोगाचा हें पाहत – जाणत – नसणार हें केव्हाहि – हे असें म्हणणें का बोलणें हे काहीं मुळीं जरुरीचे आहे असें नाहींच – असें काहीं म्हणावें लागतें कीं तो ज्ञानाच्या अर्थाचा नाही – ज्ञान प्राप्त व्हावें असा त्याचा हेतूच मुळीं नाहीं असा तो होय असें जाण (८४३)

अहो ऐलतीर न पाहाता – ऐलतीरीं न पोहोचता जो माघारीं पळतो – परत जातो – जो पाठ दाखवितो, त्यास पैल म्हणजे पलीकडच्या काठीं काय आहे तें काय समजणार – तें त्याजजवळ महत्त्व पावून नसतें – पलीकडच्या गोष्टीचें महत्त्व तो काय जाणणार बरें !

अहो ! ज्यास मंगल, शुभ, सुलक्षण, समृद्ध, सुरेख, कल्याण का शुभकार्य का आदिभव जो ब्रह्मा त्याबद्दलची का अन्नपोषणाबद्दलची कांहीच माहिती नाही – तो ह्या जीवाभावाची गोष्ट ती काय बोलणार !

[ द्वीप म्हणजे बेट "द्वीपोद्वीपीचे पक्षी मेरुतळवटी उतरले"

अर्थ—अशी कल्पना करा कीं देशोदेशींचे पक्षी – द्वीपोद्वीपींचे पक्षी मेरुपर्वताच्या तळीं येऊन बसले – तेथें पांढरा स्वच्छ खडक होता – तीं रत्ने आहेत असें समजून पक्षी तिकडे गेले – राजहंस पक्षी रत्नें खातात. बाकीचे पक्षी रत्नें वेंचण्याकरिता तिकडे गेले असता राजहंसही तसाच भ्रमिष्ट झाला व रत्नें म्हणून पाषाणांत त्यानेंही चोंच घातली चोंच पाषाणात अडकल्यावर आपला मूर्खपणा त्यास कळून आला त्याप्रमाणे अनेक मूर्खांच्या समारव्यवहाराकडे पाहून मोठेमोठे पंडितही श्रीकृष्ण परमात्म्यास विसरून संसारदुःखांत मरतात

'असें तें न दिसें। दिसें तें नहि होत' ॥ (२)

अर्थ – परमात्मस्वरूप निरवयव असल्यामुळें इंद्रियाना गोचर होत नाहीं – व जें इंद्रियाना गोचर होतें तें परमात्मस्वरूप नसते – कारण परमात्मा सत स्वरूप आहे आणि हें उत्पत्तिविनाशवान् दृश्य पाहाता पाहाता नाहींसें होतें त्या रीतीनें उत्पत्तिविनाशवान् दृश्याचा विचार करता करता दिवसानुदिवसाची परंपरा चालली आहे असें प्रत्यक्ष पाहात असता तुझ्या चित्ताचा भ्रम नष्ट होऊन अजून तूं निवात राहात नाहींस हें असें चागलें नाहीं याकरिता मायेपासून उत्पन्न झालेल्या, मोह उत्पन्न करणाऱ्या अनात्मद्वैत पदार्थातली तूं दुराशा टाकून दे ज्याच्याकरिता तूं नित्य परिश्रम करतोस त्याचा वियोग होऊन तेच तुला उदासीन करितील म्हणजे दु ख देतील (ज्ञा गा २२३-२२४ – २) ] (८४४)

अहो, उंबऱ्यातच ज्याचें शिर खचते, खाचा पडल्याप्रमाणें होते, श्रम पावतें, दमते तो वर असलेला ठेवा, तो कसा पाहाणार तरी ! (८४५)

त्याप्रमाणे ज्यास ह्या अध्यात्मज्ञानाची ओळख नाहीं त्यास, हे धनंजया ! तो विषय किंवा पदार्थ तो कोणता कीं ज्यायोगें तो ह्या येथीलच्या ज्ञानास महत्त्व देणारा होईल ! तेथे त्या ज्ञानार्थास तो महत्त्वच मुळीं देत नाहीं (८४६)

म्हणून आतां विशेषेंकरून – महत्त्वाचें असें मानून – बळाचें असें नाहीं असें समजून – तो ज्ञानाचें तत्त्व पाहात नाहीं हें काहीं तुजला आता आकडे मांडून सागण्याचें करावें असें नाही. (८४७)

गर्भार स्त्रीला वाढिलेल्या जेवणानेच मुळी ते तिचें पोटी असलेलें धालेलें होतें – त्याप्रमाणें मागल्या पदानीं सागितलेलें जे तेच महत्त्व घेऊन असते – जसें अमानित्व, अदंभित्व हेंच मुळीं अहिंसा, क्षांति, आर्जवाप्रमाणें महत्त्व पावून आहे – आचार्योपासन, शौच हेंच मुळीं स्थैर्य व आत्मविनिग्रहाचें तत्त्व पाहाणारें होणार (८४८)

अपर म्हणजे अधिक, दुसऱ्या टोकाचे, अज्ञान, दुसरा, पर, अतुल, निराळें, पाठीमागचे, शेवटचे, दुसऱ्याचें, नंतरचें, निकृष्ट (न्याय), कमी व्यापक (वर्ग, जात)

व्यापक जें तें असल्याशिवाय कमी व्यापक जे त्याच्या वर्ग किंवा जाती समजत नाहींत किंवा अधिकतेचें असल्याशिवाय सामान्य तें कसें असेल याची कल्पना होत नाहीं, अतुल बलाचें असें ते असल्याशिवाय तुललें

जाणारे बल तें कसे हें समजत नाहीं ज्याप्रमाणे अचळयास आमंत्रिलें तर त्यास वाट दाखविणारा हा त्याजबरोबर येतोच – त्याप्रमाणे पाठीमागचे पद तेंच पुढल्यास मूर्ततेचें म्हणजे रूपाचें करतें – पहिलें बोललेले तेच पुढच्या पदास रूपाचें करतें – तसें येथे अज्ञानपद सांगितलें तेंच ज्ञानास डोळस करितें. (८४९)

असो, या प्रमाणें हीं अज्ञानचिन्हें उफराटी केलीं म्हणजे ज्ञानपदें हीं प्रकाशूं लागतात – तीं म्हणजे अमानित्व आदिकरून (असलेलीं) तीं वर्णिलीं – वाखाणिलीं – गौरविलीं. (८५०)

अशीं तीं अठरा ज्ञानपदें तींच जर दुसऱ्या टोकाचीं केलीं, का उफराटीं का उलट अशीं केली तर तीं अज्ञान अशा आकारास येतात (स्थूलदृष्ट्या आकाराचीं अशीं देहबुद्धीची असतात.). (८५१)

मागें श्लोकाच्या अर्ध्या अर्ध्या अधिक पदांनी असें श्रीमुकुंदरूपी श्रीकृष्णानी सांगितलें आहे – की (यत् अत ) अन्यथा म्हणजे उफराटीं – म्हणजे जीं ही ज्ञानपदें नव्हत, यांजहून निराळें जें, तें अज्ञान होय (८५२)

म्हणून याच प्रकारानें किंवा त्याच चालीने मी हा विस्तार केला आहे – कारण दुधांत पाणी मिळविल्याशिवाय तें पुष्कळ असें होत नाहीं पण जरी तें पुष्कळ तरी पण हंस जे ते मात्र सत्वाश जो, तें दूध तेवढेंच घेतात (८५३)

येथें 'मूळध्वनि' जो त्याचीच वाढ झाली ते एक निमित्तच जसें ह्या माहेस – माहे म्हणजे अधिकतेच्या बोलण्यास – होऊन आहे – पण असे वाढलेलें तें जरी तरी तेथीलचें जें ज्ञानपद ते मात्र केव्हांही सांडणें केलेले नाहीं

आपल्या पदरचें घालणे म्हणजे मुळात नसून विषय फुगविण्यासाठीं केलेलें जें ते जसें का बडबडच एक – पण मूळ ध्वनींनच सूचित केलेलें जें तेथे अनेक शंका, प्रश्न ह्याची रेलचेल ती पद्धतीवर उभी केल्यामुळें ती बडबड नच वाटता तो विषय समजून देण्याची ती तत्परता होय (८५४)

यावर श्रोत्यानी म्हणूं केलें कीं उगा रहा, स्थिर व्हा – येथे तर विस्तार नसून शंकेचे निरसन होऊन आहे, अज्ञानाची फेड होऊन आहे, ज्ञान जें ते सांगण्याचा ठावच एक होऊन आहे, शंकेचे समाधान होऊन आहे – अज्ञानाचे का सशयाचे दूरीकरण होऊन आह – हे कविपोषका, वायाच ते बिहिणे करतोस ते का बरें !

[ कविपोषक = सारस्वत कवि = वेदअग वेदवित = या सर्व लोकाचा अध्यक्ष – सर्व देवाचा व सर्व धर्माचा – अध्यक्षच एक असा चतुर आत्मा आहेस – व्यवहारदक्षतेचा चतुर्भुज असा आहेस ] (८५५)

तेथें सर्व ज्ञानावरच मुळी प्रकाश केला असे ते ज्ञानसूर्याचे जसे तेथे अज्ञानें नाहीतच तर एक जें 'तमस परस्तात्' अज्ञानाचे पलीकडील ते सूर्याचें रूपच ज्ञानाने प्रकाशलें म्हणावें !!!

असें तुम्हाला तर श्रीमुरारीरूपी श्रीकृष्णानी म्हणितलें कीं आमच्या हृदयरूपी गुहेमध्ये जें काहीं प्रिय असें – प्रीति विवर्धक असें झाकलेलें आह ते तूं प्रगट कर (८५६)

ते देवाचें मनोगत तूं मूर्त करून दाखवीत आहेस – आकाराचें, व्यक्तीचें, मूर्तीचे करून दाखवीत आहेस असें म्हणूं केले तरीही पण तुझें चित्त हे देवाचे प्रमाणें गंहिवरून येईल. (८५७)

येवढ्याचकरिता हें असूं देत – हे बोलायचे तें काय कशास ! पण हें सर्वथा खरेंच कीं आम्हास अति सतोष होऊन आहे कीं हें श्रवण जे अति महिमानाचे असें आहे – ह्या श्रवण सुखाकरिताच तर, ती श्रवणाची गोडी ही जोडीच जशी एक ह्या जन्माची – तरी आता ह्या प्रसगाने तर आम्ही ज्ञानश्रवणरूपी नौकेमध्येंच – बसविलो गेलो आहोत – येथे आम्ही तर ज्ञाननौकेमध्येंच – ज्ञानासच मिळून आहोत – ज्ञानामध्यें व आम्हामध्यें काहीं फरकच नाहीं अशी ती गोडी आम्हास प्राप्त होत आहे. आम्ही अतिसुखाचें झालों आहोत. (८५८)

म्हणून आम्ही प्रसन्नतेप्रत आलों आहोंत. आतां यावर जें ते श्रीहरी बोलिले तें सांगावें–तेथें कथन करणें जें तें लवकर करावें, तसेंच तेथें सर्व जो कांहीं वेग (अवसान) तोच त्या कथन करण्यात असावा–पोटचें प्रेम तेच वेगाचें होऊन असणारें असें होय (८५९)

हें संतवाक्य ऐकून निवृत्तिदासांना परमविश्वासाचा हुरूप आला व ते म्हणाले कीं अहो, तें आपल्या कृपेचें असें आहेच व आतां तें जें कांहीं देवांनीं बोलणें केलें तें ऐकावें–तेथें अवधान द्यावें. (८६०)

ते म्हणाले कीं हे पाण्डवा, तुला जो आम्ही हा सर्व लक्षणाचा समुदाय, समूह ऐकविला त्यास साहित्यशास्त्रांत अलंकार विशेष असें म्हणतात. व व्याकरणामध्यें त्यास निरपेक्ष शब्दांचा समूह असें म्हणतात. असा हा अज्ञानभाग जाण. (८६१)

अशा ह्या अज्ञानविभागास पाठ देऊन–त्याजला टेकून ज्ञानाविषयीं आपण आपला निश्चय करून घ्यावा–अशा या अज्ञान विभागास, पोटविभागास पाठी देऊन म्हणजे मोडून देऊन, हा ज्ञानविषय जो तेथे–त्या ज्ञानाविषयी चागला निश्चयी हो (८६२)

मग ते ज्ञान सिद्ध झालें म्हणजे ज्ञेय हे मनानें भेदलें, जाणलें, आपलेंसें केलें–होईल असें जें कांहीं एक ज्ञेय, जें जाणणें जे, तें कसें तें, जाणण्याविषयीं–ऐकण्याविषयीं अर्जुनानें आपली इच्छा दर्शविली (८६३)

तेव्हा सर्वज्ञाचे राव जे श्रीहरी अथवा श्रीकृष्ण त्यांनीं तो त्याचा तसा भाव–त्याचें मनोगत पाहून–त्याची ती इच्छा जाणून ऐक, तो जो कांहीं एक ह्या ज्ञेयाबद्दलचा प्रेमभाव का प्रीतिनिदर्शनाचे ते ज्ञेय तें कसें ते–ते आता सागतों–तें सांगण्याचें करितों–जाणण्यास योग्य जी परमात्म वस्तु तिचें प्रियपण का प्रियापण त्याबद्दल सागतों ऐक (८६४)

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।**

**अनादिमत्परंब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ।। १२ ।।**

ज्ञेयं=जाणण्यास योग्य, परमात्म वस्तु प्रवक्ष्यामि=सागतो. अनादि=आरंभ, उत्पत्ति इत्यादि रहित (ईश्वर, परब्रह्म) अमृतम् अश्नुते=अमरत्व पाहातो, अमृत सेवन करीत असतो अनादिमत्=अनादि असें जें=अनादिमत् अनादिमन्तौ अनादिमन्त . अनादिमत् परम्=त्याचा स्वभाव अनादि असा श्रेष्ठपणाचा, अनादि असेंच ते केव्हाहि परंब्रह्म=परब्रह्म=परंब्रह्म=ब्रह्मपरं=परे ब्रह्मणि=ब्रह्म=परंब्रह्म, सर्वात श्रेष्ठ असें ब्रह्म. न सत् तत् न असत् उच्यते=तें सत्‌ही नाहीं व असत्‌ही नाहीं असें म्हटलें आहे. असत् जें त्याम भाव नसतो व सत् जें त्यास अभाव नसतो

अन्वय—यत् ज्ञेयं तत् प्रवक्ष्यामि। यत् ज्ञात्वा अमृतं अश्नुते। परंब्रह्म। अनादिमत्। तत् न सत् उच्यते। न असत्।

यत् ज्ञेयं ज्ञात्वा अमृतं अश्नुते। तत् ज्ञेय प्रवक्ष्यामि। (ज्ञेयं तत्) परंब्रह्म। अनादिमत्। तत् न सत् उच्यते। न असत् उच्यते।

अर्थ—ती 'जाणावयाची वस्तु' म्हणजे ज्ञेय तें मी सागतों जें जाणलें असता अमरपण प्राप्त होतें, नित्य अमृतसेवन करणे होते, असें जें ज्ञेय तेच अनादिमान् असेंच ते परं (श्रेष्ठ) ब्रह्म ब्रह्मपरं होय. तें सत् (ज्याचा अभाव केव्हाहि नसतो) [ब्रह्म, ब्रह्मप्रतिष्ठेन तिष्ठति] व असत् (ज्याचा भाव केव्हाहि नसतो) असेंहि तें म्हटलें जात नाहीं (१२)

तरी ज्ञेय ऐसें म्हणणें। तें येणेंचि कारणें।
जें ज्ञानेंवांचूनि कव्हणे (व) णे। उपाये (या) न ये (नये) ॥ ८६५ ॥

आणि जाणितलिया वरौतें। कांहीं करणें नाहीं जेथें।
जाणणेंचि तन्मयातें। आणी जयाचे ॥ ८६६ ॥

जे जाणितलिया सांठि। संसारा काढूनि काठी।
जिरोनि जाइजे पोटीं। नित्यानंदाच्या ॥ ८६७ ॥

ते ज्ञेय गा ऐसे। आदि जया नसे।
परब्रह्म आपैसे। नांव जया ॥ ८६८ ॥

जे नाहीं म्हणो जाईजे। तंव विश्वाकारें देखिजे।
आणि विश्वचि ऐसे म्हणिजे। तरी हे माया ॥ ८६९ ॥

रूप वर्ण व्यक्ति। नाही दृश्य द्रष्टा स्थिति।
तरी कोण कैसे आथि। म्हणावे पां ॥ ८७० ॥

आणि सांचचि जरी नाही। तरी महदादि कवणे ठायी।
स्फुरत कैचे काई। तेणेंविण असे ॥ ८७१ ॥

म्हणौनि आथि नाथि हे बोली। जे देखोनि मुकी जाली।
विचारासी मोडली। वाट जेथें ॥ ८७२ ॥

जैसी भांडघटशरावी। तदाकार असे पृथ्वी।
तैसे सर्वे होऊनिया सर्वी। असे जे वस्तु ॥ ८७३ ॥

ते–तै जे–जै कव्हणे–कवणे. उपाये न ये–उपाया नये=उपाय वन वसंताप्रत येणें हें ज्ञानावाचून होत नाहीं–फक्त एक ज्ञानच ते, तेच उपायास येते (८६५) जाणितलिया–जाणितलेया तन्मयातें–तन्मय तन्मय असें तदाकार होणे जे (८६६) जाणितलियाचि–जाणिलेयापाठीं=जाणल्यानंतर ससारा–(ससार) काढूनि काठी=(काटी)=समार तीरावर ठेवून (८६७). गा=म्हणजे आदि जया नसे=ज्यास आदि म्हणजे मूळ कारण नसतें. परब्रह्म आपैसे=सहजच मग तें परब्रह्म असें; ज्याचे नाव सहज परब्रह्म. नाव=नाम (८६८) 'जे नाही–'=जें ज्ञेय मुळींच नाहीं असें म्हणावें तर तेथें नुसता आभास–तेथे काहींच नाहीं अशी मायाच (८६९). दृष्टा–द्रष्टा. कोणे–कोण (८७०). कवणे–कोणे (८७१) आथि नाहि–आथि नाथि=आहे–नाही हे बोली=हें बोलणें. देखोनि–पाहून मुकी जाली=मौनावली, बंद झाली विचारासी–विचाराची=बुद्धि इंद्रियानें विचार करण्याची वाट नाहींशी झाली मोडली=थांबली. वाट=मार्ग, उपाय (८७२) भाडघटशरावी=भाडी जीं डेरे, घागरी, परळ इत्यादिकाच्या आकाराचीं असलेलीं (८७३)

त्यास जाणण्यासारखे तें आहे असें जें म्हणणें तें एवढ्याच करिता कीं जें ज्ञान झाल्याशिवाय कसल्याहि उपायाचें होत नाहीं अहो तेथें तें जाणणेंरूपी ज्ञान जाणीव जाणिवेची कळा आहे तरच हा उपायरूपी वसंत हा त्या वनश्रीस शोभविण्यास येणारा होतो व तें श्रीगुरुकृपेमुळेंच म्हणजे त्या त्या लक्षणानीं युक्त असावें तरच तिथें उपाय सुचूं लागतो असेंच–दुसऱ्या कोणत्याहि उपायानें का उपचारानें तें ज्ञेय जाणण्याची योग्यता येत नाहीं

(८६५)

जें जाणल्यानंतर तेथे सर्व स्वास्थ्यच पदरात पडतें – तेथें काहीं एक करणें का न करणें हें मुळींच नसतें कारण तें जें जाणणें तेच मुळीं तन्मय तन्मय असें झाल्यानें – असल्याने ज्ञेयच तें असें होय (८६६)

जें जाणल्यानंतर – जें जाणल्यानें संसार हाच मुळी तीरावर ठेविला गेला व स्वत ज्ञेय तें तर शात अशा नित्यानंदाच्या पोटींच जिरून जाणारें होतें (८६७)

तें ज्ञेय असें आहे की ज्यास मुळीं आदिकारणच नाहीं तेच स्वयं असें आणि म्हणून श्रेष्ठ असें ब्रह्मच तें परब्रह्म असें त्यास नांव आलें (८६८)

जें वस्तु – जें ज्ञेय – जें परब्रह्म नव्हे असें म्हणावें तर विश्वाकारानें ( पाहिलें असता ) दिसतें आणि तें विश्वच तें आहे म्हणावें तो तो तर नुसता मायेचा आभास होय (८६९)

अशा त्या ज्ञेयास आहे असें म्हणावें तरी कसें ! कारण तेथे ' ना रूप, ना वर्ण, ना व्यक्ति ' – तेथे दृश्य का द्रष्टा याची जी स्थितिसीमा, अवस्था जीवित्वानें भासवीत आहे असें ते म्हणणें येथें मुळी नाहीं – असें म्हणणे होईल म्हणून त्यास कोण व कसें आहे ते म्हणणे ते कसें करावें – म्हणून कुणी त्यास म्हणावें की तें आहेच आहे – तरी याहीवर— (८७०)

आणि खरोखरीचें पाहाता जर ते नाहीं असेंच म्हणणे दृढ झालें तर महदादि जी ती कुठें गेली – त्याचें असणें, स्फुरणे वगैरे मग कसचे नि काय वर असें तरी कसे म्हणावे बरें जर का ( एकले हे ज्ञेय परब्रह्म वस्तु ही नाहीं म्हणण्याचे केलें तर )—

अहो येथें माया असें म्हणणेंच मुळी स्वत स नडावते कारण त्या महदादीनीं केलेली – महदादि म्हणजेच मुळीं ती गुणमयी – जेथें त्रिगुण हे साम्य अवस्थेत आलेले – समतोल असेच ते जेथे तेथें ती गुणमयी म्हणजेच मुळी ती शातब्रह्माची बैठक ती त्या ब्रह्मानेच मुळी घडलेली असल्याने त्या परब्रह्मामुळेंच हीं पण तीं महदादि हीं आधीनतेची अशीच होऊन येतात – ( पण त्या देहबुद्धीचें तदाकारपण हेंच पुढे केल्याने तेथे ती शातब्रह्माची का गुणमयीची ती साम्य अशी सहज तोलली गेलेली एकत्वाची ती महत तत्त्वाची का बुद्धीची खोली हीच मुळी त्या जीवस्वभावाच्या अध्यात्मप्रसगाने आलेलें वरच ते पुरतें झाले ) (८७१)

म्हणून आहे आहे नाहीं नाहीं असे म्हणणेच मुळी जे ज्ञेय पाहाण्यानें थाबले व बुद्धिमयी इन्द्रियानें विचार करीत बसण्याची वाटच मुळी ती पाडून टाकली – तेथे आता बुद्धीने विचार करणें नको असे ते झाले – तेथे बोलणें बंद झाले, विचाराना तर ( इकडचा तिकडचा ) मार्ग हा एकच असें झालें (८७२)

पृथ्वी जशी डेरा का घागर वा परळ असे निरनिराळेपणाने घराच्या आकाराने असणारी तरी ती तदाकारच असते, त्याप्रमाणें सर्व काहीं होऊनही ही सर्वांमध्यें असतेच असते असें जें वस्तु तें ज्ञेय होय, ते परब्रह्म होय (८७३)

**सर्वतः पाणिपादं तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥**

सर्वत =सर्वबाजूंनीं, सर्वत्र, पूर्णपणें ( सर्वतोमुख = सर्वव्यापी, ब्रह्मदेव ) ( आत्मा, परमात्मा, ब्राह्मण, स्वर्ग, शंकर, अग्नि, पाणी, आकाश, वायु ). मुख = तोंड, चेहरा, आरंभ, मूळ कारण, साधन, उपाय, पुढील क्रम अक्षिशिरोमुखम् = डोळे, डोळा. शिरस = डोकें, अग्र, प्रधान ( श्रेष्ठ ) = डोळे, शिख, मुख त्यास सर्वत्र आहे सर्वत. श्रुतिमल्लोके = सर्वबाजूंनीं त्या लोकीं ऐकणारें ते आहे – सर्वबाजूंनी ( पूर्णपणें ) कानाचें असें तें त्या लोकीं आहे. लोके = भुवन, प्रदेश सर्व आवृत्य तिष्ठति = ते सर्व व्यापून असणारें आहे , सर्व विश्व, सर्व काहीं, सर्वव्यापी तें

लोके=सामान्यप्रचार (वैदिक नव्हे जें), निजस्वरूप, प्रकाश, चक्षुरिंद्रिय, विषय.

अन्वय=तत् सर्वत पाणिपादं। (तत्) सर्वत अक्षिशिरोमुखम्। (तत्) लोके सर्वत्र श्रुतिमत्। (तत्) सर्व आवृत्य तिष्ठति।

अर्थ—(१) ते चहूबाजूनीं हाताचें, पायाचें, त्यास चोहोकडे हातपाय आहेत, तें सर्वबाजूंनीं डोळे, डोकें, मुख असणारें, त्यास सर्व ठायीं डोळे, डोकें, मुख आहे. तें या लोकीं चोहोकडे ऐकूं येणारें व तें सर्व काहीं व्यापून असणारें आहे.

(२) त्यास सर्वत्र हातपाय आहेत. सर्व ठायीं त्यास डोळे, डोकें व मुख आहे, त्यास सर्वत्र कान आहेत व तें सर्वांना व्यापून असणारें असें आहे

(३) तें पूर्णपणें सर्वत्र हात व पाय (किरण) असलेलें असें सर्वव्यापी आहे (ब्रह्माच एक जसा का). त्यास सर्वव्यापीपणामुळें सर्वत्र डोळे, डोकें व मुख असलेले पूर्णपणामुळे ज्यास सर्वत्र कान आहेत असें आकाशाप्रमाणें व्यापक असें जें आहे (चक्षुरिंद्रियाचा विषय निजस्वरूप ते प्रकाशमान होण्याने त्याबद्दल ऐकणें जें, का सामान्य प्रचार जे वैदिक नव्हेत असें त्याबद्दल ऐकणे जे, असें सर्व काहीं ऐकणारे जे) जाणीव का जाणणें तें जाणते असे, जें वेदपारंगत आहे असें व जे सर्व विश्व व्यापून सर्वव्यापी असें आहे (तिष्ठति), सर्व काहीं आवरून, व्यापून निश्चल असें आहे. (१३)

आघवाचि देशी काळी। नव्हता देश काळा वेगळी।
जे क्रिया स्थूळास्थूळी। तेचि हात (ज) जायाचे॥ ८७४॥

तयाते या कारणे। विश्वबाहु हे म्हणणे।
जे सर्वेचि सर्वपणें। सर्वदा करी॥ ८७५॥

आणि समस्तांही ठाया। एकेकाळी धनंजया।
आले असे म्हणौनि जया। विश्वांघ्री नांव॥ ८७६॥

पै सवितया आंग डोळे। हे नाही वेगळे वेगळे।
तैसे सर्व द्रष्टे सकळे। स्वरूपे जो॥ ८७७॥

म्हणौनि विश्वतश्चक्षू। हा अचक्षूच्या ठायी पक्षू।
बोलावया दक्षू। जाला वेद॥ ८७८॥

जे सर्वांच्या सिरावरी (शरिरावरी)। जे नित्य नांदे सर्वांपरी।
ऐसिये स्थिति वरी। विश्वमूर्ध्ना म्हणिपे॥ ८७९॥

पै गा मूर्ती तेचि मुख। हुताशन जैसे देख।
तैसे सर्वपणे अशेष। भोक्ते जे॥ ८८०॥

यालागी तया पार्था। विश्वतोमुख हे व्यवस्था।
आली वाग्पथा। श्रुतीचिया॥ ८८१॥

आणि वस्तुमात्रीं गगन। जैसे असे संलग्न।
तैसे शब्दजाती कान। सर्वत्र जया॥ ८८२॥

(यालागी) म्हणोनि आम्ही तयाते। म्हणो सर्वत्र ऐकते।
एवं जे सर्वाते। आवरूनि असे॥ ८८३॥

परव्ही तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती ।
तयाचिये व्याप्ती । रूप केले ॥ ८८४ ॥

वाचुनि हस्त नेत्र पाये । हे भाष तेथ के आहे ।
सर्व शून्याचा न साहे । निष्कर्ष जे ॥८८५ ॥

प कल्लोळाते कल्लोळे । ग्रासिजेत ऐसे कळे ।
परि ग्रसिते ग्रासा वेगळे । आहे काई ॥ ८८६ ॥

तैसे सांचचि जे एक । तेथ के व्याप्यव्यापक ।
परि बोलावया नावेक । करावे लागे ॥ ८८७ ॥

पै शून्य जै दावावे जाले । तै बिन्दुले एक केले ।
तैसे अद्वैत सांगावे बोले । तै द्वैत कीजे ॥ ८८८ ॥

परव्ही तरी पार्था । गुरु शिष्य सत्पथा ।
आडळ पडे सर्वथा । बोल खुंटे ॥ ८८९ ॥

म्हणौनि गा श्रुती । द्वैत भावे अद्वैती ।
निरुपणासी वाहती । वाट केली ॥ ८९० ॥

स्थूळास्थूळी = स्थूळ व सूक्ष्म वस्तूपासून. तेच – तेचि. जायाचे – जयाचे = जायाचें लेणें जसें परत करावें लागणारें तसें मागून आणिलेलें किंवा उसने घेऊन अंगावर घालण्याकरितां आणिलेले जे अलंकार दागिने ते जसे येथें हातच म्हणिले ( ८७४ ) हे – ऐसे ( ८७५ ) म्हणौनि – म्हणोनि. विश्वाघ्री = स्थूळ देहाभिमानी जीवरूपी जग - किंवा जीवरूपी ( सर्वत्र पाय असलेला ), ज्याचे पाय सर्वत्र आहेत असा ( विश्व = सर्व, नागरसभ्य, विश्वदेव, स्थूलदेहाभिमानी जीवरूपी जग विश्व हेच किरण म्हणजे पाय ज्याचे असें पाद = किरण, पाय, सन्मानार्थ पादार्घ्यम् = सत्पात्री दान पाद + अर्घ्य. आघ्रि = पाय, श्लोकाचा चरण. आघ्रि – पान = अगठा चोखणारें मूल ) नाव – नाम ( ८७६ ). सवितिया – सवितया. हे नाहि – नाहींत दृष्टे – द्रष्टे = सर्व पाहाणारे जो – जे ( ८७७ ) विश्वतश्चक्षू = सर्वत्र डोळे असलेला, अचक्षूच्या ठायीं चक्षू = ज्याला मुळीच डोळे नाहींत त्याच्या ठिकाणीं हा पूर्वपक्ष ( बाजू – प्रकार ). दक्षू झाला वेद ( दक्षू वेद झाला ) = विश्वतश्चक्षू असें म्हणण्यास वेद समर्थ झाला ( ८७८ ). सर्वाचिया – सर्वाचे ( सिरावरी ) – शरिरावरी – सिरी - परी = जे सर्वाच्या शरिरावरी । नित्यानंदे सर्वाच्या परी । ( पा भे. ) विश्वमूर्ध्ना ( मूर्धा ) = सर्वाचे शिरीं असलेला, किंवा सर्वच, किंवा सर्वांचें शिर असलेला ( ८७९ ). हुताशना – हुताशन = अग्नीला अशेष – अशेख ( ८८० ). विश्वतोमुख = सर्वत्र तोंडें असलेला. वाग्पथा = वचनांत ( ८८१ ). म्हणोनि – यालागी आवरून = व्यापून ( ८८३ ) एऱ्हवी – प्रायः. महामति = बुद्धिवान्. विश्वतश्चक्षु इया श्रुति = परब्रह्मास विश्वतोमुख – विश्वतश्चक्षु ह्या श्रुति = वेदवचन. व्याप्तिरूप केलें = सर्व व्यापकत्वाचें वर्णन केलें ( ८८४ ) वाचुनि – वाचौनि. हस्त नेत्र पाये – हात नेत्रे पाय हे भाष तेथ के आहे = असें बोलणें तें योग्य कसें होईल. शून्याचा - शून्यत्वाचा = सर्वशून्यपणाचा – अभावाचाही निर्णय लागू पडत नाहीं निष्कर्ष = तात्पर्य, सार, निर्णय ( ८८५ ). ग्रासिजेत ऐसे – ग्रासिजत असे ( = खाते ) ( ऐसे कळे ) आहे – असे ( ८८६ ) तेथे – तेथ. नावेक = क्षणभर, नावभर ( ८८७ ) बिंदुले = वर्तुळ ( ८८८ ) आडळ = प्रतिबध ( ८८९ ) म्हणौनि – म्हणोनि. श्रुती = वेदांनीं. द्वैत भावे अद्वैती निरूपणाची ( निरूपणासी ) वाहाती वाट केली = सर्व एकच एक असतां ( द्वैतभावे ) द्वैताच्या निमित्तानें शब्दांनीं – ( तें अद्वैत सागण्याचा मार्ग मोकळा केला. ) ( ८९० )

एकदेशी नव्हत अशी तसेंच सर्वकाळींही व्यापकत्वानें असूनहि देशकाळावेगळी म्हणजे निराळेपणानें नाहीं अशी जी का एक स्थूळामध्यें का सूक्ष्मामध्यें होणारी जी क्रिया तीच ज्याचे हात होत. जें (तत्त्व का ब्रह्म) अव्यय आहे, दिशा का एकदेशीय का काळ ह्यानीं अनवच्छिन्न असें जे चिन्मात्र विष्णुरूप तेंच ज्याचे हात आहेत (८७४)

या कारणास्तव त्यास विश्वबाहु असें म्हणणें असे जे वस्तु ते तर सर्वपणें सर्व होऊन सर्वदा सर्व कांहीं करिते. 'तत् सर्वतः पाणी' – पाणी म्हणजे हात, जीवन, तेथें सर्व कांहीं जीवित्वाचें – जीवनाचें ह्या देहामध्यें दिसणारें जें तें ह्या जीवनामुळेंच, पाण्यामुळेंच, हातामुळेंच होय. म्हणून त्यास असेंच म्हटलें कीं हें सर्व कांहीं हाताचें असें होऊन असतें – आहे – पाणीच एक तो – हातच एक ते, सर्व ठिकाणीं सर्व कांहीं सर्वकाळीं होऊन आहे – आणि म्हणूनच त्यास विश्वपाणी – विश्वबाहु – विश्वच एक बाहु होऊन आहे – सर्वाठायीं, सर्व काहीं होऊन तेथें काळवेळ ही, ही पण सर्वदा तोच होऊन असलेला असा. (८७५)

आणि सर्वाही ठायीं एकाच वेळीं, हे धनंजया, आलेलें होऊन आहे आणि म्हणूनच त्याला विश्वांघ्री हें नांव आहे पायानेंच तें येणें होत असल्यानें त्यास असेंच म्हणूं केलें कीं ज्यास सर्वांघ्री तें आहे म्हणजे स्थूळ देहाभिमानी जीवरूपी जग, का विश्वरूपी जीव (देह, आत्मा) हेच किरण म्हणजे पाय ज्याचे असें सर्वव्यापी चैतन्यच एक जसें – सन्मानार्थ – आदरार्थ. (८७६)

जसें का सूर्यास आग किंवा डोळे हे वेगवेगळे, निराळे निराळे असे नाहींत त्याप्रमाणें ज्याचें स्वरूप सर्व कांहीं पाहाणारें, सकल स्वरूपाचें, असें जें किंवा असा जो (८७७)

आणि म्हणूनच त्यास 'विश्वतश्चक्षु' म्हणजे विश्वाविश्वांच्या ठायीं डोळे किंवा पाहाणारा चक्षू आहे असा ह्या बोलण्याचा जो काहीं एक – ह्या अचक्षूच्या ठायी चक्षूचें प्रस्थापितपण करण्याचा पूर्वपक्ष तो ह्या रूपानें का स्वरूपानें स्थिर केला. अहो, असें ह्या वेदाचे दाक्षिण्य का दक्षपण ते कसें ह्या डोळ्यासच रूप का स्वरूप असें म्हणून – असें म्हणण्याचें करून त्यानें तर ह्या अचक्षूचा पक्ष उचलून धरिला व त्यास सडोळस म्हणूं केले, एव्हाच तो विश्वतश्चक्षू आहे असा त्यास सिद्ध केला (८७८)

जें सर्वांच्या शिरावर आहे, जें सर्वांच्या शरीरावर आहे, जें सर्वांचे शिर आहे, जें सर्व काहीं आपण आहे असें समजून नित्य नादत असते, सर्व तऱ्हेनें का अनेक परीपरीचें होऊन तें नादणारें असल्यानें त्यास 'विश्वमूर्ध्ना' म्हणजे विश्वाचे डोकेंच ते आहे तेथे अनेक ज्या काहीं ह्या डोक्यानें – का बुद्धीनें – शरीरानें – का शिरानें (शिरावर उभा होऊन असलेला जसा का एक) नादणारा का नादविणारा ह्या विश्वास – तेथे नादणें तें जसें शिरावर उभे असल्यानें होणारें – आणि म्हणून त्यास तसें म्हणजे 'विश्वमूर्ध्ना' म्हणणें होते. ज्या रंध्रामधून ब्रह्म हें परिणाम करणारें त्यास 'मूर्धन्' म्हणतात व असें तें सर्व विश्वात शिरावर उभें राहून ह्या शरिरात नादण्यास लावणारें तें आहे आणि म्हणूनच त्यास तसें म्हणजे 'विश्वमूर्ध्ना' असें म्हटलें (८७९)

पण असें नव्हे का! कीं जेथून अग्नीची हुताशनाची ज्वाला निघते – ती अग्नीची मूर्तीच होय – व तेंच मुखही पण – त्याप्रमाणें सर्वपणें एक मुख होऊन जें सर्व काहीं भोक्तें आहे, भोगणारें आहे असें जें. (८८०)

ह्या कारणास्तव त्यास हे पार्था, सर्वत्र मुख का तोंडे असलेला असा विश्वतोमुख अशीच एक अर्थबोध-मार्गाच्या स्थितीची का अवस्थेची व्यवस्था वेदाकडून का श्रुतीकडून आली – प्रस्थापिततेची झाली 'सर्वतोमुख' – 'विश्वतोमुख' – सर्व = विश्व (देह, शरीर) (सगुण). (सर्वव्यापी अथवा ब्रह्मदेव) (विश्वत सर्वत्र मुख असलेला, सर्व बाजूंना मुख असलेला) असें श्रुतीचे वचन अर्थबोधाच्या म्हणजे व्यवस्थेस आलें, सुव्यवस्थित झाले (८८१)

वस्तुमात्रामध्यें जसें गगन हें संलग्नतेनें असतें त्या प्रमाणें शब्दजात जेवढें तें ऐकणारे कान सर्वत्र ज्यास आहेत असें तें आहे. (८८२)

आणि म्हणून त्यास आम्ही असें म्हणूं करितों कीं ते सर्वत्र ऐकणारें आहे आणि या कारणास्तव तें सर्वांसही आवरून आहे (८८३)

हे महामती अर्जुना एऱ्हवीं पाहिलें तर 'विश्वतश्चक्षू' ही जी श्रुति आहे तिनें त्या वस्तूची व्याप्ति का त्या वस्तूचें व्यापकपण पाहून त्यास रूपास आणिलें–सडोळस असें म्हटलें. (८८४)

जर हात, पाय, डोळे नाहींत तर तेथें बोलणें मग कसचें होणारें; कारण तेथे सर्व शून्य असाच एक निर्णय; का सर्व अभाव असाच एक शून्यत्वाचा निश्चय, निवाडा का निर्णयही तेथें मग लागू पडत नाहीं–सर्व शून्य असेंही तें म्हटलें जात नाहीं–म्हणून 'हात, डोळे व पाय' त्यांनींच मुळी तें बोलास येतें–कारण एऱ्हवीं पाहिलें तर तेथे सर्व शून्य असें म्हणणेंही पुरत नाहीं. (८८५)

लाटानींच मुळीं लाटा ग्रासिल्या जातात–लाटांतच लाटा मुरून जातात–लाटांवर लाटा आदळल्यानें तेथें सर्व एकच लाट झाली का त्या आदळल्यानें अनेक लाटा उद्‌भवतात तेथें लाट म्हणजे ग्रास ही पण ग्रसित म्हणजेही पण लाटेचीच जशी–का–म्हणून तेथें ग्रसित जें तेंही पण ग्रासच एक जसें व्याप्तीनें व्यापकत्व व्यापिलें–तेथे व्यापकत्व हेंच मुळीं ती व्याप्ति होय तसें येथें मोठमोठ्या आकाशाएवढ्या वस्तूही पण असणाऱ्या, तेथें व्यापकत्व जें तेंच एक जसें व्यापून आहे त्या वृत्तीच्या (का चित्ताच्या का मनाच्या अनेक) ज्या अनेक उसळ्या, लाटा, तरंग, एकाच वृत्तीनें अनेक ठायीं एक भलेंमोठें कल्लोळाचें झालें तेथें आतां अनेक अशा त्या एकाच वृत्तीने त्या कल्लोळास अनेक अनेक अशा लहानशा तरंगाचे का कल्लोळाचे करून आत सामावून घेतलें, ग्रासले तेथें जशी ती एकच वृत्ति ही कल्लोळानें अनेक कल्लोळाची झालेली तेथें जें मावणें, सामावणें तेंही पण त्या वृत्तीच्या कल्लोळातच होणारें जसें–होतें जसें तसें–तेथें एकच वृत्ति कल्लोळानें मोठी भली अशी का वसरून गेल्यानें ती जशी का दुसरीकडेसच जरी उद्‌भवली तरी तेथे वृत्तीस मुळीं तेंच एक नांव येते–तेथे दुसरें काहीं तिला म्हटलें जात नाहीं जसें. (८८६)

त्याप्रमाणें जें केव्हाही खरेंच खरें आहे–तेथे व्याप्य का व्यापकपण हे तर त्याचें आगचे असल्याने तेथें तें तसें व्यापक म्हणणें हें तरी काय! परंतु बोलण्यासाठी म्हणून ते तसें व्याप्य का व्यापक नव्हे असें म्हणणें हे बोलण्यासाठी म्हणावें लागतें त्यास शब्दास आणून जें काहीं सागणें होणें–सांगतां येणें तें करावें लागतेंच केव्हाही म्हणूनच तेथें खरेंपण हेंच सर्वथैव एक (८८७)

परंतु शून्य म्हणजे काय व तें कसें असते हें दाखविण्याचें जेव्हा तेव्हा एक बिंदुलें करावें लागतें जसें द्वैत करूनच मग तेथीलची ती अद्वैताची का अद्वितीयत्वाची गोष्ट ही बोलांनीं सांगण्याची होते. एकपण तें दुजेनिविण जें तें होय अद्वितीय तें अप्रतिमतेचें असें न द्वितीय असें. तसें येथे द्वैताची ती वार्ता का गोष्ट का मति जी तीच मुळी येथें अ–म्हणजे नच द्वैताचें तें कसें असावें हे स्पष्ट करिते–येथे द्वैत करूनच–शून्य का वर्तुल का बिदुलें करूनच ती चतुर्थाची का शून्याची का अद्वितीयत्वाची किंवा अद्वैताची गोष्ट सांगितली जाते जेथें द्वैत नाहीं व अद्वैतही नाहीं तेथे ती व्याप्यव्यापकाची एकच झालेली ती एकच ज्ञान अवस्था होय–तेथे असतच पण विसरला होतो–व मुक्तपणाची ती गोष्टच ती मुळी ती कांहीं बोलण्यानें सापडणारी थोडीच (८८८)

एऱ्हवी अशी ती गोष्ट जेथें द्वैत का द्वितीय का दुजें का एकच अभिन्न असें जें शास्त्राचे म्हणणें तेथें गुरुशिष्याची महती पाहिली असता तेथें जो सत्पथ किंवा पंथ जो तो मार्ग म्हटलेला तेथे बोलणे हे प्रतिबंधाचें होते, आक्रमण जे रस्त्याचें तें अडविलें गेल्यानें तेथे बोल हा थाबतो, मति ही कुंठित होते. (८८९)

तेथें शिष्य तोच गुरु किंवा गुरु तोच शिष्य असें बोलणें हें अद्वैताचे तें करूंच नये – तें बोलणें नेहमीं द्वैतानेंच फक्त निर्देशिलें जातें, निरूपणानें होतें. एरव्हीं तेथीलचें तें वागणें – महती – अभिमान का महिमान हें द्वैत दाखवूनच मग आपल्या एकत्वास आलेलें तेथें बोलणें हें नाहींच पण व्यवहारणें, वागणें अशींच तीं लक्षणें उमटलेलीं तीं कशीं वर्ततात तेंच तें अद्वैतीचें बोलणें होय. म्हणून एक तें लक्षण उदारपणास आलेलें असें म्हटलें म्हणून ह्या अद्वैतशब्दास महती देऊन उचलण्याचें तें प्रत्यक्ष आचरणाचें ज्ञान अंगीं बाणून असणें जें तेंच होय. म्हणून एरव्हीं या अद्वैत शब्दास काहींच मुळी अर्थ नाहीं असें तें बोलिलें जावें.

(८९०)

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥**

सर्वेन्द्रियगुणाभासम् = इन्द्रियच सर्व एक असें तें इन्द्रियाच्या व्यापकत्वानें असणें म्हणजेच गुण लागलेला जो त्यास भासविणारें – व त्यास चलनवलनादि देणारें, त्यास प्रकाशणारें असें तें ज्ञेय म्हणजे ब्रह्म आहे सर्व इन्द्रियविवर्जितम् = असें म्हटलें जरी तरीही पण ते इन्द्रियाचें सर्वपणें असणें जें त्याही शिवाय असें आहे म्हणजे त्यास इन्द्रियच मुळीं नाहीं – इन्द्रियाचे सर्व असे म्हटलेले गुणधर्म नाहींत – विकारी होणें असे जे इंद्रियाचे धर्म ते त्यास नाहींत म्हणून इंद्रिय-विकाररहित असें ते आहे असक्तम् = तें असक्त म्हणजे कोठेंही आसक्त होऊन असलेलें नाहीं, असतच नाहीं सर्वभृत् च एव – ते सर्वभृत् सर्व विश्वाला धारण करणारें आहे – नामरूपादि धारणधर्म जो तोच त्यास मुख्यत्वेंकरून निर्गुणम् – तसेंच तें गुणशून्य – त्रिगुणरहित असें आहे – तें निर्गुण आहे गुणभोक्तृ च – तें गुणाचे भोक्तें आहे – गुणाना जाणणारें आहे – गुणाना धारण करणारे आहे – बुद्धीनें निश्चय करणे, मनानें सकल्प करणे, मुखानें भाषण करणें, श्रवणानीं ऐकणें असें जें काहीं ते त्याच्याच सत्तेमुळे होत असल्याने ते हें धर्म जाणणारें आहे – त्याना भोगणारें आहे – येथे जाणीव हीच मुळी जशी शहाणपणाची एक सीमा असल्यानें तेथे ते जाणणें हेच मुळी भोगणें म्हटलें येथे 'सर्वं खल्विदं ब्रह्म' ही श्रुति महत्त्वानें असलेली.

अन्वय—( तत् ज्ञेयं ) सर्व इंद्रिय गुण आभास ( आभासकं ) अस्ति । तत् सर्व इंद्रियविवर्जितम् अस्ति । तत् असक्तं ( अनासक्तं ) अस्ति । तत् सर्वभृत् एव च अस्ति । तत् निर्गुणं अस्ति । तत् सर्वभोक्तृ च अस्ति ।

अर्थ—ते ब्रह्म इंद्रियाचें सर्व गुणसामर्थ्य आभासक आहे ( गुण – विषय सुखदुःखादि सामर्थ्य जाणणें, भासवणें जे ) ते इंद्रियाचे धर्म जें विकारणे त्याविरहित आहे. ते कोठेंही लिप्त नसल्यानें अलिप्त आहे, संगरहित आहे. ते इंद्रियरहित आहे, त्यास इंद्रिय नाहीं तें सर्व सेवा करणारें आहे – धारण करणें, पोसणें इत्यादि विश्वधारणधर्माचें आहे तें निर्गुण आहे, गुणशून्य आहे व तें सर्व कांहीं धारण करणारें म्हणून भोगणारें व भोगणारें म्हणून जाणणारें आहे – असें ते ज्ञेय ब्रह्म जाणल्यानें माझा भक्त हा माझ्या भावाच्या जवळजवळ येऊं लागतो – माझ्या भावाचा होतो. ( १४ )

**तेचि आतां अवधारी । इये नेत्रगोचरे आकारी ।**
**ते ज्ञेय गा जयापरी । व्यापक असे ॥ ८९१ ॥**

**तरि ते गा कीरीटी ऐसे । अवकाशी आकाश जसे ।**
**पटी पट होऊनि असे । तंतु जेवि ॥ ८९२ ॥**

**उदक होऊनि उदकीं । रसु जैसा अवलोकी ।**
**दीपपणे दीपकी । तेज जैसे ॥ ८९३ ॥**

कपुरत्वें कापुरीं। सौरभ्य असे जयापरी।
शरीर होऊनि शरीरी। कर्म जेंवी ॥ ८९४ ॥

किंबहुना जैसे पांडवा। सोनेंचि सोनयाचा रवा।
तैसे जे या सर्वां। सर्वांगीं असे ॥ ८९५ ॥

परि असे रवेपणा माजिवडे। तव रवा ऐसे आवडे।
वांचूनि सोने सांगडे। सोनया जेवी ॥ ८९६ ॥

पै गा ओघुचि वांकडा। परी पाणी उजू सुहाडा।
वन्हि आला लोखंडा। लोहो नव्हे की ॥ ८९७ ॥

घटाकारे वेटाळे। तेथ नभ गमे वाटोळे।
मठी तरी चौफळे। आये दिसे ॥ ८९८ ॥

परी ते अवकाश जैसे। नोहिजतीचि का आकाशे।
जे विकार होऊनि तैसे। विकारी नव्हे ॥ ८९९ ॥

मन मुख्य इन्द्रिया। सत्वादि गुणा यया—।
सारिखे ऐसें धनंजया। आवडे कीर ॥ ९०० ॥

पै गुळाची गोडी। नव्हे बांधया सांगडी।
तैसे गुण इंद्रिये फुडी। नाही तेथ ॥ ९०१ ॥

अगा क्षीराचिये दशे। घृत क्षीराकार असे।
परी क्षीरचि नव्हे जैसे। कपिध्वजा ॥ ९०२ ॥

तैसे जे इये विकारी। विकारू नव्हे अवधारी।
पै आकाशा नांव भंवरी। येर सोने ते सोने ॥ ९०३ ॥

इया उघड मऱ्हाटिया। ते वेगळेपण धनंजया।
जाण गुण इन्द्रिया—। पासोनिया ॥ ९०४ ॥

नामरूपसंबंध। जाती क्रियाभेद।
हा आकारासीच प्रवाद। वस्तूसि नाही ॥ ९०५ ॥

ते गुण नव्हे कही। गुणा तया संबंधु नाहीं।
परी तयाच्याचि ठाईं। आभासती ॥ ९०६ ॥

एतुलेया साठी। संभ्रांताच्या पोटी।
ऐसे जाय कीरीटी। जे हेचि धरी ॥ ९०७ ॥

तरी ते गा धरणे ऐसे। अभ्रातें जेवी आकाशें।
कां प्रतिवदन जैसे। आरसेनी ॥ ९०८ ॥

ना तरी सूर्यप्रती मंडळ। जैसेनि धरी सलील।
का रश्मिकरी मृगजळ। धरिजे जेवी ॥ ९०९ ॥

तैसे गा संबंधेवीण। यया सर्वांते धरी निर्गुण।
परी (पर) ते वाया जाण। मिथ्या दृष्टी ॥ ९१० ॥

**आणि यापरी निर्गुणे। गुणाते भोगणे।**
**रंका राज्य करणे। स्वप्नीं जैसे ॥ ९११ ॥**

**म्हणौनि गुणाचा संग। अथवा गुणभोग।**
**हा निर्गुणी लाग। बोलो नये ॥ ९१२ ॥**

रसु–रस (८९३) परि रवे माजिवडे–परि असे रवेपणा माजिवडे=लहान तुकड्यांमध्यें. सांगडे–सारिखे (८९६). ओघुचि–ओघचि सुहाडा=मित्रा, सुहृदा. उजू=सरळपण (विवाह=संयोगसंबंध). लोहो–लोह (८९७). मठि–मठी. चौफळे=चौकोनी (८९८). अवकाश=पोकळी, पोकळी आकारलेली नोहिजतीचि का आकाशे=आकाश होऊं असत नाहीं नव्हे–नोहे (८९९) नोहे बाधया (बोधया) सागडी=बाधा ढेपीचा त्यासारखी असत नाहीं, गोडी ही बाध्याच्या आकाराची बरोबरी करीत नाहीं, बरोबरीनें जाणारी, चालणारी. गुणेंद्रिये–गुण इंद्रिये (९०१). दशा=अवस्था, स्थिति, बाळपण, वयोवस्था. क्षीराकारे=रूपांतरानें, आकारानें, ऐक्यानें, अभिप्रायानें. नव्हे–नोहे (९०२). विकारिन्=बदलणारे, क्षोभणारे. विकारू (विकार)=रूपातर, फेरफार, व्यग्रता, चित्तक्षोभ, दोष आकाश नाव भंवरी (भोंवरी)=फिरकी, फूल, फिरकीचे फूल=ऐक्यास, प्रकारास किंवा चेहऱ्यावरील मुद्रेस रूपान्तर नाव येतें जसें [आकार=तोंडाचे भाव, चेहरा, चेहऱ्यावरील मुद्रा, स्वरूप, रूपान्तर, अभिप्राय, सौंदर्य, प्रकार, सूचना, खूण (साख्य). ऐक्य=ऐक्यज्ञान (९०३) उघड मऱ्हाटिया=स्पष्ट व सोपे (जेथें जाणण्याचें नैपुण्य का चातुर्य हें दैविकीचें जसें). वेगळेपण–वेगळेपणे=निरालेंपण, निरालेपणानें गुणइंद्रिया पासोनिया =त्रिगुण व इंद्रियादिकापासून ते=जातक्रिया याचे भेद (९०४) नामरूपसबंध=नावारूपाचा सबंध. जातीक्रियाभेद=जातक्रिया यांचा भेद आकारासीच प्रवाद=ज्यास आकार आहे त्यासच हें नामरूपादि बोलणें [प्रवाद=वदंता, लोकवार्ता, मिष, जनापवाद, (युद्धापूर्वी उभयपक्षामध्यें होणारें बोलणें)] वस्तू=असक्त, सर्वभृत्, कर्णोपकर्णी ऐकलेली गोष्ट हा जसा लोकापवाद तसा हा आकारावर आकाराचें होणें जसें. तें सद्वस्तु नामरूपातीत ब्रह्म त्यास नाहीं (९०५) आभासती=भासतात, भासमान होतात. मिथ्यात्व=आरोपणें (आभास=भ्रम) भास=प्रकाश, तेज, आरोपले जातात (९०६). एतुलेया सवि=आभासामुळें संभ्रात=भ्यायलेला, भयचकित, भावावलेला. ऐसे जाय–ऐसे गमे जया. ना–जे=संबंध (९०७). प्रतिवदन=मुखाचे प्रतिबिंब, प्रतिमा, मार्मिक ज्ञान (९०८) सूर्य–ना तरी सूर्य. सूर्यप्रतिमंडळ-सूर्यप्रतिमंडल जैसेनि–जैसे सलिल–सलील=पाणी (९०९). एर–परि (९१०) स्वप्नि–स्वप्नी (९११) गुणाचा सग=त्रिगुणाचा सबंध. गुणभोग=गुणाचा उपभोग. हा निर्गुणी लाग बोलो नये=निर्गुणाचे ठिकाणीं त्रिगुणाचा सबंध का उपभोग बोलूसुद्धा नये लाग=संबध, लागाबाधा (९१२).

तें ज्ञेय कसें आहे तें सागतो ऐक तें ह्या आकारानें, आकाररूपानें डोळ्यानीं गोचर म्हणजे स्पष्ट होणें, होणारें हें ज्यामुळें होते असें जें ज्ञेय तें ज्या तऱ्हेने का प्रकारानें व्यापक असतें–आहे–तें त्याचें व्यापकपण केवढें आहे तें सागतो ऐक (८९१)

सर्व मोय जेथे आहे तेथें सवड जशी–मेदानामध्यें जागा जशी–परमात्म्यामध्यें जीवात्मा जसा–आकाशामध्यें शिरकाव जसा–पोकळ जागेमध्यें आधार जसा–सर्व प्रकाशामध्यें संधि जसा–सर्व पोकळीमध्यें प्रसग जसा–असें जें हे अर्जुना, जें अवकाशीं आकाश का चिदाकाश म्हटलेलें तें जसें का वस्त्रामध्यें तंतू होय. हा सर्व देह आहे तेथे मनतंतू धरून जें कांहीं बोलविलें जाणें तेथे काय सर्व देहच ते ह्या जीवनतंतुस व्यापून असत नाहीं ? (८९२)

असें पहा कीं देहरूपी उदक होऊन देहामध्ये बोलणे का जीवित जसें–का उदक होऊन उदकामध्यें रसा जसा दिसतो, असतो अथवा दीप होऊन दिव्यामध्यें जसें तेज असतें, दिसते तेथें दीपनच तें दीप्तपणच एक दीपकत्वानें असलेलें (८९३)

कर्दळ जी – कर्पुरपणानें कापुरामध्यें जसा सुवास सौरभ्य असतो – प्राण हा जसा आपल्या भारास आला तेथें जीवितच मुळीं आरंभभर असें आरंभभाराचें झालें तसें शरीर हें होऊन जें शरीरामध्यें असणें असें जें कांहीं चारणें – आचरणें – चालणें – वागणें – वर्तणें – शरीरीं शरीर असणें असें जें तें कर्मच जसें एक नव्हे का म्हटलेलें । (८९४)

अथवा बहुतेक तें जसें का, हे अर्जुना, सूक्ष्म कण मिळूनच झालेलें जसें सुवर्ण – तेथे सुवर्णच मुळीं सोन्याचा रवा म्हटला जातो, तसें येथें जें कांहीं एक सर्वाठायीं असूनहि सर्व अगामध्यें व्यापून असते – सर्वच्या सर्व अंगामध्यें आहेच आहे – असतें जसें. (८९५)

ते तर एक एक सूक्ष्म कणच जसा रवेपणाच्या महत्त्वाचा (का अहो जीव हाच एक जसा) जरी माजवणच जसें का त्यास तें सूक्ष्मपणच तें उजवणच तेथें आवळून असतें असे असणारे, दिसणारे, होय. कण हा कणास जोडला तरच तें (सोबतीचे, संवगड्याचे, संगीचे) सोनें जसें सोनेपणास आलें – सुवर्ण असें झालें. कणकण मिळूनच मुळीं तें सागडे झालें – सोनें झालें असें होय. व तें आता बांध्यास आलें, गोडीचें झालें, आकारास आलें, बरोबरीचें झालें, चलनाचें झालें, जीवित्वास आले जसें. (८९६)

जरी ओघ हा वाकडा असला तरी पण हें पाणी तर मुळी आपला संबंध घेऊन नसल्यानें, आपलें पाण्याचें सकलपण असें होऊन असल्यानें, तेथें, हे मित्रा, हे सुह्रदा ! अर्जुना ! ह्या लोखंडासी संयोगसंबंध करून असल्यानें तेथें तें लोह का लोखंड न म्हटलें जाऊन तें सबंधाचें, संयोगाचें, विवाहाचें का सकलपणाचें असेंच सबंध चित्ताचें म्हटलें जातें. तेथें वैवाहिक संबंधच जसे चित्ताचे असें सकलपण होऊन आलें. तेथें तें लोह नव्हे असेच होते ना ? (८९७)

घटाच्या आकाराप्रमाणें आकाश हें केव्हाहि घटास वेटाळून असल्याने तें घटाच्या आकारासारखें वाटोळेंच असते, भासते व मठामध्यें तें जसें चौकोनी आहेसें असें होऊन आलेलें दिसतें. मठाच्या परिश्रमाच्या बांधणीनें तें आकाश आभासाचे जसें चाऱ्ही बाजूंनी आविरिलेलें असे तें आयस असेंच दिसतें [ तें नुसतेंच पसरलेलें असें नच चित्ताचें (चित्तच नाहीं) असें नसतें] (८९८)

पण ते सर्व अवकाश हा जसा का – (सर्व प्रकाश हा जसा का) आकाशाचा होऊन नाहीं (संधीचा होऊन नाहीं) असा असल्याने येथे विकारी जरी तो (सर्वव्यापकत्वच एक जरी) विकार असा म्हटला जात नाहीं (तेथे संधीचा का सवडीचा चित्ताचा होत नाहीं). (८९९)

कारण ह्या इंद्रियाना सुख येणारें तें ह्या मनामुळेंच होय – ह्या इंद्रियाना सर्वामध्यें आवडणारें असें जें काहीं आहे ते हे मन होय. येथे इंद्रियासारखें होणें म्हणजेच (तेथीलचे) ते त्याचे आवडते विषय त्यानी त्याना देणें म्हणजे शब्दस्पर्शरूपादि त्याना देण्यानें सुखदु खआदीनी जें नटणें असें जें इंद्रियसामर्थ्य तें गुणास आलें, प्रबळ झालें, गुण ते आभासक असे ते, प्रकाशक व चालक झाले म्हणजे मनच तें सत्वादि गुणच तें झालें असें, हे धनजया, गुणासारखें, गुणसंबंधाचें, गुणसगाचें, वैवाहिक जसे असेंच इंद्रियसामर्थ्य तें आवडणारें होतें – असते – तेथे किरवणी का वाणीच ती गुणास आलेली होय.

मनास हेंच मुख्यत्वेंकरून आवडतें कीं इंद्रियासारखे होणें जें तेच होऊन असावें. (येथें सत्व, रज, तम आदींना इंद्रियेंच ते किंवा तीं असे म्हटलें) (९००)

गुळाची गोडी ही काही नाजुक, गोडस, गोड का गोजिरे अशा बांध्याच्या आकाराची बरोबरी करीत नाही. गोडी ही काही आपल्या बरोबर बाधा घेऊन, आकार घेऊन केव्हाहि असतच मुळीं नाही. त्याप्रमाणें गुण किंवा इंद्रियें ही खरेपणानें का साचेपणाने तेथे असत नाहींत (खरेपणाच्या अभावामुळें पुढें होऊन येणारी अशीं नव्हत – नसतात)

गुळाची गोडी ही बांधा घेऊन असत नाहीं तसे गुण होत. तेथें इंद्रियें हीं मुळीं नाहींतच जशीं. तेथें गुण हेही पण मग सांचपण नसल्यामुळें नाहींतच असें कां नव्हे बरें? (९०१)

हे कपिध्वजा अर्जुना (ज्यांच्या रथावर मारुतीचें चिन्ह आहे अशा हे अर्जुना) असें पाहा कीं दुधाच्या अवस्थेवर तूप हें जसे दुधाच्या रूपांतराचें असें असतें, असें जरी तरी पण तें कांहीं दूध नव्हे. दुधाच्या बालपणावर तूप हें दुधाचा आकार जरी त्या भोंवतीं वेटाळलेला असें क्षीराकार अशा क्षीराकारानें जरी तरी पण तें कांहीं क्षीर का दूध नव्हे जसे [आकार हाच मुळीं भोंवरी (बाळपण) बाकी सर्व कांहीं नवनीतच] (९०२)

त्याप्रमाणें ह्या विकारी अशा देहामध्यें विकार हाच मुळीं तो देह होय असें नव्हे कारण आकार जो आहे त्यासच मुळीं, भोंवरी म्हटलें (बाकी सर्व कांहीं जें तेथें आहे तें)—इतर दुसरें जीवदशेचें वालभर सोनें जसें तें सर्व सोनेंच (जाण) जसें (९०३)

अशा ह्या स्पष्ट व सरळ अशा चातुर्याच्या किंवा नैपुण्याच्या जागा होत. ह्यापासून का ह्याहीहून जें वेगळेंपण किंवा निराळेंपण आहे तें सर्व, हे धनंजया, गुण, गुण किंवा इंद्रियामुळें—किंवा पासूनचें होय असें जाण. (९०४)

नामाचा का रूपाचा संबंध किंवा जाति का क्रिया यांचा भेद किंवा अतर का फरकानें असणें तें मुळीं ह्या आकारासच मुळीं एक भोंवरी का भंवरी म्हटलेलें अशा ह्या आकारासच, भंवरीसच ज्यास नामरूप आहे त्यासच मुळी (हें बोलणें हें) मिष केलेलें का वदंताच का जनापवाद हाच मुळीं तो ह्या भोंवरीसच पुढें घेऊन होत असलेला तेथें वस्तू जी, सद्वस्तू जी नामरूपातीत ब्रह्म त्यास नाहीं. (९०५)

तें वस्तू, तें ब्रह्म, तें ज्ञेय हें काहीं कोठें गुण नव्हे—ह्या गुणाचा व त्याचा कांहींच संबंध नाहीं, पण गुण हे त्याच्या ठायीं त्याच्याच ठिकाणीं आभासतात (त्याच्याचमुळें प्रकाशतात, त्याच्याचमुळें चालक होतात) (९०६)

आणि एवढ्याचमुळें—का एवढ्याचसाठीं भ्यायलेपणाच्या पोटीं, भांबावलेपणाच्या का घाबरेपणाच्या पोटीं असेंच तें येतें (होतें, समजणें केलें जाते, उगवतें, जन्मतें), कीं ते ब्रह्मच मुळी हें सर्व कांहीं करीत आहे —का असतें—(ब्रह्म जें तेच मुळी हें सर्व आपल्या अंगी धरून असते, धारण करून असतें) (९०७)

भ्यायलेला, भांबावलेला जो, तो असें म्हणतो कीं वस्तूचे जे (गुण नव्हे का गुणाचा कांहींच संबंध नाहीं असे जे) तेच मुळी आपलेसे कर ते आपलेसे करणे ते कसें करावें असें विचारशील तर जसें का आकाश हें अगदीं निरभ्र, निळें, शात, सर्वव्यापक त्यावरीलच्या अभ्रासच जसें का धरणें केलें जसें किंवा आरशामुळेंच मुखाचें प्रतिमुख का वदनबिंब किंवा आरसा हा जसा निळा स्वच्छ त्यावर पडलेलें जें प्रतिवदन (बिंब) तेच मुळीं आरशामुळें आपल्या सभोवतीं एक मुखाचे कडेंच करून आहे असें त्यासच जसें का धरिलें असें कर (९०८)

अथवा असें पाहा कीं सूर्यामुळेंच ह्या सूर्यावरच एक प्रतिमंडळ ह्या पाण्यानें धरिलें केलें—रचिलें. सूर्याभोवतीं पाणी जसें कडें करिते किंवा खळेंच एक धरतें, अथवा ह्या सूर्याच्या रश्मीमुळेंच ते मृगजळ जसें होतें, उगवतें, धरिलें जातें, आभासतें जसें (९०९)

त्याप्रमाणें, काहीं एक सबंध नसता—काहींच मुळीं (ह्या गुणांचा) संबंध नसतां ह्या सर्वांना निर्गुण जें तें धरितें, रचितें, करतें पण तें मिथ्या असल्यानें वाया (होय) असेंच जाण. (९१०)

ह्याप्रमाणें निर्गुणानें गुणाना भोगणें होतें (जाणणें, भोगणें, उपभोगणें) तें जसें एकाद्या रंकानें स्वप्नामध्येंच राजा होऊन राज्य करणें जसें का असें होय (९११)

म्हणून गुणांचा संग, संबंध का (निर्गुणानें) गुणांना भोगणें असा हा लाग का संबंध जोडणें हें निर्गुणाच्या ठिकाणीं मुळींसुद्धां बोलूं नये, मुळींसुद्धां असत नाहीं. (९१२)

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥ १५ ॥**

भूतानां बहि. = भूतांचा बाह्यस्पर्श किंवा भूतांच्या बाहेर भूतानां अंत· = भूतांचा अंत का भूतांच्या आंतमध्यें. अचरम् = स्थावर. चरम् = जंगम. सूक्ष्मत्वात् = अतिसूक्ष्मपणामुळें. तत् अविज्ञेयम् = तें जाणलें जात नाहीं, सहज जाणतां येत नाहीं, जाणण्यास अशक्य आहे (विज्ञ = तज्ज्ञ, प्रवीण. अविज्ञ = अविवेकी. विज्ञापन = उपदेश, विनंति) दूरस्थं च = दूर असलेलें, लांबच्या ठिकाणीं असलेलें अंतिके (च तत्) = जवळ असलेलें असें, सन्निध असें

अन्वय—(मद् भक्त एतद् विज्ञाय मद् भावाय उपपद्यते) तत् भूतानां बहिः । तत् भूतानां अंतः च । तत् चरम्) तत् अचरं च । तत् सूक्ष्मत्वात् अविज्ञेयम् । तत् दूरस्थम् । तत् अन्तिके च ।

अर्थ—तें भूताच्या बाहेर आहे – भूताच्या बाहेर आहे तेंही हेंच होय. तें भूताच्या आंत आहे, भूताच्या शेवटीं का आत आहे तेंही हेंच तें (चर) जंगम आहे. तें (अचर) स्थावर आहे. तें सूक्ष्मपणामुळें सहज जाणता येत नाहीं. तें जाणण्यास अशक्य आहे तें दूर असलेलें असें आहे व तें अगदीं जवळ असलेलें असें व्यापकच जसें आहे (असें ते ब्रह्म जाणल्यानें माझा भक्त हा, माझ्या रूपाप्रत येऊं लागतो, भज्य, भजक, भक्त असा सबंध सुटून तो मीच होतो असा).

जे चरांचर भूतां— । माजीं असे पाण्डुसुता ।
नाना वन्हि उष्णता । अभेद जैसी ॥ ९१३ ॥

तैसेनि अविनाश भावें । जे सूक्ष्म दशे आघवे ।
व्यापूनि असे ते जाणावे । ज्ञेय पथ ॥ ९१४ ॥

जे एक आंत बाहेरी । जे एक जवळी दूरी ।
जे एक वांचूनि परी । दुजी नाहीं ॥ ९१५ ॥

क्षीरसागरीची गोडी । माजी बहू थडिये थोडी ।
हे नाही तया परवडी । जे पूर्ण गा ॥ ९१६ ॥

स्वेद जाति प्रभृति । जे वेगळाल्या भूती (ति) ।
जयाचिये अनुस्युति । खोमणे नाहीं ॥ ९१७ ॥

प श्रोतृ मुख टिळका । घट सहस्रां अनेका ।
माजी बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवी ॥ ९१८ ॥

नाना लवण कणाच्या (चिये । चे ।) राशीं । क्षारता एक जैसी ।
का कोडी एक उसी । एक गोडी ॥ ९१९ ॥

चराचर – चराचरी. अभेद – अभेदे (९१३) जवळ – जवळी (९१५). माजी = मध्यभागीं. हे नाहीं तया परवडी – हे नाही तयापरी परवडी. तया – तयापरी = त्याप्रमाणें, त्या रीतीनें (९१६) स्वेदजाति – स्वेदज. अनुस्युति = व्याप्तीला अखडतेस. खोमणे = हानि, न्यूनता, कमीपणा (९१७). श्रोतेमुख (मुख्य) टिळका – श्रोतृ मुख टिळका = कानाला मुख हेंच श्रेष्ठ आहे ऐकण्यामध्यें–श्रोत्रेंद्रियास मुख हेंच दीपन

करतें म्हणून मुख हेंच मुख्य होय ( श्रुताधित=शास्त्र पढलेला ) ( ९१८ ). कणाचिया – कणाचिये. एकीच – एक कोडी एक उसी=कोट्यवधी उगात. एकीचि – एक – एकचि ( ९१९ ).

हे पाण्डवा ! ह्या स्थावरजंगम सृष्टीमध्यें जी भूतें आहेत – चर अचर अशीं जीं भूतें – त्यामध्यें जें आहेच आहे असें ते असून अभेदपणें आहे, जसें अनेक प्रकारानीं हा अग्नि असला तरी उष्णता म्हणून जी आहे ती अभेद म्हणजे भेदरहित अशी एकच होय (९१३)

त्याप्रमाणें नाशरहित असणें असा जो अविनाश भाव जो अतिसूक्ष्मपणें हें सर्व कांहीं व्यापून आहे तोच मुळीं किंवा तेच मुळी जें सूक्ष्मदशेनें असतें तें ज्ञेय आहे असें जाण – तें ज्ञेय जाणावें. (९१४)

जें एकच एक आतही आहे व बाहेरही आहे, जें एकच तें जवळ असून दूरही पण आहे, जें एकच असून त्यास दुसरेपणाची प्रमाणें नाहींत जे एक आहे त्या एकावांचून त्याचे ठायी दुसरेपणानें दुसरेपण हें मुळीच नाहीं – दुजी परीच नाहीं कारण जें एक आहे तेच तेथीलच्या सर्वपरी ( दुसरेपणाच्या तऱ्हा ) ह्याही हें एकच होऊन असलेलें (९१५)

क्षीरसागरामध्यें जी गोडी आहे ती गोडी मध्यभागी पुष्कळशी का काठी म्हणजे तेथीलच्या तीरास थोडी आहे असें म्हणणें केलें तर तेथे त्याची परवडच झाली असें होईल म्हणून जें पूर्ण आहे तें सर्वतोपरी गोडच आहे. त्यास येथें थोडेंसें गोड व तिथेहून जास्त गोड असें होणें नाहीं – तें पूर्णपणें जे आहे तें क्षीरसागराप्रमाणें सर्वतोपरी गोड असेंच होय (९१६)

स्वेदज आदिकरून ज्या जाति आहेत – त्या स्वेदज, अंडज इत्यादि ज्या जाति म्हणजे प्रकार ह्या वेगळाल्या भूतामध्यें आहेत तेथे त्याची जी अनुस्युति म्हणजे अखंडता का व्याप्ति तेथे तर खोमणें म्हणजे न्यूनता का कमीपणा अथवा हानि ही नाहींच (९१७)

सहस्रग घटामध्ये, भाड्यामध्यें चंद्रिका ही आत बिंबूनही पण ती घटातून बाहेर दिसणारी होत नाहीं तेथे ते घट म्हणजे जसे का श्रोतृगण हेच त्या मुखास टिळा लावणारे जसे – प्रकाश करणारे जसे. किंवा श्रोत्रेंद्रिय हेच मुळीं मुख्यत्वेंकरून त्या मुखास दीपन करणारें होय तेथे जें दीपन केलेलें ते घटातून – देहातून बाहेर दिसणारें होत नाहीं

ऐकणे हेच मुखदीपन जसे दीपनमुख म्हणजे ऐकणे हेच तेथे ऐकणारे – ऐकणारें इंद्रिय हेच मुखास प्रकाशित करणारें – मुखप्रकाश करणारें जें ते काहीं सर्व देहातून बाहेर दिसणारें होत नाहीं चंद्रप्रभा जरी घटाच्या आत पडलेलें प्रतिबिंब ते बाहेर मुळीच प्रभा, प्रकाश करीत नाहीं येथे श्रोते हेच मुखश्रेष्ठ का मुखदीपन होत – त्यानीच मुळी त्या मुखास टिळा लावून ते दीपन, उद्दीपन, श्रेष्ठपण, शेजारधर्म, अलंकारित करणे जें तेथे गंधाचा टिळाच कपाळाला लाविला असें एक सुभगत्व दिलेले तेथे अनेक जे भेद, पुष्पहार किंवा अश्वपरीक्षा भेद हे महत्त्व घेऊन असलेलें ( येथे तिलक ह्या शब्दाचा अर्थ शेजारधर्म, श्रेष्ठपण कसें नटते ते किंवा टिळाच एक अलंकार ह्या कपाळास लावून तेथील दिव्य पाहूं केलें ) ( मस्तक आख्य असें जें ब्रह्माग्र, डोकें का मस्तक तेथे मस्तकावरील कुरळे म्हणजे वाकडे केस – किंवा ती सरस्वती नदीच एक – जिनें ह्या शब्दाचा अंत पाहिला, का शब्दाचे शिखर का डोकेंच मुळी जें तेंच जसें का ह्या मदनानें धनुष्यानें गुण लाविल्यामुळें कसकसें ते वेगाचें का ओघाचे करते तें पाहाणें केलें होणारें ). ( २१५–१० )

[ मुख्य=मुख आख्य ( आखे लेखे )=सर्व प्रकारें ] (९१८)

सूक्ष्म सूक्ष्म असे जे मिठाचे कण त्याची केलेली एक राशी का रास का ढीगच एक, तेथें क्षारता ही का खारटपण हे एकच होय तेथे खारटपणास काय काहीं फरक का निरनिराळेंपण हें नाहीं जसें, किंवा कोट्यवधि

ऊंस घेतले तर त्यामधील जी गोडी ती एकच – तेथील गोडपण हें गोड असेंच होय – हें गोडपण ( एका उसाचें ) हें कांहीं निराळें व दुसरें गोडपण ( दुसऱ्या उसाचें ) म्हणून जें आहे तें कांहीं निराळें असें नाहीं – उसाच्या कोटी घेतल्या तरी ती गोडी ही तेथें एकच होय, जसें (९१९)

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

अविभक्तम् = पृथक् नाहीं असें, अलग नव्हे असें. विभक्तम् = पृथक् असलेलें असें, अलग म्हणजे निराळें आहे असें. स्थितम् = असतें, असलेलें, निश्चित, अढळ, उभा असलेला, राहिलेला भूत = ( भूतात्मा ) शरीर, भूतयोग्य, सत्य भूतधात्री = पृथ्वी. भूतपूर्व = गतकाळ भूतभावन = सृष्टिकर्ता. भूतळ = पृथ्वीची सपाटी. भूतभर्तृ = विष्णुरूपानें भर्तृ = धनी ( पालनकर्ता ), आश्रयदाता, नवरा ( भर्तृदारक = राजपुत्र ). ज्ञेय = जाणण्यास योग्य असें ग्रस = मिळणें, खाणें, हरण करणे. ईषणा = आसक्ति ( स्त्रीपुत्र इत्यादि विषयींची ). ग्रसिष्णु = रुद्ररूपानें ग्रास करणारें प्रभविष्णु = शक्तिमान्, प्रतापी [ प्रभ – प्रभा – प्रकाश, कांति ( आसक्ति ) ] ( ब्रह्मरूपानें )

अन्वय—तत् ज्ञेयं भूतेषु अविभक्तम् । तत् ज्ञेयं ( किन्तु ) विभक्तम् इव च स्थितम् । तत् ज्ञेयं भूतभर्तृ च । भूतग्रसिष्णु । भूतप्रभविष्णु । च ।

अर्थ—ते जाणण्यास योग्य असें ज्ञेय, तें अखंड असें आहे – तें पृथक् किंवा अलग असें नाहीं पण पृथक् असलेलें असें ( पृथक् आहे असें अलग म्हणजे निराळें आहे असें अढळपणे राहिलेलें असें ) आहे. तें ( विष्णुरूपानें ) भूताचे आश्रयदाते रक्षणकर्ते ( धारणपोषण करणारें ) आहे, ते ( रुद्ररूपानें ) भूताची मिळणी ( तसेंच भूताचें हरण करणारें ) करणाऱ्या आसक्तीचें आहे, तसेंच ते ब्रह्मरूपाने सर्वांना उत्पन्न करणारें असें शक्तिमान् असून प्रतापी आहे ( मिळणी होताना तीं भूतें जशी का एकमेकाना हरण करीत आहेत, का व्यापीत आहेत, का ग्रासीत आहेत असें दिसतें ) ( विभक्त म्हणजे वेगवेगळया सर्व भूतांत एकच अविभक्त व अव्यय भाव – अविनाशीभाव – आहे हें ज्या ज्ञानाने समजते ते ज्ञान सात्विक होय – जाण – समज [ १८ अ २० श्लो ] ) (१६)

तैसे अनेकी भूतजाती । जे आहे एकी व्याप्ती ।
विश्वकार्या सुमती । कारण जे गा ॥ ९२० ॥

म्हणोनि हा भूताकारु । जेथौनि तेचि या आधारू ।
कल्लोळा सागरू । जयापरी ॥ ९२१ ॥

बाल्यादि तिन्ही वयसी । पै काया एकचि जैसी ।
तैसे आदिस्थिती ग्रासी । अखंड जे ॥ ९२२ ॥

सायं प्रातर्मध्यान्ह । होता जाता दिन मान ।
जैसे कां गगन । पालटेना ॥ ९२३ ॥

अगा सृष्टिवेळे प्रियोत्तमा । जया नांव म्हणती ब्रह्मा ।
व्याप्ती जे विष्णु नामा । पात्र जाहले ॥ ९२४ ॥

मग आकारू हा हारपे । तेव्हां चंद्र जे म्हणिपे ।
तेही गुणत्रय जेव्हां लोपे । तैं जें शून्य ॥ ९२५ ॥

**नभाचें शून्यत्व गिळून । गुणत्रयातें नुरवून ।**
**(तें) शून्य ते महाशून्य । श्रुतिवचन सम्मत ॥ ९२६ ॥**

एकी – एकीचि (९२०) भूताकारु – भूताकार. जेथौनि – जेथूनि या – तया. आधारू – आधार. कल्लोळसागरू - कल्लोळा सागरू जयापरी – जियापरी (९२१) पै –. स्थिति = अवस्था. स्थिरता, मर्यादा, पूर्वस्थितीला जाणें जें – व्याप्ती (समयी) ग्रासी = लयाचे करणारी करिते, मिळवणी, मिळणी करणारे (९२२). सृष्टिवेळे – सृष्टिउत्पत्तीचे वेळीं प्रियोत्तमा = प्रियकरा अर्जुना. नांव – नाम ब्रह्मा = ब्रह्मदेव व्याप्ति जे = सर्वत्र स्थितिसमयीं ईश्वराचें ऐश्वर्य, व्यापणें विष्णुनामा = विश्वाच्या स्थितिसमयीं विष्णुनामास जाले – जाहाले (९२४) आकारु – आकार = विश्वाकार हारपे = नाहींसा होतो चंद्र – रुद्र (चंद्र = चंद्रमा, कापुर, पाणी, सोनें, मोतीं, आनंद देणारा रुद्र = शिव, शिवगण, अकरा) गुणत्रय = जेव्हा लोपे सत्वरज-तमादि गुणत्रयाचा लय होतो तेव्हां त्यापासूनच रुद्र (रुद्र – आक्रंदन करणारा, रुदन देणारा) शंकर. शून्य = अभाव, तेव्हां जें उरतें तें शून्य कोणताहि धर्म ज्यास नाहीं असें (९२५) शून्यत्व = रिकामें असें, निर्जन असें आकाश नुरवून – नरऊन शून्य = आकाश, अभाव, धर्मरहित महाशून्य = ब्रह्म, ज्ञेय. श्रुति = वेद. संमत – सम्मत = रुकार, पसंती

[ 'श' कार = राजाच्या (अविवाहित स्त्रीचा) रखेलीचा भाऊ ].

त्याप्रमाणें अनेक भूतप्रकारामध्यें जें व्यापून आहेच आहे असें अविनाशी, अविभक्त का अव्यय तत्त्व तेंच मुळीं ह्या विश्वरचनेस कारण होतें जें ह्या विश्वउत्पत्तीस, रचनेस, घटनेस कारण आहे तेच ह्या अनेक भूतजातींमध्यें जें व्यापून नेहमीं आहेच आहे असे अव्यय अविनाशी तत्त्व (तेंच ब्रह्म किंवा ज्ञेय होय). (९२०)

असें आहे म्हणून जेथून ह्या भूताना आकार, स्थिति का घटना का रचना येते तोच मुळी ह्या विश्वास आश्रय, आधार किंवा स्थान होय. ज्याप्रमाणें कल्लोळास सागर हा – सागरामुळेंच कल्लोळ हे उगवणारे जसे – सागर हाच कल्लोळास स्थान होय, आधार होय जसा. (९२१)

बाल्य, तारुण्य, वार्धक्य अशा ह्या तिन्ही वयोमानास जशी एकच काया ती – एक शरीर ते – एक देहच ते – तेथे काया ही काहीं मुळींच जशी बदलली, का त्यागिली जात नाहीं, एकच अथपासून इतिपर्यंत असते त्याप्रमाणें मुळापासून मध्यें, स्थितिमध्यें व लयामध्ये जें अखड असें, मुळापासून तो स्थिति व लया अखेर जें एकच अखंड असें असतें ते ज्ञेय होय (९२२)

सायंकाळीं, प्रातर म्हणजे सकाळ, तसेंच मध्यान्हकाळ म्हणजे दुपार असे जे दिवस परिमाणाचे तेथें गगन हें केव्हाहि मुळींच पालटत नाही (निराळें दुसरें असें होत नाही ते एकच तें गगन असें असतें) तसें (जें ह्या काळमानानें बदलत नाहीं तें ज्ञेय होय). (९२३)

अगा हे प्रियोत्तमा अर्जुना, ज्या सृष्टिउत्पत्तीचे वेळेस ब्रह्मा किंवा ब्रह्मदेव, ब्रह्मदेव स्थिति, ब्रह्मानें व्यापिलेलें, म्हटलेलें (म्हणतात) – जें ह्या विश्वाच्या स्थिति, आकार अवस्थेसमयीं विष्णु (भगवान्, श्रीनारायण, लक्ष्मीपति) ह्या नांवास योग्य झालेलें (होतें) (९२४)

मग जेव्हा हा विश्वाचा आकार नाहींसा होतो तेव्हा जे (चंद्र) 'रुद्र' असें म्हटलें जातें असे ते तिन्ही गुण जेव्हां लोप पावतात तेव्हां जें उरतें तें शून्य होय शून्य असें म्हणण्याचें कारण कीं तेव्हां कोणताहि धर्म ज्यास असत नाही असें तें जें (९२५)

आतां येथें त्या शून्यानें नभाचेंही शून्यत्व गिळलेलें व तिन्ही गुण जे तेही पण उरवूं दिले नाहींत व तेव्हां जें शून्य होतें त्यास महाशून्य म्हणतात असें हें वेदवचनांनीं रुकार दिलेलें – त्यांनीं संमतीस घेतलेलें असें आहे. (९२६)

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ॥ १७ ॥**

ज्योतिषाम् = आकाशमंडळामधील ग्रहगण जे त्यामध्यें – तत् म्हणजे ज्ञेय ब्रह्म होय – तें याच्या-पलीकडील असें 'परं' म्हटलें आहे – म्हणून 'परं' ह्या शब्दाचा अर्थच मुळी जीवनज्योत – जीवनज्योति – अज्ञानतेच्या पलीकडील जें 'परं' म्हणजे श्रेष्ठ असें – तें परम् – ज्ञान होय – ज्ञेय होय – सर्वांच्या हृदयामध्यें अधिष्ठित असें ज्योतिम् = आकाशातील तेजोगोल – (नेत्रेंद्रिय) ज्योति = तेज तमसः परम् = अंधकारापर म्हणजे पलीकडील, अज्ञानापर म्हणजे पलीकडचें, श्रेष्ठ असें ब्रह्म (तमस म्हणजे अंधकार किंवा तमोगुण, मोह, पाप, शोक) उच्यते = म्हटलें आहे, म्हटले जातें, म्हणतात. ज्ञानम् = बोध, जाणीव, बुद्धि ज्ञेयम् = जाणण्यास योग्य 'ब्रह्म'. ज्ञानगम्यम् = ज्ञानाने जें होतां येतें, ज्ञानानें जें जाणलें जातें, ज्ञानानें ज्यात जातां येतें, ज्ञानानें ज्यात प्रवेश होतो असें हृदि = हृदयाच्या ठिकाणीं सर्वस्य = सर्वांच्या, वस्तुमात्रांच्या. विष्ठितम् = वस्ती केलेलें आहे

अन्वय—तत् (ज्ञेयं – ब्रह्म) ज्योतिषाम् अपि ज्योतिः । तत् उच्यते तमस परम् । तत् ज्ञानं । तत् ज्ञेयम् । तत् ज्ञानगम्यम् । सर्वस्य हृदि विष्ठितम् (अधिष्ठितम्) ।

अर्थ – तें ज्ञेय आकाशातील तेजोगोलाचेंही तेज होय तें ज्ञेय ब्रह्म अंधकारापलीकडील परं म्हणजे श्रेष्ठ ब्रह्म होय तें ज्ञेय ब्रह्म ज्ञान होय. तें ज्ञेय होय तें ज्ञानानेंच फक्त जाणलें जाणारें असें आहे व तें प्रत्येक वस्तूच्या हृदयामध्यें वास करून आहे

**जे अग्नीचे दीपन । जे चंद्राचे जीवन ।**
**सूर्याचे नयन । देखती जेणे ॥ ९२७ ॥**

**जयाचेनि उजियेडे । तारागण उभडे ।**
**महातेज सुरवाडे । जेणे राहाटे ॥ ९२८ ॥**

**जे आदीची आदी । जे वृद्धीची वृद्धी ।**
**जे बुद्धिची बुद्धि । जीवाचा जीव ॥ ९२९ ॥**

**जे मनाचे मन । जे नेत्राचे नयन ।**
**जे कानाचे कान । वाचेसी वाचा ॥ ९३० ॥**

**जे प्राणाचा प्राण । जे गतीचे चरण ।**
**क्रियेचे कर्तेपण । जयाचेनि ॥ ९३१ ॥**

**आकारु जेणे आकारे । विस्तारु जेणे विस्तारे ।**
**संहारु जेणे संहरे । पांडुकुमरा ॥ ९३२ ॥**

**जे मेदिनीची मेदिनी । जे पाणि पिऊनि असे पाणी ।**
**तेजा दिवेलावणी । जेणे तेजे ॥ ९३३ ॥**

**जे वायुचा श्वासोच्छ्वासु । जे गगनाचा अवकाशु ।**
**हे असो अवघाचि आभासु । अभासे जेणे ॥ ९३४ ॥**

**किंबहुना पाण्डवा। जे अघवेंचि असे आघवा।**
**जेथ नाही रिगावा। द्वैतभावासी ॥ ९३५ ॥**

**जे देखिलियाचि सवे। द्रष्टा दृश्य हे आघवे।**
**एक वाट कालवे। सामरस्ये ॥ ९३६ ॥**

**मग तेंचि ज्ञेय ज्ञान। ज्ञाता ज्ञेय हन।**
**ज्ञाने गमिते स्थान। तेही तेंचि ॥ ९३७ ॥**

**जैसे सरलिया लेख। आंख होती एक।**
**तैसे साध्यसाधनादिक। ऐक्याते ये ॥ ९३८ ॥**

**अर्जुना जिये ठाई। न सरे द्वैताची वही।**
**हे असो जे हृदयी। सर्वांच्या असे ॥ ९३९ ॥**

जयाचेनि उजियेडे – जयाचे उजिवडे उभडे = उघडे जेणे राहाटे – राहाटे जेणे (९१८) जे आदीची आदी – आदीची जे आदी जे बुद्धिची बुद्धि – बुद्धिची जे बुद्धि (९२९) आकारु – आकार विस्तारु – विस्तार सहारु – संहार संहरे – सहारे (९३२) अवघाचि – अघवाचि. आभासु – भासु (९३३) अघवेंचि = सर्व पूर्ण आघवा – पूर्ण रिगावा – प्रवेश द्वैतभावासी = द्वैतास, दुसरेपणास (९३५) द्रष्टादृश्य – दृश्यद्रष्टा एकवाट – एकवट सामरस्ये – ऐक्यतेनें (९३६) ज्ञाने – जेणे. गमिते – गमिजे = प्राप्त होते (९३७) लेख = गणना, हिशोब ऐक्याते – ऐक्यासि (९३८) वही – लिही, संबंध, लेख, लेखा न सरे द्वैताची वही = द्वैताचा व्यवहार नाहींसा करता येत नाहीं लिह = चाखणें, चाखुन पाहण्याची क्रिया – अनुभव पाहण्याची क्रिया जेथे घडूं शकत नाहीं – द्वैतच एक सारें अनुभवास येणारें असें जेथें

जें अग्नीचें चेतन (चेतविणें) होय, जें चन्द्राचे जीवन रहस्य – (सजीव करणारें असें) जीवित – व ज्यायोगें सूर्याचेही डोळे पाहाणारे होतात असें जें – सूर्याच्या डोळयाना ज्यायोगें दृष्टि येते असें जे (९२७)

ज्याच्या उजेडाने नक्षत्रादि तारागण हे उघडले जातात, ज्याचा उजिवडा हा तारागणाना – नक्षत्रगणांना उमाळण्यास आणतो, तारागण हे ज्यायोगें झऱ्याप्रमाणें वाहूं लागतात, महातेज हें अनुकूल होऊन ज्यामुळें राहाटते असें जें – राहाटूं लागते – तेज सुखानें ज्या योगे, असें जे (९२८)

जें आदिकारणाचेंही कारण – वृद्धीची जें वृद्धि – उन्नति, उत्कर्ष का सुखाचेंही जें सुख – बुद्धीची जें बुद्धि – जगताचेंही जें जगत् – जीवाचाही जीव जें – ज्ञानाचेही ज्ञान, विचाराचाही विचार – अंतःकरण शक्तीची जी शक्ति – आत्म्याचाही आत्मा – प्राणाचाही प्राण. (९२९)

जें मनाचेंही मन – जें विचाराचाही विचार – जें मानण्याचाही सन्मान – जें ऐकण्याचेंही ऐकणें – जें नेत्राचे नयन – जें कानाचे कान – जें वाचेची वाचा – डोळयाचें पाहाणें – सन्मार्गाचा प्रेरक, नायक. (९३०)

प्राणाचाही प्राण जें, एकंदर गति जी आहे तिचें तें पाऊल जाण, तिचें तें 'चरण' होय, व ज्याच्यामुळेंच सर्व क्रिया म्हणून जी मुळी – तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान म्हणून जें आहे त्याचें जें ते कर्तेपण होऊन आहे – असतें. (९३१)

ज्याच्यामुळें आकार हा आकारास येतो – आकाराचा होतो – ह्या जगाचा जो सर्व विस्तार आहे तो ज्याच्या सत्तेनें विस्तारला होतो – प्रसरण घेऊन असतो – बिछाईला जातो – एकंदर जो संहार म्हणजे लय, हरण केलें जाणें, हें ज्याच्या सान्निध्यानें होतें का आवरिलें जातें, हे पाण्डुकुमरा, असें तें ब्रह्म होय (९३२)

जें पृथ्वीचीही पृथ्वी, जें स्थूलपणाचे का स्थूल शरीराचे स्थौल्य किंवा जाड मज्जा, जें पाणी पिऊन पाणीरूपानें ठरते, असतें—पाणी किंवा तेज होय असें म्हटलें जातें, व तेजासही पण ज्याच्या योगेंकरून—तेजेंकरून—एका ज्योतीचें केलें होतें असें जें तें ज्ञेय ब्रह्म होय (९३३)

जें वायूचेंही श्वसन—वायु हाच मुळीं ज्याच्यायोगें श्वासोच्छ्वास करूं लागतो—गगन जें सर्व अवकाश अशा त्या गगनाचाही जें अवकाश असें हें असो पण जें सर्व भासास—भासमात्रास आभासाचें करतें असें तें ज्ञेय ब्रह्म होय (९३४)

बहुत काय ( लिहिणे का ) सांगावें पण हे पाण्डवा, जें सर्व पूर्णामध्येंही पूर्णपणानें असते असें तें जेथें द्वैत किंवा दुजाभावाचा मुळीच रिगावा होत नाहीं असे तें ज्ञेय ब्रह्म होय. (९३५)

जें पाहिल्याबरोबर द्रष्टा म्हणजे पाहाणारा व पाहिलेले दृश्य जें तें सर्व एकवार म्हणजे ऐक्याचें होऊन समरसलें होतें—ऐक्यास येतें असे तें ज्ञेय ब्रह्म होय. (९३६)

असें तें जें द्रष्टा व दृश्य ह्यांचें ऐक्यभावानें समरसणें तेच मग ज्ञान ह्या संज्ञेस येते—तेंच ज्ञान होतें—तेंच ज्ञान होय—ज्ञाता—जाणणारा व ज्ञेय—जाणण्यास योग्य असें जें व ज्या योगें व का ज्या ज्ञानानें जाणण्याचें स्थान प्राप्त होतें तेंही पण तेंच म्हणजे ज्ञेय होय (९३७)

ज्याप्रमाणें लेखणें, गणणें ह्या कर्माचे संपलें म्हणजे तेथे काहींच उरत नाहीं—तेथे आख म्हणजे रेघही उरत नाहीं तेथें एकच एक तें ज्ञेय ब्रह्म उरतें ( तेथे सर्वपणे ऐक्यच त्या ब्रह्माशी होतें ) त्याप्रमाणें साध्य का साधनादि प्रकार—साध्यवस्तू व साधन जें देह त्या दोहोचे समरसपणे ऐक्यच होतें—ती दोन्ही ऐक्यास येतात ( असें तें ज्ञेय ब्रह्म होय ) (९३८)

बा, रे अर्जुना! ज्या ठिकाणीं द्वैताचें महत्त्व हें मुळीच महत्त्व घेऊन असत नाहीं—द्वैतभावानें लिपी, लिही, वही, चाखणें, स्वाद हा मुळीसुद्धा नाहीं—तेथे द्वैतभावाची उपमा हीच मुळीं तें ऐक्य झाल्यानें मुळींसुद्धा नाहीं—असें हें असो—असें ते सर्वांच्या हृदयप्रातीं वस्ती करून असते—सर्व वस्तूंच्या हृदयी ते वास्तव्यानें असतें असें तें ज्ञेय ब्रह्म होय (९३९)

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद् विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥**

उक्तम्=बोलिलें समासत.=संग्रहानें, मेटीनें, दोन पदाची जुळणी जी मेटच एक. विज्ञाय=चतुर होऊन, प्रवीण किंवा निपुण होऊन, ज्ञानी होऊन. भावाय=मजजवळ, माझ्या स्वभावास, गोडीस (स्वभाव, अभिप्राय, प्रीति, आत्मा, विलास). उपपद्यते=योग्य होतो, भावानें सिद्ध होतो, जवळच्या शब्दास येतो—पदवीचा होतो, भूषण होतो

अन्वय—इति । क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं च । समासतः उक्तम् । एतत् विज्ञाय । मत् भक्त । मत् भावाय । उपपद्यते ।

अर्थ—असें हें क्षेत्र सांगितलें त्याचप्रमाणें ज्ञानही पण, तसेंच ज्ञेयही संग्रहानें, मेटीनें सांगितलें. आत्मपर जो भक्त तो ह्यात चतुर होऊन, नैपुण्य पावल्यानें माझ्याजवळ येऊन मीच होतो—माझ्या स्वभावाचा, योग्यतेचा, पदवीचा सिद्ध होतो. (१८)

**एवं तुजपुढां । आदि क्षेत्र सुहाडा ।**
**दाविले फाडोवाडा । विवंचुनी ॥ ९४० ॥**

तैसेचि क्षेत्रांपाठीं। जैसेनि देखसी दिठी।
तैसे ज्ञानही कीरीटी। सांगितले ॥ ९४१ ॥

अज्ञानाही कवतुके। रूप केले निके।
जंव आयणी तुझी टेके। पुरे म्हणो ॥ ९४२ ॥

आणि आता हे रोकडे। उपपत्तीचेनि पवाडे।
निरूपिले उघडे। ज्ञेय पै गा ॥ ९४३ ॥

हे आवघीचि विवंचना। बुद्धि भरोनि अर्जुना।
मत्सिद्धि भावना। माझिया येसी ॥ ९४४ ॥

देहादी परिग्रही। संन्यासु करुनि जिहीं।
जीव माझ्या ठाईं। वृत्तिक केला ॥ ९४५ ॥

ते मातें कीरीटी। हेंचि जाणोनिया सेवटीं।
आपणयां सांटोवाटी। मीचि होती ॥ ९४६ ॥

मीचि होती परी। हे मुख्य गा अवधारी।
सोहोपी सर्वांपरी। रचिली आम्ही ॥ ९४७ ॥

कडा पायरी कीजे। निराळी माच बांधिजे।
अथांवी सुईजे। तरी जैसी ॥ ९४८ ॥

परवी अवघेचि आत्मा। हे सांगो जरी वीरोत्तमा।
तरि तुझिया मनोधर्मा। मिळैल ना ॥ ९४९ ॥

म्हणौनि एकचि संचले। चतुर्धा आम्ही केले।
जे आदळपण देखिले। तुझिये प्रज्ञे ॥ ९५० ॥

पैं बाळ जैं जेवविजे। तै घांस एक विसा ठाईं कीजे।
तैसे एकचि हे चतुर्धाजे। कथिले आम्ही ॥ ९५१ ॥

एक क्षेत्र एक ज्ञान। एक ज्ञेय एक अज्ञान।
हे भाग केले अवधान। जाणोनि तुझे ॥ ९५२ ॥

आणि ऐसेनही पार्था। जरी हा अभिप्रावो तुज हातां।
न ये तरी हे व्यवस्था। एक वेळ सांगो ॥ ९५३ ॥

आतां चौ ठाईं न करूं। एकही म्हणोनि न सरूं।
आत्मानात्मया धरुं। सरिसाचि पाड ॥ ९५४ ॥

परी तुवां इतुके करावे। मागो (मागैन) ते आम्हा देयावे।
जे कानाचे नांव ठेवावे। आपणयाते (आपणा) पैं गा ॥ ९५५ ॥

या श्रीकृष्णाचिया बोला। पार्थ रोमांचित जाहाला।
तेथ देवो म्हणती उगला (भला)। उचंबळे ना ॥ ९५६ ॥

ऐसेनि तो येतां वेगु। धरूनि म्हणे श्रीरंगु।
प्रकृतिपुरुष विभागु। परिसे सांगो ॥ ९५७ ॥

एवं–एवं हे. आदि क्षेत्र–क्षेत्र हेंच आदि असे–शरीर हेंच आरंभ होय. सुहाडा=सख्या. फाडोवाडा=स्पष्ट, वेगवेगळें करून. विवंचूनी=विवरण करून (९४०). ते–तैसे (९४१) कवतुके–कौतुके. निके=हितकारक. आयणी=बुद्धि. टेके=दमे (९४२). उपपत्तीचेनि=विचाराच्या युक्तीनें–विस्तारानें (९४३). आवधीची–अघवीची. मत्सिद्धिभावना माझिया येसी=माझ्या भावनेनें–मत्सिद्धि येते–माझ्या स्वरूपाला येतात (९४४). देहादी परिग्रही संन्यासु=देहादि परिवाराचा त्याग करून. करूनि–करूनिया. वृत्तिक=वतनदार (९४५). आपणपया साटोवाटी=आपल्या सर्वस्वाच्या मोबदल्यानें (९४६) परी=प्रकार (९४७). कडा पायरी कीजे=उंच जागीं चढावयाचें असल्यास पायरी करावी लागते. निराळी माच बाधिजे=अंतराळांत उंच जागी असल्यास माच म्हणजे दादर बाधतात. अथावी सुईजे तरी जैसी=खोल पाण्यात जावयाचें तर नौकेचा आश्रय करितात (९४८). सांगो–सागोनि (जरी असिजे) तरी–परी. मनोधर्मा मिळैलना=मनानें ग्रहण केलें जात नाहीं, मनास समाधान प्राप्त होत नाहीं, मन तृप्त होत नाहीं, मनाचा चंचल स्वभाव हा काहीं आत्मा नाहीं म्हणून, मनास समजत नाहीं असें होते म्हणून (९४९). आदळपण–अदळपणें=(अदळपण=घडोघडीं पडणें जें) अयोग्यता, मंदत्व (९५०) घास–घास एक. एक–एकचि हे (९५१). भाग–हे भाग (९५२) न सरूं=न मानूं (९५४) इतुले–येतुले मागेन–मागो देयावे–देआवे आपण पैगा–आपणयाते (९५५). देवो–देव. उगला–भला उचंबळे ना=उचंबळूं नको, स्थिर ऐस (पार्थ), उचंबळून जाणत नाहीं काय? (९५६).

याप्रमाणें तुजपुढें सर्वाचें आदि असें हें क्षेत्र, हे सखया अर्जुना, वेगवेगळेपणानें स्पष्ट करून व त्याचें विवरण करून दाखविलें–सांगितलें. (९४०)

त्याचप्रमाणें ह्या क्षेत्रामध्यें पाहाण्याची दृष्टि–क्षेत्राबरोबर चालणारा जसा एक डोळा–ज्या योगें येईल असें तें ज्ञानही पण तुजला सांगितलें. (९४१)

एका कौतुकानेंच जसें ह्या अज्ञानासही हितकर होईल असेंच एक रूप त्या अज्ञानास देऊन सांगण्याचें केलें; तें इतकें कीं तेथें तुझी बुद्धि ही थकून जाऊन तिनें पुरेच आता असें म्हणूं केलें जसें कां (९४२)

व आता हें तर अगदीं रोखठोक असें रोकडें का नगद असेंच, ह्या युक्तीच्या विस्तारास महत्त्व देऊन तें ज्ञेय अगदीं उघडें करून निरूपणास घेतलें आहे. (९४३)

अशी जी ही सर्व एक विवंचना, काळजीच एक लागलेली जशी–ही बुद्धीनें भरून घेऊन–बुद्धि हीच तेथें ह्या मी होण्याच्या भावनेनें भरभरून, तरतरून भरास येऊन असावी तरच माझ्या स्वरूपाला येणें होतें –आत्मसिद्धीची भावनेनें बुद्धि ही उभरून आल्यानें तेथे ती जी ह्या मनास लागलेली विवंचना ती सिद्धीप्रत येऊन मीच ते होतात–बुद्धीने विवरून पाहून माझिया भावनाच मुळीं आत्मसिद्धीची होते. आत्मभावना आत्म्यासच प्रकाशते–तेथें आत्माच होणें होते. (९४४)

हा जो देहाचा परिवार आहे–त्या सर्वांचाही त्यांनीं संन्यास केला व जीवच मुळीं माझ्या ठायीं वतनदार करून ठेविला. [संन्यास=मन, इंद्रियें व शरीर या द्वारां होणाऱ्या सर्व कर्मांच्या कर्तेपणाचा (त्याग प्राप्त होणें जें) अभिमान नसणें जें, त्याग करणें जें]. (९४५)

असें तें वृत्तीचें वतनदारपण व कर्मांच्या कर्तृत्वाचा अभिमान नसणें, का त्याग करणें असा त्या देहाचा परिवार ज्यानीं वागविला ते हेच ते मी होय असें जाणून शेवटीं आपल्या सर्वस्वाच्या मोबदल्यानें मीच होतात (९४६)

सर्वस्वाचें अर्पण करून मोबदल्यांत त्यांना मीच मिळतों – ते मीच होतात. मीच होण्याचा हा प्रकार सर्वांपेक्षाही अगदीं सोपा असा आम्ही रचलेला जरी तरी पण हेंच तेथें मुख्यत्वेंकरून समज कीं तेथें प्रीतीचा अभिप्राय हा चौसोपी रचनाच एक केलेली जशी का – सर्वापरी सोहोपी 'मीचि होती परी' आम्ही रचिली अशी ही जी रचना तीच मुळीं मुख्यत्वेंकरून महत्त्वाची आहे असें समज. (९४७)

(पर्वताच्या) कड्यावर चढणें तर पायरी करावी लागते – अंतराळीं उंच स्थानीं जावयाचें – चढावयाचें र मात्र म्हणजे (पहाड) किंवा दादर बांधतात त्याचप्रमाणें अतिशय खोल पाण्यांत शिरण्याचें झालें तर नौकेचा आश्रय करितात, ज्याप्रमाणें— (९४८)

येऱ्हवी पाहिलें तर हें सर्व काहीं अवघें आत्माच आहे असें जाणणें केलें, हे वीरोत्तमा, तरी पण ते तुझ्या (मनाची तृप्ति, शांति व सुख) मनोधर्मास मुळीच पटणार नाहीं, उमगणार नाहीं, समजणार नाहीं, तुझ्या मनाचे धर्म हे तेथें मिळणी करून घेनील असें न होईल – कदाचितच होईल व असें आहे म्हणून— (९४९)

एकच तत्त्व जें सचलेलें आहे – व्यापून आहे तेच चतुर्धा म्हणजे चार जागीं केलें – करून सांगितलें – कारण कीं तुझी प्रज्ञा हीच मुळी तेवढ्या योग्यतेची नाहीं असें पाहिले – तिचे मंदत्व पाहिल्यामुळें तेंच आम्ही चार ठायी करून सांगण्याचें केले आहे – हें तत्त्व जें आहे ते तुझ्या बुद्धीनें, प्रज्ञेनें 'माझी तितकें समजण्याची योग्यता नाहीं' असें तें आपलें मंदपण पत्करून पाहिल्यामुळे तें एकच जरी साचलेलें, व्यापून असलेलें तत्त्व, तरी तें आम्हास चार ठिकाणीं करून सांगण्याचें करावें लागलें (९५०)

पण बाळकास जेव्हा जेवण द्यावें लागते तेव्हा एक घास जो तोच मुळी विसा ठाईं करून त्या बाळाचे भरणें केले जातें तसें हें एकच जरी तरीपण तें युक्तीनें चार ठिकाणीं करून – चाराचें निमित्त पुढें करून तें सांगण्याचे केलें. चाराचे केल्यानें जसें का तें एकाआड एक लपविलेंच गेलें असें झालें (९५१)

तेथें तुझे अवधानानें असणें हे कितपत असेल हे जाणून, एकच जरी ते तरी, त्याचे (एक क्षेत्र, एक ज्ञान, एक ज्ञेय, एक अज्ञान) असे भाग करून तें सांगण्याचें केलें (९५२)

आता अशा युक्तीने सांगितलेले ते जर का तेथीलचा अभिप्राय (प्रिया × प्रिय × प्रीति) तुझ्या हातास न येईल तर ही जी त्या एकाचीच मुळी व्यवस्था ती एकदा सांगतो – सांगून ठेवितो – सांगितलेलें बरें. (९५३)

आता ते चार ठिकाणीं न करिता व ते एकच एक (ब्रह्म) आहे असें म्हणूनही पण उगीच न राहूं, तसेंच आत्मवर्गाचे (जीवप्राणी, आपण, स्थूलशरीर) जे का अनात्मवर्गाचें (आत्मवर्गाचें = पुरुषाचें. अनात्मवर्गाचें = प्रकृतीचे) जे ते एकाच प्रमाणानें तोलून पाहूं – तीं दोन्ही बरोबरीची अशींच समजूं. (९५४)

पण तुझ्याकडून एवढें व्हावें कीं आम्ही जें मागूं तें आम्हास द्यावें व तें म्हणजे ह्या कानासच मुळीं 'आपणच आपणास "पावला"' असे नाव ठेवावें (९५५)

असें हें भगवान् श्रीकृष्णाचें बोलणें ऐकल्याबरोबर पार्थ रोमांचित झाला – त्याच्या अंगावर एकदम शहारेच आलेले ते देवानीं पाहून म्हणूं केलें कीं उगाच ऐस, भलेपणानें स्थिर ऐस, उचंबळून जाऊं नकोस. (९५६)

अशा तऱ्हेने तो एका वेगासच (व्यापकत्वाची गति, धाव) आला तो त्याचा तेथीलचा वेग श्रीरंगरूपी देवांनीं धरून ठेविला व (त्यानी) आता 'प्रकृति पुरुष विभाग' सांगतो तो ऐक असें म्हणणे केलें (९५७)

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादि उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥**

उभौ प्रकृतिं पुरुषं च अनादि विद्धि = दोन्ही जे एक प्रकृति व एक पुरुष ते अनादि आहेत असें जाण. प्रकृतिसंभवान् विद्धि गुणान् विकारान् च एव = प्रकृतीपासून झालेले आहेत असेच मुळीं ते गुण व विकार जाण संभव = जन्म, उत्पत्ति, हेतुकारण, शक्यता, संभव, उचितपणा, अनुरूपता, तुल्यप्रमाणता, परिचय, ऐश्वर्य, ज्ञान

अन्वय—प्रकृति च पुरुषं च उभौ अपि अनादि विद्धि। विकारान् गुणान् च। प्रकृतिसंभवान् एव विद्धि।

अर्थ—प्रकृति व पुरुष हे दोन्ही अनादि आहेत असें समज विकारांना व गुणांना प्रकृतीच्या पोटीं उत्पन्न झालेले असें जाण (कामक्रोधादि विकार व त्रिगुणात्मक सर्व पदार्थ हे प्रकृतीपासून झालेले जाण)— गुण किंवा गुणधर्म जो – सर्व पदार्थांमधील त्रिगुणात्मक धर्म किवा गुण किंवा गुणधर्म जो तो विकारामुळें दोषाचा होणारा का दोषास पाहाणारा होय – तेथें मग तो जो वातकफपित्तात्मक जो त्रिदोषात्मक असा जो प्रकृतीस येणारा आरोग्यविघातकपणा तेथे ही तबियत म्हटली गेलेली (तब्येत = प्रकृति, आरोग्य). तसेंच कुतणें, कुंथणें, मिजाज, रुसवा इत्यादींनीं बोलणें होणारें. येथे भाव हा आरोग्यलक्षण पुढें घेऊन प्रकृतिपुरुषाचें तें कसें पण ऐक्यतेनें चालत असलेले तें लक्षणेस येऊन असतं – येथें

गुण (धर्म) × विकार × दोष × तब्येत × आरोग्य × का प्रकृति का प्रतिकृति का विकृति?
भाव × अनुशील × अनुष्ठान (शील) अनुस्थिति (१९)

**जया (जेया) मार्गातें जगीं। सांख्य म्हणती योगी।**
**तयाचिये (जयाचिये) भाटिवेलागीं। मी कपिल जाहालो ॥ ९५८ ॥**

**तो आईक निर्दोषु। प्रकृतिपुरुष विवेकु।**
**म्हणे अनादि पुरुषु। अर्जुनाते ॥ ९५९ ॥**

**तरी पुरुष अनादि आथी। आणि तैंचि लागोनि प्रकृति।**
**सवे सरिसी दिवोराती। दोन्ही जैसी ॥ ९६१/९६० ॥**

**का रूप नव्हे वायां। परि रूपा लागली छाया।**
**निकण वाहे धनंजया। कणेसी कोंडा ॥ ९६०/९६१ ॥**

**तैसी जाण जवटे। दोन्ही हये एकवटे।**
**प्रकृतिपुरुषें प्रगटे। अनादिसिद्धें ॥ ९६२ ॥**

**पैं क्षेत्र येणे नावे। जे सांगितले आघवे।**
**तेचि एथ जाणावे। प्रकृति हे गा ॥ ९६३ ॥**

**आणि क्षेत्रज्ञु ऐसे। जयाते म्हणितले असे।**
**तो पुरुष हे अनारिसे। न बोलो घेईं ॥ ९६४ ॥**

**एवं हये अनानें नांवें। परि निरुप्य आन नव्हे।**
**हे लक्षणा न चुकावे। पुढत पुढती ॥ ९६५ ॥**

**तरी केवळ जे सत्ता। तो पुरुष गा पांडुसुता।**
**प्रकृति ते समस्तां। क्रिया नांव ॥ ९६६ ॥**

**बुद्धि इन्द्रियें अंतःकरण। इत्यादि विकारभरण।**
**आणि ते तिन्ही गुण। सत्वादिक ॥ ९६७ ॥**

**हा आघवाचि मेळावा। 'प्रकृति जाहला' जाणावा।**
**हेचि हेतु संभवा। कर्मांचिया ॥ ९६८ ॥**

**तेथ इच्छा आणि बुद्धि। घडती अहंकारेसी आधी।**
**मग तिया लाविती वेधी। कारणाच्या ॥ ९६९ ॥**

जे या – जया – जेया – आता जेया मार्गातें – पद्धतीला, तत्त्वज्ञानास, शोधनास, रस्त्यास, शोधास, प्रार्थनेस, वाटेस, साधनास, प्रकारास, चालीस ( मार्गव = निषाद व आयोगवी यांचा पुत्र ) सांख्य = साख्य-ज्ञान असें योगी = योगी जन भाटिवेलागीं = ( भाट = हिस्सा, वाटा, पंगत, भाडें ) प्रशंसा करण्यासाठी, त्या साख्याची स्तुति गाण्यास, प्रशंसा करण्यास. कपिल = कपिलमहामुनि, साख्यशास्त्रकार ( कपिलानीं आपली माता देवहुतीस आत्मज्ञान निवेदिलें ), सांख्यशास्त्रप्रवर्तक ऋषि, कर्दम व देवहूति याचा पुत्र, याच्या शेजारीं सगराचा यज्ञीय अश्व इंद्रानें चोरून नेलेला घोडा दिसला म्हणून याच्यावर सगरपुत्रांनीं चोरीचा आरोप केला तेव्हा त्यानें क्रोधाग्नीनें त्या सगरपुत्राना भस्म केलें ( ९५८ ). निर्दोषु = दोषरहित. प्रकृति-पुरुष ( विवेकु ) = साख्याचीं मूलतत्त्वें प्रकृतिपुरुष याचा विचार आदिपुरुष = भगवान् श्रीकृष्ण ( ९५९ ) अनादि = ज्यास आदि नाहीं असा जो मूळचा आहे. तैंचि लागोनि प्रकृति = आणि तेव्हापासूनच ही प्रकृति. सवे सरिसी = एकत्वास दिवोराती = दिवसरात्र जयापरी – दोन्ही जैसी = दोन्ही, जोडीनें. अनुसंगानें = दोन्ही एकच अशी एकत्वाने, एकोप्यानें वागणारी, एकत्रिततेच्या उगमतेने एकच अशा संवयीचे ( ९६०–९६१ ) निकण = मुळीच कण नाहीं असें नव्हे तर कण जो त्याबरोबर कोंडा असणारच ( ९६१ ). जवटे = जुळीं प्रकटे – प्रगटे ( ९६२ ). जयाते – जयाचे ते ( ९६४ ) एवं लक्षणा – लक्षण – निर्णायक गोष्ट = विशिष्ट गुणधर्म – उद्देश ( वाच्यार्थाहून निराळा पण तत्संबंध अर्थ ). ( लक्षणा = आभास, सदोष व्याख्या ) ( ९६५ ) सत्ता = सदंश, सत्‌रूप तो पुरुष – तोपुरुष प्रकृति ते समस्ता क्रिया नाव ( नाम ) = सर्व प्रकारच्या क्रियेस प्रकृति म्हणावें, समस्त प्रकृतीस क्रिया म्हणावें ( ९६६ ) कर्मांचिया हेतुसभवा = कर्माच्या उत्पत्तीला कारण हीच ( ९६८ ) घडवी = उपजवी. वेधी = नादाला.

ज्या मार्गास – या मार्गास योगीजन हे कर्मफळसिद्धान्त किंवा दैव म्हणतात व ज्या शास्त्राची – सांख्यज्ञानाची – स्तुति गाण्यास मी कपिल महामुनि झालों होतों प्रकृतिपुरुष मानणाराचा जो सप्रदाय ज्यास साख्य म्हणतात त्याचा प्रवर्तक कपिल तो माझाच अवतार होय. (९५८)

असा तो निर्दोष असा, दोषरहित असा तो प्रकृतिपुरुष विवेक ( सांख्यांचीं मूलतत्त्वें, प्रकृतिपुरुष याबद्दलचा जो काहीं एक शास्त्रदृष्टीचा विचार ) ऐक, असें आदिपुरुष जे भगवान् श्रीकृष्ण ते अर्जुनातें म्हणाले. (९५९)

तरी हा पुरुष ज्यास आदि नाहीं असा मूळचा आहे – जेव्हापासूनचा पुरुष अगदीं तेव्हाच पासूनची ही प्रकृति – हीं दोन्ही एकत्वात – दोन जशीं दिवस व रात्र तेथे दोन्ही जोडीनें, अनुसंगानें दोन्ही एकच अशी एकोप्यानें, एकत्वानें वागणारीं – एकत्रिततेच्या उत्तमतेनें एकच अशा संवयीचें असें जें वागणें – प्रकृति व पुरुष हीं दोन्ही अनादि असेंच. (९६०)

अहो रूप हें कांहीं, अहो डोळसपण हें जें तें वाया म्हणजे असें नव्हेच पण त्या तेथीलच्या रूपपणास – रूपास – का डोळसपणास छाया ही आहेच – जसें बिछाइर्णेच एक असें – अहो कणच मुळीं नाहीं असें केव्हांहि नसतें, नव्हेच, हे धनंजया, पण तेथें हें जाणत ऐस कीं जेथें कण तेथें कोंडा आहेच किंवा असणारच. (९६१)

तशी ही जुळीच एकवटलेली का एकवट झालेली जवटे – प्रकृतिपुरुष ही उघड, स्पष्ट, जाहीर अशी प्रगटतेची अनादिसिद्ध, आरंभ, उत्पत्ति इत्यादि रहित प्रख्यात नित्य ईश्वरसिद्ध अशी होत. (९६२)

आणि क्षेत्र या नांवानें जें कांहीं सर्व सांगितलेलें तें सर्व प्रकृति असें जाणावें. क्षेत्र म्हणजे प्रकृति. (९६३)

आणि क्षेत्रज्ञ म्हणजे पुरुष होय ज्यास क्षेत्रज्ञ असें म्हटलें आहे तो पुरुषच तेथें दुसरें तिसरें बोलणेंच मुळीं होत नाहीं – तेथे पुरुष एक पुरुष, शिवाय ( दुसरें तिसरें ) बोलणेंच मुळी होऊं नये (९६४)

याप्रमाणें हीं दोन निरनिराळी नावें जरी तरी जें कांहीं एक निरूपणास घेतलेलें तें तर आन म्हणजे दुसरें कांहीं आहे असें नाहीं, तेथें एकच एक तें निरुप्य जाण. तेथें हें जें काहीं लक्षण – उद्देशनिर्णायक गोष्ट – ती पुन्हा पुन्हा चुकण्याचें करूं नये. (९६५)

करितां केवळ जें सत् सत्यांश अथवा सत्तारूप तोच येथें पुरुष (म्हटल्यास काहीं वावगें नाहीं) व प्रकृति म्हणजे त्याच्या आधारानें चालणारी क्रिया आहे. सर्व ज्या क्रियाशक्ति ती प्रकृति होय. (तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान इत्यादि त्याना क्रियायोग म्हटलेलें). (९६६)

बुद्धि, इंद्रियें, अंतःकरण आणि विकार आणि सत्वादि ते तिन्ही गुण हा सर्व मेळावा – मेळा प्रकृतीपासून झाला असें जाण – ही प्रकृतीच सर्व कर्माचें मूळ आहे कर्माच्या उत्पत्तीस मूळ कारण हीच प्रकृति होय. (९६७/९६८)

ही प्रकृति प्रथम अहंकार, बुद्धि व इच्छा यांना मेळाव्याचें करून म्हणजे उत्पन्न करते आणि मग जीवाला इच्छित वस्तु मिळविण्याच्या नादीं लावते. इच्छित वस्तु तें कारण. (९६९)

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

कार्यकारणकर्तृत्वे = कार्यकारण व कर्तृत्व याना जो हेतु. हेतुः = प्रकृतिः = तीस प्रकृति म्हणतात. सुखदु.खानां भोक्तृत्वे हेतु. = पुरुष = सुखदु खभोक्तृत्वानें जो कारण होतो तो पुरुष.

अन्वय—'कार्यकारणकर्तृत्वे हेतुः' प्रकृतिः उच्यते । सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुः पुरुषः उच्यते ।

अर्थ—कार्यकारणकर्तृत्व यामध्यें जो हेतु त्यास प्रकृति म्हणतात. सुखदुःखाच्या भोक्तृत्वाचा हेतु जो त्यास पुरुष म्हणतात. (२०)

**तेचि कारण ठाकावया । जे सूत्र धरणे उपाया ।**
**तया नांव धनंजया । कार्य पै गा ॥ ९७० ॥**

**आणि इच्छा मदाच्या थावी । लागली मन उठवी ।**
**ते इंद्रिये राहाटवी । हे कर्तृत्व पै गा ॥ ९७१ ॥**

**म्हणौनि तिन्ही या जाणा । कार्य कर्तृत्व कारणा ।**
**प्रकृति मूळ हो राणा । सिद्धांचा म्हणे ॥ ९७२ ॥**

एवं तिहीचेनि समवाये। प्रकृति कर्मरूप होये।
परी जया गुणावाढे त्राये। त्याचि सारिखी ॥ ९७३ ॥

जे सत्वे अधिष्ठिजे। ते सत्कर्म म्हणिजे।
रजोगुणे निफजे। मध्यम ते ॥ ९७४ ॥

जे का केवळ तमे। होती जिये कर्मे।
निषिद्धे अधमे। जाण तिये ॥ ९७५ ॥

ऐसेनि संतासंते। कर्म प्रकृतिस्तव होते।
तयापासूनि निर्वाळते। सुखदुःख गा ॥ ९७६ ॥

असंती दुःख उपजे। सत्कर्मी सुख निपजे।
तया दोहीचा बोलिजे। भोग पुरुषा ॥ ९७७ ॥

नाम – नाव गा – पैं गा ( ९७० ). थावी = ठिकाण, ठाव इच्छा मदाच्या थावी = इच्छा व मद यांच्या आश्रयानें मन – मनाते कर्तृत्व = मन इंद्रियांकडून त्याचे व्यापार करवितें ( ९७१ ) राणा = भगवान् श्रीकृष्ण. सिद्ध = श्रेष्ठ. कार्यकर्तृत्व कारणा प्रकृति मूळ = कार्य = इंद्रियाकडून होणारी क्रिया, क्रियेसाठीं अगोदर जी मनोवृत्ति तें कारण. इच्छेनें मनाकडून इंद्रियास प्रवर्तन ते कर्तृत्व, ह्या त्रिपुटीस म्हणजे कार्यकर्तृत्व कारणास – मूळ प्रकृतीच होय ( ९७२ ) समवाये = ऐक्यातें त्राये = आधिक्य, बळ ( ९७३ ). सत्वे = सत्वगुणें. निफजे – निपजे ( ९७४ ). निषिद्ध = धर्माविरुद्ध, निंद्य. अधर्मे – अधमे = न्यून किंवा कुत्सित ( ९७५ ). संतासंते = बरें वाईट, उत्तम अधम, चांगले का वाईट कर्मे – कर्म पासूनि – पासोनि. निर्वाळते – निर्वाळिले = निर्वाळ = निर्मळ, सिद्ध = उत्पन्न होतें, निर्मळ केलें जातें ( ९७६ ).

तो हेतु किंवा कारण सांपडावें म्हणून ज्या सूत्राचा आश्रय केला जातो – जो उपाय केला जातो त्यास हे धनंजया, कार्य म्हणतात त्यास कार्य हें नाव किंवा नाम येते. (९७०)

इच्छा ही मदाच्या आश्रयाने – ठिकाण, ठाव किंवा तळानें – तळास पाहून, लागून मन हें उठवितें – ती इच्छा मनास जागविते, उभारते व मग मन इंद्रियाकडून त्याचे व्यापार करवितें, जें त्यास कर्तृत्व म्हणतात – ते कर्तृत्व होय (९७१)

म्हणून, कार्य साधावयास जे उपाय म्हणून सूत्र धरावें लागते तें कार्य व इच्छारूपी मदभाराने जे ह्या मनास जागवून – उपस्थित करून इंद्रियाकडून जे कर्तृत्व होते – अशा ह्या तिहींनाही प्रकृति हीच मूळ होय, असें सिद्धामधील जे श्रेष्ठ भगवान् श्रीकृष्ण, ते म्हणाले (९७२)

याप्रमाणें या तिहींच्या म्हणजे कारण, कार्य व कर्तृत्व ह्याच्या ऐक्यानें – एकसमयावच्छेदेंकरून होण्यानें प्रकृति ही कर्मरूप होते पण तेथे जो गुण आधिक्य, बळ किंवा वाढ घेऊन असतो त्याच गुणासारखी ती प्रकृति होते का कृति होते. (९७३)

जर तेथें सत्वाचें अधिष्ठान अथवा उपस्थितपण असेल तर त्या कृतीस सत्कर्म म्हटलें जातें. रजाचें उपस्थितपण असेल तर ती कृति मध्यम अशी म्हणजे सर्वसाधारण म्हटली जाते. (९७४)

केवळ तमोगुणानें जीं कर्मे होतात – तीं निषिद्ध अथवा धर्मविरुद्ध अशीं अधम न्यूनतेचीं किंवा कुत्सित अशीं ( म्हटलीं जातात ) असतात. (९७५)

याप्रकारेंकरून प्रकृतीमुळेंच तीं कर्मे हीं संत कर्मे असंत अशीं होतात व त्या कर्मापासून मग सुख अथवा दु ख हें उत्पन्न होणारें होतें. सत अशा कर्मामुळें ते शुद्ध अथवा सुख कोटीचें होतें किंवा असततेमुळें तें दु खकोटीचें होतें (९७६)

असंत अशा कर्मामुळें दु.ख उत्पन्न होतें, निष्पन्न होतें – सत्कर्मामुळें सुख निपजतें – ह्या देहींच्या ह्या पुरुषास भोग होतो – मायेचें दुःख किंवा सुख हें पुरुषास भोगावें लागतें (९७७)

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान् गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनि जन्मसु ॥ २१ ॥**

प्रकृतिस्थ = प्रकृतिसारखा झालेला जो. प्रकृतिजान् = प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या गुणसंग = गुणाचा संग म्हणजे गुणासारखे होणें. सत् अथवा असत् = चागल्या किंवा वाईट जन्मसु = चांगल्या किंवा वाईट योनीमध्यें जन्म पावल्यामुळें – उपजल्यामुळें – उपजविलें गेलें तसें तें त्या त्या चागल्या वाईट योनीमध्यें त्यामुळें

अन्वय—प्रकृतिस्थः पुरुष· । प्रकृतिजान् गुणान् भुंक्ते । अस्य कारणं । गुणसंगः । सत् असत् योनि । जन्मसु ।

अर्थ—प्रकृतिसारखा झालेला पुरुष प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या गुणांना भोगतो – गुण उपभोगतो– दु ख भोगतो ( भोक्तृत्व ) कारण त्या चांगल्या वाईट योनीमधील जन्मामुळें तो तो गुणसंग ह्याच प्रकृति-पासून जन्मलेल्या गुणांचा ( भोक्तृत्व का ) संग ह्याच कारण होतो – ह्या गुणसंगापासून सूबाल्या दिला का पोबारा केला असें बाजूस न होतां आल्यामुळें – आपलें अंग काढून न घेतल्यामुळें – तेथें बरेवाईट परिणाम हे सुखदु·खाचे असे घेणेंच झाल्यानें पुरुष हा प्रकृतिआधीन होऊन विकारवशतेंत फसतो ( २१ ).

**सुखदुःखें जंववरी । निफजती सांचोकारी ।**
**तंव प्रकृति 'उद्यम' करी । पुरुषभोगी ॥ ९७८ ॥**

**प्रकृति पुरुषाची कुळवाडी । सांगता असंगडी ।**
**जे आंबुली जोडी । आंबुला खाय ॥ ९७९ ॥**

**अबुला आपुलिये । संगती ना सोये ।**
**की अंबुली जग विये । चोज आईके ॥ ९८० ॥**

**तो अनंगु पैंधा । निकवडा नुसधा ।**
**जीर्ण अति वृद्धा— । पासूनि वृद्ध ॥ ९८१ ॥**

**तया आडनांव पुरुषु । एरव्ही स्त्री ना नपुंसकु ।**
**किंबहुना एकु । निश्चयो नाहीं ॥ ९८२ ॥**

**तो अचक्षु अश्रवण । अहस्त अचरण ।**
**रूप ना वर्ण । नाम आथी ॥ ९८३ ॥**

**अगा प्रकृति कर्मरूप होये । परी गुणयात्रे जाये ।**
**तयासारिखे होये । नाम पुरुषा ॥ ९८४ ॥**

**अर्जुना काहीच जेथ नाही । तो प्रकृतीचा भर्तार पाही ।**
**की भोगणे ऐसयाही । सुखदुःखाचे ॥ ९८५ ॥**

**तो तरी अकर्ता । उदास अभोक्ता ।**
**परी इया पतिव्रता । भोगविजे ॥ ९८६ ॥**

जियेते अळुमाळ। रूपा गुणाचा ढाळ।
ते भलतैसाही खेळ। लेखा आणी ॥ ९८७ ॥

ना इये प्रकृति तंव। गुणमयी हेचि नांव।
किंबहुना सावेव। गुण तेचि हे ॥ ९८८ ॥

हे प्रतिक्षणी नीचनवी। रूपाचीच आघवी।
जडातेही माजवी। इयेचा माज ॥ ९८९ ॥

नामें इयेतें प्रसिद्धें। सस्नेहें इया स्निग्धे।
इंद्रिये प्रबुद्धे। इयेचेनि ॥ ९९० ॥

काय मन हे नपुंसक। कीं ते भोगी तिन्ही लोक।
ऐसऐसे अलौकिक। करणे इयेचें ॥ ९९१ ॥

हे भ्रमाचे महाद्वीप। हे व्याप्तीचे रूप।
विकार उमप। इया केले ॥ ९९२ ॥

हे कामाची मांडवी। मोह वनीची माधवी।
इये प्रसिद्धची दैवी। माया हे नांव ॥ ९९३ ॥

हे वाङ्मयाची वाढी। हे साकारपणाची जोडी।
प्रप्रंचाची धाडी। अभंग हे ॥ ९९४ ॥

कळा येथूनि जालिया। विद्या इयेच्या केलिया।
इच्छा ज्ञान क्रिया। वियाली हे ॥ ९९५ ॥

हे नादाची टांकसाळ। हें चमत्काराचें वेलाउळ।
किंबहुना सकळ। खेळ इयेचा ॥ ९९६ ॥

जे उत्पत्ति प्रळय होत। ते इयेचे सायंप्रात।
हे असो अद्‌भुत। मोहन हे ॥ ९९७ ॥

हे अद्वयाचे दुसरे। हे निःसंगाचे सोयरे।
हे निराळेसि घरे। नांदतसे ॥ ९९८ ॥

इयेते इतुलावरी। सौभाग्य व्याप्ति थोरी।
म्हणौनि तया आवरी। अनावराते ॥ ९९९ ॥

तयाच्या तव ठायी। निपटुनि काहीचि नाही।
की तया आघवेही। आपण होय ॥ १००० ॥

कुळवाडी=शेतकी, शेती, व्यापार असंगडी=अमर्याद. आंबुली जोडी आंबुला खाय=बायको मिळविते व नवरा नुसता बसून खातो (९७९) अंबुला–अंबुलिया. संगती–संगती ना. आईके–आईका (९८०). तो अनंगु पेंधा–जो अनंगु तो पेंधा अनंगु=निराकार, अवयवरहित. पेंधा=उदासीन, पांगळा निकवडा=दरिद्री, दिगंबर नुसधा=उघडावाघडा, एकटा, आईबाप नाहींत असा (९८१) पुरुषु–पुरुष एकु–एक (९८२) भर्तार–भर्ता ऐसयाही=अशालाही (९८५) ढाळ–चाळढाळ=हालचाल, नखरा लेखा=हिशेबाला, गणतीला (९८७). प्रकृति=प्रकृतीला. गुणमयी=त्रिगुणघटिता (असें नाव आहे) सावेव=अवयवासहित पूर्ण. गुण=गुणत्रयी, त्रिगुण (९८८).

नीचनवी = नित्यनवी　रूपाचीच – रूपगुणाचीच ( ९८९ )　इयेतें – इये　सस्नेहें – स्नेह　इयेचेनि = इच्यामुळेंच ( ९९० )　काय – कायी　भोगी – हिंडवी. ऐस ऐसे – ऐसेऐसे ( ९९१ ). उमप = पुष्कळ, असंख्य ( ९९२ ). हे कामाची मांडवी = ही प्रकृति कामरूप वेलीचा मांडवच – मंडपच. हे मोह वनीची ( माधवी ) = मोहभूलरूपी वनाची – ( वसंत ऋतूनें येणारी शोभा )　माया हे नाव = नाम = दैवी, माया अशी हिला प्रसिद्ध नावें आहेत ( ९९३ ). वाङ्मयाची = शब्दशास्त्राची. धाडी – धाड ( ९९४ ). नादाची = ध्वनीची. वेलाउळ = राव, राउळ, देव, देऊळ, विळ, वेळ = वेळाउळ = घर ( ९९६ ). मोहन = सर्व देहधारींना घातलेलें हें मोहनास्त्रच एक ( ९९७ ). दुसरे = जोडीदार　सोयरे = सोबतीकर, सोबतीण. निराळेसि घरे नांदतसे = निरालय, निरालंब, आश्रयरहित असा जो पुरुष त्याच्याबरोबर संसार करते. नांदतसे – नांदत असे ( ९९८ ). इतुलावरी – येतुलावरी = एवढी. तया अनावराते आवरी = अनावर अशा पुरुषाला आवरते ( ९९९ ). निपटुनि = मुळींच　आपण – आपणचि ( १००० ).

जंववर – जोंपर्यंत खरेपणानें सुखदुःखें हीं – हिरवेकच्चेपणामुळें का पिकलेपणानें – असत – सत्कर्म – का संत – अशीं तीं कर्में पुरुषास भोगावीं लागणारी तेथें – तोंपर्यंत जोंपर्यंत तो पुरुष प्रकृतीच्या आधीनतेचा असा असलेला, झालेला – प्रकृति ही उद्यम करीत असते व पुरुष हा तो उद्यम परिणाम भोगीत असतो.

येथें यमनियमाचें ठाणेंच उठविलें असें तें मायेचें करणें हें झाल्यानें तेथें जर का पुरुषानें आपला गुणधर्म का पुरुषार्थ पुढें घेऊन चालणें केलें नाहीं तर त्यास ते प्रकृतीच्या – विघटनात्मक उद्यमाचें – हालचालीचें – परिणामफळ हें भोगावें लागतेंच　येथें उद्यम शब्दाचा अर्थच मुळीं दुर्लक्ष – असंतपण – तपराहित्य इत्यादि असून तेथें मग स्वत म विसरल्यामुळें तो पुरुष प्रकृतितंत्राचा होऊन त्या तपराहित्यातच फसतो व दुःख का सुख भोगण्यास वशतेचा होतो [ जंववरी जाड । तंववरी जड ॥ ( ज्ञा गा ) ]　　( ९७८ )

प्रकृति व पुरुषाची अशी ही व्यापाररत होणारी तऱ्हा अमर्याद अशाच फलश्रुतीची होय. तेथें अंबुली ही जोडते – आपल्याच प्रकृतिधर्मानें प्रकृतिमंततेचें वैलक्षण्य – काय गुणसुंदर, रूपसुंदर – अवयवसुंदर असे ते देहावरील इंच इंच जागाच मुळीं अति उत्तम असाच एक बाणा ह्या प्रकृतीनें पुरुषावर लादलेला – तेथें मग तिचेंच तें होणें होतें झालें – तीच त्या पुरुषधर्मास आपल्या सत्तेखालीं घेऊन त्यासच मुळीं तिनें आपलें स्वमहत्त्व पटविण्यात आपली अक्कल खर्च केली व त्यासच त्यात रत केलें, तेव्हा आता असेंच झालें कीं अंबुली हीच मुळीं जोडते – साधते – प्रकृतिमंत होते व तेंच आतां तो पुरुष हा भोगून राहातो. अशी ही जोडी सागडीची म्हणजे बरोबर चालणारी नसून असंगडीची अशीच होय.　　( ९७९ )

येथें अबुला का आमूबुला म्हणजे पति ( राज ) किंवा अबुली म्हणजे स्त्री ( पत्नी-पूज्य ) ह्याची तर मुळी ना संगत – ना सोबत ना जीवितरहस्य गोडीची सोय ही नसलेली तेथे स्त्री ही, आबुली ही, ह्या जगाम शरीरास, देहास प्रसरण देऊन असलेली – ह्या देहास विकारवशतेचें असेंच तें करतें. तेथें पुरुषाचाहि पुरुष हाच आटविला गेला असें तें विलक्षणतेचें, तें कवतुकाचें तिचे तें करणें हें ऐका तर खरें कसें असतें तें – ते ऐकण्यासारखे आहे.　　( ९८० )

येथें तो आबुला किंवा पति कसा आहे म्हटलेला तो तर निराकार असा, अवयवरहित असा तो ज्यास अंगच मुळी कसलें तें नाहीं असा, तो नुसता उदासीन होय. तो पागळाच तर काय, तो दिगंबर असा उघडावाघडा, एकटा व आईबापरहित असा तो तर सर्वाहीमध्यें जो अति वृद्ध असेल त्याहीपेक्षा अधिक वृद्ध असलेला असा.　　( ९८१ )

असा तो 'पुरुष' ह्या नावाच्या आड असलेला, पुरुष असें नुसतेंच नाव आड वागविलेलें – नसतेंच तें आडून वागत अललेलें असें तें. एरव्हीं पाहिलें तर तो ना स्त्री, ना नपुंसक अथवा असें कशास ते तेथे

असें म्हणूं कीं तो पुरुष म्हणावा, कीं स्त्री म्हणावा का नपुंसक म्हणावा असा कांहींहीं मुळीं निश्चयच झालेला नाहीं असा तो होय (९८२)

तो अचक्षू, अश्रवण, अहस्त, अचरण व ज्यास रूप नाहीं, वर्ण नाहीं का नामही पण नाहीं असा तो. (९८३)

असा तो पुरुष – अशा त्या पुरुषाच्या गुणधर्माच्या यात्रेसच ती प्रकृति कर्मरूप होऊन जाते – असते व आतां त्या कर्माप्रमाणेंच त्या पुरुषास नांव हें येतें. तेथें कर्म हेच गुण. कर्माचे गुण प्रकृतीस लागल्यानें कांहींशा धर्मास आलेले, तेथें जीवितयात्रा हीच मुळीं चालविली गेली – नटली – व त्याप्रमाणें तें तें किंवा तसलें तसलें तें नाव ह्या पुरुषास मिळालें होतें. तेथे आतां तो चक्षू का श्रवण का हस्त का चरण का रूप का वर्ण हे सर्व ती प्रकृतीच नटली व जें काहीं जीवितयात्रेचें निष्पन्नत्व त्यावरून ते पुरुषास नांव येणें झालें. (९८४)

म्हणून हे अर्जुना, येथे आता असें पाहा कीं जेथे मुळी काहींच नाहीं असा जो प्रकृतीचा भर्तार अशा विलक्षणतेचें तें त्याचें असणे असून याहीवर अशा त्यासच मुळी ते सुखदु:खाचें भोगणें प्राप्त होणारें होतें (९८५)

अहो ! तो तर मुळीच अकर्ता, उदासीन व अभोक्ता असा असूनही ह्या प्रकृतिपतिव्रतेनें तो भोगला, भोगानें भोगविला गेलेला – रंजविला गेलेला – नटविला गेलेला – होय. आमूबुल्याचे ते तिचें जोडण्याचें, उद्यमाचें – का साधण्याच्या व्रतावर उभें होणें हेंच प्रकृतिमंततेचें वैलक्षण्य होय (९८६)

जिला किंचित् किंचित् अलुमाळ अशा प्रकाशाचे, जाणिवेचे चालणे सवरणें – चालढाळ – नखरा – तेथे रूप हेच गुण लाविले गेले – काय रूपसुंदर असें गुणानें रूप गुणास गुण लाविला तेथे ती भलतासलताच मुळीं खेळ खेळणें, चढ हे सर्व प्रकारें करून महत्त्वास आणते – ( प्रकृतिमंततेचें महान् रेखाटलें असें सर्व प्रकारें ) – गणतीस आणून – हिशोबानें करते, मान्य करवून घेते – तेथे मानच डोलविली असें पसतीचें लक्षण – अशा लक्षणानें ती ( सुवासाचें सौंदर्य ) सुवाससौंदर्य झाले असें ती स्वत:स करते. (९८७)

अहो ! ह्या प्रकृतीस तर 'गुणमयी' असें नाव आहे – अथवा असेंच तेथें म्हटलें जाते कीं 'सर्वथैव गुण' हेच ती होय – अवयवासहिततेचे असे जे गुण जे तेच ती प्रकृति आहे – म्हणून जेव्हा जेव्हा का प्रकृति हे नाव येते तेव्हा तेव्हा तेथे सावयव गुणतेचे असणे – गुणाचे असणें – गुणयुक्ततेनें असणे – म्हणजे गुणत्रयाचें जें काहीं केलेले तेच तेथे प्रकृतिरूपानें वागत असतें म्हणून प्रकृति जी ती गुणच होय अथवा गुण जे तेच मुळीं प्रकृति होय असेंच नव्हे का ? (९८८)

ही क्षणोक्षणी नीचनवी अशी – नित्य नित्य नवेपणाचा बहर घेऊन असलेली अशी नाविन्यतेची नवाई का नवलाई घेऊन असलेली – तेथे ती रूपाची केलेली – रूपच एक ते सर्वतन्हेनें – बाध्यानीं – अवयवानीं – तेथे रूपच एक सर्व पुढें घेतले जाणारें – पाहिलें जाणारें असें असल्यानें तेथें जड जें – तेही पण हिच्या माजावरच माज घेऊन येतें असें होय. हिचा माज – मत्तपणा – महत्त्व – मानमरातब सर्वथैव रूपाचा तो, तेथे जड जे तेंही पण माजण घेऊन येतें – महत्त्वाचें होतें, प्रकाशूं लागतें – मान्य होतें. (९८९)

रूपाची सर्वथैव – रूप पाहाणारी – जडासही चेष्टविणारी – क्षणोक्षणीं नवीं अशीं भासमान होणारीं अशीं तीं तिचीं नांवें प्रसिद्धच आहेत – अशा तिच्या प्रसिद्धपणानें इंद्रियें हीं पण, तिच्या स्निग्धतेमुळें – मवाळपणामुळें – व स्नेहधारेमुळें प्रवुद्ध अशीच दिसणारी – होणारीं होतात – हें सर्व हिचे करणें जें तें प्रसिद्ध प्रसिद्धतेचें असें सिद्धतेचे ते वारें बाणून असलेलें तें तिचे करणे होय – तेथे प्रसिद्ध, रूप, नाविन्य, नवेपणा, स्नेहधारेचे, तसेंच मनास मवाळपणाचें असें हळुवारपण देणारें – आर्द्र करणारें व इंद्रियाचें प्रबुद्धपण हेंच तर हिची प्रसिद्धी – नेहमी सिद्धतेची एक चढाई घेऊन असलेले तें –( हिच्यामुळेंच इंद्रियें प्रबुद्ध म्हटलीं गेलीं – झालीं ) (९९०)

हिच्यामुळेंच तर मन हें काय नपुंसक असें तें तर तिन्ही लोकही भोगतें – तिन्ही लोकीं रमतें – फिरतें – हिंडतें – जगतें – जोगतें – असें हें तिच्यामुळेंच तर त्या मनाचें तिन्ही लोकींही हिंडणें – तिन्ही लोकाना भोगणें हें होत असणारें असें तिचेंच एक मुळी एक लोकोत्तरतेचे असें करणें होय. (९९१)

अशी ही गुणमयी – निखळ गुणच ते – जसे त्रिगुण तसेच जेथे आधी ही ह्या दोषांनीं वर आणिली का तेथें त्रिदोष हेच ह्या तब्येतीचे, का आरोग्याचे, का प्रकृतीचे ते विकारवश होण्यानें खस्त दिली गेलेली – तेथें ती भ्रमच एक म्हटली गेली – भ्रमाचें महाद्वीपच जगी का एक – द्वीपच तें जेथें सर्व भ्रमच एक – तेथे खरें का खोटें, चागलें का वाईट – बरें किंवा दुसरें कांहीं असें काही जाणणेंच मुळी नाही असा काहीच निश्चितपणा न झाल्यानें भ्रमच एक परिणाम करणारा, येथें व्यापव्याप्ती कामकाजाचें केलेले सर्वथैव असें तें तेथे ही व्याप्तीच मुळीं नावारूपास आलेली होय. तेथें विकारवशतेचे ते सर्व एक असख्य – असंख्य असे विचारच मुळी ह्या मनास जरब देणारे किंवा ह्या मनासच ते जर्जर करून ह्या विकाराबाबत एक पुष्कळपणाचें असें विकारवशतेचे अंग तेंच हिचे करणें होय. विकार हेच विकार करणारे असे – विकारवान् असें काय षड्रिपूंचे तें वैचित्र्य तेंच हिनें मोठ्याच मोठ्या अशा महत्त्वास आणिलें – हे विकार कसे तें जाणणें का होणें हेंच मुळी असें तिचे तें करणें होय (९९२)

ही प्रकृति कामरूप वेलीचा माडवच होय – आकाशाचा मंडप दिलेला तेथे कामरूप वेल व पल्लवाची ही सर्वथैव केलेली अशी – ही मोहभूलरूपी वनास वसंत ऋतूमुळें येणारी शोभा असून – तेथें मोहभूलच एक नेहमी ह्या विकारानीं सजविलेली – तेथें आंता दैवी असें प्रसिद्धपण तिच्या ठायीं आलें – व माया अशा नावाची झाली – (जेथे मुळीच काहीं होणें नाहीं, जाणें नाहीं, झालें नाही, देहास येणें नाहीं असें तें भ्रमरूपच एक). (९९३)

हिनेंच मुळीं तर हें वाङ्मय वाढीस लाविलें – शब्दशास्त्राचें निष्णातपण किंवा अगाधपण हेंच हिनें वाढीचें केलें – महत्त्व घेऊन आलें – अपरंपार असें झालें – येथें साकारपण हेंच जसें आहे – असलेलें तेंच मुळीं मोठ्या महत्त्वाचें आहे असें घेऊन तीच एक जोड स्वतःस केली – तेथें प्रपंच सर्व हाच जेव्हा तेव्हां – चोर-धाडीच एक महत्त्वभार लुटणारा – उरावर आदळणारा झाल्यानें तेथे खंड हा मुळीच नाहीं – एकसारखें हेंच पुढें होऊन येणारें का पुढेंच घेऊन असल्यानें तेथे अभंगपण म्हणजे भंग का खंडच नाहीं – तेथें निराश होणें का हात टेकणें हें कोणच्या गावचें कारण एकेक ज्या काहीं व्यापाच्या जागा त्याच मुळी, त्याच मुळी एकमेकीस चेव देत गेल्यानें तेथे मुतवानर – म्हणजे एकसारखेपण अथवा जेथे भंगच नाहीं असें चालणें होत असलेलें तें म्हणजे त्यातच नेहमी गुरफटून जाणे हें दुसऱ्या तिसऱ्या कोणत्याच गोष्टीस महत्त्व न देतां हेंच एक अगही मजबूततेचें असें आहे असे न वाटणें घेतलेलें होय (प्रपंचपण = त्रिगुणाचें ओझेंपण) (९९४)

असें तिचें एकसारखें तेथेंच लागून असल्यानें ह्या कलाकुशलता ह्या सर्वथैव हिच्याच केलेल्या आहेत असें होतें – तसेंच ज्या अनेक विद्या त्याही पण हिच्याचमुळें महत्त्वास पाहणाऱ्या होत असेंच हिनें केलें. तेथें काय इच्छा, वासना काय ज्ञान, का जाणती कळा किंवा काय त्या क्रिया, कामकाजाची थोरवी हें सर्व हीच मुळीं व्यायली आहे असेंच भासतें असा हिचा पराक्रम हा अवर्णनीय होय (९९५)

ही तर नादाची का ध्वनीची एक टांकसाळच होय अहो! काय येथें शब्दवैचित्र्याचा रगाडा – का ह्या नादाचें कामकाजसूत्र हें तर प्रकृतीस भलतीच जरब देऊन असल्यानें तेथे हिचा कारभार हा तर सर्व भार घेऊन असलेला असाच असतो, दिसतो – अशी ही माया – ही आकारच पुढें करून असते तेथे चमत्काराचें अग हेंच जसें का हा आकार. ह्यानें तर तो रज्जुसर्प न्याय हाच मोठ्या महत्त्वाचा करून सर्व देह हाच मुळी चमत्काराचें घरच करून ठेविलें आहे – असें हिचें एकेक करणें हें तर तिनें हा सर्व खेळ मोठ्याहूनही

मोठया महिम्याचा आहे असेंच करून ठेविलें – अशी ही माया, ही नादाची टांकसाळ, चमत्काराचें घर व सकळ काहीं हिचेंच करणें होय. नाद छंद ध्वनीनें तर हिनें शब्दरूपी नाणींच पाडिलीं – व आतां काय तेथें सहजच तें बोलणें, घडणें का जोडणें हें ह्या मायेचें अंगच नटवीत राहिल्यानें तेथें लोकोत्तरता – का अद्वितीयता किंवा अलौकिकपण हेच सर्व महत्त्वाचें आहे असें हिचें करणें हें तर हें घर म्हटलें एक चमत्कारच होय असें हिनें करून ठेविलें आहे तेथें ध्वनि हाच मुळीं शब्दाचें नाणेंच घडविलें – का घरच एक तें अनेकी अनेकतेचे असेंच उभारलें व आता काय तेथें जसा एक जगामधील अपूर्वतेचा रंगच ही होऊन आली आहे. असें हिनें आपलें घर करून ठेविल्यानें तेथे वैचित्र्य हेंच मुळीं ज्यास त्यास तोंड उघडें ठेवूनच पाहाण्याचें केल्यानें स्वत· हा मनुष्यही पण नसल्याच एका आश्चर्याचा झाला व त्यानें स्वतःचें महत्त्व मायेसच दिलें – कीं ही माया हीच मुळीं अति महानतेची अशी लोकलीलेची लोकोत्तरता होय व असें झाल्यानें मनुष्यप्राणि हा स्वत स हरवून घेतो व सर्वथैव त्या मायेच्या प्रकृतिमंततेच्या नावारूपारंगातच मुळीं दंग होऊन गेल्यानें जशा एका ह्या गोडींत का डावांतच फसला असें होतें. (९९६)

उत्पत्ति ही हिची प्रातर्वेळा, प्रळय ही सायंकाळ – जशी लग्नच लावणारी ह्या शब्दटाकसाळीचे – असें हें अद्‌भुत मोहनच एक ह्या मनुष्यजातीला भ्रमात टाकणारें असें – सर्व देहधारींना घातलेलें असें मोहनच हें होय (९९७)

अद्वितीय – अद्वय असें जें वस्तू आहे त्या वस्तूवर हें एक दुसरेंच मुळीं अद्वय असें झालेलें – नि.संग असा जो मुळींच सगाची सोबत नको म्हणून बाजूस होणारा तेथें तर आता ही तर एक अति लाघवी अशी सोबतीणच होऊन आली – व हिनें निरालंब – निराधार – आकाररहित (निरालंबे न सिरे नांदत असे [डोक्याशिवायच]) असा जो पुरुष त्याचे बरोबरच नादण्याचे केलें – संसार करूं लागली – नांदूं लागली. (९९८)

हिची एवढी काहीं – लग्नच लागलें आहे असे मानणेंच घेऊन असल्याने – सौभाग्यलक्षण व्याप्तीची थोरवी आहे कीं ती सर्वाहूनही थोर अशीच मानली गेल्यानें तिनें तर ह्या अनावर अशा पुरुषासच मुळी आवरण्याचें केले. (९९९)

अहो! पुरुष म्हटला तर त्याचे जवळ तर अगदी कांहींसुद्धा नाहीं – पण हिचा जो कांहीं एक या पुरुषाचा संसार पाहाण्याचा क्रम हाच मुळीं अद्वय असा असल्यानें हीच मुळीं अद्वय झाली व पुरुषाचें जें अद्वितीय का अद्वयपण तेंच हिनें आपलें असेंच केलें – हीच पुरुषाचें सर्व काहीं होऊन आहे, अशी ही माया होय (१०००)

**तया स्वयंभाची संभूती। तया अमूर्ताची मूर्ती।**
**आपण होय स्थिती। ठावो तया॥ १००१॥**

**तया अनार्ताची आर्ती। तया पूर्णाची तृप्ती।**
**तया अकुळाची जाती। गोत होय॥ १००२॥**

**तया अचर्चाचें चिन्ह। तया अपाराचे मान।**
**तया अमनस्काचे मन। बुद्धिही होय॥ १००३॥**

**तया निराकाराचा आकारु। तया निर्व्यापाराचा व्यापारु।**
**निरहंकाराचा अहंकारु। होऊनि ठाके॥ १००४॥**

**तया अनामाचे नाम। तया अजाचे जन्म।**
**आपण होय कर्म। क्रिया तया॥ १००५॥**

तया निर्गुणाचे गुण । तया अचरणाचे चरण ।
तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षू ॥ १००६ ॥

तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव ।
किंबहुना होय सर्व । पुरुषाचे हे ॥ १००७ ॥

ऐसेनि या प्रकृति । आपुलिया सर्वे व्याप्ति ।
अविकाराते विकृति— । माजि कीजे ॥ १००८ ॥

तेथ पुरुषाचे जे असे । ते ये प्रकृतिदशे ।
चंद्रमा आंवसे । पडिला जैसा ॥ १००९ ॥

विदळ बहु चोखा । मिनलिया वाला एका ।
कसु होय पांचिका । जया परी ॥ १०१० ॥

कां साधूतें गोंधळी । संचरुनि सुये मैळी ।
नाना सुदिनाच्या आभाळीं । दुर्दिन कीजे ॥ १०११ ॥

तेथ पय पशूच्या पोटी । का वन्हि जैसा काष्ठी ।
गुंडूनि घेतला पटी । रत्नदीपु ॥ १०१२ ॥

राजा पराधीन जाला । की सिंह जैसा व्यापला ।
तैसा पुरुष प्रकृति आला । स्वतेजा मुळे ॥ १०१३ ॥

जागता नरु सहसा । निद्रा पाडूनि जैसा ।
स्वप्नीचिया सोसा । वश्य कीजे ॥ १०१४ ॥

तैसे प्रकृति जालेपणे । पुरुषा गुण भोगणे ।
उदास अतौरि गुणें (अंतरी गुणे–पा. भे.) । आतुडे जेवी ॥ १०१५ ॥

तैसे अजा नित्या होये । अंगीं जन्ममृत्यूचे घाये ।
वाजती जै लाहे । गुणसंगातें ॥ १०१६ ॥

परि ते ऐसे पांडुसुता । तांतले लोह पीटिता ।
जे वन्हीसीचि घाता । बोलती तया (बोलिजती तिये—पा.भे.) ॥ १०१७ ॥

का आंदोळलिया उदक । प्रतिमा (प्रतिबिंब) होय अनेक ।
ते नानात्व म्हणती लोक । चंद्री जेंवी ॥ १०१८ ॥

दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसे ये मुखा ।
कां कुंकुमे स्फटिका । लोहितत्व (आरक्तता) ये ॥ १०१९ ॥

तैसा गुणसंगमे । अजन्मा हा जन्मे ।
पावत ऐसा गमे । परन्ही नाहीं ॥ १०२० ॥

अधमोत्तमु यौनी । यासी ऐसिया मानी ।
जैसा संन्यासी होय स्वप्नी । अंत्यजादि जाती ॥ १०२१ ॥

म्हणौनि केवळ पुरुषा । नाही होणे भोगणे देखा ।
येथ गुणसंगचि अशेखा । लागी मूळ ॥ १०२२ ॥

स्वयंभ=स्वत उत्पन्न होणारे, ब्रह्मदेव संभूती=योग्यता, ज्ञान, विद्या, जन्म, संभोग, वैभव. अमूर्त=निराकार मूर्ती=आकृति, (बुद्धिअवतरण), प्रतिमा, देह, अवयव, सौंदर्य, स्वभाव स्थिति=स्वरूपरचना, निश्चय, आस्था, स्वभाव, शाश्वती, शिस्त (व्यवस्था ठेवणें), शील, आचार, मर्यादा, आदर, उच्च दर्जा, सत्वगुण ठावो—अतस्थान, ठिकाण (१००१) अनार्ताची आर्ती=इच्छारहिताचें दु ख, पीडा, आजार पूर्णा=सर्वश्रेष्ठ, व्यापक, सर्वपूर्ण (१००२) अचर्चाचें=अनिर्वचनीयाचें, नच अभ्यास केलेला, नच घोकणें केलेलें, उटणें लावणें नच केलेलें चिन्ह=संज्ञा. अपाराचे=अमर्याद, अनंत, आटोक्याबाहेरचें, अत्यंत मोठे मान=माप. अमनस्क=विचाररहित, बुद्धिहीन, गाफील, प्रेमरहित, बेफिकीर (१००३). व्यापार=क्रिया, खटपट, उपद्व्याप, प्रयोग उपयोगांत आणणें, परिणाम (१००४). अनाम=बिननावाचा अजाचे=जन्मरहिताचे कर्मक्रिया=क्रियाकर्म (१००५) निर्गुण=त्रिगुणातीत परब्रह्म, परमात्मा अचरण=चरण नसलेला अश्रवण=बहिरेपण, श्रवण नसलेल्याचें. अचक्षू=दिव्यज्ञान नसलेल्याचें चक्षू=दिव्यज्ञान, ज्ञान, प्रकाश, उजेड, तेज (१००६). भावातीताचे=अस्तित्वरहिताचे, अवस्थारहिताचे. भाव=स्थिति, अवस्था, अस्तित्व, प्रकार, प्रेम, निष्ठा, भावना, भक्ति, अभिप्राय, अर्थ, पदार्थ, गुण, धर्म (१००७) या—इया विकृति=(विकारांत आणिलें) विकार, रूपांतर, बदल, मनोविकार, यदृच्छेनें होणारी गोष्ट. आपुलिया सर्व व्याप्ति=आपलाच सर्व व्याप, पसारा=आपल्याच सर्व व्यापाचें करून. अविकाराते—तया अविकाराते. पडिला=पडला, हारपला. पुरुषाचे=पुरुषत्व (१००९). विदळ=हीन धातु. पाचिका—पांचका=पाच नंबरी, हलकें (१०१०). दुर्दिन=मेघाच्छादित दिवस. सुये मेळी=भ्रमवितो (१०११) तेथ—जेवी (१०१२). गुंडूनि=झांकून, गुंडाळून व्यापला—रुंधला (१०१३) पीडूनि—पाडूनि सोसा=सुखदु ख भोगास (१०१४) उदास अंतौरि गुणें (अंतुरी गुणें—अतरीगुणें) आतुडे जेवी=उदास पुरुष स्त्रीच्या (गुणामुळें—योगानें) स्वाधीन होतो—अडकतो, आधीन होतो (१०१५) अजा=अजन्मा नित्या=नित्यब्रह्म जें जै—जव (१०१६) तातले लोह पीटिता जेवी वन्हीसीचि घाता बोलती तया=तापलेल्या लोखंडावर घाव घातले तरी ते अग्नीवर बसले असें लोक म्हणतात तसाच हा प्रकार. बोलती तया—बोलिजति तिये (१०१७). आदोळलिया=हालले असतां (१०१८). कुंकुमे—का कुंकुमे लोहितत्व=आरक्तता, ताबडेपणा (१०१९) अधमोत्तम—अधमोत्तमा. योनी—यौनी मानी=समज, मान (१०२१)

स्वतः उत्पन्न होणें जें स्वयंभ ब्रह्मदेवाचें एक जसें तेथीलची योग्यता, ज्ञान, विद्या, वैभव तसेंच निराकार जो तेथीलची ती आकृति, सौंदर्य, स्वभाव तेथीलचा उच्च दर्जा किंवा ठिकाण ती स्वत.च होऊन असते (१००१)

त्या इच्छारहिताची इच्छा, इच्छेनें व्याकुळ होणें का त्रस्तपण हेंच ती होते. सर्वश्रेष्ठ व सर्वव्यापक असें जें ब्रह्म त्याची ती तृप्ति—समाधान—त्या ज्यास मुळीं कुळ नाहीं त्याची जात व गोत होते (१००२)

त्या अनिर्वचनीयाचे ती लक्षण किंवा चिन्ह, संज्ञा होते त्याच्या अमर्यादतेचें, अनंतत्वाचें ती मोजमाप होते त्या विचाररहिताचें ती मन होते तसेंच बुद्धीहि होते. (१००३)

त्या निराकाराचा ती आकार होते, त्या निर्व्यापाराची ती उपद्व्याप, क्रिया, खटपट, प्रयोग होते—त्या निरहंकृतीचा जो त्याचा ती अहंकार होऊन येते. (१००४)

ज्यास नावच मुळी नाहीं त्यास नाव ठेविते—अनामन् जें त्याचें ती नाम होते—त्या जन्मरहिताचें ती जन्म होते तसेंच कर्मक्रिया किंवा क्रियाकर्म सर्व काहीं होते (१००५)

त्रिगुणविरहित जें ब्रह्म—परमात्मा त्यास ती गुण होते—गुणाची करते—त्या अचरणाचे चरण—अश्रवणाचे श्रवण—अचक्षूचे (नेत्रेंद्रिय नसलेल्याचे) ती चक्षू (दिव्यज्ञान) होते (१००६)

भावातीत म्हणजे अस्तित्वरहित असा जो त्याची ती स्थिति, अवस्था, स्वभाव होते – त्या निरवयवाचें अवयव होते – किंबहुना सर्व कांहीं एक पुरुषाचें ती होते. (१००७)

याप्रमाणें या प्रकृतीनें आपलीच जेथें तेथें व्याप्ति करून हा अविकाररूपी जो परमात्मा त्यास रूपांतराचें केलें – तिचें त्यास करण्याचे होतें (१००८)

तेथें पुरुषाचें जें काहीं किंवा पुरुषत्व जें तें प्रकृतिदशेस येते, जसा का चंद्रमा हाच आवसेमध्यें (हार पडला किंवा) पडला. (१००९)

अथवा उत्तम असें सोनें एक वालभर अशा जीवितास जर जोडलें गेलें तर तेथें पांच नंबरी का हलकें (किंवा उत्तम असें तेथे कम लावलें) होतें जसें अथवा हीन धातु एका वालभर उत्तम सुवर्णास जर जोडली तर तेथें उत्तमत्व हें कम लावलेलें होतें. (१०१०)

गोंधळी हा सचार करून साधूसही भ्रमवितो अथवा उत्तम अशा सुगीचे जे ते जसे मेघाच्छादित दिवसाचे जसे दुर्दिन केले जाणारे – अनेक आशा करून – असणें जें तेथे प्रकृति हीच मुळीं उठावणीस आली. ती काहींसुद्धा करीत नाहीं – उलटें प्रकृतीसच स्वस्त दिव्यफळें व्यर्थ आशा करून असतां – प्रयत्न नच करतां तेथें आशा ही काय आपण होऊन पुरतेपणास येणारी तेथें प्रयत्न हा पाहिजेच. जर प्रयत्न नाहीं तर हा देहच मुळी उठावणीचा गळून जाणारा झाल्यानें 'दुर्दिनच' एक तेथें दुर्भिक्षच एक तेथें होणारें जसें. (१०११)

तेथें रत्नदीप जो तोच मुळी पशूच्या पोटीचें पय – का काष्ठामधील वन्हि – पटामधील रत्नदीप तोच गुंडाळून घेतला झाकून ठेविला तसें होते (१०१२)

राजा पराधीन झाला – सिंह जसा व्याधीनें व्यापला – त्याप्रमाणें पुरुष हा प्रकृतीचा का झाला – कीं प्रकृतिसारखा झाला कीं आपल्या तेजासच मुळीं मुकूं लागतो (तो स्त्रीसारखा होतो) (१०१३)

जागा असलेला मनुष्य निद्रेनें लवंडिला का कलंडल्यामुळें स्वप्नींच्या सुखदु:ख भोगास – स्वप्नींचे सुखदु:खभोग भोगण्यास तयार होतो (१०१४)

त्याप्रमाणें प्रकृतीचें झाल्यानें – होण्यानें – प्रकृतिसारखेंच एक होणें केल्यानें पुरुषास गुण भोगणें पडतें – उदास पुरुष हा जसा स्त्रीच्या गुणामुळें का अतरीं प्रकृतिसारख्या गुणामुळें अडकतो – आधीन होतो – तो स्त्रीच्या स्वाधीन होतो (१०१५)

त्याप्रमाणें जें जन्मरहित आहे – जो अजन्मा आहे – जें नित्य ब्रह्म असें आहे त्यास होतें – त्याचे अंगीं जन्ममृत्यूचे घाव वाजूं लागतात जेव्हां का किंवा जर का तो – प्रकृतीचा – गुणसंगाचा झाला तर (१०१६)

तापलेल्या लोखंडावर जरी घणाचे घाव घातले तरी ते अग्नीवर बसले असें लोक म्हणतात तसाच हा प्रकार आहे. (तसेंच अज – अजन्मा जो अनित्य नसून नित्य ब्रह्म जो त्यास जन्म असणें का अनित्यपण असणें असेंच लोक म्हणतात). (१०१७)

अथवा पाणी हललें तर एका प्रतिमेच्या अनेक प्रतिमा होतात – एका प्रतिमेस अनेकत्व येतें – तेथीलचें तें अनेकत्व चंद्राचें आहे – चंद्रापासून येतें – चंद्रामुळें होतें असें लोक मानतात. (१०१८)

दर्पण जवळ असला तर – आरशात पाहिलें तर त्या मुखास दुजेपण येतें अथवा कुंकवामुळें शुभ्र स्वच्छ स्फटिक तांबडा म्हटला जातो – स्फटिकासच मुळीं ती आरक्तता, लोहितत्व का तांबडेपणा आहे असें मानलें जातें – दिसतें. (१०१९)

त्याप्रमाणें गुणसंगमामुळें हा जन्मरहित असा (आत्मा) अनेक जन्म पावतो आहे असा दिसतो. भासतो एरव्हीं तेथें जन्माची गोष्टच मुळीं नाहीं — जर तेथें गुणाचा संग का संगम नाहीं तर जन्माची गोष्टच तेथें नाहीं (१०२०)

अधम का उत्तम अशा योनीचा तो होतो असें समज, मान, ज्याप्रमाणें संन्यासी हा स्वप्नामध्यें अंत्यज इत्यादि जाती होतो. (१०२१)

असें आहे म्हणून जो पुरुष आहे त्यास कांहींही होणें जाणें नाहीं का (दु ख) भोगणें नाहीं, पण येथें गुणसंगच एक हा असल्या सर्व कांहींचें मूळच होय. (१०२२)

**उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः ॥२२॥**

उपद्रष्टा =(उपद्रष्टृ = साक्षी, देखरेख करणारा, झोपेंत स्वप्न पाहणारा) साक्षी अनुमंता = (अनुमत = प्रिय, इष्ट, समति देणारा, कात, नवरा) संमति देणारा भर्ता =(भर्तृ = पति, धनि, नायक, पालक, पोषक) पति, पालनपोषण करणारा. भोक्ता = [भोक्तृ =(भुज्) भोगणारा, राजा, पति, जार] भोगणारा, जीवात्मा महेश्वर = महा + ईश्वर = राजा, शंकर, इंद्र, परमात्मा, सर्वांचा ईश्वर, महेश्वर. पुरुष परः = श्रेष्ठ पुरुष, विष्णु, परमात्मा, शुद्ध सच्चिदानंदघन म्हणून परमात्मा.

अन्वय—अस्मिन् देहे पुरुषः पर उपद्रष्टा, अनुमंता, कर्ता, भोक्ता, महेश्वर परमात्मा अपि च उक्त ॥ २२ ॥

अर्थ =(१) साक्षी म्हणून देखरेख करणारा (उपद्रष्टा), समति देणारा म्हणून प्रिय किंवा इष्ट (अनुमन्ता), पालनपोषण करणारा म्हणून पति (भर्ता) भोगणारा म्हणून भोक्ता, महान् ईश्वर परमात्मा म्हणून परमेश्वर अशी ह्या देहामध्यें असलेल्या पुरुषास नावें येतात (२२)

(२) ह्या देहात पुरुषश्रेष्ठ त्यास उपद्रष्टा, साक्षी, अनुमंता, प्रिय किंवा इष्ट, कर्ता म्हणून नायक, भोक्ता म्हणून पति, महेश्वर म्हणून परमात्मा असें म्हणतात

(३) पुरुष देहांत असून देहापलीकडे म्हणजे देहातीत आहे तो केवळ साक्षी म्हणून उपद्रष्टा यथार्थ संमति देणारा म्हणून अनुमन्ता, सर्वाचें धारण पोषण करणारा म्हणून भर्ता, जीवरूपानें भोक्ता — ब्रह्मादिकाचा स्वामी म्हणून महेश्वर व शुद्ध सच्चिदानंदघन असल्यामुळें परमात्मा म्हटला आहे (२२)

**हा प्रकृतिमाजी उभा । परी जुई जैसा वोथंबा ।**
**थया (इया) प्रकृति पृथ्वी नभा । तेतुला पाड ॥ १०२३ ॥**

**प्रकृतिसरितेच्या तटी । मेरु होय हा कीरीटी ।**
**माजी बिंबे परी लोटी । लोटो नेणे ॥ १०२४ ॥**

**प्रकृति होय जाये । हा तो असतुचि आहे ।**
**म्हणौनि आब्रह्माचे होये । शासन हा ॥ १०२५ ॥**

**प्रकृति येणे जिये । याचिया सत्ता जग विये ।**
**यया लागी इये । वर येतु हा ॥ १०२६ ॥**

**अनंते काळे कीरीटी । जिया मिळती इया सृष्टी ।**
**तया रिगती ययाच्या पोटी । कल्पांत समयीं ॥ १०२७ ॥**

**हा महत्ब्रह्म गोसावी । हा ब्रह्मगोलक लाघवी ।**
**हा अपारपणे मवी । प्रपंचातें ॥ १०२८ ॥**

**पैं या देहामाझारी । परमात्मा ऐसी जे परी ।**
**बोलिजे ते अवधारी । ययातेंचि ॥ १०२९ ॥**

**अगा प्रकृति परौता । एक आथी पांडुसुता ।**
**ऐसा प्रवादु तो तत्वता । पुरुष हा पैं ॥ १०३० ॥**

**जो निखळपणें येणें । पुरुषातें यया जाणे ।**
**आणि गुणांचें करणें । प्रकृतीचें तें ॥ १०३१ ॥**

जुई=जुईचे वेलीस. बोथंबा=आश्रय, टेका, खांब. यया–इया. प्रकृति पृथ्वी नभा तेतुला पाड =(जुईच्या वेलाचा खांब जसा टेकू देण्यापुरताच असतो तसें) याच्यामध्यें म्हणजे पुरुषामध्यें व प्रकृतींत योग्यता पुढें घेतली तर जमीन अस्मानाचें अंतर आहे (१०२३). हा–होय हा. परी लोटी लोटो नेणे= तिच्या प्रवाहानें का प्रवाहांत वाहून जात नाहीं (१०२४) होय–होये. असतुचि–असतचि प्रकृति होय जाये हा तो असतुचि आहे=प्रकृति उत्पन्न होते, लय पावते हा पुरुष जसा तसाच. आब्रह्माचे होये शासन हा=मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत हा पुरुष नियंता–शिस्त लावणारा–शासन-शास्ता होय. (१०२५) इया लागी–यया लागी वर येतु–वरयितु=वर, भर्ता (१०२६) इयाच्या–ययाच्या (१०२७). महत्-ब्रह्मगोसावी=मायेचा स्वामी; महत्ब्रह्म जी योनि तिचा स्वामी ब्रह्मगोलक लाघवी=ब्रह्मांडगोलकाचा सूत्रधार मवी=गणना करतो, अजमावतो प्रपंचाते=तिन्ही गुणाना (१०२८) प्रकृति परौता= प्रकृतीच्या पलीकडे एकु–एक. आथी आहे=एक सत् आहे. ऐसा प्रवादु (वांजु) तो तत्वता पुरुष हा पैं =(प्रकृतीच्या पलीकडे एक सत् आहे) असें तात्विक रीतीनें म्हणतात–बोली भाषा, चर्चा, बोलणें–करतात तो पुरुष (१०३०) निखळपणें=शुद्धपणें–पूर्णपणें–केवळपणें–पूर्णत्वानें. पुरुषातें–पुरुषा. गुणांचें करणें प्रकृतीचें हें=गुण कर्म सर्व प्रकृतिमूलक होय. (१०३१).

जुईचे वेलास जसा आश्रय किंवा टेका दिलेला तसा ह्या प्रकृतिमध्यें उभा असलेला अगा हा पुरुष असून ह्याच्यामध्यें व प्रकृतीमध्यें तर जमीन अस्मानाचें अंतर आहे. **(१०२३)**

प्रकृतिरूप नदीच्या तटावर, किनाऱ्यावर हा तर मेरूच जसा असा असतो–आहे–तो प्रकृतिसरितेमध्यें बिंबतो पण तिच्या प्रवाहानें का प्रवाहांत हा वाहून जात नाहीं–वाहून जाणें जाणत नाहीं. **(१०२४)**

प्रकृति उत्पन्न होते–लय पावते–हा पुरुष तर जसाच्या तसाच–आणि म्हणून आब्रह्माचें म्हणजे मुंगीपासून तो तहत् ब्रह्मदेवापर्यंत हा पुरुष नियंता–शिस्त लावणारा–शासन-शास्ता आहे. **(१०२५)**

ह्यामुळेंच प्रकृति जन्मते–जगते–ह्याच्याच सत्तेनें जग उत्पन्न होतें–वीतें–आणि एवढ्याच कारणामुळें हा वर किंवा भर्ता म्हटला जातो–हा भर्ता आहे. **(१०२६)**

अनंत काळ जे ह्या सृष्टीमध्यें मिळून मिसळून असतात ते कल्पांतसमयीं ह्याच्याच पोटीं विरून जातात –रिगून जातात. **(१०२७)**

हा मायेचा स्वामी–महत्ब्रह्म जी योनि तिचा स्वामी आहे–हा ब्रह्मांडगोलकाचा सूत्रधार आहे–हा ह्या प्रपंचास–तिन्ही गुणाना अपारपणानें मवतो–अजमावतो–गुणाची–प्रपंचाची गणना करतो. **(१०२८)**

या देहामध्यें परमात्मा अशी जी एक योग्यता बोलिली जाते ती यासच होय हें नीट समज. **(१०२९)**

अगा हे अर्जुना, ह्या प्रकृतीच्या पलीकडे एक आहे – एक सत् आहे असें तात्विक रीतीनें म्हणतात – असा प्रवाद तात्विक वाज रीत अशा बोलीनें का भाषेनें का चर्चेनें बोलिली जाते – तोच मुळीं तत्वदृष्ट्या पुरुष हा जो आहे तो होय— (१०३०)

– जो शुद्धपणें – पूर्णपणें – निखळपणें – केवळपणें – पूर्णत्वानेंच मुळीं ह्या पुरुषास जाणतो – जाणणें करितो, आणि गुणकर्म सर्व प्रकृतिमूलक आहे असें जाणतो

येणें निखळपणें यया पुरुषातें जाणें आणि गुणाचें करणें प्रकृतीचें तें जाणे जो तो तत्वता पुरुष हा पैं. (१०३१)

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥**

वर्तमानः अपि = वर्तमानकाळी म्हणजे ह्या देहानें कर्मे करीत असला तरी न सः भूयः अभिजायते = पुन्हा जन्म पावत नाहीं

अन्वय—यः एवं गुणैः सह पुरुषं प्रकृतिं च वेत्ति स सर्वथा वर्तमानः अपि न भूयः अभिजायते ।

अर्थ—याप्रमाणें जो गुणासहित पुरुषाला व प्रकृतीला जाणतो तो सर्व प्रकारें जरी कर्मे करीत असला तरी पुन्हा जन्म पावत नाहीं (२३)

**हे रूप हे छाया । पैल जळ हे माया ।**
**ऐसा निवाड धनंजया । जेवी कीजे ॥ १०३२ ॥**

**तेणें पाडे अर्जुना । प्रकृतिपुरुष विवंचना ।**
**जयाचिया मना । गोचर जाली ॥ १०३३ ॥**

**तो शरीराचेनि मेळे । करू का कर्में सकळे ।**
**परी आकाश धुई न मैळे । तैसा असे ॥ १०३४ ॥**

**आथिलेनि देहे । जो न घेपे देहमोहे ।**
**देह गेलिया नोहे । पुनरपि तो ॥ १०३५ ॥**

**ऐसा तया येकु । प्रकृति पुरुष विवेकु ।**
**उपकार अलौकिकु । करी पैं गा ॥ १०३६ ॥**

**परी ह्राचि अंतरी । विवेक भानुचिया परी ।**
**उदैजे ते अवधारी । उपाय बहुत ॥ १०३७ ॥**

निवाड = निर्णय (१०३२) तेणें पाडे = त्याप्रमाणें जाली – जाहाली (१०३३). शरीराचेनि मेळे = शरीरानें – देहसंगतीमुळें आकाश धुई न मेळे = धुळीनें (धुये – धुई) आकाश मळत नाहीं (तसा असतो) (१०३४) आथिलेनि देहे = असलेल्या देहानें, असल्या देहानें, प्राप्त झालेल्या देहानें (१०३५). एकु – एक अलौलिकु – अलौकिकु (१०३६). उदैजे = उगवेल उपाय बहुत – उपाये बहुते (१०३७)

याप्रमाणें अशा ह्या पूर्णत्वेंकरून पुरुषास जाणणें तसेंच प्रकृतीचें तें गुणाचें करणें जो जाणतो तोच तत्त्वत पुरुष होय हें रूप आहे – असें हें रूप आहे – व ह्या रूपास विछाणें करणारी ती छाया ही जशी डोळस आहे – रूप हें (सडोळस असें तें ह्या देहास) छायेनेच जणूं विछावणारें असें – जें निवाड्याने असणे – स्वतःचा निर्णय केलेला कीं हें रूप व ही त्या रूपास विछाईत करणारी छाया (देह) – तसेंच पलीकडे असणारें

जें तें जळ व त्या जळांत प्रतिबिंबित होणारी ही माया आहे असें जें निवाडा देणें का स्वत च्या निर्णयानें असणें असें जें कांहीं करणें तें तेथें स्वतःच ह्या गोष्टीचा निवाडा केलेला. (१०३२)

अशा त्या निर्णयाच्या योग्यतेनें चालणें हें बा अर्जुना, जें त्यामुळेंच तर ही जी मति विवंचना (नेहमीं विचार करणारी ती वितर्क करणारी अशी होऊन) घेऊन असलेली ह्या प्रकृतिपुरुषाबाबत ती येथे गोचर म्हणजे आटोक्यांतलें दृश्य अशी स्पष्ट झाली – दृश्य झाली – समजण्यास सुलभ अशी (ती इंद्रियज्ञानाची महती) झाली – प्रकृतिपुरुषाची जी नेहमीं विचार करणारी ती बुद्धीची कला येथें समजण्यास सुलभ अशी गोचर म्हणजे आटोपशीर झाली (१०३३)

शरीराच्या मेळानें – शरीरानें – देहसगतीमुळें तो सकळ कांहीं कामकाज का कर्मे जरी करीत राहिला तरी धुराळयानें जसें आकाश मळत नाहीं तसाच असतो (१०३४)

असत्या देहानें – असलेल्या देहाने – ह्या प्राप्त झालेल्या देहानें – देहधारीपणाने जो ह्या देहमोहानें (व्यापला जात नाहीं) – घेतला जात नाहीं – (उच्छृंखलपणाचा होत नाहीं घाबरत नाहीं) – तो देह गेला तरी पुन्हां तो तसा होत नाहीं – तो तसा (मोहसंचारानें) घेतला जाणारा होत नाहीं जो – (जसें पिशाच्चाला मुळी देहधारणच नसतें. तें एका सावलीवरच चालणारें – का छायेचें सर्वथैव तेथें देहधारणच नाहीं – देहाच्या आधारानें असणें नाहीं असें जें कांहीं एक नसत्या भुलींतच फसलेलें – तेथें मोहच एक सर्व ह्या देहावर परिणाम करणारा, तेथें देह हाच मुळी न दिसणारा – न पाहिला गेल्यानें तेथे नुसत्या वाऱ्यावरच, छायेवरच जसें तें चालणें, तेथें देहमोहवश हाच मोठा जबरदस्त असतो) असलेल्या देहानें – जो देहमोहानें पछाडला जात नाहीं तो देह गेला तरी पुन्हा देहमोहाचा होत नाहीं – देहधारी असून जो दुसऱ्या देहाच्या मोहानें आकळिला जात नाहीं – दुसऱ्या देहाच्या मोहात फसत नाहीं – फसविला जात नाहीं, तो देह गेला तरी पुन्हां मोहाचा होत नाही अभिनिवेश म्हणजे देह धारण करण्याची जी वृत्ति ही नेहमीच्या नेहमीं मोह पाडून असलेली – तेथें देहधारणा हीच मुळीं काय भोग, काय योग, काय भाग्य इत्यादींनीं नेहमीं परिणाम केलेली – करणारी असल्यानें तेथें देहधारणाची हौस ही अगदीं खिळून गेलेली असते – म्हणून येथें असें म्हटलें कीं मोह पावून – पावल्यामुळें – घेतला – (पछाडच) न जाणारा तो असत्या देहानें असलेला जरी तरी पुन्हा देहमोहांत फसत नाहीं – देहबुद्धीचा मोह – देहानें देहच भोगणें जें तेथे एक महामोहच परिणाम करणारा – तेथें भूतच जसें ह्या देहबुद्धीचें तें – म्हणून म्हटलें कीं हा देह हाच एक महामोह – तेथे जसें का भूतसंचार किंवा पिशाच्चाने पछाडलें जाणें होणारें – म्हणून ही देहभ्रांति टाकून जो असतो – तो देह गेला कीं देहमोहानें 'घेपे' न होय – देहमोहानें – देहभ्रांतीनें आकळिला – आवरिला – पछाडला जात नाहीं – म्हणून येथें देहाचा मोह हाच मुळीं भूतच संचारलें असा असतो तोच अगोदर व्यवस्थिततेस आणिला तर मग हा देह नच पाहाता ज्या आधारावर हा देह चालत असलेला तो मूळ आधारच मुळीं आपलासा केला होतो – तेथें – जरी देह तरी तो साधन तत्परतेचा असा असल्यानें एक जी जन्ममरणाची ती 'मातृकोदरकुहरी' जन्मणारी व मरणारी ती देहधारणाची हौस किंवा इच्छा हीच मोडली जाऊन एक तेथे सत् इच्छा पुढें झालेली. (१०३५)

अशा तऱ्हेचा हा त्यास एक ह्या प्रकृति व पुरुषासंबंधीचा विवेक – सारासार ज्ञान – तेथें चुकणें झालें तरी पण एक 'उपकार' जो तोच महत्त्व घेऊन असल्यानें तेथें महत् उपकार असें त्या मनानें घेतलेलें उपकर्तृत्व तें ह्या मनास मोठेपणाचा अलंकार करिते – तेथें जीवित हें एका मोठ्या पातळीवर आरूढ झाल्यानें ते मन मुळीच कांहीं बोलतच मुळीं नाहीं – ते स्वस्थ असते – स्थिर असतें – जसें का एकादा देवच मुळी त्या मनास वरण्यास आलेला व तेथें त्या मनाचें सर्व जें उत्तमत्व तेंच महत्त्व घेऊन असलेलें असें ते – उपकार स्मरतें – तेथें वैराग्यच एक आपल्या महत्त्वास पाहणारें झालें – वैराग्य हा देवलोकीचा दागिना असल्यानें

तो दागिना ते देव ते कसा बरें टाकून देतील? आपला नाहीं म्हणतील? – म्हणून येथें उपकारकर्ता असाच ह्या विवेकास प्रशस्तपणा प्राप्त झालेला – तेथें अलौकिकपण – लोकोत्तरता – का अलोलिकता हीच लोकलीलेचें लौकिकवान् किंवा अलोलिक अद्भुतपण हेंच संपन्नपण घेऊन येतें (१०३६)

असा हा (उपचारानें) उपकारच अंतरामध्यें अंत·करणामध्यें जर विवेकरूपी सूर्यानें – सूर्यरूपी विवेकच उदयास आला – विवेकसूर्य उगवला असें जें उपायाचें करणें तेथें अनेक उपाय आहेत "उपाये बहुत उपकार अलौकिकु, अंतरी विवेकभानु उदैजे" ते ऐक – अंत·करणांत विवेकरूपी भानू (बृहत्भानु) म्हणजे सूर्य उगवेल असे जे बहुत उपाय ते ऐक (उपायवन वसत, अमृतानुभव) उपकारच तो, का उपचारच एक स्नेहाचे अद्भुतपणानें जोडला – सबंधाचा केला (१०३७)

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ॥**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥**

आत्मनि ध्यानेन पश्यन्ति = चित्तवृत्ति ही निरोधानें एकतानतेस आल्यानें ध्यानच तें ध्यानानें आत्मा, ब्रह्म – भूतप्रतिष्ठा पाहिली आहे असें आत्मना आत्मानं केचित् = ब्रह्मप्रतिष्ठेवरच आत्मा हा भूतप्रतिष्ठा तेथे अशा त्या प्रतिष्ठेस आलेल्या आत्म्यानेंच आत्मा पाहिला सांख्ययोगेन अन्ये = दुसरें ज्ञान क्रियेनें – पुरुष-प्रकृति ऐक्यानें भोगसंपन्नता ही ह्या प्रकृतीस विलासानें रमविलें, साधलें, आपलेसें केलें. अपरे च कर्मयोगेन = कर्मप्रतिष्ठा हीच अगोदर मुळी तीच येथें महत्त्वाची ती कर्मनिवृत्ततेनें मुळीं जोडली गेली, विभावास आली, भावभाराची झाली तेथे प्रवृत्ति ही निवृत्तीवर उभी झाली असे

अन्वय—आत्मनि ध्यानेन पश्यन्ति। आत्मना आत्मानम् (पश्यन्ति) केचित् सांख्येन योगेन अन्ये (आत्मानम् आत्मना) पश्यंति। अपरे (केचित्) कर्मयोगेन च (आत्मनि पश्यन्ति – आत्मानम् आत्मना पश्यन्ति)।

अर्थ—(१) ध्यानानें आत्म्यामध्यें – स्वभावामध्यें – अतःकरणात – (भूतप्रतिष्ठा ही ब्रह्म आधारावर कशी तें) पाहातात. कोणी (भूतप्रतिष्ठेनें भूतप्रतिष्ठा ही कशी हें) आत्म्यानें आत्म्यास – स्वभावानें भावास पाहातात, दुसरें कल्याणच एक का हितच एक पाठीवर वाहून असणारी ती सांख्याची (बुद्धिरज हेंच ज्यानीं प्रकृतिपुरुषाचें ऐक्य साधून आपलेसें केलेलें) योगक्रिया तिनें पाहातात तर दुसरे आणीक कर्मयोगानें म्हणजे विश्वरचनेचा जो संभावना भार त्यानें पाहातात (कर्म हें नैष्कर्म्य झालें, भोगसंपदा साधली, ऐक्य – साधणें ज्ञानच तें उभयताच्या जाणिवेंत आलें – परस्पर भोगविलास हा ह्या देहानें नटला.

(२) कोणी योगी शुद्ध झालेल्या सूक्ष्मबुद्धीनें ध्यानाच्याद्वारें आत्म्याला हृदयाच्या ठिकाणीं पाहातात. कोणी ज्ञानयोगानें (सांख्य) तर कोणी कर्मयोगानें त्याला पाहातात – प्राप्त करून घेतात. (२४)

**कोणी एक सुभटा। विचाराचा आगिठा।**
**आत्मानात्मकीटा। पुटे देऊनी ॥ १०३८ ॥**

**छत्तिसही वानी भेद। तोडुनिया निर्विवाद।**
**निवडिती शुद्ध। आपणपे ॥ १०३९ ॥**

**तया आपणपयाच्या पोटी। आत्मध्यानाचिया दिठी।**
**देखती गा कीरीटी। आपणपेंची ॥ १०४० ॥**

**आणीक पै दैवबगे। चित्त देती सांख्ययोगे।**
**एक ते आंगलगे। कर्माचेनी ॥ १०४१ ॥**

**ययां चतुर्विध प्रकारें। जे मज मीनले पुरे।**
**तयासी कांहीं नुरे। भोक्तव्य गा॥ १०४२॥**

**कोणी**–कोण्ही विचाराचा आगिठा आत्मानात्मकीटा पुटे देऊनी=विचाररूप शेगडींत आत्म्यावरील अनात्मरूप किडाळ जाळून किंवा त्यास वैराग्याग्नीचीं पुटे देऊन (१०३८) छत्तिसही वानी भेद तोडुनिया निर्विवाद=छत्तीस तत्त्वरूप हिणकस जाळून कसाचे भेद नाहींसे करून. आपणपे='स्व' तत्त्वास, स्वभावास, भावास का आत्मरूपास (१०३९). आपणपयाचे=आपल्या सर्वस्वाचे. आत्मध्यानाचिया–अध्यात्मज्ञानाचिया. आपणपेचि=स्वतःचें सर्वस्व, आत्मरूप (पाहातात) (१०४०). आणीक–आणि. दैवबगे=दैवसबंधानें, देवयोगानें, साख्ययोगे=ज्ञानयोगानें. आंगलगे=आधारें, आधारानें, आश्रयानें, अगच सर्व करुणेचें करून, लहान होऊन, बाल्य अंगिकारून (१०४१) चतुर्विध प्रकारे=१ आत्मानात्मविचार, २. आत्मध्यान; ३. सांख्यज्ञान; ४ कर्मयोग

हे वीरश्रेष्ठा अर्जुना, कोणी योगी विचाररूपी शेगडीमध्यें आत्म्यावरील अनात्मरूपी किडाळ नाहींसें करून–त्यास अग्नीची पुटें देऊन (आपणपे शुद्ध निवडिती). (१०३८)

छत्तीस गुण जे आहेत त्यामधील कस किंवा भेद हे तोडून नाहींसे करून त्यामधील लोकापवाद का भाडण हें तोडून आपणपे म्हणजे शुद्ध आत्मस्वरूप निवडतात. (१०३९)

अशा आपल्या सर्वस्वाच्या पोटीं आत्मध्यानाच्या दृष्टीनें आपलें सर्वस्व–आत्मरूप हे कीरीटी, पाहतात (१०४०)

आणि केवळ दैवयोगानें, दैवच एक सबंधाचे करून साख्ययोगासच, ज्ञानयोगासच चित्त देतात व असेही पण ते आत्मरूप पाहातात व दुसरे कोणी एक कर्माचे अग पुढें घेऊन–कर्माच्या आश्रयाने का आधारानें–कर्मामध्यें आपलें अंगच करुणेचे करून–लहान होऊन का बाल्य अगिकारून आपणपे देखती–आपलें आत्मस्वरूप पाहाणारे होतात. (१०४१)

अशा ह्या चार तऱ्हानीं जे मजला पुरतेपणानें मिळालेले होतात त्याना भोक्तव्य असें काहींही उरत नाहीं (१०४२)

**अन्येत्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः॥ २५॥**

एवं अजानन्तः=असें हें न जाणणारे अन्येभ्य श्रुत्वा उपासते=(तत्त्वगुरूपासून) दुसऱ्याकडून ऐकून घेऊन सागितल्याप्रमाणें उपासना करतात अतितरन्ति मृत्युं ते अपि=मृत्युरूपी संसारसागर तरून जातात. श्रुतिपरायणाः=असे श्रवणपरायण (गुरूपासून ऐकलेली गोष्ट प्रमाण मानून चालणारे) लोकही.

**अन्वय**—एवम् अजानन्तः अन्ये। अन्येभ्यः श्रुत्वा उपासते। ते अपि श्रुतिपरायणाः। एव मृत्युं अतितरन्ति।

**अर्थ**—दुसरे कोणी हें (ज्ञान) न जाणणारे दुसऱ्यापासून (तत्त्वगुरूपासून) ऐकून घेऊन त्यांनीं सांगितल्याप्रमाणें उपासना करितात. असे ते श्रुतिपरायण–श्रवणपरायण–म्हणजे सांगितलेलें मनापासून ऐकणारे व ऐकिलें जें त्याप्रमाणें उपासना करणारे–प्रमाण मानून चालणारे असे लोकही मृत्युसंसारसागरास तरून जातात. (२५)

**येणे येणे प्रकारें। निस्तरती सांचोकारें।**
**हें भव भेऊरें। आघवेंचि॥ १०४३॥**

परी ते करिती ऐसे। अभिमान दवडुनि दशे।
एकाचिया विश्वासे। टेकिती बोला ॥ १०४४ ॥

जे हिताहित देखती। हानी कणवा घेपती।
पुसोनि सीण हरिती। देती सुख ॥ १०४५ ॥

तयाचेनि मुखे (जे) निगे। तेतुले आदरे चांगे।
ऐकोनिया आंगे। मने होती ॥ १०४६ ॥

तया ऐकणेयाचि नावे। ठेविती गा आघवे।
तया अक्षरासी जीवे। लोण करिती ॥ १०४७ ॥

तेही अंती कपिध्वजा। इया मरणार्णव समाजा।
पासूनि निघति वोजा। गोमटिया ॥ १०४८ ॥

ऐसेसे हे उपाये। बहुवस येथे पाहे।
जाणावया होये। एकी वस्तु ॥ १०४९ ॥

आता पुरे हे बहुत। पै सर्वार्थीचें मथित।
सिद्धांत नवनीत। देवो तुज ॥ १०५० ॥

एतुलेनि पांडुसुता। अनुभवु लाहाणा आईता।
येर तंव तुज होता। सायास नाहीं ॥ १०५१ ॥

म्हणौनि ते बुद्धि रचुं। मतवाद हे खांचु।
सोलीव निर्वेचु। फलितार्थचि ॥ १०५२ ॥

सांग्वोकारे = खरेपणानें भव भेऊरें – भय का उरे – भव काऊरे = भवभयभ्राति – भवभ्रांति – भववेड (१०४३) एकाचिया विश्वासे टेकिती बोल = एकाच्या शब्दावर विश्वास ठेवितात अभिमान दवडुनि दशे = अभिमानदशा ही बाजूस ठेवून, निरभिमान होऊन (१०४४) हिताहित देखती = कल्याण का अकल्याण हें पाहातात. हानी कणवा घेपती – (हा निकणवा घेपती) = नाशापासून दयेनें वांचवितात – नाश होणार म्हणून दयार्द्र होतात (१०४५) निगे – जे निगे. चागे = चागले (१०४६). ऐकणेयाची नावे – ऐकणे याचेनि – एकते याचे नावे – (नावे = बाजूस). ठेविति – ठेवती. गा आघवे = श्रवणाचें नाव ऐकल्याबरोबर इतर सर्व कामें बाजूस ठेवितात – तें ते ऐकण्याचें नाव – श्रवण करण्याचें नाव घेताच सर्व व्यापार बाजूस ठेवून ऐकतात. लोण करिती = निंब लोण, ओवाळणी करितात (१०४७). मरणार्णव समाजा = मृत्युरूपी समुद्र समुदायापासून – मृत्युरूप महासागरापासून निघती वोजा गोमटिया = चांगल्या रीतीनें – प्रकारानें (वोजा) बाहेर पडतात (१०४८) येथे – एथे एकी – एक (१०४९) देवो – देऊं (१०५०). अनुभवु लाहाणा आईता = अनुभवाचा आयताच अनायासे लाभ घेऊन – अनुभवाची प्राप्ती होते – अनुभव हेंच एक देवाचें देणें (लाहाना) तें अनायासेंच पदरात दडतें येर = ब्रह्मरूप होण्यास (१०५१) बुद्धि रचुं = बुद्धीम समजेल अशा – प्रबंध – बुद्धिरचनेनें सागूं. मतवाद हे खाचू = मतवादाचे खंडण करूं. निर्वेचु = सांगूं. फलितार्थचि = शुद्ध आत्मज्ञान (१०५२)

अशा अशा प्रकारानीं योगीजन जे ते उपाय योजण्याचे करून – उपायानीं स्वतःस जाणणें का आत्मरूप जाणण्यामध्यें जी काहीं अडचण येते ती खरेपणानें निस्तरली होते व अशीं तीं संकटें का भवभेऊरें म्हणजे ह्या भवसागराबरोबर असणारी जी भ्राति का वेड किंवा भय हें सर्व खरेपणानें निस्तरलें होतें (१०४३)

पण ते असें करतात कीं – ते प्रकृतिपुरुष विवेकामध्यें सर्वथैव रत असलेले ते योगी म्हणा, का ज्ञानी म्हणा, का आणीक कोणी दुसरे म्हणा – असे ते अभिमान सर्वथैवपणें – अभिमान हा बालवयाचा करून – दिव्याची वातच जशी का अगदीं लहान अशी – तसा तो अभिमान हा अगदीं सरळपणें बालपणाचा करून – तो अभिमान ते बालपणातच दवडितात – मुरवितात – ( जसें का एकाद्या बाळाचें कण्हणें, का रुसणें छेद घेऊन असतें तसें ) एकाद्याच शब्दावर मुळीं विश्वासानें ठेवितात – एकावरच, एकविध एकपणावरच विश्वास ठेवून बोलास टेकतात, तेथीलच्या बोलासच टेकून असतात. एक जो सर्व विश्वासाचा आहे – जो पूर्ण श्रद्धाळू – निष्ठावंत असा आहे त्याच्याच बोलास टेकतात. त्याच बोलाचा ( बोल = ध्वनिसूत्र, अक्षरमातृका ) टेका घेऊन असतात – तेथें विश्वच श्वास घेऊं लागून विश्वासास आलें असें होणारें होतें – जसें का बाल्यच एक मातेनें कुरवाळून त्याचें संगोपनच करण्याचें केलें तेथें त्या मातेचा जसा आनंद अवर्णनीय असाच तो आनंद आता दोहीकडे वाटला गेला – परिणामास आला असें होतें. ( १०४४ )

असें तें ' एकाचिया विश्वासें ' एकविधतेचें असलेलें सर्व विश्वास एकावर ठेविला – सर्व विश्व एकाच्या श्वासाचें असें विश्वासाचें केलें – उपकार अलौकिकु प्रकृतिपुरुष विवेकु करी – असे ते प्रकृतिपुरुषविवेक हाच लोकोत्तर असा उपकारच करणारे ते – हित व अहित पाहून नाशापासून दयेनें वाचवितात – नाश होणार म्हणून दयार्द्र होतात – असे ते ज्ञानी करुण हृदयाचे होऊन करुणा करणारे – करुणा घेणारे होतात – व विचारपूस करून सर्व शीण नाहींसा करून सुख देतात – कणवनच येणारी जेथें तेथें हा कणवेचा असा घेऊन असतात. ( १०४५ )

असे ते दयार्द्रतेचे त्याचे मुखामधून – जें जे काहीं निघते ते ते अति चागल्या आदरानें ऐकून घेऊन सर्व अंगानें व मनानें तेंच जे होतात त्यानीं आपले सर्व अग व मन – त्याच्या मुखातून जें काहीं निघालेलें तें अत्यादरेंकरून ऐकून घेऊन – तेथेंच ते देतात ( १०४६ )

त्या ऐकण्याच्या नावानेंच मुळी आपलें सर्व काहीं ठेवितात – त्याच्या नावानें आपलें सर्व काहीं करून असतात. तेथेंच – त्या ऐकण्यातच – ऐकणें हेंच एक नाव दिलेले तेथेंच ठेवून असतात.

त्याच्या नांवानें – त्या ऐकण्याच्या नांवानें – ऐकणें हेंच एक सर्व महत्त्व दिलें गेलेलें तेथें त्या ऐकण्यांतच – ऐकण्याच्या नांवांतच मुळीं त्यानीं आपलें सर्व काहीं आघवे – सर्वस्व – ठेविलें व तेथीलच्या अक्षरासच मुळीं आपल्या जीवभावानें निंबलोण करितात – ओवाळतात – ( येथे असेंही म्हटलें आहे कीं श्रवणाचे नाव ऐकल्या-बरोबर इतर सर्व कामें बाजूस ठेवून त्या ऐकण्यातच – तें ऐकण्यानें ते इतर सर्व व्यापार बाजूस ठेवून ऐकतात – ऐकणें करितात – व त्या ऐकण्यास – अक्षरास ऐकण्यावरून – अक्षरावरून आपले सर्व जीवनच मुळीं ओवाळून टाकितात – जीव ओवाळून टाकून निंबलोण करतात, दृष्ट काढतात ( १०४७ )

असें तें – ऐकण्याच्या नावानें आपलें सर्वस्व ठेविले व जीवच दृष्ट काढण्यास योजिला – असें जें तेंहीपण हे कपिध्वजा, शेवटी म्हणजे अंतकाळीं, ह्या मृत्युरूपी महासागरामधून चागल्या प्रकारें करून बाहेर निघ-तात. 'इया मरणार्णव समाजापासूनि गोमटिया वोजा निघती' ह्या मृत्युरूपी समुद्रजमावामधून, समुदाया-पासून ( वोजा ) चागल्या प्रकारें, गोमट्या रीतीनें बाहेर पडतात. ( १०४८ )

असे असे हे उपाय येथें बहुत आहेत – असे ते उपाय पाहून एक वस्तु ती जाणावयास तूं वस्तूच होऊन ऐस. मुळी ती वस्तु – एक ती वस्तु जाणावया एक वस्तु होई – असे येथें बहुत उपाय ते तूं पाहून घे व एक वस्तूच होऊन ती एकी वस्तूच ( जाणण्याचें कर ) होऊन ऐस. ( १०४९ )

आता असें हें बहुत जें काहीं आहे ते असो – पण सर्व पुरुषार्थाचे जें काहीं एक मंथन केलेलें असें ते सिद्धान्तनवनीतच तुला आतां देतो – देण्याचें करूं – देण्याचे करितों ( १०५० )

एवढ्यानेंच हे पाण्डुसुता, 'अनुभवु लाहाणा आईता' म्हणजे अनुभवाचें आयतें होणें का देणें हें होईल. तेथें अनुभवाचें आयतें लहानगें तुला दिलेलें होईल. अनुभवाचा आयता लाभ होईल. अनुभवाची येणी (का देणीघेणी) प्राप्ति होते व यानंतर येर म्हणजे इतर सर्व कांहीं का ब्रह्मरूप होण्यास तुजला कसलेही ते सायास का श्रम पडणार नाहींत (१०५१)

या करिता तशीच ती बुद्धि करूं–का त्या बुद्धीच तमलेंच एक वळण का चढण देऊं–रचनेचें करूं–इतर मतवाद्याचे वाद हे खंडन करूं व शुद्ध आत्मज्ञानच एक तें सांगूं–फलितार्थाचि सोलीव निर्वचूं–असें आतां करू (१०५२)

**यावत् संजायते किंचित् सत्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

संजायते = उत्पन्न होतें (संगात् जायते यत्). सत्वम् = प्राणी, स्वभाव, बळ, उत्साह, अस्तित्व, धैर्य, प्राण, द्रव्य, आत्मा, चैतन्य संयोगात् = अतिसघट्टन, मिलाफ, समागम तत् विद्धि = तें जाण भरत + ऋषभ = भरतकुलोत्पन्नातील श्रेष्ठ असा

अन्वय–यावत् किंचित् सत्वं, स्थावरजंगमम् जायते तत् (विद्धि) भरतर्षभ, क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् (जातम्) विद्धि ।

अर्थ–जें किंचित् काहीं सत्व (जीव, अस्तित्व, स्वभाव) स्थावर किंवा जंगम असें (सोबतीनें, सगानें) जन्मतें, उत्पन्न होते तें, हे भरतकुलातील श्रेष्ठ अशा अर्जुना, क्षेत्र व क्षेत्रज्ञ याच्या मैत्रीनें, संबंधानें, एकत्र येण्यानें, सयोगानें का समागमानें जन्मलें–जन्मते–हर्षास आलें–येतें–होतें–का उत्पन्न होतें–झालें आहे असेंच समज. तेथें क्षेत्रपण, क्षेत्रज्ञत्व व संयोग हे तिन्ही एकदमच हर्षास आले, सजीव उत्पन्न झाले, जीवदशेस आले असें समज. स्थावर, स्थितिशील, अचल का जंगम, चर, अस्थिर, सजीव अशी कोणतीहि वस्तू जी उत्पन्न होते ती क्षेत्र व क्षेत्रज्ञ याच्या संयोगापासून होते असें जाण. (२६)

**तरी क्षेत्रज्ञ येणे बोले । तुज आपणपे जे दाविले ।**
**आणि क्षेत्रही सांगितले । आघवे जे ॥ १०५३ ॥**

**तया येरयेरांच्या मेळी । होईजे भूतीं सकळीं ।**
**अनिल संगें जळीं । कल्लोळ जैसे ॥ १०५४ ॥**

**का तेजा आणि उखरा । भेट जालिया वीरा ।**
**मृगजळान्निया महापूरा । रूप होय ॥ १०५५ ॥**

**नाना धाराधर धारी । झळंबलिया वसुंधरी ।**
**उठिजे जेवी अकुरी । नानाविधी ॥ १०५६ ॥**

**तैसें चराचर आघवें । जें कांहीं जीव (येणें) नांवे ।**
**ते तो उभय योगें संभवे । ऐसें जाण ॥ १०५७ ॥**

**यया लागीं अर्जुना । क्षेत्रज्ञा प्रधाना ।**
**पासूनि नव्हती भिन्ना । भूतव्यक्ति ॥ १०५८ ॥**

आघवे जे–आघवेचि (१०५३) जळीं–सलीलीं कल्लोळ = लाटा (१०५४). तेजा आणि उखरा = रविकिरणांची आणि माळजमिनीची भेट–भेटी (१०५५). नाना = अथवा. धाराधर धारी = पर्जन्यधारांनीं झळंबलिया वसुंधरी = पृथ्वी भिजली असता नानाविधी–नानाविधे (१०५६) जीव नांवे–

जीव येणें नावें=जीव नांवानें उभय योगें (योग) संभवे=दोघाच्या म्हणजे प्रकृतिपुरुषाच्या योगानें उत्पन्न होतें (१०५७) यया लागीं–इया लागीं. क्षेत्रज्ञा प्रधाना पासूनि=(प्रकृतिपुरुषाहून, पुरुषप्रकृतिपासून) =क्षेत्रज्ञ प्रधान ब्रह्म=(प्रधानः पुरुषेश्वरः 'स ईश्वर. पूर्वेषां सर्वेषामपि गुरु काले–नानवच्छेदात्।) प्रधान =त्रिगुणात्मिका प्रकृति (साख्य)=जगाचें उपादान कारण माया, प्रकृति. नव्हती–न होती (१०५८).

येथें आतां क्षेत्रज्ञ या बोलानें तुला आपणामध्यें जें सर्वस्वपणें दाखविलें, तसेंच सर्व क्षेत्रही पण सांगितलें जें (अशा त्याच्या एकमेकांच्या मेळानें भूतें हीं जन्मलेलीं होतात–आहेत) (१०५३)

अशा त्या क्षेत्र व क्षेत्रज्ञाच्या ऐक्यानें, मेळानें सकळ भूतें हीं होणारी होतात–सकळ भूतीं होईजे–ज्याप्रमाणें अनिल म्हणजे वायूच्या संगानें सलिली–जळामध्यें कल्लोळ, लाटा उत्पन्न होतात त्याप्रमाणें. (१०५४)

तेज हें क्षेत्रज्ञाचे व माळजमीन ती क्षेत्र तिचे ह्या दोघांच्या (तेज व माळजमीन) भेटीमध्यें ज्याप्रमाणें मृगजळ हें भासमान होते–त्यास रूप येऊन असतें–प्रत्यक्ष दिसूं लागतें–तशीं सकळ भूतें ही त्या ऐक्यानें भासमान होणारीं होतात–रूपास आलेलीं होतात तेथे (तेजाची व उखराची भेटच झाली जशी का) रविकिरणांची व माळजमिनीची भेट झाली असता, हे वीरा अर्जुना, ज्याप्रमाणें मृगजळाचा महापूरच एक रूपास आला का जसा असें त्यास रूप येऊन असतें (१०५५)

अथवा पर्जन्यधारानीं पृथ्वी ही भिजली असतां ज्याप्रमाणें अनेक अकुर हे वर येऊन असतात–दिसूं लागतात–उठून दिसतात (१०५६)

त्याप्रमाणें चराचर अघवें–स्थावरजंगम सर्व काहीं जे जीव या नावानें असलेलें असतें तें तर दोघांच्या जिवंतपणाच्या म्हणजे प्रकृतिपुरुषाच्या योगानें उत्पन्न होतें असें जाण त्याप्रमाणें सर्व चराचर जिवंत अशा उभययोगें संभवें ऐसें जाण उभय जिवंत योगच जसा त्या जीवदशेस आलेल्यास–जीव नावानें असलेल्यास –सभव देणारा होय असें जाण (१०५७)

एवढ्याच करिता हे अर्जुना, क्षेत्रज्ञ प्रधानाहून वेगळी अशी भिन्न ही भूतव्यक्ति आहे असें नाहीं (क्षेत्रज्ञ–प्रधानब्रह्म=प्रधान· पुरुषेश्वरः 'ईश्वरः' स पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्।)

ब्रह्मसूत्रें–१ ब्रह्म. २ प्रधानब्रह्म (१०५८)

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्।**
**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥२७॥**

समम्=सारखा. सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्=सर्व भूताच्या अंतरीं सारखा असणारा. सर्व भूतेषु विनश्यत्सु अविनश्यन्तम्=भूतें नाश पावलीं तरी नाश न पावणारा असा. य· पश्यति स पश्यति= असा परमेश्वर आहे हें जो पहातो तोच खरा पाहणारा होय.

अन्वय—सर्वेषु भूतेषु समं तिष्ठन्तं परमेश्वरम्। (सर्वभूतेषु) विनश्यत्सु अविनश्यन्तम् (परमेश्वरम्)। यः पश्यति स पश्यति।

अर्थ—सर्व भूतांच्या अंतरी सारखा असणारा असा परमेश्वर आहे व सर्व भूते हीं नाश पावलीं तरी (परमेश्वर हा) नाश न पावणारा असा आहे, असें जो पाहातो तोच खरा पाहणारा होय

**पै पटत्व तंतू नव्हे। तऱ्ही तंतूसीचि ते आहे।**
**ऐसे खोली डोळां पाहे। ऐक्य हें गा ॥१०५९॥**

**भूते आघवीच्चि होती । एकाची एक आहाती ।**
**परी पै भूतप्रतीती । वेगळाली असे ॥ १०६० ॥**

**ययाची नांवेही आनाने । अनारिसी वर्तने ।**
**वेष ही सीनाने । अवघेयाचे ॥ १०६१ ॥**

**ऐसे देखोनि कीरीटी । भेदु सूसी हन पोटी ।**
**तरी जन्माच्चिया कोटी— । न लाहसी निघो ॥ १०६२ ॥**

**पै नाना प्रयोजन-शीळे । दीर्घ वक्त्रे वर्तुळे ।**
**होती एकीचीच फळे । तुंबिणियेची ॥ १०६३ ॥**

**होत का उजू वांकुडे । परी बोरीचे हे न मोडे ।**
**तैसी भूतें अवघडे । (परि) वस्तु उजू ॥ १०६४ ॥**

**अगारकणी बहुवसी । उष्णता समान जैसी ।**
**तैसा नाना जीव राशी । परेश असे ॥ १०६५ ॥**

पटत्व = वस्त्रपण तंतूसीच – तंतूच्चि ऐसा – ऐसे खोलि डोळां = सूक्ष्म दृष्टीनें ( १०५९ ). परी तूं प्रतीती । याची घे पा—पै भूतप्रतीती । वेगळाली असे ॥ भूतप्रतीती = प्राणिमात्राचा अनुभव ( १०६० ). ययाची नावे ही – याची नामे ही आनाने = निरनिराळी. अनारिसी = सहज सूक्ष्म विचारानें, भिन्नभिन्न. सीनाने = तऱ्हतऱ्हेचे अवघेयाचे – अघवियाचे ( १०६१ ) सूसी = धरशील, ठेवशील न लाहसी निघो = निघूं शकणार नाहींस, तरणार नाहीस ( १०६२ ) नाना प्रयोजन-शीळे = विविध उपयोगाचीं, नाना प्रकारच्या कामी उपयोगी पडणारी दीर्घ – दीर्घे वक्त्रे = वक्रे एकाचीच – एकीच तुंबिणियेची = भोपळीची ( १०६३ ) होता का – होतु का उजू = सरळ, नीट वस्तु – परिवस्तु ( १०६४ ) अगारकणी = अग्नीच्या ठिणग्यात, निखाऱ्यात जीव राशी – जीवसंघ तैशी – तैसा सर्वांगी चेतनाधर्मे ( १०६५ ).

वस्त्रपण हें काहीं तंतू नव्हे जरी तरी पण तेथें वस्त्रपण हें सर्व तंतूंचें असल्यानें ते तंतूसच असतें नव्हे का, अशा तऱ्हेच्या सूक्ष्म दृष्टीने, खोलीने हें ऐक्य पाहात अस (१०५९)

भूतें ही सर्व होतात, जातात – एकाची एक केलेली आहेत – असतात – पण भूतप्रतीति ही प्राणिमात्राच्या अनुभवानें वेगळाली अशी असते पण तूं ह्या गोष्टीची प्रतीति घेऊन ऐस (१०६०)

ह्याचीं नावें ही आनानी म्हणजे निरनिराळी – वर्तनेंही पण सहजच, सूक्ष्म विचारानें पाहिलें तर भिन्नभिन्न अशी त्याचप्रमाणें वेषही ते ह्या सर्वांचे तऱ्हेतऱ्हेचे होत (१०६१)

असें पाहून हे कीरीटी, कदाचित् तूं पोटीं भेद ठेवशील – ह्या भूताविषयीं भेद धरशील जर तर कोट्यवधि जन्म घेऊनही तूं तरणार नाहीस – ह्या जन्ममरणचक्रामधून तूं निघूं शकणार नाहीस. (१०६२)

येथें असें पहा कीं ह्या भोपळीची फळें तीं तर विविध उपयोगाची अशी – नानाप्रकारच्या कामीं उपयोगी पडणारी अशी – काही लाबट अशी – काही वाकडी अशी, तर काहीं वर्तुळें म्हणजे गोल अशीं असणारी तीं एकीच का एकीचीं, का एकाच भोपळीची तीं – तुंबिणीयेचीं फळें असलेलीं (१०६३)

सरळ, नीट का वांकडे असे ते बोरीचे असोत तरी मोडतच मुळीं नाहींत, तशी भूतें हीं अवघडलेलीं अशीं असतात पण वस्तु जी ती मात्र उजु म्हणजे सरळ अशीच, केव्हांही नीटच. (१०६४)

अग्नीच्या कणामध्यें, ठिणग्यात का निखाऱ्यात जशी उष्णता ही समान म्हणजे चोहोकडे सारखी असते, त्याप्रमाणें अनेक जीवराशीमध्यें – सर्वांगीं चेतनाधर्मानें असलेला (तो) परेश तो समान असाच जसा का (१०६५)

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥**

सर्वत्र समं पश्यन्=सर्वत्र सम म्हणजे सारखा अशा ईश्वराला ईश्वरं समवस्थितम् (पश्यन्)= पाहणारा – तसेंच ईश्वर हा सर्वत्र सारखा अवस्थित म्हणजे भरून आहे असें पाहणारा जो तो. आत्मना आत्मानं न हिनस्ति=आपण आपल्यास हिंसेचे करीत नाहीं. तत. परांगतिं याति=त्यामुळें तो परमगतीस प्राप्त होतो

अन्वय—सर्वत्र समम् । सर्वत्र समं अवस्थितम् । ईश्वरं पश्यन् । स । आत्मना आत्मानं न हिनस्ति । तत परां गतिम् याति । (येथे चारी वाणींचा उल्लेख लक्ष्यांत घ्यावा).

अर्थ—सर्वत्र समपदाचा सारखा, सर्वत्र एकसारखा भरून असलेला असा जो ईश्वराला पाहातो तो आपण आपणास घातकर न होता परमगतीप्रत पावतो (२८)

**गगनभरीं धारा । (परि) पाणी एकचि वीरा ।**
**तैसा या भूताकारा । सर्वांगी तो ॥ १०६६ ॥**

**हे भूतग्रामविषम । परी वस्तू ते एथ सम ।**
**घटमठी व्योम । जियापरी ॥ १०६७ ॥**

**हा नाशता भूताभासु । येथ आत्मा तो अविनाशु ।**
**जैसा केयूरादिकी कसु । सुवर्णाचा ॥ १०६८ ॥**

**एवं जीवधर्म हीन । जो जीवेसी अभिन्न ।**
**देखे तो सुनयन । ज्ञानिया माजी ॥ १०६९ ॥**

**ज्ञानाचा डोळा डोळसा । माजी डोळस तो वीरेशा ।**
**हे स्तुति नव्हे बहुवसा । भाग्याचा तो ॥ १०७० ॥**

**हे गुणेंद्रिय धोकटी । देह धातूची उघडी ।**
**पाचा मेळावा वोखटी । दारुण हे ॥ १०७१ ॥**

**हे उघडी पांच वेऊळी । पंचधा आंगीं लागली ।**
**जीवपंचानना सांपडली । हरिणाची राहाटी ॥ १०७२ ॥**

**ऐसा असोनि इये शरीरी । कोण नित्य बुद्धिची सुरी ।**
**अनित्य भावाच्या उदरी । दाटीचि ना ॥ १०७३ ॥**

**परी इये देही असता । जे न येचि आपणया घाता ।**
**आणी शेखी पांडुसुता । तेथेंचि मिळे ॥ १०७४ ॥**

**जेथ योगज्ञानाची प्रौढी । वोलांडुनिया जन्म कोडी ।**
**न निगो इया भाषा बुडी । देती योगी ॥ १०७५ ॥**

**जे आकाराचे पैलतीर । जे नादाची पैल मेर ।**
**तुर्येचे माजघर । परब्रह्म जे ॥ १०७६ ॥**

**मोक्षा सकट गती । जेथे येती विश्रांती ।**
**गंगादि अपांपती । सरिता जेवी ॥ १०७७ ॥**

**ते सुख येणेंचि देहे । पाय पाखाळणिया लाहे ।**
**जे भूतवैषम्यें नोहे । विषम बुद्धि ॥ १०७८ ॥**

**दीपांचिया कोडी जैसे । एकचि तेज सरिसे ।**
**तैसा जो असतचि असे । सर्वत्र ईश ॥ १०७९ ॥**

**ऐसेनि समत्वें पांडुसुता । जिये जो देखत सांता ।**
**तो मरणा आणि जीविता । नागवे फुडा ॥ १०८० ॥**

**म्हणोनि नो दैवागळा । वानित असो वेळोवेळा ।**
**जो साम्यसेजे डोळा । लागला तया ॥ १०८१ ॥**

पाणी – परि पाणी (१०६६) भूतग्राम = प्राणिसमूह. विषम = भिन्न (१०६७). नासता – नाशता भूताभासु – भूतभास = नाहींसा होणारा जगदाभास आत्मा – पुरुष, आत्मा. अविनाशु = नाश न पावणारा. केयूरादिकी कसु सुवर्णाचा = सुवर्णभूषणादिकास – बाहुभूषणादिक अलंकाराच्या ठायी कसोटीवर उमटणारा सोन्याचा वाण किंवा कस (१०६८) जीवधर्म – जीव ऊर्मि = शोक, मोह, जन्म, जरा, क्षुधा, तृषा, गुणधर्म, विकार. हीन = (पासून) अलिप्त जो जीवेंसि अभिन्न देखे तो सुनयन ज्ञानिया माजी = आपलें जीवधर्मांहून वेगळेंपण, पण जीवासी एकरूप आहोत असें जो पहातो, तो ज्ञानियात खरा डोळस होय जीवधर्मरहित आपण असून सर्व जीवाशी एकरूप आहोत असें ज्यानें पाहिले तो ज्ञानी जनातील खरा डोळस (१०६९) ज्ञानाचा डोळा डोळसा माजी डोळस तो = ज्ञानाचा डोळा उघडल्यामुळें जे डोळस त्यामध्ये तो पुरुष भाग्याचा = दैववान् (१०७०) गुणेंद्रिय धोकटी = हें शरीर गुण व इंद्रियें याची पिशवी, धोकटी आहे. देहधातूची उघडी – त्रिकुटी = कफ, वात, पित्त ह्या तीन धातूंचें हें शरीर – त्रितय पाचा – पाच मेळावा वोखटी = पंच मेळाव्याची कुडी = पंच भूताचा खिचडा, पंच महाभूताचें बनलेलें (१०७१) उघड – उघडी पाच वेउळी = पाच नागयाची इंगळी पचधा (पंचधातु) आगी (आगी) लागली = पाच प्रकारानी जीवाला (देहाला) लागलेली आग आहे जीवपंचानना = जीवरूपी वाघास हरिण कुटी हे – हरिणाची राहाटी = हरिणाचा सापळा (१०७२) ऐसा असोनि इये शरीरी । कोण नित्य बुद्धिची सुरी । अनित्य भावाच्या उदरी । दाटीचिना ॥ = मग नित्य बुद्धीच्या सुरीनें अनित्य भावाचा नाश करून कोण मोकळा होणार नाहीं? (१०७३) नयेचि – न येचि आपणया घाता = (पण ज्ञानी जिवंत आहे तोपर्यंत) आत्म्याचा घात करीत नाहींत आणी शेखी पांडुसुता तेथेचि मिळे = आणि देह पडल्यावर शेवटीं तर त्याच आत्मतत्त्वांत, ब्रह्मपदतत्त्वांत मिळून जातात तेथेचि = ब्रह्मपदी. मिळे – पिळे = मिळतात, पिळलेले होतात (१०७४). प्रौढी – या प्रौढी इया भाषा = या प्रतिज्ञेनें न निगो = परतणार नाहीं असें म्हणून (१०७५) नादाची = ध्वनीची मेर = सीमा, कडा (१०७६). सकट – सगट. जेथे – जेथ अपापती = समुद्र (१०७७). सुख – सुख तो पाय – पाद पाखाळणिया लाहे जो (जे) = ते सुख याच देही त्याचे पाय धुण्यास येते, त्याचे पायी लोळतें = गुरुपादपद्मा लागले – सद्गुरुच्या पूजेनें (१०७८) कोडी = कोट्यवधीमध्यें (१०७९) समत्वे (जीये) = जीवितास येतो, जीवनकळा प्रफुल्लित झाली असे. जिये – जीवे – जी देखत साता = जिवत असता पाहातो – पाहात असता वाचतो मरणा आणि जीविता नागवे फुडा = तो खरोखर जन्ममरणाच्या फेऱ्यात सांपडत नाहीं (१०८०) दैवागळा = आगळया दैवाचा, भाग्याचा, दैववान् वानित असो = वर्णन करितो, वाखाणीत असो (१०८१)

सर्व गगन भरून पावसाच्या धारा असल्या तरी पण ते पाणी तर हे वीरा अर्जुना, जसें एकच त्याप्रमाणें ह्या भूतआकारास सर्वांगानें – भूतआकारामध्ये सर्वस्वी सर्वांगी तोच (परेशच) आहे – असतो (१०६६)

भूताचा हा नामरूप खेळ नाशवंत असला तरी त्यातला आत्मा मात्र शाश्वत आहे. हे भिन्नभिन्न प्राणिसमूह वेगळे असे जरी तरी पण वस्तु जी, आत्मा जो तो तर सम अशी ( विषम नव्हे ती सम अशी ) होय. जसें गगन हें मठात किंवा घटांत असलेलें, तें गगन हें तर गगनच जसें एक तें समच जसें का (१०६७)

हा जगदाभास नाहींसा होतो – नाहींसा होणारा जरी तरी पण येथें आत्मा तो – पुरुष तो नाश न पावणारा जसा बाहुभूषणादिकास, सुवर्णभूषणास कसोटीवर उमटणारा सोन्याचा वान दागिन्याचा असला तरी तो सोन्याचाच जसा. (१०६८)

जो याप्रमाणें आत्मतत्त्वाला जीवधर्माहून अभिन्न समजतो तोच ज्ञानियांतील डोळस जाणावा. याप्रमाणें जीवधर्म जो त्याहून जीवभावानें अभिन्न असा ( आत्मा पाहतो ) तो ज्ञानियांमध्यें सुनयन म्हणजे उत्तम अशा ज्ञानदृष्टीचा समजावा. (१०६९)

ज्ञानाचा डोळा असलेला, डोळसामध्यें तोच एक खरा डोळस होय, तो हे वीरश्रेष्ठा ( ज्ञानाचा डोळा उघडल्यामुळें जे डोळस त्यामध्यें तो पुरुष समजावा ) हें कांहीं एक स्तुतीचें असें बोलणें नाहीं पण तो खरो-खरच एक आगळ्या अशा महत् भाग्याचा दैववान् समज (१०७०)

हे शरीर गुण व इंद्रियें याची पिशवी ( थोकटी ) आहे, ( धाकौटी – धोकौटी ) आहे कफ, वात, पित्त या तीन देहधातूंचें हें शरीर त्रिकूट आहे पंचमहाभूताचा बनलेला खिचडा का पंच मेळाव्याची कुडी अशी दारुण उघडी त्रिकुटी होय (१०७१)

ही उघड म्हणजे स्पष्ट अशी पाच नाग्याची इंगळीच जशी का हा देह म्हणजे ह्या जीवाला लागलेली पंचधा, पाचानीं धरलेली, भरलेली आग आहे – जीवरूपी वाघास सापडलेली ही हरिणकुटीच ( सापळाच ) एक – का हरिणाची राहाटीच एक (१०७२)

ऐसा ह्या शरीरामध्यें शरीरानें असलेला जीव – तेथे पाचानी ठेंवलेला हा देह म्हणजे फार भयंकर अशी जीवाला लागलेली आग आहे, तेथें मग नित्यबुद्धीच्या सुरीने अनित्य भावाचा नाश करून कोण मोकळा होणार नाहीं ? (१०७३)

म्हणून असा तो ज्ञानी ह्या देहामध्यें असता आत्मघात करीत नाहीं आणि देह पडल्यावर तर त्याच आत्मतत्त्वात मिळून जातो

पण ह्या देहानें असताना जो आत्मघातास येत नाही – आपलें सर्वस्व नाश करणारा होत नाहीं – तेथें स्वतःनें स्वतःसच घात केला असा जो होत नाहीं, तो तर शेवटीं म्हणजे मरणाचे वेळेस त्या आत्मपदींच का ब्रह्मपदांतच मिळून जातो – मिळलेला होतो. (१०७४)

योगीजन योगसामर्थ्यानें ज्यात प्रवेश करून तेथेंच कायम राहाण्याची इच्छा करतात असें जें भूतसृष्टीच्या पलीकडे असलेलें परब्रह्म तेथेच राहातात

कोट्यवधि जन्म ओलांडून जे ह्या योगज्ञानाच्या प्रौढीनें योगीच झाले ते आम्ही परतणार नाहीं असें म्हणून प्रतिज्ञेनें असतात व योगच एक आपलासा करतात (१०७५)

असें जें ( आकाराचें पैलतीर ) भूतसृष्टीच्या पलीकडे असलेलें – जें नादाचा का ध्वनीचा पैलतीर का सीमा – जें तुर्याअवस्थेचे मधलें घर ते परब्रह्म जें तेथेंच राहातात (१०७६)

ज्यात मोक्षादि सर्व परमगति विश्रांतीस येतात – लीन होतात अशा त्या परब्रह्माच्या प्राप्तीचें सुख याच देहानें असता – याच देहात असता – त्याना विपुल मिळतें जे भूतवैषम्यानें विषमबुद्धीचे न होतां –

भूतामधले भेदभाव मनात न आणता तें सुख याच देहीं त्याचे पाय धुण्यास येतें – त्याचे पायीं लोळतें – श्रीगुरूचे पाय प्रक्षालनानें – श्रीसद्‌गुरूच्या पूजेनें. (१०७७)

कोट्यवधि दीपामध्यें जसें सरिसेपणानें एकच तेज – तसा ईश हा सर्वत्र जो आहेच आहे. (१०७८)

अशा समत्वें म्हणजे भेदभावरहिततेनें जो जीवितास येतो – जीवनकला प्रफुल्लित झाली असा असतो – त्याच्या ठायीं भेदभाव नसतो – प्रकृतीच म्हणजे मायाच सर्व खेळ करविते असें पाहून असतो – जिवंत असता जी – जीये – जीवे – जीवित उदासीन असें करून असतो, ( त्याचा आत्मा उदासीन असतो ) पाहातो तो जन्म ( जीवितास येण्याच्या ) आणि मरणाच्या फेऱ्यात सापडत नाहीं. (१०७९)

हें ( तत्त्व ) ज्याला कळलें त्यालाच खरें तत्त्व समजलें म्हणून तोच खरा दैवागळा – आगळ्या भाग्याचा दैववान् असा जाण. हेंच नेहमीं वाखाणीत असावें, तेथें जसें का आत्मसेजेवरच तो आत्मरूप होऊनच आहे, तेथेंच ब्रह्मसाम्यामध्येंच त्याचा डोळा लागला – तो स्थिर झाला, विश्रांतीचा झाला – असें समज. (१०८०)

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

प्रकृत्या एव = प्रकृतीनेंच. कर्माणि क्रियमाणानि = कर्मे व क्रियमाण हें केलें जातें. सर्वशः = सर्व प्रकारें यः पश्यति = असें जो जाणतो, ज्ञानदृष्टीनें समजतो तथा अकर्तारम् आत्मानम् = त्याचप्रमाणें आत्मा अकर्ता आहे ( असें पाहातो ) सः पश्यति = तोच ज्ञानी होय

अन्वय—यः प्रकृत्या एव कर्माणि सर्वशः क्रियमाणानि पश्यति । सः आत्मानं तथा अकर्तारं पश्यति ।

अर्थ—जो प्रकृतीकडूनच सर्व प्रकारें कर्में केली जातात – त्याचप्रमाणें आत्मा अकर्ता आहे असें जो पहातो – जाणतो – तोच खरा पहाणारा – जाणणारा म्हणजे ज्ञानी समजावा (२९)

**आणि मनोबुद्धि प्रमुखें । कर्मेंद्रिये अशेखे ।**
**करी प्रकृतीचि हे देखे । सांचे ( जे ) जो गा ॥ १०८१ ॥**

**घरीची राहाटी घरी । घर काही न करी ।**
**अभ्र धांवे अबरी । अंबर ते उगे ॥ १०८२ ॥**

**तैसी प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणीं विविधारंभा ।**
**येथ आत्मा तो वोथंबा । नेणे कोण ॥ १०८३ ॥**

**ऐसेनि येणे निवाडे । जयाच्या जीवी उजिवडे ।**
**अकर्तयाचे फुडे । देखिले तेणे ॥ १०८४ ॥**

**परव्ही तैंचि अर्जुना । होईजे ब्रह्मसंपन्ना ।**
**जै या भूताकृति भिन्ना । दिसती एकी ॥ १०८५ ॥**

मनोबुद्धि – मनबुद्धि. जे – जो ( १०८१ ). राहाटी – राहाटती. अंबर उगे – अंबर ते उगे ( १०८२ ) तैसे – तैसी. आत्मप्रभा = आत्म्याच्या प्रकाशानें – प्रकाशात खेळे गुणीं विविधारंभा = अनेक कार्यारंभांत = गुणांनीं युक्त होऊन अनेक खेळ खेळते. वोथंबा = आश्रयस्तंभ, टेका, खांब, आधार ( १०८३ ). उजिवडे = प्रकाश पडतो. अकर्तयाचे फुडे देखिले तेणे = अकर्त्या आत्म्याला – आत्मा अकर्ता हें त्यानें – निश्चित जाणलें ( १०८४ ) भूताकृति = भूतसंघ एकी = एका आत्मरूपावर ( १०८५ ).

प्रमुख असें जें मन व बुद्धि, तसेंच सर्व कर्मेंद्रियें हीं पुढें घेऊन, प्रकृतीच सर्व कांहीं करते असें खरेपणानें जो पहातो— (१०८१)

(देहप्रकृति) घरीं असलेली जी तीच घरामध्यें राहाटती, राहाटी, घर हें काहींही करीत नाहीं. आकाशांत अभ्र धावत असतें पण (आत्मरूप) आकाश हें उगे असेंच होय, असतें जसें (१०८२)

त्याप्रमाणें प्रकृति ही आत्म्याच्या प्रकाशानें (देहांत) प्रकाशात अनेक कार्यारंभात – विविधारंभा होऊन – गुणानीं युक्त होऊन अनेक खेळ खेळते येथें आतां आत्मा हा तर जसा एक टेका का खांब, आश्रयस्तंभ किंवा आधार असलेला (तो कोण, कसा हें जाणणेंच नाहीं) – तो काहीं ते प्रकृतीचें करणें जाणतच नाहीं (१०८३)

अशा तऱ्हेच्या निवाड्यानें – (कीं प्रकृतीच आत्म्याच्या प्रकाशानें गुणांनीं युक्त होऊन खेळ खेळते – आत्मा हा उगा असाच) – ज्याच्या जीवहृदयामध्यें प्रकाश पडतो – त्यानेंच मुळीं तें आत्म्याचें अकर्तेपण खरेपणानें पाहिलें असें होय. आत्मा हा अकर्ता आहे असें त्यानें निश्चितपणानें जाणलें – असें त्यानें पाहिलें. (१०८४)

हे अर्जुना, एरव्हीं पाहिलें तर तेव्हांच मुळीं ब्रह्मसंपत्तीनें संपन्न होणें होतें जेव्हां का – जर कां – ह्या भिन्न अशा भूत आकृति – हे भिन्न असे भूतसंघ एका त्या आत्मरूपावरच दिसणाऱ्या आहेत, असें दिसणें दिसत असेल तर – एका आत्मरूपावरच ह्या भूताकृति दिसत असतील तर (विवर्तरूपानें जशा का) (१०८५)

**यदा भूतपृथक्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥**

भूतपृथक्भावम् = भूताचें पृथक्पण, अस्तित्व, स्वभाव एकस्थम् = एका आत्म्यामध्येंच स्थित आहे अनुपश्यति = एकसारखे टक लावून पाहाणें जसें तसें येथे विचार करणें हें तपासाचें, वास्तपुस्ताचें जसें. ततः = आत्म्यापासून. विस्तारं = सर्व विस्तार, विस्तरण, फैलाव, प्रसार, प्राचुर्य ब्रह्म संपद्यते तदा = तेव्हांच त्याला ब्रह्माची प्राप्ति होते ब्रह्मसंपत्तीनें – संपदेनें तो युक्त होतो, ब्रह्म प्राप्त होतें.

अन्वय – भूतपृथक्भावं यदा एकस्थं अनुपश्यति । (विस्तृति) विस्तारं ततः एव च । सः (अनुपश्यति) । तदा ब्रह्म सपद्यते ।

अर्थ—(सः) पुरुष हा जेव्हां सर्व भूतांचें पृथक्पणानें अस्तित्व का स्वभाव हे एका आत्म्यांतच स्थित आहेत (एकातच स्थिर पहातो) व सर्व विस्तृत असा हा विस्तार आत्म्यापासूनच आहे असें पाहूं लागतो तेव्हा त्याला ब्रह्मसंपन्नता प्राप्त होते – तेव्हां तो ब्रह्मसंपन्न होतो. (३०)

**लहरी जैसिया जळी । परमाणु कणिका स्थळीं ।**
**रश्मिकर मंडळी । सूर्याचिया जेंवी ॥ १०८६ ॥**

**नातरी देही अवेव । मनी अवयेचि भाव ।**
**विस्फुलिंग सावेव । वन्हि एकी ॥ १०८७ ॥**

**तैसे भूताकार एकाचे । हे दिठी रिगे जै साचे ।**
**तैंचि ब्रह्मसंपत्तीचें । तारुं लागे ॥ १०८८ ॥**

**मग जयातया कडे । ब्रह्मैचि दिठी उघडे ।**
**किंबहुना जोडे । अपार सुख ॥ १०८९ ॥**

येतुलेनि तुज पार्था । प्रकृति पुरुष व्यवस्था ।
ठाये ठावो प्रतिपथा— । माजी जाहली ॥ १०९० ॥

अमृत जसें ये चुळां । कां निधान देखिजे डोळां ।
तेतुला जिव्हाळा । मानावा गा (हा) ॥ १०९१ ॥

हा जी जालिये प्रतीती । घर बांधणें जे चित्ती ।
ते आता ना सुभद्रापती । इयावरी ॥ १०९२ ॥

तरी एक दोन्ही ते बोल । बोलिजेति सखोल ।
देई मनाते वोल । मग ते घेई ॥ १०९३ ॥

ऐसें देवें म्हणितले । मग बोलो आदरिले ।
तेथें अवधानाचेंचि केले । सर्वांग येरे ॥ १०९४ ॥

लहरी – लहरिया परमाणु – परिमाणु स्थळीं = पृथ्वीवर रश्मिकर = रविकिरण. मंडळी = सूर्य-मंडळीं – सूर्यवर्तुलामध्यें – सूर्यतेजाचें वलय जेंवी – जैसे ( १०८६ ). विस्फुलिंग = ठिणग्या. सावेव = सर्व ( १०८७ ) हे दिठी – ये दिठी – येथ दृष्टी – रिगे जै सांचे = दृष्टींत भरतें तारुं = जहाज ( १०८८ ). ब्रह्मचि – ब्रह्मचि ( १०८९ ) प्रकृति पुरुष व्यवस्था = प्रकृतिपुरुषासंबंधीं विचार. ठाये ठावो = जेथला तेथें, बरोबर, तंतोतंत प्रतिपथा = प्रतीतीपथा, अनुभवास बरोबर, अनुभवात आली ( १०९० ) चुळा = हातात. निधान – निदान गा – हा ( १०९१ ) हा जी – वांचूनि जी, जाहालिये प्रतीती. घर बांधणें जे चित्ती = चित्ताचा निश्चय करणें, कायम विचार करणें इयावरी = इतक्यात ( १०९२ ) बोलिजेति – बोलिजति. वोल = ओलीस, हमी, जामीन, गहाण ( १०९३ )

ज्याप्रमाणें पाण्यावर ( वायूमुळे ) लहरी येतात – सूक्ष्म परमाणु हे जसे पृथ्वीवर ( वाऱ्यामुळें उडतात ) – रविकिरण हे सूर्यतेजाच्या मंडळामध्यें का सूर्याच्या तेजोवलयामध्यें हे जसे— ( १०८६ )

अथवा देह हा सावयव जसा – मन हें जसें सर्व भावानीं भरलेलें – एक हा वन्ही म्हणजे जशा सर्व ठिणग्याच ( १०८७ )

त्याप्रमाणें एकाचे भूत आकार – एका भूताचे आकार हे दृष्टीमध्यें जेव्हा प्रवेश करितात तेव्हाच मुळी ब्रह्मरूपसंपत्तीचे जहाज लागलें – सापडलें होते ( १०८८ )

मग जिकडे तिकडे – पाहेल तिकडे – ब्रह्मच मुळी दृष्टि उघडणारें होतें – ह्या ब्रह्मानेंच मुळीं ती दृष्टि उघडली होते – अथवा बहुत काय लिहिणें, तेथें तर अपार सुखच एक जोडलेलें होतें – झालें – मिळालें असें होतें ( १०८९ )

एवढ्यानेंच हे पार्था, तुजला प्रकृतिपुरुष विचार हा जेथला तेथेच – अगदीं तंतोतंत जुळलेला असा प्रतीतिपथास म्हणजे अनुभवास आला असें होय. प्रकृतिपुरुष व्यवस्था प्रतिपंथा आली – अनुभवांत उतरली – बरोबर अनुभवास आली ( १०९० )

अमृत जसें हातात यावें किंवा एखादा गुप्त ठेवा दृष्टीस पडावा, इतका जिव्हाळा येथें मानावा गा. ( १०९१ )

अहो हा, येथें प्रतीति जाहल्यावाचून चित्तामध्ये जे घर बाधणे – चित्ताचा निश्चय करणें का विचार कायम होणें ते तर आताच मुळी ह्यावरच ना, हे सुभद्रापति, होणारें असे. ( १०९२ )

करितां एकादा दुसरा असा, एक दोन असे कांहीं खोलीचे, उत्तम प्रकारचे ते बोल बोलूं—येथें तूं आपल्या मनास वोल दे—मनास हमीचें कर—मन हेंच जामीन आहे असें कर व नंतरच मग ते बोल ऐक—घे—त्याप्रमाणें कर—तरच बरें　　(१०९३)

असें श्रीदेवानीं अर्जुनास म्हटलें व नंतर असें त्यानीं आदर देऊन बोलण्यास सुरवात केली—तेथें आता अर्जुनानें तर आपलें सर्व अंग हें मर्व लक्ष्यच एक—अवधानाचें मर्व असे त्यानें आपलें अंग केलें (१०९४)

**अनादित्वान्निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥**

अनादित्वात्=अनादि असा असल्यामुळें निर्गुणत्वात्=मुळींच गुण नाहीं असा. अयम् परमात्मा =हा परेश· अव्ययः=नच खर्च होणारा अविनाशी. शरीरस्थः अपि=शरीरामध्यें असलेला तरी. न करोति=कांहीं करीत नाहीं. न लिप्यते=कशानेंही लिप्त होत नाहीं.

अन्वय—अयम् अव्यय· परमात्मा शरीरस्थ· अपि अनादित्वात् निर्गुणत्वात् न करोति न लिप्यते ।

अर्थ—हा अविनाशी परमात्मा शरीरात असूनही—अनादि असल्यामुळें व निर्गुण असल्यामुळें—अकर्ता व अलिप्त असतो. (३१)

तरि परमात्मा म्हणिपे । तो ऐसा जाण स्वरूपें ।
जळीं जळे न लिंपे । सूर्य जैसा ॥ १०९५ ॥

का जे जळा आदी पाठीं । तो असतुचि असे कीरीटी ।
माजी बिंबे ते दिठी । आणिकांचिये ॥ १०९६ ॥

तैसा आत्मा देहीं । आथी म्हणिपे हे कांहीं ।
सांचे तरी नाहीं । तो जेथिचा तेथें ॥ १०९७ ॥

आरिसा मुख जैसे । बिंबलिया नांव असे ।
देहीं वसणे तैसे । आत्मतत्वा ॥ १०९८ ॥

तया देहा म्हणती भेटी । हे सफाई निर्जिव गोठी ।
वारिया वाळुवे गाठी । केही आहे ॥ १०९९ ॥

आगि आणी कापुसा । दोरा सुवावा जैसा ।
केउता सांदा आकाशा । पाषाणेसी ॥ ११०० ॥

एक निघे पूर्वेकडे । एक ते पश्चिमेकडे ।
तिये भेटीचेनि पाडे । संबंधु हा ॥ ११०१ ॥

उजियेडा आणि आंधारेया । जो पाड मृता उभेया ।
तोचि गा आत्मया । देहा जाण ॥ ११०२ ॥

रात्री आणि दिवसा । कनका आणि कापुसा ।
अपाड का जैसा । तैसाचि यासी ॥ ११०३ ॥

देह तंव पाचांचे जाले । हे कर्माचे गुणी गुंथले ।
भंवतसे चाकी सुदले । जन्ममृत्यूच्या ॥ ११०४ ॥

हे काळा नळाच्या (कुंडी) तोंडी । घातली लोणियाची उंडी ।
मासी पांख पांखडी । तव हे सरे ॥ ११०५ ॥

हे विपाये आगी पडे । तरी भस्म होऊनि उडे ।
जाले श्वाना वरपडे । तरी ते विष्ठा ॥ ११०६ ॥

या चुके दोन्ही काजा । तरी होय कृमीचा पुंजा ।
हा परिणाम कपिध्वजा । कश्मलु गा ॥ ११०७ ॥

या देहाची हे दशा । आणि आत्मा तो येथ ऐसा ।
पैं सिद्ध नित्य आपैसा । अनादिपणे ॥ ११०८ ॥

सकळु ना निष्कळु । अक्रिय ना क्रियासीळु ।
कृश ना स्थूळु । निर्गुणपणे ॥ ११०९ ॥

साभास का निराभासु । प्रकाश ना अप्रकाशु ।
अल्प ना बहुवसु । अरुपपणे ॥ १११० ॥

रिता ना भरितु । रहितु ना सहितु ।
मूर्तुना अमूर्तु । शून्यपणे ॥ ११११ ॥

आनंदु ना निरानंदु । एकु ना विविधु ।
मुक्त ना बद्धु । आत्मपणें ॥ १११२ ॥

एतुला ना तेतुला । आईता ना रचिला ।
बोलता ना उगला । अलक्षपणे ॥ १११३ ॥

सृष्टिच्या होणां न रचे । सर्वे संहारे न वेंचे ।
आथि नाथि या दोहीचे । पंचत्व तो ॥ १११४ ॥

मवे ना चर्चे । वाढे ना खांचे ।
विटे ना वेंचे । अव्ययपणें ॥ १११५ ॥

एवं रूप पैं आत्मा । देही जे म्हणती प्रियोत्तमा ।
तें मठाकारें व्योमा । नाम जैसें ॥ १११६ ॥

तैसें तयांचिये अनुस्युति । होती जाती देहाकृती ।
तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा ॥ १११७ ॥

अहोरात्रें जैसी । येती जाती आकाशीं ।
आत्मसत्तें तैसी । देहें जाण ॥ १११८ ॥

म्हणोनि इये शरीरीं । कांहीं करवी ना करी ।
आईताही व्यापारीं । सज्जु नव्हे ॥ १११९ ॥

यालागीं स्वरूपें । उणा पुरा न घेपे ।
हें असो तो न लिंपे । देही देहां ॥ ११२० ॥

आदी पाठी = मागेंपुढे, आधीं व नंतर, पूर्वी व नंतर तो = सूर्य बिबे – बिंब दिठी – दृष्टि. आणिकाचिये = अज्ञानियाचे, इतरांचें ( १०९६ ) आरिसा = आरशामध्यें नाव – नाम ( १०९८ ) तया देहा म्हणती मेटी = त्या आत्मतत्त्वाचा व देहाचा संबंध आहे असें म्हणतात, आत्म्याचा व देहाचा संबंध. सफाई – सपायी = सर्वथैव, यच्चयावत्, संपूर्ण निर्जिवा – निर्जिव केही – केही = कधींतरी ( १०९९ ).

कापुसा–पाऊसा–(पिसा). सुवावा=घालावा, ओंवावा साधा=जोड, नाते पाषाणेसी–पृथ्वियेसी (११००) पाडे=सारखे, प्रमाणें (११०१) पाड=संबंध. उभेया–उभया=उभेयाला, जिवंताला (जिवंताला व मृताला) (११०२) अपाड=असंबंध, असबद्ध, सबंध नसतो यासी–हा=(११०३). देह=शरीर पाचाचे=पंचमहाभूताचे. कर्माचे गुणी गुंथले=प्रारब्ध कर्माच्या सूत्रात, दोरीत–दोऱ्यात –गुंतले–मळलेले–गुंफलेले भंवतसे सुदले=कुंभाराच्या चाकावरील मडक्याप्रमाणे फिरत आहे–ते जन्ममृत्यूच्या चाकावर घातले–ठेविलेले जन्ममृत्यूच्या=भवचक्रावर चढविलेलें तें पुन्हापुन्हा जन्ममृत्यु घेते (११०४) काळा नळाच्या–कानानळाच्या–कानाळाच्या=(कानरूपी अनळाच्या) कालगतीरूप अग्नीच्या कुंडी (=कुंडांत)–तोंडीं. उंडी=गोळा. मासी–माशी. पांख पाखडी तंव हे सरे=(माशी) पंख झाडते तो हें संपतें–नाहींसें होतें (११०५) विपाये–कदाचित् जाले श्वाना वरपडे=श्वानास प्राप्त का श्वानाचे स्वाधीन झालें (११०६). या चुके दोन्ही काजा–यया चुकोनि काजा करमळु=वाईट, खेदकारक, दोषाचा (११०७). सिद्ध नित्य–शुद्धसिद्ध=शुद्ध व नित्यसिद्ध, मूळचाच. आपैसा=सहज, कायम, आपला आपण. अनादिपणे=ज्याला आदि का मूळ नाडी असा अनादिपणाच्या रीतीचा (११०८) आभास–साभास (१११०) मुक्त ना बद्धु=मोकळा ना बंधु (बद्धु) (१११२) होणा न रचे=होण्यानें हा होत नाहीं आणि या दोहीचे पंचत्व तो=आहे व नाहीं हे दोन्हीं येथें सपतात–सरतात–लय पावतात. पंचत्व=लयस्थान. तो–हा (१११४) मवे ना चर्चे=हा मोजवत नाहीं का वर्णन करवत नाहीं खाचे =कमी होत नाहीं (१११५) नाम–नाव (१११६) अनुस्युति=तो अखंड ओतप्रोत भरलेला असल्यामुळें–अखंडदंडायमान–व्याप्ती–अखडपण (१११७) काहीं करवी ना करी–काहीं न करवी करी. आईता–आयता. व्यापारी=कर्मात सज्जु–सज्ज=आसक्त नव्हे–न होय आयता=विस्तृत असूनही कोणत्याहि कर्मांत आसक्त होत नाहीं (१११९) घेपे=घेतला जात नाहीं (११२०)

तरी परमात्मा म्हटलेला तो कसा म्हणशील तर जसा जळामध्यें दिसणारा सूर्य हा काही जळाने लिपलेला असत नाही (१०९५)

(ह्या देहाच्या अगोदर व नंतरही)–पाण्याच्या मागें पुढें–पाण्याच्या (पाणीरूप देहाच्या) पूर्वीं व नंतरही पण तो सूर्य तर केव्हाही असतोच असा–असलेलाच असा–हे कीरीटी, पण त्या पाण्यामध्यें (जें बिंबतें)–बिंब जें दिसतें तें अज्ञानाच्या दृष्टीनें तसें–तसें तें होय (१०९६)

त्याप्रमाणें आत्मा देहीं–ह्या देहामध्यें आहे असें म्हणणे हें कांहीं खरेपणाचे असें नाही–कारण असें पाहा की तो आत्मा तर जेथल्या तेथे आहेच आहे. (१०९७)

ज्याप्रमाणें आरशात पडलेलें मुखाचें प्रतिबिंब त्यास तर नांव हें केव्हाही आहेच, हे जसें अगदी तसेंच, ह्या देहामध्यें वसणें का असणें ह्या आत्मतत्त्वाचें तें होय (१०९८)

अशा त्या देहाचा व आत्म्याचा संबंध आहे असें म्हणणें हें तर सफाई म्हणजे सर्वथैव निर्जीव असेंच बोलणें होय. अहो वाऱ्याची व वाळूची गाठ ही कधींतरी पडते काय? (१०९९)

अहो, मोठी आग जी तिजमध्यें व पावसामध्यें का कापुसामध्यें दोरा हा कसा ओवावा–घालावा–आगीचें व पावसाचें नातें तें कसलें!–आकाशाचें व पृथ्वीचें नाते आहे–किंवा ह्या दोहींना जोडणारा साधा आहे म्हणावें तर तो कोठें आहे तो! (११००)

कोणीएक पूर्वेकडे व दुसरा कोणीएक पश्चिमेकडे अशा निघालेल्या दोन माणसाची गाठभेट ही कशी होणारी–केव्हां होणेंच नाहीं–तसल्या त्या भेटीप्रमाणें हा संबंध जाणावा (११०१)

उजेड का प्रकाश आणि अंधार याचा जसा संबंध तसा हा प्रकार जाणावा. किंवा जिवंताला व मृताला – काहीं एक सारखेपण (का कांहीं एक अमुकप्रमाणें) असें तें नाहींच, अगदीं असाच संबंध ह्या आत्म्याचा ह्या देहाशीं आहे असें जाण— (११०२)

रात्रीचा का दिवसाचा संबंध तो काय ? सुवर्णाचा आणि कापसाचा संबंध नसणें हें केव्हांही ! अगदीं तसाच हा (आत्म्याचा व देहाचा) संबंध जाण (असंबद्धतेचें) असलेंच अपाडपण आत्म्याचें व देहाचें होय (११०३)

अहो ! देह हें तर पंचतत्त्वांचें – पंचमहाभूताचें केलेलें – झालेलें – व, हें तर प्रारब्धकर्माच्या (गुणीं) सूत्रामध्यें मळलेलें – का गुंफलेलें असें, तें तर कुंभाराच्या चाकावरील मडक्याप्रमाणें जन्ममृत्यूच्या चक्रावर घातलेलें, भव का भावचक्रावर चढविलेलें असें झाल्यामुळें तें पुन्हा पुन्हा जन्मतें व मरतें (११०४)

हे काळरूपी अग्नीच्या (गतीच्या) कुंडामध्यें का तोंडामध्यें घातलेला लोण्याचा गोळाच एक जसा – व हें माशी पंख झाडते तेव्हाच हें संपतें – नाहींसें होतें. (११०५)

हें कदाचित् आगीमध्यें पडलें तर भस्म होऊनच उडत रहातें अथवा कदाचित् तें श्वानास प्राप्त झालें का श्वानाच्या स्वाधीन झालें तर मग विष्ठाच एक तें होऊन असतें (११०६)

अशा ह्या दोन्ही काजाना (वाजाना) जर का ते चुकलें तर ते कृमींचा एक पुंजाच होते व हे कपिध्वजा, असा हा परिणाम अति खेदकारक होय (११०७)

अशी तर ह्या देहाची दशा होते व आत्मा पहावा तो तर येथे ज्याला आदि का मूळ नाही अशा रीतीचा तो अनादिपणामुळें नित्य सिद्ध असा सहजपणेंच आपला आपण मूळचाच कायम असा. (११०८)

तो म्हणजे आत्मा हा निर्गुणपणामुळें – निर्गुण असल्यामुळें सकळ काहीं होऊन आहे तसेंच काहींच मुळी होऊन (त्याने असणें) नाहीं – तो अक्रिय असा, कधींही नच करणारा का सर्व काहीं करणारा असा क्रियाशीलही पण नाहीं – तसेंच तो कृश म्हणावा तर तसा नाहीं व स्थूल म्हणावा तर तसाहि तो (निर्गुण असल्यामुळें) नाहीं (११०९)

आभासाचा म्हणजे भ्रमानें दिसणारा – मिथ्यापणामुळें नच दिसणारा – असा नाहीं का (तो भासमात्र असा नाहीं तो नच भासमात्र असाही नाहीं) भ्रमाच्या आहेपणाचा असा तो नाहीं असाही मुळींच नाहीं तो प्रकाश नाहीं, अंधारही पण नाहीं – तो अल्पस्वल्प असा नाहीं का पुष्कळसा असाही पण तो 'अरूप. असल्यामुळें नाहीं (१११०)

रिक्त असा का भरलेला असा, रहित का सहित असा, मूर्त का अमूर्त (प्रत्यक्ष का अप्रत्यक्ष) असा, शून्यपणामुळें नाहीं (११११)

तो अनादि – निर्गुण – अरूप – शून्य – आत्मपणच तें – अलक्ष्य – आहे नाहींच्या लयस्थानाचा – अव्यय – आनंद नव्हे, निरानंदही नव्हे, एक नव्हे, विविध असाही नव्हे, मुक्त नव्हे व बद्धही पण नव्हे – आत्मत्वामुळें (१११२)

एवढा नव्हे, तेवढा नव्हे, आइता नव्हे, रचिलेलाही नव्हे, बोलता असें नव्हे तसाच मौनीही नव्हे – अलक्षपणामुळें. (१११३)

सृष्टीच्या होण्यानें हा होत नाहीं – रचला जात नाहीं – सर्व संहार जरी झाला तरी ह्याचें काहींच कमी होत नाही – असा, आहे व नाहीं हीं दोन्ही जेथें सरतात अशा दोहींचें तो पंचत्व म्हणजे लयस्थान होय (१११४)

तो मोजता मोजवत नाहीं किंवा वर्णिता येत नाहीं – तो (वाढीस लागून) मोठा होत नाही का कमी होत नाहीं – तो विटत नाहीं तसेंच खर्चेही पण तो होत नाहीं – अव्ययपणामुळें. (१११५)

असें हें आत्म्याचें रूप सांगितलें – असा हा आत्मा देहीं म्हणजे देहामध्यें, हे प्रियोत्तमा अर्जुना, असतो असें जें म्हणतात तेथें जसें का मठाच्या आकारानें असलेलें व्योम आकाश ते होय – जसें (१११६)

त्याप्रमाणें त्याच्या त्या (व्योमाच्या अखंडतेवर) अखंड ओतप्रोत भरलेल्या असतेपणावरच मुळी – व्याप्तीवरच मुळीं देहाकृति ह्या होत जात असतात. तो काहीं तेथे घेणारा होत नाहीं का सोडणारा होत नाहीं. हे सुमति म्हणजे चागल्या मतीच्या अर्जुना, आत्मा तो तर जैसा असे तैसाचि असे (१११७)

दिवस व रात्र हीं जशीं आकाशावर येतात व जातात त्याप्रमाणें आत्मसत्तेवरच मुळीं असणारीं हीं शरीरें जाण. (१११८)

आत्मसत्ताच एक तेथें असणारी म्हणून ह्या शरीरामध्यें आत्मा तो काहीही करवीत नाहीं कीं करीत नाहीं – तो विस्तृत असा असूनही कोणत्याहि कर्मांत (व्यापारात) सज्ज म्हणजे आसक्त होत नाहीं (१११९)

या कारणास्तव स्वरूपानें कमी का पुरता आहे असा तो (आत्मा) घेतला जात नाहीं हें असो, पण तो देही, देहामध्यें मुळीच लिप्त नच होणारा असाच जाण (११२०)

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थिते देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

सर्वगतम् = सर्वठायीं असलेलें – जाणरे – आकाश. सौक्ष्म्यात् = अत्यंत सूक्ष्म किंवा विरळ असल्यामुळें. उपलिप्यते = लिप्त म्हणजे सबद्ध होत नाहीं सर्वत्रावस्थिते = आत्मा देहामध्यें ओतप्रोत भरून – व्यापून असलेला देहधर्मांनीं लिप्त – सबद्ध होत नाहीं.

अन्वय – यथा सर्वगत आकाशं सौक्ष्म्यात् न उपलिप्यते । तथा देहे सर्वत्र अवस्थित· आत्मा न उपलिप्यते ।

अर्थ – ज्याप्रमाणें सर्वत्र असलेलें, सर्वव्यापक आकाश, तें अत्यंत सूक्ष्म किंवा विरळ असल्यामुळें त्या सर्वगामी आकाशाला कशाचाही संपर्क होत नाहीं – त्याप्रमाणें देहामध्यें सर्व जागी ओतप्रोत व्यापून असलेला आत्मा देहधर्मांनीं (कर्तृत्वभोक्तृत्वादिकानीं) संबद्ध होत नाही (३२)

**अगा आकाश के नाही । हे न रिघेचि कोणे ठाईं ।**
**परी काईसेनि कंही । गादिजेना ॥ ११२१॥**

**तैसा सर्वत्र सर्व देही । आत्मा असतुचि असे पाही ।**
**परी संगदोषे एकेही । लिप्त नोहे ॥ ११२२॥**

**पुढती पुढती येथें । हेंचि लक्षण निरुते ।**
**जे जाणावे क्षेत्रज्ञाते । क्षेत्रविहीना ॥ ११२३॥**

**संसर्गे चेष्टिजे लोहे । परी लोहो भ्रामक नोहे ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञा आहे । तैसा पाड ॥ ११२४॥**

**दीपकाच्या आर्ची । राहाटी वाहे घरीची ।**
**परी वेगळिका कोडीची । दीपा आणि घरा ॥ ११२५॥**

**पै काष्ठाच्या पोटीं। वन्हि असे कीरीटी।**
**परी काष्ठ नव्हे या दिठी। पाहिजे हा॥ ११२६॥**

**अपाड नभा आणि आभाळा। रवी आणि मृगजळा।**
**तैसाचि हाही डोळां। देखसी जरी॥ ११२७॥**

कोणे–कवणे. ठाई–ठायीं. काइसेनि–कायिसेनि कंही=कधीं गादिजेना–गादेना (जैसे)= पीडा पावत नाहीं, दोषाचे होत नाहीं (११२१) असतुचि असे=असूनही (११२२) पुढतपुढती–पुढतीपुढती=वारंवार. निरुते=खरें क्षेत्रविहीन=क्षेत्राहून भिन्न (११२३). संसर्गे=सान्निध्याने, आकर्षणानें लोहो–लोह भ्रामक=लोहचुंबक नोहे–नव्हे. तैसा–तें तुला (११२४). दीपकाच्या आर्ची–दीपकाची अर्ची=दिव्याची ज्योत राहाटी वाहे=व्यवहार चालतो, व्यापार चालविते कोडीची=कोटिश (११२५) नव्हे–नोहे दिठी–दृष्टि पाहिजे हा=पाहावा आत्मा (११२६). अपाड=वैलक्षण्य, फार अंतर देखसी जरी–देखावा पै (११२७).

अगा अर्जुना, आकाश हें कोठें नाहीं–तें सर्वत्र आहे, हें कोणत्या एकाद्या ठिकाणीं शिरत नाहीं–असत नाहीं असें नाहीं–तें सर्व ठिकाणीं आहे जरी, तरी पण कशानेंही ते पीडा केलें जात नाहीं–ते पीडिलें–का दोषाचें केलें असें होत नाहीं. (११२१)

तसा सर्वत्र सर्व देहामध्यें आत्मा असूनही, तो असलेलाच आहे असा (जाण) जरी, तरी एकाही–कोणत्याहि–संगदोषानें लिप्त होत नाहीं. (११२२)

येथें पुन पुन्हा हेंच एक लक्षण खरें असें असावें, जें का क्षेत्राहून भिन्न अशा क्षेत्रज्ञास जाणणें तें जाणून असावें. (११२३)

लोहचुंबकाच्या सान्निध्यानें लोह हें चेष्टते पण लोह हें कांहीं लोहचुंबक नव्हे जसें–तसा तितका–येथें क्षेत्रक्षेत्रज्ञाचा संबंध आहे. (११२४)

दिव्याच्या ज्योतीवर घरचे व्यवहार चालतात–दिव्याची ज्योत ही घरचे व्यापार चालविते पण दिव्याची व घराची जी कोटी ती तर अगदी वेगळिकतेची अशी आहे. (११२५)

लाकडाच्या पोटीं अग्नि असतो, हे कीरीटी, पण तो अग्नि कांहीं काष्ठ नव्हे अशा दृष्टीनें हा आत्मा पाहावा. (११२६)

नभामध्यें व आभाळामध्यें किंवा सूर्य आणि मृगजळामध्यें फार अंतर असतें, तेथें वैलक्षण्यच एक–त्याप्रमाणेंच हा आत्मा (डोळ्यानीं पाहाता डोळाच जसा–देखावाच देखावा). (११२७)

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः।**
**क्षेत्रक्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत॥ ३३॥**

प्रकाशयति=प्रकाशित करतो क्षेत्रक्षेत्री तथा=त्याप्रमाणें एकच क्षेत्रज्ञ आत्मा क्षेत्र म्हणजे सर्व क्षेत्राना, सृष्ट वस्तूंना प्रकाशित करतो.

**अन्वय—**भारत, यथा एक रविः। इमं कृत्स्नं लोकम्। प्रकाशयति। तथा। क्षेत्री। कृत्स्नं क्षेत्रम्। प्रकाशयति।

**अर्थ—**भारत! अर्जुना! ज्याप्रमाणें एकच सूर्य ह्या सर्व जगाला प्रकाशित करतो त्याप्रमाणें एकच क्षेत्रज्ञ आत्मा सर्व क्षेत्राना म्हणजे सृष्ट वस्तूंना प्रकाशित करतो (आत्मा सूर्याप्रमाणें एकच असून तो तसाच सर्वांपासून अलिप्त आहे). (३३)

**हे आघवेचि असो एकु। गगनौनि जसा अर्कु।**
**प्रगटवी लोकु। नांवे नांवें ॥ ११२८ ॥**

**एथ क्षेत्रज्ञ तो ऐसा। प्रकाशक क्षेत्राभासा।**
**या वरौते हे न पुसा। शंका नेघा ॥ ११२९ ॥**

**शब्दतत्वसारज्ञा। पै तेचि देखती प्रज्ञा।**
**जे क्षेत्रक्षेत्रज्ञा। अपाड देखे ॥ ११३० ॥**

एकु–एक प्रगटवी लोकु=निरनिराळ्या लोकावर प्रकाश पाडतो. नावे नावें=वेगवेगळ्या 'भू' आदि लोकाना, नावामुळें लोक हीं जगेंच जशी अनेक (११२८) तो ऐसा–तैसा. क्षेत्राभासा–क्षेत्रभासा. या वरौते–यावरुते (११२९). पै तेचि देखती प्रज्ञा–पै देखणी तेचि प्रज्ञा. अपाड=फार अतर, वैलक्षण्य किंवा साम्य (असाम्य) (११३०)

हे सर्व काहीं एकच (एक जगच जसें) जसें त्या एकाच गगनातील सूर्याने जगतामधील निरनिराळ्या लोकावर प्रकाश पाडला–नावामुळें लोक हे जगेच जशी पण एक सर्व जग अशींच म्हटलीं गेलेलीं

हें आघवेचि एक जग गगनौनि जसा एकु अर्कु–तेथ वेगवेगळे हे लोक असणारे. (११२८)

त्या एकाच सूर्याप्रमाणें येथें क्षेत्रज्ञ क्षेत्र आभासाना प्रकाशित करणारा–यापेक्षा आणखी काही बोलणें नाहीं, तसेंच येथे शंकाही पण घेऊं नका (११२९)

शब्दतत्त्वाचें सार जाणणाऱ्याची तीच देखण अशी प्रज्ञा होय जी का क्षेत्र व क्षेत्रज्ञामध्यें एकत्व, साम्य (का वैलक्षण्य) पाहाते (का नाहीं विलक्षणता जेथे का अत जेथे नाही असें जें पाहाणें) (११३०)

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥**

भूतप्रकृतिमोक्षम्=भूतामध्ये स्थित असणाऱ्या सृष्टीचे मूळ जी प्रकृति तिच्यापासून मुक्त होणे हे. ये ज्ञानचक्षुषा विदु=जे ज्ञानदृष्टीने जाणतात ते पर यान्ति=ते ज्ञानवान् लोक मोक्षाला पावतात

अन्वय–एवं। क्षेत्रक्षेत्रज्ञयो· अतरम्। भूतप्रकृतिमोक्षं च। ये ज्ञानचक्षुषा विदु। ते पर यान्ति ॥

अर्थ–याप्रमाणें, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यामधील भेद आणि भूतामध्यें स्थिर असणाऱ्या सृष्टीचें मूळ जी प्रकृति तिच्यापासून मुक्त होणें हे ज्ञानदृष्टीने जे जाणतात–मायेला ज्यानीं शून्यरूप केलें ते ज्ञानवान लोक परमात्वतत्त्वाला म्हणजे मोक्षाला पावतात.

इति श्रीमद्भगवदगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्याया योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे प्रकृतिपुरुषयोगो नाम त्रयोदशोऽध्याय।

**या दोहींचें अतर। देखावया चतुर।**
**ज्ञानियाचे द्वार। आराधिती ॥ ११३१ ॥**

**याचिलागी सुमती। जोडिती शांती संपत्ती।**
**शास्त्रांची दुभती। पोसिती घरी ॥ ११३२ ॥**

**योगाचिया आकाशा। वळंघिजे एवढाचि धिंवसा।**
**याचियाचि आशा। पुरुषासि गा ॥ ११३३ ॥**

शरीरादि समस्त। मानिताति तृणवत।
जीवें संताचें होत। वाहाण धरु ॥ ११३४ ॥

ऐसऐसिया परी। ज्ञानाचिया भरोवरी।
करूनिया अंतरी। निरुतें होती ॥ ११३५ ॥

मग क्षेत्रक्षेत्रज्ञाचे। जे अंतर देखती सांचे।
ज्ञाने उन्मेख तयाचे। ओवाळू आम्ही ॥ ११३६ ॥

आणि महाभूतादिकी। प्रभेदली अनेकी।
पसरलीसे लटकी। प्रकृति जे हे ॥ ११३७ ॥

ते शुकनलिकान्याये। न लगती लागली आहे।
हे जैसे तैसे होये। ठाऊके जया ॥ ११३८ ॥

जैसी माळा ते माळा। ऐसेनि देखिजे डोळां।
सर्पबुद्धि टवाळा। उखि होउनी ॥ ११३९ ॥

कां शुक्ति ते शुक्ति। हे सांच होय प्रतीती।
रुपेयाची भ्रांती। जाऊनिया ॥ ११४० ॥

तैसी वेगळी वेगळेपणे। प्रकृति जे अंतःकरणे।
देखती ते मी म्हणे। ब्रह्म होती ॥ ११४१ ॥

जे आकाशापासूनि वाड। जे अव्यक्तीची पैल कड।
ते भेटलिया अपाड पाड। पडो नेदी ॥ ११४२ ॥

आकारु जेथ सरे। जीवित्व जेथ विरे।
द्वैत जेथ नुरे। अद्वय जे ॥ ११४३ ॥

ते परतत्व पार्था। होती जे सर्वथा।
जे आत्मानात्मव्यवस्था। राजहंस ॥ ११४४ ॥

ऐसाजी हा आघवा। श्रीकृष्णे तया पाण्डवा।
उगाणा दिधला जीवा। जीवाचिया ॥ ११४५ ॥

येर कलशीचे येरी। रिचविजे जयापरी।
आपणपे तया श्रीहरी। दिधले तैसे ॥ ११४६ ॥

आणि कोणा देता कोण। तो नर तैसा नारायण।
वरी अर्जुनाते श्रीकृष्ण। हा मी म्हणे ॥ ११४७ ॥

परी असो हे नाथिले। न पुसता कां मी बोले।
किंबहुना दिधले। सर्वस्व देवे ॥ ११४८ ॥

कीं तो पार्थ जी मनीं। अजुनि तृप्ती न मनी।
अधिकाधिक उतान्ही। वाढवित असे ॥ ११४९ ॥

स्नेहाचिया भरोबरी। आंबुथिला दीप घे थोरी।
चाड अर्जुना अतरी। परिसता तैसी ॥ ११५० ॥

तेथ सुगरिणी आणि उदारें। रसज्ञ आणि जेवणारे।
मिळती मग अवतरे। हात जैसा ॥ ११५१ ॥

तैसे जी होतसे देवा। तया अवधानाचिया लवलंवा।
पाहाता व्याख्यान चढले थांवा। चौगुणे वरी ॥ ११५२ ॥

सुवायें मेघ सावरे। जैसा चंद्रें सिंधु भरे।
तैसा मातला रस आदरें। श्रोतयांचेनी ॥ ११५३ ॥

आतां आनंदमय आघवें। विश्व कीजेल देवें।
तें रायें परिसावें। संजयो म्हणे ॥ ११५४ ॥

एवं जे महाभारतीं। श्रीव्यासें अप्रांतमतीं।
भीष्मपर्वीं संगतीं। म्हणितली कथा ॥ ११५५ ॥

तो श्रीकृष्णार्जुन संवाद। नागरी बोली विशद।
सांगोनि दाऊं प्रबंध। वोवियेचा ॥ ११५६ ॥

तुसधीचि शांतिकथा। आणिजेल कीर वाक्पथा।
जे शृंगाराच्या माथां। पाय ठेवी ॥ ११५७ ॥

दाऊं वेल्हाळ देशी नवी। जे साहित्यातें वोजावी।
अमृतातेंहि चुकी ठेवी। गोडिसपणें ॥ ११५८ ॥

बोल वोल्हवितेन गुणें। चंद्रासी घेऊं उमाणे।
रसरंगीं भुलवणें। नाद लोपी ॥ ११५९ ॥

खेचराचियाहि मना। आणी सात्विकाचा पान्हा।
श्रवणासवे सुमना। समाधी जोडे ॥ ११६० ॥

तैसा वाक्‌विलास विस्तारु। गीतार्थेसी विश्व भरुं।
आनंदाचा आवारु। मांडू जगा ॥ ११६१ ॥

फिटो विवेकाची वाणी। हो ओ कानामनाची जिणी।
देखो आवडे ते खाणी। ब्रह्मविद्येची ॥ ११६२ ॥

दिसो परतत्व डोळां। पाहो सुखाचा सोहळा।
रिगो महाबोध सुकाळा—। माजी विश्व ॥ ११६३ ॥

हे निफजैल आता आघवे। ऐसे बोलिजेल बरवे।
जे अधिष्ठिलासे परदेवे। श्रीनिवृत्ति मी ॥ ११६४ ॥

म्हणौनि अक्षरी सुमेदी। उपमा श्लेष कोंदाकोंदीं।
झाडा देईन प्रतिपदी। ग्रंथार्थासी ॥ ११६५ ॥

हा ठावोवरी मातें। पुरतया सारस्वतें।
केले असे श्रामंतें। श्रीगुरुरायें ॥ ११६६ ॥

तेणें जी कृपा सावायें। मी बोले तेतुले सामाये।
आणि तुमचिये सभे लाहे। गीता म्हणो ॥ ११६७ ॥

